# व्होल्गा ते गंगा

ख्रिस्तपूर्व ६००० ते इ. स. १९४२ पर्यंतच्या आठ हजार वर्षांतील मानव समाजाच्या प्रगतीचें ऐतिहासिक, आर्थिक व राजकीय वस्तुस्थितीच्या आधारें केलेलें वीस ललित-कथांच्या स्वरूपांतील संपूर्ण चित्रण

लेखक
राहुल सांकृत्यायन

अनुवादक
व्यं. शं. वकील

लोक - साहित्य
मुंबई
१९४४



महापंडित राहुल सांकृत्यायन

फोटोग्राफर : कॉम्रेड सुनील जाना.

# प रि च य

हिटलरच्या राक्षसी फौजांनीं वेढलेल्या झुंझार लेनिनग्राद शहरांतून १९४३ च्या मे महिन्यांत मुंबईच्या पत्त्यावर एका हिंदीं गृहस्थाला पुढील तार आली:—

"ताबडतोब इकडे निघून या. आम्ही
तुमची उत्सुकतेनें वाट पाहात आहोंत.

—**इगोर**

—**एल्येना.**"

लेनिनग्राद युनिव्हर्सिटींतील 'रिसर्च स्कॉलर' **एल्येना नोर्बेतोव्ना** हिनें तयार केलेले 'मंगोलियन-रशियन' व 'तिबेटी-रशियन' शब्दकोश नुकतेच प्रसिद्ध झाले आहेत. तेथील प्राच्य-विद्या-मंदिराच्या (Oriental Institute) हिंदी-तिबेटी विभागाची ती सेक्रेटरी आहे. तिचा मुलगा **इगोर राहुलोविच** पाच वर्षे वयाचा आहे.

पत्नीची व मुलाची वरील तार आली, त्यावेळी **महापंडित राहुल सांकृत्यायन** हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यात परिभ्रमण करीत होते. मार्क्स व लेनिन यांच्या कांहीं लेखांचा हिंदी अनुवाद करण्यासाठीं नोव्हेंबरपासून तीन चार महिने मुंबईत घालवि-ल्यानंतर उन्हाळयात ते त्यांच्या अनेक वर्षांच्या रिवाजाप्रमाणें प्रवासासाठीं निघाले होते. 'वोल्गा से गंगा' या ग्रंथाच्या द्वितीयावृत्तीची व 'नये भारतके नये नेता' या ग्रंथाची तयारी करण्यासाठीं ते जून महिन्यांत दिल्ली-अलाहाबादला परत आले. तार हातीं आल्यावर त्यांनीं पासपोर्ट मिळविण्याची खटपट सुरू केली. बऱ्याच अडचणी-नंतर त्यांना आतां पासपोर्ट मिळाला आहे. अजूनहि कांहीं अडथळे आहेतच. ते सारे ओलांडतां येतील याची स्वतः राहुलजींना खात्री वाटत नाहीं. तोंपर्यंतचा काळ ते कसा घालवीत आहेत?

जान्युआरी अखेरीस दिल्ली येथें कम्युनिस्ट पार्टीच्या प्रांतिक परिषदेच्या वेळीं त्यांच्या हस्तें ध्वजारोपणाचा समारंभ झाला. त्यानंतर इंदूर येथें भरलेल्या फॅसिस्ट-विरोधी लेखक परिषदेचें अध्यक्षस्थान त्यांनीं सुशोभित केलें. मग ते मुंबईला आले. परवां मी त्यांची भेट घेण्यासाठीं गेलों तेव्हां त्यांच्यापुढें दोन हस्तलिखितांचीं बाडें पडलेलीं होतीं. एक हस्तलिखित पोथीच्या आकाराचें होतें. प्रख्यात बौद्ध नैय्यायिक

धर्मकीर्ति याच्या 'प्रमाणवार्तिक' या ग्रंथाच्या तीन अध्यायांवर प्रज्ञाकरगुप्त यानें केलेल्या भाष्याचे ते तिबेटी भाषांतर होतें. दुसरे बाड फुलस्केप कागदाचे व स्वतः राहुलजींच्या हस्ताक्षरात होते. 'प्रमाणवार्तिकभाष्य' या मूळ संस्कृत ग्रथाची राहुलजीनी उतरून घेतलेली ती नक्कल होती. दोन्हीं बाडे राहुलजींनीं तिबेटमध्ये स्वतः जाऊन महत्प्रयासानें आणली होती. या अमूल्य ग्रंथाचे संपादन करण्याचें काम 'भारतीय विद्याभवन' या संस्थेने महापंडित राहुल साकृत्यायन यांच्याकडे सोपविले आहे. हें काम संपविल्यानंतर राहुलजी 'नये भारतके नये नेता' या ग्रंथाच्या द्वितीय भागाची साधनसामुग्री मिळविण्यासाठीं आन्ध्र, तामिलनाड, केरळ, वगैरे प्रांतांत दौरा काढणार आहेत. आणि त्यानंतर—

त्यानंतर ते काय करणार याची, त्यांच्या असामान्य चरित्राची ओझरती ओळख करून घेतल्यानंतर कुणालाही कल्पना करतां येईल.

* * *

## शुकाचें कथाश्रवण

जिल्हा आझमगड (संयुक्तप्रात) येथील पन्दाहा नांवाच्या खेड्यांत ता. ९ एप्रिल १८९३ रोजी राहुलजींचा जन्म झाला. त्याचें मूळ नांव केदारनाथ पाडे असे होतें. बौद्धधर्म स्वीकारल्यापासून त्यानी राहुल साकृत्यायन हें नाव धारण केलें व तेव्हापासून त्यांच्या मूळ नावाची आठवणसुद्धा बुजून गेली आहे. पन्दाहा गांवी राहुलजीचें आजोळ होतें. आजोबा ब्रिटिश लष्करातील नोकरीतून सेवानिवृत्त झाले होते व आपल्या चिमुकल्या शेतीवाडीचे काम पाहात होते. राहुलजीचे वडील शेजारच्याच एका खेड्यातील एक गरीब शेतकरी होते. वयाच्या दहाव्या वर्षापर्यंत राहुलजी पन्दाहा येथेंच होते. व 'अपर प्रायमरी' ची परीक्षा पास झाल्यानंतर 'व्हर्नाक्युलर फायनल' चा अभ्यास करण्यासाठीं ते निझामाबाद येथे गेले.

आजोबांनीं आपल्या नोकरीचा बराच काळ जालना ( दक्षिण हैदराबाद ) येथें घालविला होता. निशाणबाजीतील त्याच्या प्रावीण्यामुळें बड्या ऑफिसरांबरोबर 'ऑर्डर्ली' म्हणून फिरण्याचा प्रसंग त्यांच्यावर अनेकदां आला व या निमित्तानें अजिठा, वेरूळ, वगैरे ठिकाणें त्याना पहावयास मिळाली. या स्थळाचें रसभरित वर्णन राहुलजीना बालपणीं आपल्या आजोबाच्या तोंडून ऐकावयाला मिळाले. ही सारी विश्वकर्म्याची कला आहे, राक्षसानीं तिची मोडतोड करण्यास सुरवात केली तेव्हा रामानें त्यांचा निःपात केला, आता पुनः राक्षसांनीं मोडतोड सुरू केली आहे, वगैरे गोष्टी हा अशिक्षित शिपाईगडी आपल्या नातवाला मोठ्या प्रेमाने सागे. बालमनावर अभावितपणें झालेल्या या संस्कारांना राहुलजींच्या प्रवास-प्रियतेचें व संशोधनकार्यांतील दुर्दम्य उत्साहाचें बरेंचसें श्रेय दिलें पाहिजे यांत शंका नाहीं. याबाबत राहुलजी मला म्हणाले—

"पुराणांत शुकाची गोष्ट आहे ना? पार्वतीच्या आग्रहावरून शंकरानें अमरत्व-प्राप्तीसंबंधीं उपदेश करण्यास सुरवात केली. मात्र त्यानें अशी अट घातली कीं पार्वतीनें सावधानपणे हा उपदेश ऐकला पाहिजे, सतत 'हुंकार' दिला पाहिजे. परंतु कांहीं काळानंतर पार्वती कंटाळून झोंपीं गेली. हुंकार मात्र चालूच होता. जवळच पिंजऱ्यात पोपट होता व पार्वतीचा हुंकार बंद झाल्यावर त्याने हुंकार देण्यास सुरवात केली. त्या शुकाने अबोधपणे ऐकलेला शंकराचा उपदेश आणि मी अबोधपणें आजोबांच्या तोंडून ऐकलेल्या कथा यात बरेच साम्य आहे."

१९०९ साली प्राथमिक शाळेतील अभ्यास पुरा करून राहुलजी कलकत्त्याला गेले. वडिलांची इच्छा मुलाने इंग्रजी शाळेत जावे अशी होती. पण मुलाचे मन एव्हांपासूनच बाहेरच्या अमर्याद जगात भटकूं लागलें होते. यापूर्वीच १९०७ सालीं एकदां राहुलजी घरातून निसटून कलकत्त्याला पळून गेले होते. खिशात फक्त आठ आणे होते. पण मुलगा घाबरला नाही. 'त्या पहिल्या अनुभवानें माझ्यांत आत्मविश्वास निर्माण केला,' असे राहुलजी म्हणत असतात. दुसऱ्यांदां कलकत्त्याला आल्यावर तेथे राहुलजींनी एका दुकानात गुमास्त्याची नोकरी धरली व अनेक वेदांत्यांची ओळख करून घेऊन त्याच्याबरोबर चर्चा केली. आठ महिन्यांनंतर ते घरीं परत गेले व १९१० च्या सुरवातीस पुन. बाहेर पडले ते कायमचेच.

## वैष्णव साधु

अयोध्या, हरद्वार, गंगोत्री, जम्नोत्री वगैरे दूरदूरचा प्रवास त्यांनीं केला. बनारस येथे संस्कृतचा अभ्यास करून व्याकरण व काव्य यांचा चांगला परिचय करून घेतला. शेवटीं १९१२ सालीं ते बिहारमधील छापडा जिल्ह्यांतील एका मठांत जाऊन वैष्णव साधु बनले तेथील महंताची त्याच्यावर मर्जी बसून ते त्याचे पट्टशिष्य व भावी मठाधिपति झाले.

सत्यशोधनासाठी हपापलेल्या या भटक्या जीवापुढें मठाच्या जीवनक्रमानें दोन नवे अंतर्गत विरोध निर्माण केले मठ म्हणजे जमीनदारी. खंडाबाबत व जमिनींच्या मालकी हक्काबाबत शेतकऱ्यांशी नेहमीं खटके उडावयाचे. कायदा आणि एकंदर वातावरण जमीनदाराला–म्हणजे मठाधिपतीला–अनुकूल. पण अशा परिस्थितीत मठाचा कारभारी या नात्यानें राहुलजी शेतकऱ्यांचीच बाजू घेत. अखिल भारतीय किसान सभेच्या भावी अध्यक्षाच्या राजकीय शिक्षणाची सुरवात या काळातच झाली.

दुसरी गोष्ट म्हणजे मठाच्या वैभवाला शोभणारी चैनबाजी. राहुलजींनी या काळापासूनच स्वदेशीचे व्रत स्वीकारले होते, व म्हणून भावी मठाधिपतीला आवश्यक असलेला कपड्यालत्त्याचा साजशृंगार त्यांना अगदी वर्ज्य असे.

मठाच्या कार्याचाच एक भाग म्हणून ते १९१३ च्या आरंभीं दक्षिणेच्या प्रवासास निघाले. मद्रासनजीकच्या एका क्षेत्रांत कांहीं दिवस घालविल्यावर रामेश्वरची यात्रा पुरी करून ते महाराष्ट्र व गुजरातच्या मार्गाने पुनः छापडा येथें परत आले. मठांत त्यांचें पाऊल क्वचिनच ठरत असे अयोध्या येथें कांहीं महिने अध्ययनासाठीं राहून ते १९१५ च्या आरंभीं आग्र्याला गेले. तेथें आर्यसमाजाच्या पुढाऱ्यांशी संबंध येऊन त्यांच्या आयुष्याला नवी कलाटणी मिळाली.

## आर्यसमाजी प्रचारक

आर्यसमाजाच्या शिकवणुकीनें त्यांच्या तर्कनिष्ठ मनाला वैष्णवधर्मापासून खेचून घेतलें. ईश्वराच्या अस्तित्वावरील श्रद्धेव्यतिरिक्त इतर बहुतेक सर्व तर्कविरोधी समजुतीपासून आर्यसमाजानें माझी सोडवणूक केली, असें ते अजून कृतज्ञतेनें म्हणत असतात. १९२७ सालापर्यंत ते आर्यसमाजी होते. पंजाबांत दौरा काढून त्यानीं आर्यसमाजाच्या संघटनेची चागली माहिती करून घेतली. आर्यसमाजाच्या प्रचाराला इस्लाम धर्माची चांगली माहिती असावी लागते, म्हणून त्यांनी अरबी भाषेचा अभ्यास केला. १९१७ सालीं त्यांना बुंदेलखंडांत आर्यसमाजाचे प्रचारक म्हणून पाठविण्यांत आले. महेशपुरा ( जिल्हा जालोन ) येथे त्यांनी प्रचारकांसाठीं खास शाळा उघडली. इस्लाम व ख्रिस्ती धर्माविरुद्ध निरनिराळया उर्दू नियतकालिकांत त्यांचे लेख प्रसिद्ध होऊं लागले. यापूर्वी मीरत येथील ' भास्कर ' मासिकांत त्यांची कांहीं प्रवासवर्णनें प्रसिद्ध झालीं होतीं.

धार्मिक विचारसरणीच्या प्रगतीतलि एक नवा टप्पा गांठण्यास आर्यसमाजाने राहुलजींना मदत केलीच, पण त्याखेरीज दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे राजकीय क्षेत्रांतील राष्ट्रवादी कार्यकर्त्यांशी त्यांचा प्रथमच संबंध आला. ऐन पंचविशींतल्या त्या तरुणाचा ओढा त्या काळच्या सर्वांत जहाल अशा दहशतवादी क्रांतिकारकांच्या गटाकडेच जास्त होता. लोकमान्य टिळकाविषयींहि राहुलजींना फार आदर असे. काँग्रेसमध्यें वरचढ असलेल्या मवाळ पुढाऱ्यांविषयीं मात्र त्यांना तिटकारा वाटे. १९१६ सालीं अलाहाबाद येथें काँग्रेसनें भरविलेल्या प्रांतिक राजकीय परिषदेला राहुलजी प्रतिनिधि म्हणून हजर होते, पण ती केवळ ' मवाळांची मजलिस ' असल्यामुळें राहुलजींना तिच्याविषयीं कांहींच उत्साह वाटला नाहीं.

## ' बाईसमी सदी '

राहुलजींच्या बुंदेलखंडांतील मुक्कामांत एक महत्त्वाची घटना होऊन त्यांच्या संपूर्ण जीवनक्रमावर तिचा चिरंतन परिणाम झाला. त्यांच्याच काय, पण साऱ्या दुनियेच्या इतिहासाला नवे वळण देणारी अशी ती घटना होती. १९१७ च्या अखेरीस राहुलजींनीं ' प्रताप ' या हिंदी पत्रांत रशियन क्रांतीची बातमी वाचली. लेनि-

नचें नांव त्यांनीं प्रथमच ऐकलें. लेनिनचा बोल्शेविक पक्ष व रशियांतील जुना दहशतवादी ' नारोदनाया वोल्या ' पक्ष यांतील भेदहि 'प्रताप'च्या लेखकाना कळत नव्हता व म्हणून राहुलजींना त्याचीसुद्धां कांहीं कल्पना नव्हती परंतु 'प्रताप' पत्रांतील रशियन क्रांतीसंबंधींचा मजकूर क्रातीला अनुकूलच असे, त्यांत या क्रांतीचे अभिनंदन करण्यांत येत होतें. इंग्रजी वर्तमानपत्रांची गोष्ट अर्थात् निराळी होती. त्यांत रशियन क्रातीविषयीं विपर्यस्त बातम्या देण्यांत येत असत व बोल्शेविकाची कुचेष्टा करण्यांत येत असे. राहुलजींनी वर्तमानपत्रें वाचण्याइतके इंग्रजीचे ज्ञान अद्यापि मिळविलें नव्हते. त्यांना हिंदी पत्रातल्या बातम्यांवरून एवढे कळले की रशियांत नवी समाजव्यवस्था अस्तित्वांत आली आहे, जुलुमशाही व पिळणूक नामशेष झाली आहे, गरीब-श्रीमंत भेद उरलेला नाही, प्रत्येकाला श्रम करावा लागतो व त्या श्रमाचें संपूर्ण फळ त्यालाच मिळते. सत्यदर्शनासाठीं आतुर झालेल्या त्या नवयुवकाच्या डोक्यांत नवा प्रकाश पडला.

१९१८ सालीं त्यांनी 'बाईसमी सदी' ( २२ वें शतक ) या आपल्या ग्रंथाचा आराखडा तयार केला. मध्यंतरीच्या कार्यव्यापृतीमुळे त्यांना १९२४ पर्यंत हा ग्रंथ पुरा करतां आला नाही. त्यानंतर त्याच्या तीन आवृत्या निघाल्या आहेत. रशियन क्रांतीच्या पहिल्या प्रकाश-किरणाच्या उबाऱ्यांत उमललेलें हे पुष्प हिंदुस्थानांतील साऱ्या देशी भाषांच्या साहित्याच्या इतिहासांत अद्वितीय समजलें जाईल. ' रिप व्हॅन् विंकल ' च्या गोष्टीतील कल्पनेचा उपयोग करून राहुलजींनी १९२४ पासून दोनशे वर्षेपर्यंत निद्रावश झालेल्या व इसवी सन २१२४ साली ' सार्वभौम सन' १०० सालीं ) जागा होऊन त्या वेळच्या समाजांतील विविध दृश्ये पाहणाऱ्या नालंदा विद्यालयातलि अध्यापक विश्वबंधूची हृदयंगम कथा लिहिली आहे. तुटपुंज्या माहितीच्या, परंतु त्याचवेळीं उदात्त ध्येयनिष्ठेच्या आणि प्रतिभाशाली कल्पकतेच्या आधारें राहुलजींनीं १९१८ सालीं जागतिक सोविएत समाजाचे हें जें कल्पना-चित्र रंगविलें, तें किती वस्तुस्थितीला धरून आहे हे पडताळून पाहण्याची संधि त्यांना कांही वर्षांनीं सोविएत रशियाला भेट देण्याच्या वेळी मिळाली, व त्यावेळी त्यांना केवढें समाधान झालें असेल याची कल्पनाच करावी.

## असहकारितेची चळवळ

बुंदेलखंडांत दोन वर्षे काढल्यानंतर राहुलजी पंजाबांत गेले. १९१९ सालीं मार्शल लॉच्या वेळीं ते तेथेंच होते. पुढें त्यानीं नेपाळच्या तराईत प्रवास केला. वेदांताविरुद्ध बंड उभारणाऱ्या बौद्ध तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्याची त्यांना तीव्र इच्छा झाली. लुंबिनी, कुसिनारा, जेतवन, वैशाली, वगैरे बौद्ध इतिहासांतील सुप्रसिद्ध स्थळांना त्यांनीं भेट दिली. तेथून ते नदिया येथें गेले. पुढील वर्षी पुनः दक्षिणचा

प्रवास करून मीमांसा व वेदांत यांचा नव्यानें अभ्यास केला. बौद्धमताचा स्वीकार करण्याची त्यांच्या मनाची धडपड चालली होती, पण ती पूर्णपणे बुद्धिनिष्ठ होती.

दक्षिणेतून परत येतांना वाटेत ते कूर्गला गेले. त्याच सुमारास असहकारितेच्या चळवळीचा भडका उठला. त्या अपूर्व देशव्यापी आंदोलनानें या तत्त्वचिंतक भटक्याला आकर्षून घेतले. १९२१ च्या जून महिन्यांत ते आपल्या प्रांतांत येण्यासाठीं निघाले. वाटेत खाडवा येथे त्यानी पहिले राजकीय भाषण केले. छापडा जिल्ह्यांत त्यांनीं खेडोंपाडी राजकीय प्रचारासाठी दौरा काढला. १९२२ च्या आरंभी त्यांना अटक होऊन सहा महिन्याची शिक्षा झाली.

बक्सार जेलमध्ये त्यानीं 'बाईसमी सदी' ह्या पुस्तकाचा खर्डा संस्कृत भाषेंत लिहून काढला तुरुंगातून बाहेर आल्यावर ते जिल्ह्यांतील एक प्रमुख राजकीय कार्यकर्ते म्हणून ओळखले जाऊं लागले. त्यांचीं भाषणें अत्यंत प्रभावी होत. याचें एक कारण म्हणजे ते मध्यमवर्गाच्या शहरी हिंदीऐवजीं स्थानिक ( भोजपुरी ) भाषेतच व्याख्याने देत असत. शेतकऱ्यांवर त्यांचा तात्काळ परिणाम होई. शिवाय 'उच्च' राजकारणाच्या लंब्याचौड्या गोष्टी सांगण्याऐवजीं ते शेतकऱ्यांच्या जिव्हाळ्याच्या प्रश्नांवरच भर देत व स्वराज्याच्या चळवळीशीं त्यांचा संबंध सहज पटेल अशा रीतीनें समजावून देत. रशियांतील क्रांतीचा संदेश त्यांनीं आपल्या माहितीप्रमाणें बिहारी शेतकऱ्याच्या कानावर घातला. महात्मा गांधींच्या चंपारण्यांतील कार्यामुळे बिहार प्रांतातील शेतकऱ्यांत फारच जागृति झाली होती. गांधीजीच्या राजकीय तत्वज्ञानाचे राहुलजींना त्यावेळी सुद्धां फारसे आकर्षण वाटत नव्हतें, पण गांधीजींनीं केलेल्या लोकजागृतीच्या अपूर्व कामगिरीविषयीं मात्र त्यांस निःसीम आदर होता.

## शेतकऱ्यांचे पुढारी

राहुलजींच्या या वेळच्या लोकप्रियतेचें आणखी एक महत्त्वाचें कारण म्हणजे ते केवळ व्याख्यानें देणारे पुढारी नव्हते. जनतेच्या तात्कालिक अडचणींचें निवारण करण्यांत प्रत्यक्ष मदत करणें, हा त्यांच्या कार्याचा एक मुख्य भाग होता. छापडा जिल्ह्याच्या कांहीं भागांत त्यावेळीं पुरानें कहर केला होता. अनेक खेडीं समुद्रांतील लहान लहान बेटाप्रमाणें अलग पडली होतीं व कांहीं तर अजिबात वाहून गेलीं होतीं. राहुलजी इतर स्वयंसेवकांसह दिवसरात्र न पाहतां होड्यांतून जाऊन खेड्यांतील लोकांना मदत करीत असत. यापूर्वीं १९१९ सालीं कानपूर जिल्ह्यांतील एका भागात प्लेगचा धुमाकूळ चालू होता तेव्हांसुद्धा राहुलजींनीं स्वयंसेवक म्हणून बहुमोल कामगिरी बजाविली होती.

लौकरच त्यांना छापडा काँग्रेस कमिटीचे सेक्रेटरी निवडण्यांत आलें. गया येथें भरलेल्या काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाला ते ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सभासद म्हणून हजर होते. १९२३ सालीं चौरीचुरा प्रकरणानंतर त्यांनीं पाटणा येथें जहाल भाषण केले व त्याबद्दल त्यांच्याविरुद्ध वॉरंट निघाले. पण अटकेअगोदरच ते नेपाळला निघून गेले होते. तेथे दीड वर्ष अध्ययन करून परत आल्यावर त्यांना वॉरंटची बातमी समजली. ते आपण होऊन पोलिसच्या स्वाधीन झाले. दोन वर्षांची शिक्षा देऊन हजारीबाग जेलमध्ये त्यांची रवानगी करण्यात आली.

ह्या कारावासाच्या मुदतीतच त्यांनी 'बाईसमी सदी' हे पुस्तक पुरे केलें. त्याखेरीज 'शैतानकी आंख' 'विस्मृति के गर्भ मे' 'जादू का मुल्क' व 'सोने की ढाल' या अद्भूत कथानकावर आधारलेल्या कादंबऱ्याहि लिहिल्या. शिवाय याच काळात त्यांनी उच्च गणितशास्त्राचा व खगोलशास्त्राचा अभ्यास केला. जगन्नाथपुरीचे हल्लीचे शंकराचार्य भारती कृष्णतीर्थ हे त्यावेळी असहकारितेच्या चळवळीत भाग घेतल्याबद्दल त्याच तुरुंगांत शिक्षा भोगीत होते. त्यांनीं गणितशास्त्राच्या अभ्यासात राहुलजींना मदत केली. आरंभी त्यांना कागद शाई मिळत नसे, तेव्हां ते पाटीवरच अभ्यास करीत. हा अभ्यास त्यांनीं सुटकेनंतरहि चालू ठेवला. भास्कराचार्यांचा व युरोपियन गणितज्ञाचा त्यांनी चागला परिचय करून घेतला.

कॉंग्रेसमध्यें 'नाफेरवाले' व 'फेरवाले' असे जे दोन तट त्यावेळीं पडले होते त्यापैकी फेरवाल्यांकडे, म्हणजे पं. मोतीलाल नेहरू देशबंधू दास, यांच्या स्वराज्यपक्षाकडे राहुलजींचा ओढा होता. परन्तु त्या वेळच्या राजकीय वादात त्यांचें मन रंगण्यासारखे नव्हते. कानपूर येथे भरलेल्या अधिवेशनाला ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सभासद या नात्यानें हजर राहिल्यानंतर ते पुनः दीर्घ प्रवासासाठीं निघाले. पंजाब, सरहद्द प्रांत व काश्मीर पायाखालीं घालून त्यांनीं पश्चिम तिबेटलाहि भेट दिली. परत आल्यानंतर प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुकीत त्यांनी काँग्रेस पक्षातर्फे प्रचारकार्य केलें. गौहती येथें भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनालाही ते ऑ. इं. काँ कमिटीचे सभासद म्हणून हजर होते.

## तिबेट-यात्रा

बौद्धग्रंथांचा पूर्ण अभ्यास करण्याची त्यांची इच्छा या सुमारास अनिवार झाली होती. १९२७ च्या मे महिन्यांत ते लंकेला गेले. तेथील 'विद्यालंकार कॉलेज' मध्यें त्यांना संस्कृतच्या प्रोफेसरची जागा मिळाली व तेथेच दीड वर्षांच्या अवधींत उपलब्ध पाली भाषेतील बौद्ध ग्रंथांचें परिशीलन करून त्यांनीं 'त्रिपिटकाचार्य' ही पदवी मिळविली. बौद्ध संप्रदायांतील मागाहूनच्या काळांतले महत्वाचे ग्रंथ पाली भाषेंत

नसून तिबेटी भाषेंत आहेत असें त्यांना आढळून आलें. स्वतः तिबेटमध्यें जाऊन हे ग्रंथ मिळवावयाचे असें त्यांनीं ठरविलें. १९२९ च्या आरंभी ते तिबेटला गेले.

तिबेटला जाणे सोपे नव्हते भौगोलिक व राजकीय अडचणींचे हिमालय ओलांडणे जरूर होते. ग्यांची वरून तिबेटला जाण्याचा त्यांतला त्यांत सोपा रस्ता आहे, पण त्या मार्गाने जावयाचे तर ब्रिटिश सरकारची परवानगी पाहिजे व ती तर कांहीं मिळेना. राहुलजींनीं नेपाळमार्गाने जाण्याचे ठरविले. एक तर हा मार्ग फार कठीण, शिवाय नेपाळच्या नागरिकांनाच या मार्गाने तिबेटला जाऊं देण्यात येतें, आणि खुद्द नेपाळमध्येसुद्धां हिंदी माणसाला महाशिवरात्रीच्या सुमाराच्या पंधरा दिवसाबाहेर राहण्याला तेथील सरकारची खास परवानगी काढावी लागते. राहुलजींचा आत्मविश्वास, दृढनिश्चय, सारे कष्ट सोसण्याची तयारी, या सर्वांची परीक्षा झाली. शिवरात्रीच्या वेळीं ते नेपाळांत गेले व मुदत संपल्यानंतर तेथेच वेषांतर करून राहिले. संधि मिळतांच त्यानी लद्दाकच्या रहिवाशाचा वेष घेऊन तिबेटचा रस्ता सुधारला. प्राचीन बौद्ध भिक्षूंची परंपरा अजून जिवंत आहे हे त्यानीं सिद्ध केले.

यावेळीं त्यानी १५ महिने तिबेटमध्ये काढले. या प्रवासाचे वर्णन त्यांनी 'तिब्बत में सवा वर्ष' या पुस्तकांत दिले आहे. २२ खेचरांवर हस्तलिखिताच्या बाडाचें ओझे लादून ते स्वदेशीं परत आले व तेथून लंकेला गेले. बरोबर आणलेलें अमूल्य सांस्कृतिक धन सुखरूप ठिकाणी पोचविणे सोपे नव्हते. ज्या परिस्थितीत त्यानी तिबेटचा प्रवास केला होता ती लक्ष्यात घेतल्यास याची सहज कल्पना येईल. तथापि सुदैवानें कांहीं घोटाळा झाला नाही. तिबेटहून आणलेली ऐतिहासिक महत्वाची अनेक चित्रे त्यांनी पाटणा येथील संग्रहालयाला देऊन टाकली. पाटणा म्यूझियममध्यें **'राहुल सेक्शन'** म्हणून एक खास विभाग आहे व तेथे या चित्रांना मानव जातीचा बहुमोल सांस्कृतिक वारसा म्हणून अढळ स्थान मिळाले आहे. पुस्तके बिहार-ओरिसा रिसर्च सोसायटीला दिली. लंकेंतील या वेळच्या मुक्कामात राहुलजींनी बौद्ध भिक्षूची दीक्षा घेतली. तिबेटांतून आणलेल्या ग्रंथांना सुरक्षित स्थान मिळाल्याची खात्री करून घेतल्यानंतर ते १९३० अखेरीस हिंदुस्थानांत परत आले.

## युरोपचा प्रवास

त्यावेळी देशभर कायदेभंगाच्या चळवळीची लाट उसळली होती. हजारों देशभक्त तुरुंगात होते. कॉंग्रेस बेकायदेशीर झाली होती व तिचे कार्य गुप्त संघटनेच्या द्वारें चाललें होतें. राहुलजी या गुप्त कार्यात सामील झाले. पण लौकरच 'गांधी-आयर्विन' तडजोड झाली. तेव्हांपासून राहुलजी पुनः राजकीय चळवळीपासून अलग झाले. कराची कॉंग्रेसला ते हजर होते. तेथेच त्यांना प्रथम लाल झेंडा पहावयास मिळाला.

तिबेटांतून आणलेल्या ग्रंथांचा अभ्यास व संशोधन करण्याचें काम त्यांनीं सुरू केलें. वसुबन्धु (सुमारें इ. स. ३७५) याचा '**अभिधर्मकोश**' संशोधित करून स्वतःच्या संस्कृत भाष्यासह राहुलजींनी १९३१ साली तो प्रसिद्ध केला त्याखेरीज '**बुद्धचर्या**' या नांवानें गौतम बुद्धाचें नवे चरित्र त्यांनीं लिहून प्रसिद्ध केलें पाली भाषेंतील अत्यंत प्राचीन ग्रंथाच्या आधारें लिहिलेल्या या संशोधनात्मक चरित्राला ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झाले आहे. याच वेळीं राहुलजींचे लक्ष्य मार्क्सवादाकडे वळूं लागलें होतें. प्राचीन बौद्धविद्येत रंगलेल्या त्यांच्या चिकित्सक मनाला मार्क्सवादाचें अद्यावत् तत्त्वज्ञान आकर्षूं लागले होतें. १९३१ मध्यें त्यानी मार्क्स-एंगल्सच्या 'कम्युनिस्ट जाहीरनाम्या'चा हिंदी अनुवाद करण्यास सुरवात केली. पण तो पुरा होण्यापूर्वीच त्यांना यूरप-यात्रा करण्याची संधि मिळाली.

१९३१ अखेरीस ते लंकेला परत गेले व तेथील बौद्ध मिशनतर्फे पांचसहा महिन्यांनंतर त्याना यूरपला पाठविण्यांत आले. प्रथम ते इंग्लंडला गेले. तेथील मुक्कामांत कम्युनिस्ट पार्टीचे 'डेली वर्कर' पत्र ते नियमितपणे वाचीत असत. सोविएत रशियासंबंधी अनेक पुस्तकेंहि त्यांना वाचावयास मिळाली व कांहीं कम्युनिस्टांची ओळख झाली. फ्रान्समध्ये त्यावेळचे सर्वश्रेष्ठ भारतेतिहासशास्त्रज्ञ (Indologist) प्रो. सिल्वां लेवी यांच्याशी त्यांचा परिचय झाला. 'जूर्नाल आशियातिक' या नियतकालिकांत बौद्धविद्येवर (Buddhology) राहुलजींचे अनेक लेख प्रसिद्ध झाले. रशियाला भेट देण्याच्या उद्देशाने ते जर्मनींत गेले. पण त्यांची इच्छा यावेळी पूर्ण झाली नाहीं. जर्मनींतून रशियांत पाठवावयाच्या विद्यार्थ्यांचा शेवटचा गट नुकताच रवाना झाला होता व पुढचा गट पाठविण्याला काहीं महिन्यांचा अवधि होता. राहुलजींना इतका वेळ थांबणें शक्य नव्हते व म्हणून ते १९३३ च्या आरंभी हिंदुस्तानात परत आले. या प्रवासाचे वर्णन त्यांनीं 'मेरी यूरपयात्रा' या पुस्तकांत केलें आहे.

## जगद्वंद्य पंडित

या पुढील त्यांचा प्रतिवर्षाचा कार्यक्रम उन्हाळ्यांत परदेशांत प्रवास करावयाचा व बाकीचे महिने स्वदेशांत कुठे तरी—विशेषतः पाटणा येथें डॉ. जयस्वाल यांच्या घरीं—राहून अभ्यास व लेखन करावयाचें असा होता. १९३३ सालीं ते लद्दाकला पुनः गेले. १९३४ साली त्यानी दुसऱ्यांदां तिबेट-यात्रा केली. या प्रवासासंबंधींचा त्यांचा ग्रंथहि प्रसिद्ध झाला आहे. या खेपेस त्यांना प्रज्ञाकर गुप्त यांचें '**प्रमाणवार्तिक भाष्य**' सापडलें. धर्मकीर्तीनें स्वतःच्या '**प्रमाणवार्तिक**' ग्रंथाच्या एका अध्यायावर '**प्रमाणवार्तिकस्ववृत्ति**' नांवाचें भाष्य लिहिलें आहे. बाकीच्या अध्यायांवरील प्रज्ञाकरगुप्ताच्या भाष्याचा उल्लेख इतर ग्रंथांत होता पण तें उपलब्ध

मात्र नव्हतें. या अमूल्य शोधाबद्दल जगांतील सध्यांचे सर्वश्रेष्ठ भूतशास्त्रज्ञ व लेनिनग्रादच्या प्राच्य-विद्या-मंदिराचे प्रमुख **डा. श्चेरबात्स्की** यांनीं पुढील शब्दांत राहुलजींचे अभिनंदन केलें--

" आतांपर्यंत अनुवादांच्या द्वारांच ज्याचा आम्हांला अभ्यास करावा लागत असे त्या मूळ संस्कृत ग्रंथांचा तुम्ही शोध लावल्यामुळे फारच प्रचंड परिणाम घडून आला आहे. विशेषतः प्रज्ञाकर गुप्ताच्या भाष्यासहित प्रमाण-वार्तिक' च्या अध्यायाचा तुम्ही जो शोध लावला तो फारच महत्त्वपूर्ण आहे. या अत्यंत मूल्यवान ग्रंथाचें प्रकाशन होण्याची मी फारच अधीरतेने वाट पहात आहे."

**प्रो. सिलवां लेवी** यांनीहि राहुलजींच्या कार्याची मुक्तकंठाने स्तुति केली आहे. १९३२ साली राहुलजींना लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात—

" तुमच्या सुंदर, सुबोध व अस्खलित संस्कृत लेखनशैलीबद्दल मी प्रथम तुमचे अभिनंदन केले पाहिजे. तुमचे लेखन पुनः वाचतांना मला फार आनंद झाला. अश्वघोष, नागार्जुन व वसुबन्धु यांनी जिचा अत्यंत प्रभावी रीतीनें उपयोग केला अशा या संस्कृत भाषेत तुमच्याइतक्या सुंदर रीतीने निदान गेल्या शंभर वर्षांत—नेपाळातील पंडित अमृतानंदानंतर—दुसऱ्या कुणीहि लेखन केले असेलसे वाटत नाहीं. तुमच्या ' अभिधर्मकोश ' ग्रंथावरून संस्कृत भाषेवरील तुमच्या प्रभुत्वाची पुनः साक्ष पटते; त्या ग्रंथाला तुम्ही लिहिलेल्या प्रस्तावनेवरून तुमचे प्रचंड वाचन व अनेक भाषांचे ज्ञान यांचा पुरावा मिळतो."

पाटणाचे विद्वान इतिहासज्ञ **डॉ. काशीप्रसाद जयस्वाल** यांना लिहिलेल्या पत्रांत डॉ. श्चेर्बात्स्की म्हणतातः--

" राहुलजींनीं धर्मकीर्तीच्या ग्रंथांचा शोध लावून व ते मिळवून जी अद्भुत कामगिरी बजाविली आहे तिची बातमी ऐकून आम्हांला अत्यंत हर्ष झाला. धर्मकीर्ति म्हणजे भारतवर्षाचा कॅन्ट. आतांपर्यंत त्याचे ग्रंथ चिनी व तिबेटी भाषातच उपलब्ध होते. पण आतां मूळ ग्रंथ सापडले. मी व माझे सहाय्यक डॉ. वोसत्रिकोव हे ग्रंथ पाहण्यासाठीं हिंदुस्थानांत येऊं इच्छितों. तज्ज्ञांची एक लहानशी कमिटी स्थापन करून या ग्रंथांच्या प्रकाशनाची व्यवस्था करा."

## सोविएत भूमि

१९३५ साली राहुलजींनी जपान, कोरिया, मॅचूरिया व चीन या देशांना भेट दिली. तेथूनच ते पुढें सैबेरियाच्या मार्गे रशियांत गेले. त्याच्या पासपोर्टवर फक्त ' प्रवासाचा परवाना ' ( Transit visa ) असल्यामुळें रशियांत चार आठवड्यांहून जास्त राहणें त्यांना शक्य नव्हतें. मॉस्को, बाकू, वगैरे शहरांचे ओझरतें दर्शन घेऊन इराण मार्गानें ते स्वदेशीं परत आले.

पण १९३७ सालीं सोविएत देशाकडून या भारतीय विद्वानाला खास आमंत्रण आलें. लेनिनग्रादच्या प्राच्य-विद्या-मंदिरात त्यानी संशोधन करावे अशी विनंति करण्यात आली. सोविएत यूनियनच्या 'ॲकॅडमी ऑफ सायन्सेस' कडून आलेलें हें पत्र कोणत्याहि कारणास्तव म्हणा राहुलजीच्या हातीं पडू शकले नाही. परंतु पांच-सहा महिन्यानंतर पुनः पत्र आलें, इतकेंच नव्हे तर 'तेहरानला तुमच्यासाठीं व्हिसा पाठविण्यात आला आहे' असेंहि त्यांना कळविण्यांत आलें.

लेनिनग्रादला जाऊन त्यानी आपल्या कार्याला सुरवात केली. तेथील त्यांची सहकारिणी एल्येना नोर्बेतोवना हिच्याशी त्याचा विवाह झाला. परंतु चारपांच महिन्यांतच त्याना स्वदेशीं परत जाणे आवश्यक झालें.

हिंदुस्थानात प्रांतोप्रांती कॉंग्रेसची मंत्रिमंडळे स्थापन झालीं होतीं. तिबेटमध्यें राहुलजीना साधनसामुग्रीसह पाठविण्याचे बिहारच्या मंत्रिमंडळानें ठरविले. तेथील सर्व ग्रंथांची नक्कल करून आणणें अशक्यप्राय होते. त्यांचे फोटो घेऊन आणावे असें राहुलजीच्या मनात फार दिवसांपासून होतें. हें खर्चाचे काम कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या सहानुभूतीमुळें आता शक्य झालें. लेनिनग्रादला पुनः कधींतरी येता येईल, पण कॉंग्रेस मंत्रिमंडळ मात्र किती दिवस अधिकारारूढ राहील याची खात्री नाही, असा विचार करून ते हिंदुस्थानात ताबडतोब परत आले. अपेक्षित पुत्रजन्माची वाट पाहण्याचा मोहहि त्यानी आवरला.

## तिसरी तिबेट-यात्रा

तिसऱ्या तिबेट-यात्रेला निघण्यापूर्वी त्यांनी 'सोविएत भूमि' हा विस्तृत ग्रंथ लिहून काढला. 'बाईसमी सदी' या पुस्तकातील कल्पनाचित्राच्या सत्यतेचा प्रत्यक्ष निरीक्षणावर आधारलेला तो पुरावाच आहे. या खेपेस सरकारचे अधिकृत प्रतिनिधि म्हणून राहुलजी तिबेटात जात असल्यामुळे त्याचा मार्ग सोपा होता. धर्मकीर्ति, प्रज्ञाकर गुप्त, ज्ञानश्री, नागार्जुन, आसंग, वसुबन्धु, रत्नाकर शांति, भव्य, गुणप्रभ, वगैरे केक पंडिताच्या संस्कृत ग्रंथाचे फोटो त्यांनी आणले. या ग्रंथाचीं संख्या सुमारें ७० असून त्यांतील श्लोकाची संख्या दीड लक्ष आहे. त्याखेरीज ५० हजार श्लोकाची त्यांनी स्वतः नक्कल करून आणली. याच वेळी राहुलजीना इ. सन ८५० च्या सुमारास होऊन गेलेल्या सरहपा नावाच्या कवीच्या हिंदी दोह्यांचा शोध लागला व त्याचेहि फोटो त्यानी आणले. हिंदी भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनें हा शोध अत्यंत महत्त्वाचा होता. बुद्धगयेच्या मंदिरांची बाराव्या शतकातील हुबेहुब नक्कल त्यांना तिबेटात आढळली, तिचाहि फोटो त्यानी आणला आहे.

कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या आश्रयाने राहुलजी या खेपेस तिबेटला गेले होते खरे, पण त्यांनीं स्वतःच्या खर्चासाठीं किती पैसे घेतले होते? फक्त शंभर रुपये!

प्राचीन बौद्ध भिक्षूंच्या बाण्यानें प्रवास करणाऱ्या या आधुनिक पंडिताची मुख्य आकांक्षा कोणती होती ? सत्यदर्शन हीच. हें सत्य जीवनांतच आढळेल हें त्या बौद्ध भिक्षूंप्रमाणें त्यालाहि कळून चुकले होतें. आणि आजच्या जीवनावर झगझगीत प्रकाश पाडणारा नवा दीप मार्क्सवादानें व सोविएत संस्कृतीनें त्याच्या हातीं दिला होता. कम्युनिस्ट चळवळीचा झेंडा उत्साहानें हातीं घेणे ही त्यांच्या आतांपर्यंतच्या आयुष्याची क्रमप्राप्त परिपूर्ति होती.

## कम्युनिस्ट पुढारी

१९३८ अखेरीस तिबेटहून परत आल्यावर राहुलजी कलकत्त्याला गेले व तेथें कॉ. सोमनाथ लाहिरी यांना भेटून त्यानीं कम्युनिस्ट पार्टीचा सभासद होण्याची इच्छा व्यक्त केली. पाटणाच्या 'जनता' साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेला श्री. मिनू मसानी यांचा एक सोविएत-विरोधी लेख तिबेटच्या मुक्कामांतच राहुलजींच्या पाहण्यांत आला होता व बिहारमधील बहुतेक सारे कॉंग्रेस सोशालिस्ट या लेखामुळें मसानींविरुद्ध आपणांइतकेच चिडले आहेत हें राहुलजींना ठाऊक होतें. स्वतः श्री. जयप्रकाश नारायण यांनी सुद्धा 'ते केवळ मसानींचे वैयक्तिक मत आहे, कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षाशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं' अशी सारवासारव करून राहुलजींची समजूत घालण्याचा प्रयत्न केला होता. अशा परिस्थितीत कम्युनिस्ट पुढाऱ्यानीं जेव्हा राहुलजींना बिहारमध्ये कॉंग्रेस सोशालिस्ट पार्टीची संघटना करण्याकडेच लक्ष देण्याचा सल्ला दिला तेव्हा त्यानीं–बऱ्याचशा नाखुषीनें–तो मान्य केला. पुढील काळांत कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षाचे स्वरूप पालटल्यानंतर बिहारमधील त्या पक्षाचे बहुतेक सर्व सभासद कम्युनिस्ट पार्टीत आले.

शेतकऱ्याची संघटना हे राहुलजीनी आपले मुख्य कार्यक्षेत्र म्हणून पत्करलें. बिहार किसानसभेची प्रचंड वाढ करण्यांत त्यानी स्वामी सहजानंद वगैरेंच्या बरोबरीनें कार्य केलें आहे. १९३८ सालातील किसानांच्या 'बकास्त' चळवळींत त्यांना एकदां दीड वर्षाची व नंतर दोन वर्षाची अशा दोन सजा झाल्या. स्थानिक अधिकाऱ्यानीं शेतकऱ्यांवर दहशत बसविण्यासाठी व त्याचवेळीं राहुलजींवर वैयक्तिक सूड उगविण्यासाठी त्यांना एका तुरुंगातून दुसऱ्या तुरुंगांत नेताना मुद्दाम हातकड्या घातल्या. दोन्ही वेळच्या तुरुंगवासात बरोबरच्या शेतकरी राजबंद्यांना योग्य वागवणूक मिळण्यासाठी राहुलजींनी पंधरा पंधरा दिवस अन्नसत्याग्रह केला, व दोन्ही वेळा तो यशस्वी होऊन राजबंद्याच्या मागण्या मिळाल्या व राहुलजीहि मुदतीच्या आंत सुटले.

## शेवटचा कारावास

१९४० च्या मार्च महिन्यांत पालिसा ( ओरिसा प्रांत ) येथे भरावयाच्या अखिल भारतीय किसान कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड करण्यात आली. पण

हीं परिषद भरण्यापूर्वीच ता. १४ मार्चे रोजीं त्याना डिफेन्स ऑफ इंडिया कायद्या-खालीं अटक झाली. कांहीं महिने हजारीबाग जेलमध्ये ठेवल्यानंतर त्यांना कुप्रसिद्ध देवळी कँपमध्ये रवाना करण्यात आले. तेथे त्याचा बहुतेक प्रमुख कम्युनिस्ट पुढाऱ्यांशीं प्रथम परिचय झाला. या तुरुंगवासाच्या काळांत त्यांनीं पुढील ग्रंथ लिहिले:—

( १ ) '**वोल्गा से गंगा**'—मानवी समाजाच्या विकासाचें कथात्मक चित्रण.

( २ ) '**सिंह सेनापति**'—इ. स. पूर्व ५०० च्या काळासंबंधीं ऐतिहासिक कादंबरी. प्राचीन गणराज्यांच्या समाजाचे कलात्मक चित्रण. स्वतः राहुलजींना ही कादंबरी 'वोल्गा से गंगा' पेक्षांहि अधिक महत्त्वाची वाटते.

( ३ ) '**मानव-समाज**'—मानवजातीच्या इतिहासाचें स्थूलदर्शन.

( ४ ) '**दर्शन-दिग्दर्शन**'—तत्त्वज्ञानाचा संक्षिप्त इतिहास.

( ५ ) '**वैज्ञानिक भौतिकवाद**'—मार्क्सवादी तत्त्वज्ञानाची रूपरेषा.

( ६ ) '**विश्व की रूपरेखा**'—विश्वाच्या रचनेसंबंधी सुगम शास्त्रीय विवेचन.

शेवटचे चार ग्रंथ मिळून एक प्रचंड ज्ञानकोशच राहुलजींनी तयार केला आहे.

जुलै १९४२ मध्ये सुटका झाल्यापासून राहुलजींचा विविध उद्योग सारखा चालू आहे. या लेखाच्या आरंभी दिलेल्या त्यांच्या अगदीं अलीकडील कार्याच्या आढाव्यावरून या उद्योगाच्या स्वरूपाची कल्पना करता येईल.

## साहित्याचे हिमालय

राहुलजींनी आतापर्यंत सुमारे साठ ग्रंथ लिहिले आहेत. त्यांचे विषय किती विविध! आणि हे केवळ निष्काळजीपणानें भरकटलेलें लिखाण नाहीं; विद्वत्ता, अभ्यास, चिंतन, अनुभव, यांच्या अढळ पायावर उभारलेले हे साहित्यिक हिमालय आहेत. त्यांनी प्रवासवर्णनाची ८ पुस्तकें लिहिली आहेत, ८ कादंबऱ्या लिहिल्या आहेत. भोजपुरी भाषेत ८ छोटी नाटकें लिहिलीं आहेत. संस्कृतमध्ये दोन ग्रंथ ('विज्ञप्तिमात्रा सिद्धि' आणि 'अभिधर्मकोशवृत्ति') लिहिले आहेत. सिंहली (सिलोनी) भाषेचा परिचय करून देणारीं ४ पुस्तकें, व तिबेटी व्याकरणावर पुस्तक लिहिण्यासहि त्यांनी वेळ काढला आहे. 'सोविएत यूनियन कम्युनिस्ट पार्टीचा इतिहास' या मार्क्सवादी प्रमाणग्रंथाचा व मार्क्स-लेनिनच्या अनेक लेखांचा त्यांनीं अनुवाद केला आहे.

सध्यां त्याचे 'मेरी जीवनयात्रा' हें पुस्तक छापत आहे. त्यांत त्यानीं १९२७ पर्यंतचे आपले आत्मचरित्र दिले आहे. गणराज्याच्या अंतिम अवस्थेतील, इ. सनाच्या चौथ्या शतकांतील, समाजाचें चित्रण करणाऱ्या एका कादंबरीची रूपरेषा त्यांनीं तयार करून ठेवली आहे.

राहुलजींचें भाषाज्ञान अद्वितीय आहे. इंग्लिश, फ्रेंच व रशियन भाषांचा त्यांनीं उत्तम अभ्यास केला आहे. जर्मनचाहि थोडा परिचय आहे. पर्शियन, अरबी व तिबेटी भाषा त्यांना उत्तम येतात. चिनी भाषेत त्यानी एक हजार शब्दापर्यंत प्रगति केली होती. आपल्या देशातील हिंदीखेरीज बंगाली, गुजराथी व मराठी भाषांतील ग्रंथ ते वाचूं शकतात. हिंदीच्या ३३ स्थानिक उपभाषाचा (dialects) त्यांनीं तुलनात्मक अभ्यास केला आहे. तामिल व कानडी भाषातहि त्याची बरीचशी गति आहे.

अलिकडे कांहीं वर्षे त्याच्या डोक्यात नागरी लिपी सुधारणेचे विचार घोळत आहेत. सध्यांच्या ५०० खिळ्यांऐवजी ११२ खिळ्याची 'केस' छापण्याच्या कामासाठी कशी तयार करतां येईल, याविषयी त्यानी एक सविस्तर योजना तयार केली असून हिंदीचें व्याकरण अधिक सोपें करण्याच्या बाबतींतहि त्याचा विचार चालू आहे.

## साहित्यिकांना संदेश

आणि राहुलजी अजून पन्नास वर्षांचेच नवजवान आहेत ! त्यांच्या लाजऱ्या मुखावर अजून बाल्याचा तजेला दिसतो. त्यांच्या डोळ्यांत करारी वृत्तीचें तेज चमकत असतें. त्याच्या कामाचा उरक पाहून त्याच्या तरुण सहकाऱ्यानाहि हेवा वाटतो.

भारताच्या सांस्कृतिक निधीचें रक्षण व वर्धन करण्यात राहुलजीनी बजाविलेली कामगिरी अमूल्य आहे आणि म्हणून परवां इंदूर येथें त्यांनीं काढलेले पुढील उद्गार प्रत्येक भारतवासीयाच्या हृदयाला जाऊन भिडतील.

"सांस्कृतिक निधि की रक्षा और नवनिर्माण की अभिलाषा यही वे बातें हैं, जिन्होनें हमें फासिस्टवाद का घोर विरोधी बनाया। हमें अफसोस है कि हमारे कितने ही साहित्यकार अभी इसे समझते नहीं हैं कि फासिस्टवाद दुनिया के हरेक जाति कि संस्कृति और नव निर्माणका कितना महान शत्रु है। जर्मन फासिस्तोंनें ताल्स्तायके आश्रमको—विश्वके उस अमर कलाकार की पवित्र समाधीको—ध्वस्त और अपवित्र किया, लेकिन यहि हमारे साहित्यकारने उससे यह नहीं समझा कि उन हाथों और पैरों से हमारे रवीन्द्र के शान्तिनिकेतन और आधुनिक कवि कुलगुरु की मधुर स्मृतिचिन्हो के लिये क्या आशा कीं जा सकती है। क्या फासिस्ट जर्मन और जापानी कवींद्र की स्वहस्तलिखित पुलियो और स्वसंग्रहित साहित्यनिधियों को जलाकर चाय नहीं तैयार करेंगे। देश की स्वतंत्रता के प्रतिक्षण अधीर जवाहिरलाल, राजनीतिज्ञ ही नही लेखक जवाहिरलाल, विदेशी शासन के प्रति अपार घृणा रखते भी, क्यों फासिस्टो के खून का प्यासा बना। फासिस्टों के प्रति तटस्थता हमारी हरगिज नहीं हो सकती।"

—शं. वा. देशपांडे.

# मानवसमाजाला 'वोल्गा ते गंगा'चा प्रवास कुठें नेतो?

"वोल्गा ते गंगा" हा हिंदी वाङ्मयांतील एक ऐतिहासिक महत्त्वाचा ग्रंथ आहे. वोल्गा नदीच्या किनाऱ्यावर अर्धमानुष अर्धपाशव स्थितीत राहणारा मानवसमाज आठ हजार वर्षांच्या संघर्षानंतर प्रगतीच्या कुठच्या टप्प्याला कसा येऊन पोहोंचला आहे हे कथेच्या रूपानें राहुलजींनी या पुस्तकात सांगितलें आहे.

हा ऐतिहासिक कथाचा संग्रह आहे खरा. पण हिंदी वाङ्मयामध्ये आजपर्यंत जे ऐतिहासिक कथासंग्रह अथवा कादंबऱ्या निर्माण झाल्या, त्याहून याचें स्वरूप अत्यंत भिन्न आहे.

इंग्रजी राजवटीच्या अगोदरचे कुठचेहि साल कल्पून त्यांत एखादा राजा-राणी, किल्ला-तरवार, सोगा-पायजमा अथवा कौपीन यांचा मालमसाला चढवून गोष्ट मढवली की ती ऐतिहासिक झाली—असें कांहींसे आजच्या ऐतिहासिक कथांचे स्वरूप असते. तसें हे पुस्तक नाहीं. यांत सत्य इतिहास-कथन आहे.

पण या इतिहास-कथनाचें सत्य, गोष्टींमध्ये वापरलेल्या नामावलीवरून ध्यायचें नाही. मानवी प्रगतीचा रस्ता ज्या मूलभूत नियमाने आंखला जातो त्या नियमाचें सत्यसंधन या गोष्टीच्या द्वारें केलें आहे म्हणून या संग्रहाला एक प्रकारें इतिहासाचें स्वरूप आलें आहे. पण तो इतिहास नाहीं; गोष्टी-संग्रहच आहे.

कारण इतिहासप्रगतीची फोड शास्त्ररूपानें न मांडता त्या त्या कालातील व्यक्तींच्या रागद्वेषादि विकार-विचार-भावनांच्या प्रकर्षाचें चित्र उभारून केली आहे.

राहुलजींना ज्या इतिहास-शास्त्राची मांडणी करायची, त्याची शास्त्रीय आंखणी त्यांनीं आपल्या "मानवसमाज" या ग्रंथांत केल्याचें या संग्रहाच्या प्रस्तावनेंतच सांगितलें आहे. मार्क्सच्या ऐतिहासिक भौतिकवादाच्या सिद्धांताची किल्ली वापरून हिंदी मानवसमाजाच्या प्रगतीच्या इतिहासाचे दरवाजे उघडून दाखवावयाचे; आपण होतों कसे व आज कसे झालों आहोंत; आणि ते कां, हें सांगून पुढची पायरी जाणतेपणानें आपण कशी चढूं शकतों, हें सांगायचें, हा त्यांचा या कथा लिहिण्याचा उद्देश त्यांनीं सांगितला आहे.

कम्युनिस्ट इतिहासशास्त्र मानवसमाजाच्या प्रगतीबद्दल काय म्हणतें?

मानवसमाजाच्या प्रगतीचीं पांच युगे त्याला दिसतात : (१) प्राथमिक गण-संघाचें युग (२) गुलामागिरीचें युग (३) सरंजामशाहीचें युग (४) भांडवलदारी युग (५) कम्युनिझमचे युग.

हीं पांच युगें कुठच्या लक्षणांनीं ओळखायचीं ? प्रत्येक युगाचा आगम आणि विलय हीं प्रगतीकडेच नेतात काय ? त्यांच्या आगम-विलयाला कोण कारणीभूत होतो ? हीं मनुष्यनिर्मित आहेत का दैवनिर्मित ? असे अनेक प्रश्न त्यांसंबंधीं उप-स्थित करतां येतील.

मनुष्यजीवन सुखी करण्यासाठी लागणाऱ्या वस्तूंची निपज व बुद्धीची उपज यांनीं इतिहास मापला तर मानवसमाज प्रगतीकडेच जात आहे यांत कुणी शंका बाळगणार नाही. कथासंग्रहांतील निशा-परिवाराच्या परिस्थितीपासून चालत निघालेला मानवसमाज १९४२ च्या समाजाशी तोलून पाहिला की कोणीहि सर्वसाधारण मानव सहज मान्य करील की आपण प्रगत झालो आहोत. कच्चे मांस व हाडुक चघळणाऱ्या नग्न निशापरिवारापेक्षां आपण प्रगत नाही असे कोण म्हणेल ? –फक्त निशाचरच !

ही प्रगति ज्या टप्प्यांनी गाठली जाते ती युगे. खाद्यपेयादि पदार्थांची निपज व ती भोगण्याची कला ज्या साधनानी साधली जाते ती साधनें हा टप्पा ठरवितात. त्या साधनांच्या परिस्थितीला अनुसरून मनुष्यांमनुष्यांचे जे संबंध ठरले जातात ते संबंध हा टप्पा ठरवितात. साधनानी माणूस बदलतो व माणूस साधनांना बदलतो व दोहोंच्या समासाने इतिहास आणि जग बदलून मनुष्य सुखाप्रत जातो.

निसर्ग आपोआप कुणाला वस्तूंचा पुरवठा करीत नाहीं. गवत आणि गाय हीं दोनही निसर्गजन्य खरी. पण गाईची भूक शमवायला गाईने गवताकडे गेलें पाहिजे. गाय आणि माणूस हे दोनही निसर्गजन्य खरे. पण माणसाची भूक शमवायला त्याने गाय गवताकडे जाते तसें गाईकडे वळून भागणार नाही. वन्य गाईला माणसाळ-ण्याची कला, तिला दावें बांधून धरण्याची कला, दूध दोहण्याची व दोहण्यासाठी भांडें घडविण्याची कला, त्याला प्रथम साधावी लागते. कुरणाचें गवत संपलें तर गाय तें निपजूं शकत नाहीं–ती बुद्धि तिला नाही. पण गाईचें गवत संपलें तर तें उगविण्याची, पुढची तरतूद करण्याची बुद्धि, कला, हत्यारें, माणूसच निर्माण करूं शकतो. गवताबाबतचे श्रम दोघांचेही श्रमच दिसतात. पण एकाचे श्रम केवळ निस-र्गानें दिलेलें भोगून जगणे–अहेतुक–असे असतात. गवताची निपज, त्यासाठीं हत्यारें, नांगरट, कुरणाची मालकी वगैरे गोष्टींना अनुसरून आपसांतले संबंध ठरवून गाय-समाज झालेला मिळत नाहीं. गायींचा कळप होतो–समाज नाही.

पण गवताची उगव, कांपणी, सांठण, कुरणाची मालकी व वापर या सर्व बाब-तींतील विशिष्ट संबंधांनीं माणूस मात्र बांधला जातो, श्रम करतो, उपभोग घेतो. माणसांचा कळप नसतो-समाज बनतो-तो सहेतुक श्रम करतो.

सगळे मिळून हे श्रम करतात. निसर्गाशीं लढतात, अन्न मिळवितात. सगळे मिळून भोगतात. साधनें इतकीं कमकुवत कीं आज जगून उद्याला शिल्लक टाकायची अगदींच अशक्यता. सर्व सामयिक शक्तीनें एकवटूनच कांहींतरी निपजूं शकतात. तेथें व्यक्तीला स्वतःच्या श्रमाच्या अलगपणाची जाणीव कुठून होणार ? जेथें किमान गरजेपेक्षांहि निपज कमी, तेथे एकाच्या श्रमाच्या निपजेवर दुसऱ्यानें जगायचें ही कला येणारच कशी ? निसर्गाचे ज्ञान इतके कमी, कीं जनन-मरणाची क्रियाहि कळत नाहीं. सामयिक उत्पादन आणि सामयिक उपभोग हेंच त्या वेळचें प्राथमिक जीवन. तेथें खाजगी मालमत्ता नाहीं, राजसत्ता नाही, कुटुंब नाही, रक्तानुवर्ती नातीं-गोतीं समज-ण्याची समज नाहीं, वर्ग नाहीं, वर्ण नाहीं, आपसातील कलह नाहीं; न्यायनिवाड्याची जरूर नाही. अत्यंत दरिद्री पण सहभागी, अत्यंत लहान पण सुदृढ, जीवनासाठीं सारखी धडपड करणारा पण आपसातील कलहापासून विमुक्त, असा जो समाज तो प्राथमिक गणसंघ-युगाचा समाज.

गणसंघांची प्रजा वाढून त्यांतून अनेक गणगोतें फुटून दूर होतात. सामयिक शरीर-संबंधाची प्रजा निकस निघतेसें पाहून त्याबाबत निर्बंध निर्माण होतात. आई-बाप, भाऊ-बहीण, नवरा-बायको इत्यादि नाती बनून निरनिराळीं गणगोतें स्थापलीं जातात, त्यांत कुटुंब अस्तित्वात येते. पण या कुटुंबाचा पाया अद्याप आर्थिक-श्रमाचा अथवा मालमत्ता-मालकीचा नसून केवळ प्रजापोषणासाठीं निसर्ग-निवडीचा रोख सांभाळणें हाच काय तो असतो.

या बुभुक्षित गणसंघांची उत्पादन-कला वाढत जाते. उत्पादन-साधनें स्थिर राहूंच शकत नाहींत. अग्नीचा शोध लागतो, भांडीं तयार करतां येऊं लागतात, जना-वरें माणसाळण्याची कला सांपडते, जनावरांचीं कातडीं पांघरून हाडांचीं हत्यारें वापरून, केसांचीं वस्त्रें बनवून, अनेक विविध वस्तूंचा वापर वाढतो, सुखसाधनें वाढतात. मनुष्याची श्रमशक्ति पूर्वी जिथे किमान गरजेपेक्षांहि कमी निपज कर-णारी होती, ती आतां जादा श्रमानें नव्या साधनांच्या योगानें शिल्लक टाकूं शकते. श्रमाची शिल्लक देणारा व त्यावर जगूं पाहणारा असे भेद उत्पन्न होण्याची परिस्थिति निर्माण होते. गुलामगिरीचें युग येऊन ठेपतें.

परंतु मानवसमाजाच्या एका वर्गानें अथवा वर्णानें दुसऱ्यावर मालकी-सत्ता चालवून त्याला श्रम करायला लावून त्यावर जगण्याची पद्धति अंमलांत येण्यापूर्वी

सामयिक श्रमांतून उत्पन्न झालेल्या वस्तूंची सामयिक मालकी अथवा उपभोग नष्ट व्हावा लागतो.

प्राथमिक गणसंघामध्यें उत्पादनसाधनांची जोपासना वाढत वाढत जेव्हां सामयिक श्रमांतून विविध वस्तूंची निपज होऊं लागते तेव्हां संघाला आपल्या विविध गरजा भागविण्यासाठीं इतर गणसंघांशी वस्तूंचा विनिमय करण्याची जरूरी भासूं लागते. गाय-म्हैस-घोडे यांचीं खिल्लारें उत्पन्न करणाऱ्यांची संपत्ति जास्त, कार्यक्षमता जास्त, मनुष्यसंख्याबल वाढण्याची पात्रता जास्त. त्यांच्या उत्पादनांत वस्तूंची विविधता जास्त. जें आपल्याजवळ आहे व ज्याचा कांही हिस्सा आपण देऊं शकतों तो देऊन जे आपल्या जवळ नाही पण हवें आहे तें घेण्याची—सारांश वस्तूंचा विनिमय करण्याची पात्रता अशा गणसंघाजवळ जास्त. प्रथम प्रथम विनिमय सामयिक उत्पन्नाच्या सामयिक वस्तूंचा होतो. ते करणारे गणसंघांचे गणपति सर्वांच्या संमतीनें व वतीनें तो चालवितात.

पण विनिमयामध्यें वस्तूंची उपयुक्तता तसेच तिला लागणारे श्रम यांचा विचार "विनायका"ला करावा लागतो श्रममूल्याचें मापन सुलभ कुठें? जिथे वस्तूच्या निपजेमध्यें लागलेला श्रम-काळ संघांतील व्यक्तीवर नामनिर्दिष्ट केला जाऊं शकतो तिथे. सामयिक जोपासनेच्या खिल्लारांतील गोधनाचे विनिमयमूल्य श्रम-कालानें अजमावून प्रत्येकीं ठरविणे त्या पद्धतींत अशक्य. पण तक्षानें केलेल्या गदेचें मूल्य ठरविणे तितकें अवघड नाही. विनिमयानें व्यक्तिकृत श्रमाचीं बीजें सामयिक श्रमापासून अलग पडूं लागतात.

एवढेंच नव्हे तर विनिमयाच्या वाढीबरोबर तो सुलभ करण्यासाठीं सर्वमान्य व सर्वोपयुक्त अशा वस्तूला विनिमय-साधनाचें स्वरूप येतें. कालांतरानें ती वस्तु सर्वोपयुक्ततेचें स्वरूप सोडून पैशाचें स्वरूप धारण करते. विनिमय हाच ज्यांचा पेशा अथवा धर्म असा वर्ग गणसंघामध्ये निर्माण होऊन त्याच्या हातीं पैशाच्या रूपानें धनसंचय होऊं लागतो. सामयिक श्रमोत्पादन व वस्तूंचा उपभोग याला खाजगी व्यक्तिगत श्रमाचें मूल्यमापन पछाडूं लागतें. गणसंघाचें संघस्वरूप मोडून पडायची वेळ येते. खाजगी मालमत्तेचा उदय होतो व ती ज्यांची असा धनी वर्ग व ती ज्यांच्या जवळ नाहीं अथवा अगदीं कमी आहे असा निर्धन वर्ग हे गणसंघामध्यें निर्माण होतात. निर्धन श्रमजीवि व धनी यांचा वर्गलढा सुरू होतो.

प्राथमिक गणसंघामध्यें सामयिक श्रमाच्या सौष्ठवासाठीं श्रमाची विभागणी हळु हळु निर्माण होते. गणसंघांना परकीय गणांशीं सतत युद्धें करावी लागतात; त्यांसाठी नेते व लढवय्ये नेमावे लागतात. गणाच्या दैनंदिन कार्यांत मार्गदर्शन करण्यासाठीं

नेते नेमावे लागतात. ही कर्माची विभागणी कालान्तरानें त्या समाजांत परंपरागत होऊं लागते.

पण त्यामुळेंच काय ते वर्ग अथवा वर्णकलह निर्माण होत नाहींत. वर्ग-वर्ण-कलहाचें बीज कार्यविभागणींत नसून केलेल्या कर्मांच्या फलविभागणींत आहे. सामयिक संघामध्यें ही फलविभागणी सामयिक होत असल्यानें कलहाचें बीज त्यांत नसतें. पण उत्पादनाची वाढ व विनिमय सुरू होऊन त्यांतून खाजगी मालमत्तेचा व मत्तेच्या असमान विभागणीचा उदय झाला कीं कलहाला सुरुवात होते. वर्गविहीन समाज वर्गदुष्ट होऊन बसतो.

प्राथमिक गणसंघांना पूर्वी परकीयांशींच युद्ध करण्याचा प्रसंग पडे. आतां स्वकीयांमधील नवें युद्ध जन्माला आलें. एका बाजूला बहुसंख्य पण निर्धन असा वर्ग व दुसऱ्या बाजूला ज्याच्या आर्थिक सत्तेचा जोर आहे असा अल्पसंख्य वर्ग यांचें तुंबळ युद्ध माजतें. प्राथमिक गणसंघांत पूर्वी केवळ रक्तानुबंधी प्रजा असे. आतां तेथें आर्थिक जीवनाच्या वाढीबरोबर केवळ आर्थिक हितसंबंधाचे नवे प्रजाजन गणसंघांच्या देशांत वास्तु करून राहूं लागले. तेही या युद्धांत गोंवले जातात. रक्तानुबंधी गणांच्या कायद्यांत त्यांना बसविणे अशक्य. त्यांचा आचार-विचार-धर्म-गणगोत सर्व परकीय. ते केवळ अर्थानें देशाला बांधलेले. आणि गण तर रक्तानें एकमेकाला बांधलेला. या दोहोंच्या विरोधांतून रस्ता कसा निघायचा ? युद्धानेंच.

पण या युद्धाचा शेवट, ज्यांच्या हातीं आर्थिक सत्ता त्यांच्या बाजूनेंच व्हायचा, व झाला. श्रमजीवि बहुसंख्य गण-प्रजा त्यांच्या श्रमावर जगणाऱ्या अल्पसंख्यांकांची गुलाम बनविली जाते. दास-शूद्र प्रथेचे नवे राज्य येतें. जेथें राज्य नव्हतें तेथें राजसंस्था निर्माण होते. व ती संपत्तिवानांची बनते. श्रमजीवींना कामाला लावून आर्थिक गाडा चालू ठेवायचा, सामयिक पद्धतीच्या सर्व लक्षणांचा नायनाट करून केवळ वर्गसत्ताधारी समाज निर्माण करायचा, ही सत्ता उलथूं पाहणाऱ्यांना राजसत्तेने चिरडायचें अशी नवी पद्धति अमलांत येते.

ज्या सामयिक पद्धतींत गुलामगिरी व पिळणूक नाहीं, जुलूम नाहीं, दण्ड नाहीं, ती उलथून पाडून अल्पसंख्यांकांची वर्गसत्ता टिकूं तरी कां शकते व इतर वर्ग ती मानतात तरी कां ? वर्गसत्ता ही केवळ राजसत्तेच्या शस्त्रबलानेंच नसते टिकत. प्राथमिक गणसंघामध्यें जी आर्थिक विभागणी होते तिच्यामुळें सर्व संघाची एकूण आर्थिक शक्ति वाढीस लागलेली असते. तुंबळ वर्गयुद्धानंतर जरी तीव्र पिळणूक एका वर्गावर लादली जाते, तरी तिच्यामुळें सर्व समाजाचें अर्थतंत्र पुढच्या प्रगतीच्या पायरीवर चढत जातें, म्हणूनच वर्गसत्ता टिकूं शकते. युद्धार्जित गुलामसुद्धां, जे पूर्वी केवळ वधस्तंभाच्या भक्ष्यस्थानीं पडत, त्यांना आतां वाढत्या आर्थिक बलामुळें

जिवंत राखून त्यांच्याकडून दासस्थितीमध्यें उत्पादन करून घेणें शक्य होतें. बधापेक्षां दास्यत्वांतलें जीवदानसुद्धां त्यांना त्या मानानें उपकारक ठरते. वर्गाधिष्ठित समाज व राजसत्ता ही सार्वत्रिक हिताची, ( पिळणुकीच्या चौकटींत राहून, खाजगी मालमत्तेच्या सत्तेच्या चौकटींत ) साधन बनते म्हणूनच ती टिकाव धरूं शकते.

पूर्वीचा वर्गविहीन प्राथमिक गणसंघ आणि वर्गदुष्ट दास-भोगी राजसत्ताधारी समाज यांत आर्थिक घटनांनुसार लोकनियामक नव्या संस्था निर्माण होतात. गणसंघाचे सर्व सभासद गोत्रानुबंधी अथवा रक्तानुबंधी—म्हणजे एकाच गोतावळ्यांचे असतात. वर्गसमाजाचे सभासद राजसत्तेखालील देशांतले जे रहिवाशी ते सर्वच असूं शकत. रक्तबंधाऐवजीं अर्थबंध बलवत्तर ठरला. पूर्वी सर्वच शस्त्रधारी असत, तेथें अंतर्गत नियमनासाठीं खास राजपुरुषांची जरूर नसे, कारण वर्गकलहाच्या व लोभ-मोह-मदाच्या अभावीं राजसत्तेचीच जरूर नव्हती; गणसंघ स्वयंपूर्ण, स्वयंप्रेरित, परस्पर-रक्षित असा समाज होता. आतां धनी वर्गसत्तेच्याच हाती राजसत्ता व शस्त्रसत्ता आली. समाजापासून अलग असा राजपुरुष अंतर्गत नियमनासाठीं उभा करावा लागे. पूर्वी सामयिक उत्पादन व भोग—त्यांत राजसत्तेसाठी खास कर काढण्याची जरुरी नव्हती. आतां ती उत्पन्न झाली. पूर्वी अपराधी हा समाजाबाहेर फेंकला जाई अथवा युद्धार्जित दास झाल्यास मारला जाई. आता अंतर्गत कलहाच्या अपराध्यांवर दहशत बसविण्यासाठी कारागृहे निर्माण झाली. दण्डविहीन परस्परंभावी समाज आता दण्डधारी परस्परविरोधी बनला.

पण प्राथमिक गणसंघ जसा चिरकालीन राहूं शकत नाहीं तशीच गुलाम-दास पद्धतही राहूं शकत नाहीं.

दासांच्या श्रमावर उभारलेला समाज एका आर्थिक पल्ल्याला गेला कीं ती पद्धति निकामी ठरूं लागते. तिच्यांतला अंतर्गत विरोध विकोपास जातो. स्फोट होतात. समाजयंत्र अडखळूं लागते. सरंजामशाहीचें युग जन्म घेऊं लागतें. त्याच नियमानें भांडवली युग येतें. त्याच नियमानें कम्युनिझमचें युग येतें. मनुष्यांमनुष्यांमधील अर्थ-संबंधांचें हें मात्र अखेरचें युग होते. त्यांत परत राजसत्ता नष्ट होते, वर्ग विलयाला जातात. विपुल उत्पादन, सामयिक उत्पा दन, सामयिक मत्ता पण व्यक्तिगुणानुसार उपभोग-प्रथा, सर्व समाज परत परस्परंभावी, असा या युगाचा विशेष असतो.

प्राथमिक गणसंघ आणि अंतिम कम्युनिझम या दोन टोंकांच्या अवस्थांमधील तीन पद्धतींत, एक श्रम करणार तर दुसरा त्याच्या फलावर जगणार. अशा पद्धतींवर, म्हणजे उत्पादन साधनांच्या खाजगी मालकीवर आधारलेले वर्ग सत्ताधीश असतात. प्राथमिक आणि अंतिम कम्युनिझममध्ये वर्ग नसतात. पण प्राथमिक अवस्था ही वस्तुसाधनांच्या बाबतींत अत्यंत दरिद्री असते. तीमध्यें सुखाला, संस्कृतीला, बुद्धि-

वैभवाला, व्यक्तिगुणाला वाव मिळायला अवसरच नसतो. अंतिम कम्युनिझम हा मूलतः प्रचंड यंत्रसाधनेच्या सामुग्रीवर उभारलेला असतो. त्यांत दारिद्र्याचा प्रश्नच नसतो. म्हणूनच वर्गसत्ता नसते, म्हणून तेथें सुखाला, संस्कृतीला, बुद्धिवैभवाला, व्यक्तीगुणाला पूर्ण वाव मिळून नवा मानव त्यांतून निर्माण होतो.

प्राथमिक आणि अंतिम कम्युनिझम याचा दुसरा एक असा विशेष असतो की दोहोंमध्ये सामयिक अर्थोत्पादनात स्त्रियाना पूर्ण हक्क असल्यानें त्यांना संपूर्ण मानव-स्वातंत्र्य मिळते. तसे मधल्या तीन अवस्थामध्ये नसते.

मानवी इतिहासाच्या या पांच अवस्थांतील संस्कृति, कायदे, कला, भावना हीं भिन्न भिन्न असतात. ती अर्थबंधनांनुसार, वर्गसंबंधांनुसार उत्पन्न होतात. प्रत्येक अवस्था मनुष्याला बदलून पुढच्या पायरीवर ढकलून विलय पावते. या अवस्थांतरांचें चित्रण साकल्यानें करण्याचा प्रयत्न राहुलजींनी या कथासंग्रहांत केला आहे. कांहीं कथाबाबत असा आक्षेप येण्याचा संभव आहे की त्यांत भावनामय कलोद्भवापेक्षां तार्किक तत्त्वज्ञानमय विवेचनाचीच झळ जास्त दिसते. पण बहुतांशी कथांमध्यें कलोद्भव साधलेला आहे. अत्यंत प्राचीन कालखंडाचें चित्रण तर अप्रतिम झालें आहे.

किंबहुना प्राचीन कालखंडावर इतकें चित्त वेधलें जातें कीं कांहीं ठिकाणांहून असा आक्षेप आला कीं प्राथमिक गणसंघांची ही अवस्था पाहवत नाहीं, तिचें आकलन होत नाही, व झाले तरी हिंदी संस्कृतीच्या इतिहासात ती बसत नाहीं. पण हा आक्षेप निराधार आहे.

प्रत्येक मानवसमाज प्राथमिक कम्युनिझम अथवा गणसंघावस्थेंतून गेला आहे. याला पुरातन हिंदी समाज अपवाद नाही. सामयिक उत्पादन, सामयिक उपभोग, वर्गसत्तेचा अभाव, राजसत्तेचा अभाव, अन्तर्गतविरोधाचा व कलहाचा अभाव, रक्तानुबधी गणव्यवस्था, सामयिक कुटुंबपद्धति इत्यादि गुणयुक्त असा पुरातन हिंदी समाज एकदां होता. वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासूंना सहज दाखवितां येईल कीं त्यांतील अत्यंत पुरातन क्रियाकर्में हीं अशा समाजाचीच आहेत. या अवस्थेंतील अर्थोत्पादनाची विद्या जे दाखवितात ते वेद, असा त्यांचा अर्थही सांगितला आहे. वेद–वेदस् म्हणजे धन, धनोत्पादनाची विद्या, इष्ट वस्तूंची प्राप्ति व अनिष्टाचा परिहार दाखविणारी विद्या ( सायण ). ही विद्या काय सागते ?–काय वर्णिते ?—तर यज्ञकर्म. यज्ञकर्म म्हणजे हल्लीच्या शास्त्रीपंडिताचे दक्षिणाभूत कर्म नव्हे. अत्यंत प्राचीन यज्ञकर्म कोणतें ? कसें केलें जाई ? त्यात सहभागी कोण ? त्याचें फल कुणाचें ? असे प्रश्न टाकले व त्याचीं उत्तरे शोधलीं की एकच उत्तर येतें---सामयिक उत्पादन आणि उपभोगाची अत्यंत पुरातन पद्धति म्हणजे अत्यंत पुरातन यज्ञकर्म.

त्यांतच सर्व आर्यगण उगम पावले व त्यांतून वाढले. ती उत्पादनपद्धति म्हणजे यज्ञपद्धति–यज्ञकर्म. तीं करणारा समाज हा स्वतःला विश्वाचा, सर्व चराचराचा भाग समजे व त्याला ब्रह्मन् म्हणे. पुरातन ब्रह्मन् ते प्राथमिक गण-गोत्रसंघ अथवा कम्यून्–अशी व्याख्या करण्यास कांहीच हरकत नाही.

परंतु या विषयाचा या ठिकाणीं जास्त ऊहापोह करणे आवश्यक नाहीं. प्रश्न एवढाच कीं प्राचीन इंडो-युरोपियन कालाचे राहुलजींनीं केलेलें चित्रण सत्यावर कितपत आधारलेलें आहे. प्राथमिक गणगोत्रसंघाचा वर्गविहीन, राजसत्ताविहीन, सामयिक मालकीचा, सामयिक उपभोगाचा समाज, त्याचें जीवन, त्याचे भ्रमण, त्याच्यात उत्पन्न झालेले विरोध, त्याच्या प्राथमिक लढाया व नंतरची आपसांतील वर्गयुद्धें याचे ऐतिहासिक पुरावे शोधणें कठीण नाही. अग्नीचा उद्भव, यज्ञ नामक सामयिक उत्पादन व भोगपद्धतीचा उद्गम, इत्यादि गोष्टी, सत्रांची वाढ, त्रिरात्र क्रतूंच्या आख्यायिका, वसु–आदित्यादि गणसंघाची कर्मे, अग्निहोमाचे विधि, तनूनप्त्रप्रचार व समाख्या विधि, गणपति अथर्वशीर्षातील गणनायकाची कामे, सामयिक मालमत्तेचा महावेदीवरील वाटप व भोग, युद्धार्जित मत्तेचा व कैद्याचा दानसूक्ते व पुरुषमेधांतील वाटप, गणसंघांत उत्पन्न झालेल्या वर्गद्वंद्वाचे देवविष्णु-युद्धातील काहीसे चित्रण व शेवटीं रक्तानुबंधी गणसंघाचा नाश व राजसत्तेचा गुलामपद्धतीवर आधारलेला उगम (ज्याचें प्रतीक पुरुषसूक्त आणि अखेरचें महाभारतीय युद्ध ही आहेत)–या सर्वांचे मार्क्सवादाचा ऐतिहासिक प्रगतीचा सिद्धांत लावून वाचन केलें की इंडोयुरोपियन समाजाचें यथार्थ चित्र सहज मिळते.

आणि मग वाचकाला प्रश्न सुचतो आणि उत्तरही मिळते.

प्रश्न असा की बाह्याशी स्वरक्षार्थ युद्धें गणसंघाना करावी लागत; त्यांत नंतर आपसांतील वर्गयुद्धाची, क्रान्तीयुद्धाची भर पडली; मालकवर्ग युद्धे स्वतःच्या वर्गहितासाठीं, गुलाम, जमीन, व्यापार, वसाहती, भाडवल यासाठी माजवूं लागला—ज्याचा पूर्वी पत्ताही नव्हता; प्रत्येक वर्गाचें स्वार्थाचें युद्धतंत्र, युद्धाचे उद्देश, हीं त्या त्या काळच्या उत्पादनतंत्र आणि पद्धतीला धरूनच चालत; पण हा व्याप संपणार का व कधी? का हे अनादी कार्य आहे?

गणसंघापासून तहत आतांपर्यंतच्या युद्धांचे समालोचन (ज्यांचा या कथासंग्रहांत उल्लेख आहे) केल्यास दिसून येईल की मानवाला हताश होण्याचें कांहींच कारण नाहीं. वर्गयुद्ध जगांतील एका मोठ्या समाजाने–सोविएतने–अन्तिम कम्युनिझमच्या पल्ल्यापर्यंत पोंचून नाहींसे केलें. स्वरक्षार्थ व जगाच्या इतर भागांतही युद्ध-हिंसा वर्गहिंसा नष्ट करून परस्परं भावयन्तः असा सुखी समाज आणूं पहाणाऱ्यांना मदत करण्याचें त्यांचे ब्रीद आहे. तें ते पाळतील. व जगांतील जनताही लाखों

वर्षांच्या इतिहासाची कमाई व अनुभव हातांत घेऊन, पिळवणूक, पारतंत्र्य, वर्गसत्ता, गुलामी, यांचा नाश करून सुखी व सुसंस्कृत समाजरचनेकडे धाव घेत आहे व त्यांत यशस्वी होणार.

मुंबई,
२९-४-४४

एस्. ए. डांगे.

# प्राक्कथन



मानव समाज आज जिथें आहे, तेथपर्यंत तो अगदीं प्रारंभींच पोंचलेला नव्हता; आजचा टप्पा गांठण्यासाठीं त्याला मोठमोठ्या संघर्षांना तोंड द्यावें लागले. मानवसमाजाच्या प्रगतीचें तात्त्विक विवेचन मी माझ्या "मानव-समाज" या ग्रंथांत केलेलें आहेच. या प्रगतीचें यथार्थ सरळ चित्रण देखील करता येण्यासारखें असतें. याच उद्देशानें मी "वोल्गा ते गंगा" लिहिण्यास उद्युक्त झालो. मी या ग्रंथांत हिंदी—युरोपीय जातींविषयींच तेवढे लिहिण्याचें ठरविलें; हेतु हा की भारतीय वाचकांना यामुळें ग्रंथ समजण्यास सुगम व्हावा. मिस्रदेशीय, असीरियन व सिन्धु-जाति ह्या, प्रगतीच्या दृष्टीनें, हिंदी-युरोपीय जातीच्या मानानें हजारो वर्षे अगोदरच किती तरी पुढें गेलेल्या होत्या. पण त्या सगळ्यांचा अंतर्भाव या वर्णनांत केला असता तर लेखक व वाचक या दोघांच्याहि अडचणी वाढल्या असत्या.

मी हर एक काळांतील समाजाचें चित्रण प्रामाणिकपणें करण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण अशा प्रकारचा प्रयत्न हा पहिलाच असल्यामुळें यांत चुका होणें साहजिक आहे.

जर या माझ्या प्रयत्नामुळें भावि काळांतील लेखकांना अधिक बिनचूक चित्रण करण्यास मदत झाली तर मी स्वत:ला कृतार्थ समजेन.

"बंधुल मल्ल"च्या (बुद्धाच्या) काळाला अनुलक्षून मी "सिंह सेनापति" ही एक स्वतंत्र कादंबरीच लिहिलेली आहे.

सेंट्रल जेल,
हजारी बाग.
२३-६-४२

राहुल सांकृत्यायन

# अनुक्रमणिका

# १—निशा

**देश**—वोल्गाकांठचा वरचा प्रदेश. **जाति**—हिंदी युरोपियन.

**काळ**—इ. स. पूर्वी ६००० वर्षे.

– १ –

दुपारची वेळ. आज कितीक दिवसांनंतर सूर्यदर्शन झाले. पांच तासांच्या त्या दिवसांत जरी सूर्याच्या तेजात तीक्ष्णता नसली तरी पण ढग, बर्फ, धुकें आणि झंझावात यांचा जरा देखील मागमूस नसल्यामुळे, चहूंकडे पसरलेले सूर्याचे किरण दिसायला किती मनोहर, आणि त्याच्या स्पर्शानें तर मनात आनंद संचारूं लागायचा. आणखी ते भोवतालचे दृश्य! वर सघन निळे नभ आणि खाली पांढऱ्या कापराप्रमाणे दिसणाऱ्या बर्फाने आच्छादित धरणी चोवीस तासांपासून वर्षाव न झाल्यामुळे बर्फ दाणेदार असून देखील ते कठीण बनले होते. ही हिमवसना धरणी तशी क्षितिजापर्यंत जाऊन टेकली नाही. उत्तरेकडून दक्षिणेकडे कांहीं मैल दूर वांकड्या-तिकड्या चंदेरी रेषेप्रमाणे गेलेली आहे. या रेषेच्या दोन्ही बाजूंच्या टेकड्यांवरील काळी वनराजी दुरून दिसून येते. ही वनराजी जरा जवळ जाऊन बघूं हं! या वनराजींत वृक्षांच्या दोन तऱ्हाच अधिक दिसतात. एक पांढरीं वल्कले पांघरलेले परंतु सध्यां पर्णहीन असलेले भूर्ज आणि दुसरे अत्यंत सरळ आणि उंच देवदार–समकोणावर फांद्या विस्तारलेल्या–सुईसारख्या पानांचा रंग भडक वा गर्द हिरवा. वृक्षांचा किती तरी भाग बर्फाच्छादित. त्यांच्या फांद्या-डहाळ्यांवर जिथे तिथें सांचलेलें बर्फ त्यांना काळीढवळी कळा आणून नजरा आपल्याकडे आकर्षून घेत आहे.

आणिक? भयानक नीरवता अखंडितपणे चहूंकडे नांदत आहे. ना कुठें रातकिड्यांचा किर्र ध्वनि, ना कुठे पक्षांचा कलरव, ना एखाद्या पशूचा देखील शब्द!

येतां का, जरा पहाडावरल्या सगळ्यांत उंच ठिकाणी असलेल्या देवदार वृक्षांवर चढून चहूंकडे बघूं! कदाचित तेथून बर्फ, धरणी, देवदार यांच्याशिवाय आणिक कांहीं दिसेल. इथें काय मोठमोठे वृक्षच वाढत असतात? लहानसहान रोपटीं नि गवत याला काय स्थानच नाहीं या भूमीत? या बाबतींत आपण कांही आपलें मत देऊ शकत नाहीं. थंडीचे दोन भाग लंघून आम्ही आतां शेवटल्या भागांत आलो. हे वृक्ष बर्फांत किती खोल गाडलेले आहेत हें मोजण्याचें कोणतेंहि साधन आमच्या-

जवळ नाहीं. थराची जाडी आठ हात असू शकेल किंवा त्याहूनहि अधिक. यंदां हिमवृष्टि जरा अधिक होत आहे अशी सर्वांचीच तक्रार आहे.

देवदाराच्या शेंड्यावरून काय दिसतंय? तेच बर्फ, तीच वनराजी नि तींच उच सखल पहाडी पठारे! हां! पहाडाच्या दुसऱ्या बाजूला एका ठिकाणीं धूर दिसतोय. या प्राणीशब्दशून्य वनांत धूर दृष्टीस पडणे जरा आश्चर्यच म्हणायचे. चला तिथे जाऊन आपल्या कुतूहलाचे शमन करूं.

धूर दूरदूर होता, परंतु निरभ्र निर्मळ आकाशात तो आपल्या कितीतरी जवळ आहेसा वाटले. आपण आता त्याच्या अगदी जवळ जाऊन पोंचलो. आगींत जळणाऱ्या चर्बीचा नि मांसाचा वास आपल्या नाकांत शिरत आहे – आणिक हे शब्द देखील कानीं पडतात – लहान बालकांचे शब्द हे! आपल्याला आतां चोरपावलांनी श्वास रोखून चालावे लागेल. नाहीतर त्याना आपला चाहाळ लागेल आणि मग ते किंवा त्यांचे कुत्रे आपले स्वागत कशा प्रकारे करतील हे कुणी सांगावें?

खरेच, लहान लहान अर्भकें आहेत ही! सगळ्यांत थोरले आठ वर्षांपेक्षा अधिक वयाचे नाही नि धाकटे असेल एक वर्षाचे! सहा मुले नि एका घरांत. घर कसलें? पर्वतांतली एक नैसर्गिक गुहा आहे. ती आंत अंधःकारात कुठवर पसरलेली आहे हें दिसत नाही, नि ती बघण्याचा प्रयत्न पण करूं नये. आणिक वडीलधारीं माणसे म्हणाल तर डोक्यावरील धुरकट पांढऱ्या तागाच्या जटा विखरलेल्या आणि तोंडावर आलेल्या आहेत अशी एक म्हातारी! तिने आपल्या हातानें तोंडावर आलेल्या जटा बाजूला सारल्या. तिच्या भुंवया देखील पांढऱ्या.– गोऱ्यापान चेहऱ्यावर सुरकुत्या पडलेल्या–सगळ्या जणुंकांही मुखांतून बाहेर पडलेल्या दिसत होत्या! गुहेत विशेषतः आजीबाई नि बालकें बसलेल्या त्या जागी विस्तवाचा धूर आणि ऊब पण आहे. आजीच्या अंगावर ना वस्त्र ना प्रावरण. तिचे दोन वाळकट हात पायांजवळ जमिनीवर टेकलेले; डोळे खोल गेलेले आणि गिजऱ्या डोळ्यांतल्या बाहुल्या निस्तेज शून्यवत भासतात. परंतु अधून मधून त्यांत तेज प्रगट होते आणि मग त्या अगदीच विझून गेलेल्या नाहीत असे वाटूं लागते. कान अगदीं (सशाच्या कानाप्रमाणें) सतर्क! आजी बालकांच्या आवाजाचा कानोसा घेऊं शकते असें दिसून येतें. आतां एक मुलगा ओरडला. लागलीच तिची नजर तिकडे वळली. वर्षा दीड वर्षांचीं दोन मुलें आहेत—एक मुलगा नि एक मुलगी. अगदीं एका शीमेचे. दोघांच्याहि केशांत पिवळट पांढुरक्या रंगाची झाक. म्हातारीच्या प्रमाणेंच पण अधिक सजीव आणि चमकणारे. त्यांचीं शरीरें पीवरपुष्ट, तांबुस गौर वर्णाचीं. त्यांच्या टपोर डोळ्यांतल्या बाहुल्या गर्द निळ्या! मुलगा आक्रसून रडत आहे. मुलगी एक लहानसें हाडूक तोंडांत घालून ते चोखत उभी आहे. म्हातारपणामुळें कंप आलेल्या

आपल्या स्वरांत आजीनें हांक मारली: "अगिन, बाळ, ये इकडे. आजीकडे ये."

अगिन जाग्यावरून हालत नव्हता. त्याला आठ वर्षांच्या मुलग्यानें कडेवर उंचलून घेतले आणि आजीजवळ आणून पोंचते केले. या मुलाचे केस देखील लहान मुलाच्या प्रमाणे पिंगट पांढरे आहेत, पण ते जरा अधिक लांब, व त्याच्या लटा झालेल्या आहेत. त्याच्या पायांपासून माथ्यापर्यंतच्या उघड्याबंब शरीराचा वर्ण देखील तितकाच गौर, मात्र तितकाच पीवर नाहीं आणिक त्यावर जागोजागीं काळ्या मळाचे लेपन झालेलें. थोरल्याने धाकट्याला आजीजवळ आणून उभें केलें आणि सांगितले: "आजी! रोचनानं हाड हिसकून घेतलं. अगिन रडतोय."

तो चालता झाला. आजीने आपल्या वाळलेल्या हातांनी अगिनला उचलून घेतले तरी देखील तो रडतच होता. त्याच्या कळकट गालावरून वाहणाऱ्या आसवांच्या ओहळांनी एक तांबुस जाड रेघोटी काढली. आजीने अगिनचे मुखचुंबन घेऊन लाडाने म्हटले: "अगिन, रडायचं नाही. रोचनाला मारत्ये."–आणि वर्षानुवर्षे चर्बीने चडबडलेल्या खुल्या बैठकीवर आपला एक हात आदळला. अजून देखील अगिनचें "ऊं ऊं" थांबले नव्हते, ना त्याच्या आंसवांना खळ पडला होता. आजीने आपल्या मळकट तळहाताने अगिनचे आंसू पुसल्यानें त्याच्या गालावरच्या तांबुस रेषा काळेजून गेल्या. रडत असलेल्या अगिनला उगे करण्यासाठी आपल्या सुकट चामड्यामधून झळकणाऱ्या बरगड्यांतून वाळल्या भोपळ्याप्रमाणे लोंबणाऱ्या स्तनाची कोसली तिने त्याच्या तोंडांत कोंबली. अगिनने स्तन तोंडी धरला नि त्याचे रडणें थांबले.

त्याच वेळी बाहेर बोलण्याचा आवाज ऐकायला आला. त्याने सुकलेला स्तन तोंडाबाहेर काढून तिकडे वळून पाहिलें. कुणाचा तरी गोड स्वर कानीं पडला–

"अगिन–?–?–!"

अगिन पुन्हा स्फुंदून उठला. आलेल्या दोघीजणींनी डोक्यावरले मोळ्यांचे भारे एका कोंपऱ्यात फेंकले नि मग एक रोचनाकडे धांवली व दुसरी अगिनकडे. अगिनने "मा–मा" करून आणखी भोकांड पसरले. आपला उजवा हात मोकळा ठेवून साळीच्या कांट्यांनीं जोडलेलें ढवळ्या बैलाचें केसाळ कातडें काढून मातेनें तें खालीं टाकले व आपला उजवा स्तन मोकळा केला. हिवाळ्यांत खाद्यांची टंचाई पडल्यामुळे तिच्या मुसमुसलेल्या देहांतले मांस सुकून गेले असले तरी त्यांतले असाधारण सौंदर्य जसेंच्या तसेंच होते. लाल निर्मळ स्तनावरील तांबुस गौर कांति, भालप्रदेशावर चढाईखोरपणा न करणारे पण स्वैरपणे भुरभुरणारे मोकळे पिंगट पांढुरके केस, अल्प मांसल पण भरदार वक्षावरील गोल गोल काळ्या बोंडाचे स्तन. ओटीपोटावरची बारीक कंबर, नितंब भरीव पण मध्यम आकाराचें, भरघोंस वाटोळ्या जांघा, श्रमाची संवय असलेल्या नांगराच्या आकाराच्या पोटऱ्या. त्या अठरा

वर्षांच्या तरुणीनें अगिनला दोन्हीं हातांनीं उचलून घेतलें नि त्याचें तोंड, डोळे, गाल यांच्यावर चुंबनांचा वर्षाव केला. अगिन रडें विसरला. लाल ओंठांमधून दांतांच्या पांढऱ्या कण्या चमकून दिसूं लागल्या. त्याच्या डोळयांत आनंद दिसत होता, गालांत इवलाल्या खळ्या पडलेल्या! खाली पडलेल्या बैलाच्या कातड्यावर ती तरुणी बसली आणि तिनें आपला कोमल स्तन अगिनच्या तोंडाशीं लावला. अगिनने दोन्ही हातानीं स्तन धरून ठेवला व तो चुट्‌चुटू पिऊं लागला. तिकडे दुसरी नग्न तरुणी देखील रोचनेला घेऊन जवळ येऊन बसली. त्या दोघी बहिणी असाव्यात हें त्यांच्या चेहेऱ्यांकडे बघूनच लक्षात येत असे.

– २ –

गुहेंत त्या दोघींना मोकळेपणानें बोलत राहूं देऊन आपण बाहेर येऊं. चामड्यानें झांकलेलीं बरीचशीं पावलें बर्फावरून एका दिशेकडे जातांना दिसतात. लगबग करा, आपण त्याच्याबरोबर जाऊं. आतां ती पावलांची रांग वळून पलीकडच्या पहाडामधल्या जंगलात पोचली. आपण कितीं वेगानें पळत पुढें चाललो तरी पण नुकतीच उमटलेली पदचिन्हें अजून संपतां संपत नाहीत. आपण कधी बर्फमय पांढऱ्या प्रदेशातून चालतों, तर कधीं पर्वताच्या पाठीचा कणा तुडवून जंगलपार दुसऱ्या बर्फमय प्रदेशांत येतों. पुन्हां पहाडी जंगल तुडवूं लागतों. सरतेशेवटीं तळाकडल्या एका वृक्षहीन पहाडाच्या कण्यावर आपली दृष्टि खिळली. तिथें खालून वर डोकें करणाऱ्या श्वेतहिमराशीनें आपलें मस्तक जणुं नीलनभाला टेकलें. त्याच नीलनभावर आपले आकार उमटवून कितीतरी मानवदेह पर्वताच्या पाठीआड दिसेनासे होत आहेत. निळ्या नभाची पार्श्वभूमि नसती तर ते खात्रीनें आपल्याला दिसले नसते त्यांच्या देहावर बर्फाप्रमाणें शुभ्र बैलाचे कातडे असून हातांतलीं हत्यारें देखील पांढऱ्या रंगांत बुडवून काढलेली वाटतात. मग त्या विशाल बर्फमय प्रदेशांत त्यांच्या हालत्या डुलत्या आकृति कशा ओळखतां आल्या असत्या? जरा आणखी जवळ जाऊन बघूं! सर्वांच्या पुढे एक धष्टपुष्ट शरीराची स्त्री आहे. वय असेल चाळिशी पन्नाशीच्या दरम्यान! तिच्या दिसणाऱ्या उघड्या उजव्या भुजे-वरून वाटूं लागतें की ती अत्यंत बलवान स्त्री असावी. तिचे केस, तिचा चेहरा, अंगप्रत्यंग गुहेंतील पूर्वी पाहिलेल्या दोन तरुणींप्रमाणेच दिसतात; मात्र आकारानें मोठी! तिच्या डाव्या हाती तीन हात लांबीची चांगली अणकुचीदार भोजाची काठी, नि उजव्या हातांत चामड्याच्या वादीनें दांडक्याच्या खापणींत बांधून काढलेला आणि घांसून घांसून धार आणलेला दगडाचा परशु! तिच्या पाठोपाठ चार पुरुष आणि दोन स्त्रिया जात आहेत. एका पुरुषाचें वय या स्त्रीपेक्षां जरा अधिक असावें, बाकीचे असतील सव्वीस ते चौदाच्या दरम्यान! मोठ्या पुरुषाचे केस तसेच लांब-

सडक आणि पिंगट-पांढुरके. त्याचे तोंड दाढीमिशीच्या दाट जंगलानें झांकून गेलेंलें. त्याचें शरीर देखील त्या स्त्रीप्रमाणेच बलिष्ठ, हातांत तशींच दोन हत्यारें! उरलेल्या तीन पुरुषांत दोघांना तसेंच दाढीमिशांचें घनदाट जंगल, पण वय मात्र कमी. स्त्रियांपैकीं एक बावीस वर्षांची तर दुसरी सोळाहून देखील कमी. आपण गुहेंतले चेहरे पाहिले, आजीचा पण पाहिला. हे सगळे चेहरे ताडून पाहिले तर आजीच्या मुशीतूनच या सर्व स्त्री-पुरुषांचें रूप ढाळून निघाले असें स्पष्टपणें कळतें.

या नरनारींच्या हातांतली काठ्या, हाडकें आणि दगड यांची केलेलीं शस्त्रें पाहिली आणि त्यांच्या गंभीर हालचाली न्याहाळल्या म्हणजे चटकन कळून येते कीं हे सारे कुठल्या तरी मोहिमेवर निघालेले आहेत.

पहाडावरून खाली उतरल्यावर मुखरीण–तिला "मा" म्हणूं या – डावीकडे वळते; सगळे मुकाट्यानें तिला अनुसरतात. चामड्यानें झांकून घेतलेल्या पायांचा बर्फावरून चालताना जरा देखील आवाज होत नाही. आता समोरच्या बाजूला अधांत्री पुढे झुकलेला एक मोठा कडा दिसतोय. त्याच्याच आसपास लहान लहान तुटलेले कडे पडलेले. शिकाऱ्यांनी आपली गति अत्यंत मंद केली. ते इकडे तिकडे पांगून सावधपणे एकेक पाऊल उचलीत आणि हातानें कड्यांचा आश्रय घेत पुढें सरकूं लागतात. सर्वांच्या आधी "मा" गुहेच्या उघड्या तोंडाजवळ जाऊन पोंचत्ये. ती बाहेरचा पांढरा बर्फ नीट न्याहाळत्ये; त्याच्यावर कसलेहि पदचिन्ह आढळत नाहीं. मग ती एकटीच गुहेंत शिरत्ये, कांही पावलें पुढे गेल्यावर गुहेचा रोख बदलतो, आणि मग उजेड देखील मंदमलीन होतो. तिथे जरा वेळ थांबून ती आपल्या दृष्टीला संवय करून घेत्ये नि मग पुढें सरकूं लागत्ये बघत्ये तर काय? –तीन पांढरीं अस्वलें – नर, मादी नि पिल्लूं ! –माना खाली टाकून जमिनीवर झोंपलेलीं– अगर मरून पडलेलीं ! कारण त्यांच्यांत सजीवपणाचे कसलेच लक्षण दिसत नाही.

मा हळूंच परत येत्ये, परिवार तिची प्रफुल्ल मुद्रा पाहून जें काय समजायचें तें समजतो. मा आंगठ्याने करांगळी दाबून तीन बोटे पुढे करत्ये. तिच्या पाठोपाठ दोन पुरुष आपलीं हत्यारें सांभाळींत पुढें सरकूं लागतात. बाकीचे तिथेच श्वास रोखून उभे राहतात नि वाट पाहूं लागतात. इकडे आंत मा नराच्या जवळ उभी राहत्ये, नि थोरला पुरुष मादीजवळ. तिसरा पिल्लाजवळ उभा राहतो. मग ते सारे आपापल्या हातांतल्या अणकुचीदार काठ्यांनीं त्या अस्वलावर एकदमच असा कांहीं घाव घालतात कीं कुशींतून पार काळजापर्यंत ! अस्वलांची हालचाल होत नाहीं. त्यांची षण्मासींची हिवाळझोंप मोडायला अजून महिन्याच्या वर अवधि आहे. पण हें मा आणि तिचा परिवार यांना कसें माहीत होणार? त्यांनीं आपल्या परीने खबरदारी घेऊनच वागले पाहिजे. काठ्यांच्या अण्या आणखी तीन चारदां अस्वलांच्या पोटांत खुपसून

ते त्यांना उताणे करतात. आणि मग निर्भय होऊन पुढचे पाय नि तोंड धरून त्यांना फरफटत बाहेर आणतात. आनंदानें सगळे हंसतात आणि मोठमोठ्यानें बोलूं लागतात.

मा मोठ्या अस्वलाला उताणें पाडून आपल्या चामड्याच्या आच्छादनामधून एक चाकू काढत्ये. तो चकमकीच्या दगडाचा बनवलेला आहे. जखमेच्या जागेवरून ती त्या चाकूने पोटाचें चामडे चिरून काढत्ये. दगडाच्या चाकूनें येवढ्या शिताफीनें चामडे कापणें हे केवळ मजबूत आणि सराईत हातानेच शक्य आहे. त्या नरम काळजाचा एक तुकडा कापून तिनें आपल्या जिभेवर ठेवला, नि दुसरा सर्वांत लहान असलेल्या चौदा वर्षांच्या बालकाच्या मुखांत घातला. बाकीचे सारे अस्वलांच्या भोवती बसले, मा सर्वांना काळजाचे तुकडे कापून देऊं लागली. एक अस्वल संपवून जेव्हां मा ने दुसरें अस्वल ओढले तेव्हा षोडशी तरुणी बाहेर निघाली. तिनें बर्फाचा एक खडा तोंडांत घातला. त्याच वेळीं वयस्क पुरुष देखील बाहेर आला. त्यानेंही एक खडा तोंडांत घेऊन त्या षोडशीचा हात धरला. ती जरावेळ अस्वस्थ झाली पण लागलीच शांत झाली. तिला आपल्या भुजापाशांत कवळून पुरुष एकांतांत घेऊन गेला.

षोडशी आणि तो पुरुष हातांत बर्फाचे मोठाले खडे घेऊन जेव्हां अस्वलांच्या जवळ परतले तेव्हां दोघाच्या गालांवर आणि डोळ्यांत अधिक रक्तिमा दिसत होता. पुरुषानें म्हटलें : “आतां मी कापतों मा! तूं थकलेली आहेस!”

मा नें त्या पुरुषाच्या हाती चाकू दिला. खालीं वांकून चोवीस वर्षांच्या तरुणाचे मुखचुंबन घेतलें आणि त्याचा हात धरून ती बाहेर निघाली.

त्यांनीं त्या तिन्ही अस्वलांच्या काळजांवर ताव मारला. चार महिने निजून असलेल्या त्या निराहारी अस्वलांत चर्बी कुठली मिळणार? तरी पण पिल्लाचें मांस जरासें अधिक नरम आणि चवदार होतें. त्याच्यावर देखील त्यांनीं बराच ताव मारला. मग जरा वेळ विसांवा घेण्यासाठी ते सगळेच एकमेकांना खेटून लेटले.

आतां त्यांना घराकडे जायचे होतें. नर व मादी यांचे चारहि पाय वादीनें बांधून आणि त्या पायांतून एकेक दांडकें घालून एकेक धूड दोघांदोघांनीं आपल्या खांद्यावर घेतले. पिल्लाचें ओझें एका तरुणीनें सांभाळलें. आपला दगडी फरस उगारून मा सर्वांच्या पुढे चालत होती.

त्या जंगली मानवांना दिवसांच्या घटकापळांचें ज्ञान नसले तरी आज चांदणी-रात्र आहे याची माहिती त्यांना होती. जरा वेळ चालल्यावर सूर्य क्षितिजाखालीं बुडाला तरी देखील संधिप्रकाश बराच टिकल्यामुळे तो फार खोल बुडाला नसावा

असें वाटत होतें. संधिप्रकाश कांहीं तास टिकून मग लोपला नि चंद्रप्रकाश सुरू झाला. धरांबर धवलतेनें नाहून निघालें.

अजून गुहाघर दूर होतें. मोकळ्या जागेंत एका ठिकाणीं मा एकाएकीं थबकली आणि कसला तरी कानोसा घेऊं लागली. सगळेच गुपचूप उभे राहिले. षोडशी सव्वीशीच्या उमरींत असलेल्या तरुणाजवळ जाऊन म्हणाली, "गुर्र, गुर्र, वृक, वृक!" आपलें डोकें खालीवर हालवून मा देखील म्हणाली, "गुर्र, गुर्र, वृक! बहुत वृक, बहुत वृक!" आणि मग आवेशानें उद्गारली,–"तैयार!"

शिकार जमिनीवर ठेवून दिल्यावर सर्वांनीं आपापली हत्यारें सज्ज केलीं. एक-मेकांच्या पाठीला पाठी लावल्या, एक व्यूह केला व चहूंकडे तोंड करून ते साम-न्याला उभे राहिले. पाहतां पाहतां सात आठ लांडग्यांची एक झुंड आपल्या लपलप-णाऱ्या जिभा बाहेर काढून त्यांच्या आसपास झडप घालण्यासाठीं घोटाळूं लागली. मानवांच्या हातांतले लाकडी भाले नि दगडी बरच्या पाहून ते हल्ला चढवायला कच-रत होते. याच वेळीं व्यूहाच्या मध्यें असलेल्या लहान मुलानें आपल्या दांडक्याला बांधलेली एक कामटी काढली, कंमरेला बांधलेली पातळ वादी सोडली आणि त्याची कमान तयार केली. कुठून न कळे लपवलेले दगडाचे अणकुचीदार फाळ असलेले बाण काढले, चोविशीतल्या पुरुषाच्या हातीं दिले व त्याला मागें ओढून स्वतः त्याच्या जागीं उभा ठाकला. चोविशीतल्या तरुणाने प्रत्यंचा आणखी घट्ट बांधली नि मग टणत्कारासह एक बाण एका लांडग्याच्या कुशीत ताणून मारला. लांडगा खाली कोसळला. पण पुन्हां तो चवताळून आतां झेप घेणार तोंच त्या तरुणाने दुसरा बाण मारला. लांडग्याच्या वर्मी नेम लागला. त्याला निश्चल स्थितींत पाहून दुसरे लांडगे त्याच्याजवळ जमा झाले. आधी त्यांनीं त्याच्या शरीरांतून भळभळ वाहणारें गरम रक्त चाटून घेतले व मग ते त्याचे लचके तोडूं लागले.

लांडग्यांना खाण्यांत व्यग्र झालेले पाहून त्यानी पुन्हां आपली शिकार उचलली व सावधपणे पुढें पळ काढायला सुरुवात केली. आतां मा सगळ्यांच्या मागे राहिली आणि वारंवार मागें वळून बघत होती. आज बर्फवृष्टि न झाल्यामुळें त्यांच्या पावलांचे उमटलेले ठसे चांदण्या रात्रीं दिसत होते व त्यामुळे त्यांना रस्ता सहज दिसत होता. अर्ध्या मैलावर गुहा असेल नसेल तोंच पुन्हां लांडग्यांची धाड येऊन पोंचली. पुन्हां त्यांनीं शिकार जमिनिवर ठेवली आणि आपापलीं हत्यारें सांभाळलीं. या वेळीं धनुर्धराने कितीतरी बाण सोडले परंतु एका जागीं पळभर देखील न टिकणाऱ्या त्या लांडग्यांपुढें ते व्यर्थ गेले. बराच वेळ हुलकावणी दाख-विल्यावर चार लांडग्यांनीं एकदम षोडशी तरुणीवर हल्ला चढवला. जवळच उभ्या असलेल्या मा नें आपला भाला एका लांडग्याच्या पोटांत खुपसून त्याला लोळवलें.

पण उरलेल्या तिघांनीं षोडशीच्या जांघेचा लचका तोडून तिला लोळवलें व पाहतां पाहतां तिच्या पोटांतलीं आंतडीं बाहेर काढली. इकडे षोडशीच्या संरक्षणाकडे सगळ्यांचें लक्ष गुंतले आहे असे पाहून दुसऱ्या तीन लांडग्यांनीं चोविशींतल्या तरुणावर पिछाडीकडून हल्ला चढवला; त्याला आत्मसंरक्षणासाठीं क्षणाची देखील उसंत न देतां लोळवले व त्याला फाडून टाकले. त्याच्याकडे परिवाराचे लक्ष जातें तोंच तिकडे षोडशीला त्यांनीं पंचवीस हात लांब ओढून नेले. अर्धमेल्या लांडग्या-जवळ घायाळ पडलेला चोविशीतला तरुण आपल्या आयुष्याचीं शेवटलीं पळे मोजीत आहे असे मा ला दिसले. अर्धमेल्या लांडग्याच्या तोंडांत कुणीतरी दांडकें खुपसलें आणिक दुसऱ्यानें त्याचे पुढचे दोन पाय धरले आणि इतरांनी तोंड लावून त्या लांडग्याच्या वाहत असलेल्या गरम गरम खारट रक्ताचें प्राशन केलें. मा नें त्याच्या गळ्याची शीर तोडून त्याचे काम अधिक सुकर केले. हे सगळे कार्य कांहीं थोड्या क्षणांतच उरकण्यांत आले. षोडशीचा चट्टामट्टा केल्यावरच लांडगे आपल्यावर पुन्हा हल्ला चढवतील हें त्यांना माहित होतें. त्यांनीं चोविशीतल्या मृतप्राय तरुणाला तसेंच मागे टाकून तीन अस्वले आणि मेलेले लांडगे उचलून पुन्हां धूम ठोकली आणि ते सुरक्षितपणे आपल्या गुहेंत येऊन पोचले.

विस्तव धगधग पेटलेला होता. त्याच्या लाल प्रकाशांत सगळीच मुले आणि दोन तरुणी झोंपलेल्या दिसल्या. आजीला चाहूल लागतांच तिनें कांपऱ्या पण गंभीर स्वरांत विचारले,–"निशाऽऽ! आलीस."

"हां" म्हणून मा ने आपली हत्यारें एका बाजूला ठेवून दिली आणि मग तिनें आपला चामड्याचा पोशाख सोडून टाकून ती दिगंबरा झाली. शिकार खालीं ठेवून तिच्याच प्रमाणें इतरांनीं देखील आपलीं चामड्याचीं आवरणें बाजूला काढून ठेवली व विस्तवाचा सुखद उष्ण स्पर्श शरीराच्या कणाकणाला होऊं दिला.

आतां झोपी गेलेला सारा परिवार जागा झाला. एखाद्या सामान्य चाहूलानें देखील जागें होण्याची संवय त्यांना बालपणापासून लागलेली होती. बराचसा सांभा-ळून खर्च करून मा ने या परिवाराचा आतांपर्यंत निर्वाह केलेला होता. हरिण, ससा, गाय, मेढी, बकरी, घोडा, यांची शिकार थंडीचा मोसम सुरू होण्याच्या आधींच मिळेनाशी होते. कारण त्यावेळीं ते प्राणी दक्षिणेंतल्या उष्ण प्रदेशाकडे निघून जातात. मा चा परिवार देखील दक्षिणेकडे जायला हवा होता परंतु त्याच वेळीं षोडशी आजारी पडली. एका जिवासाठीं साऱ्या परिवाराचे प्राण धोक्यांत न आणणें हें त्या काळच्या मानवधर्मानुसार त्या परिवाराची स्वामिनी मा हिचें कर्तव्य होतें. परंतु तिनें आपल्या हृदयाचा दुबळेपणा दाखवला. नि आज एका ऐवजी दोन जीव बळी गेले. अजून दोन महिने तरी ते शिकारयोग्य प्राणी परत येणार नाहींत; बघूं या,

तोंपर्यंत आणखी कितीकांचे बळी जातात तें! तीन अस्वलें नि एक लांडगा यांच्या-वर उरलेला हिवाळा निभणें शक्य नाहीं.

मुलांना खूपच आनंद झाला; बिचारे रिकाम्या पोटी झोंपलेले होते. मा नें आधीं त्यांना लांडग्याच्या काळजाचे काप करून दिले आणि मुलें ते बकाबका खाऊं लागलीं. जरा देखील नासधूस होऊं न देतां चामडें उधडण्यांत आलें. चामडे कितीतरी उपयोगीं पडतें. मांसाचे कापून तुकडे वांटण्यांत आले. बऱ्याच जणांनीं तर भुकेमुळें थोडेंफार कच्चेंच खाऊन टाकलें, नि मग सर्वांनीं निखाऱ्यावर भाजून भाजून खायला सुरवात केली. आपल्या भाजलेल्या तुकडयांतून एक घांस मा नें घ्यावा म्हणून प्रत्येक जण तिला आग्रह करूं लागला. मा म्हणाली, "घ्या, आज पोटभर खाऊन घ्या. उद्यांपासून इतकं मिळायचं नाहीं."

मा उठून गुहेच्या एका कोपऱ्यात गेली व तेथून तिनें एक चामड्याची भरलेली पखाल आणून म्हटले, "आणि ही मधुवारुणी, आज प्या, नाचा, मजा करा."

लहानग्यांना पखालींतून एकेक घोंट प्यायला मिळाला पण थोरल्यांना खूपखूप! नशा चढूं लागली, डोळे लाल झाले. हास्याची खसखस पिकली. कुणी गाऊं लागले. थोरल्या पुरुषाने काठीवर काठी वाजवून ताल धरला, सगळे नाचूं लागले. आज वस्तुतः आनंदरात्रि होती. राज्य मा चें होतें परंतु तें असमानता आणि अन्याय यांचे राज्य नव्हतें. म्हातारी आजी व थोरला पुरुष यां शिवाय सगळेच मा च्या कुसव्यांतून जन्मास आले होते. आणि मा व थोरला पुरुष हे दोघे म्हातारींचेच मुलगी नि मुलगा होते. यामुळें त्या परिवारात हें माझे नि हें तुझें हा मुळी प्रश्नच उद्भवत नव्हता. आपपरभावाचे युग अजून यावयाचे होते. मात्र सगळ्या पुरुषांवर मा चा समान आणि पहिला हक्क होता. पति व पुत्र असलेला चोविशींतला तरुण मेल्याचें तिला दुःख झालें नाही, अशांतला कांहीं भाग नव्हता; परंतु त्या वेळचें जीवन भूतकाळाची चिंता करण्यापेक्षां चालू वर्तमानकाळाचीच अधिक काळजी करीत असे. मा चे दोन पति जिवंत होते, तिसरा चौदा वर्षे उमरीचा लवकरच तयार होऊं घातलेला होता. तिच्या राज्यांतल्या बालकांपैकीं कितीजण पतिपदाला पोंचत असतील हें सांगता येत नाहीं. मा ला सव्वीस वर्षांचा तरुण आवडत होता, त्यामुळें उरलेल्या तिघी तरुणींसाठीं पन्नाशीची झुळुक लागलेला थोरला पुरुषच काय तो शिल्लक होता.

हिंवाळ्याच्या शेवटीं शेवटीं एक दिवस आजी कायमची निजलेली आढळली. बालकांपैकीं तिघांना लांडग्यांनीं उचलून नेलें आणि थोरला पुरुष बर्फ वितळल्यावर एके दिवशीं नदीच्या पुरांत वाहून गेला. अशा रीतीनें त्या सोळा जणांच्या परिवाराची संख्या नवावर उतरली.

वसंताचे दिवस ! चिरमृत निसर्गात नवजीवन संचारत होतें. सहा महिन्यांपासून वाळलेल्या भोजांच्या झाडांना आतां पालवी फुटूं लागली. बर्फ वितळलें, हिरवळीनें धरणीची लाज राखली. हवेंत वनस्पति आणि ताजी माती यांचा मादक ओला सुगंध दरवळूं लागला. जीवनहीन दिगंत सजीव झालें. कुठें वृक्षांवर पक्षी विविध प्रकारचे मधुर शब्द किलबिलत होते, तर कुठें रातकिडयांचे सतत क्रंदन चाललेलें होतें. कुठें पाघळलेल्या बर्फाच्या प्रवाहाच्या कांठीं बसून हजारों पाणपक्षी किड्यांची मेजवानी उडवीत होते, कुठें कलहंसांची प्रणयकेलि चाललेली होती. आतां या हिरव्यागार पहाडी जंगलांतून हरिणांचे कळपां मागून कळप चरतांना व पळतांना दिसत. कुठें कुठें शेळ्या, मेंढ्या, गायी आणि सांबर यांचे देखील कळप दिसत. नी मग कांही जागीं त्यांच्या घातासाठीं टपलेले, दबा धरून बसणारे चित्ते आणि कांही जागीं लांडगे देखील दिसत. बांध घातलेल्या नदीच्या प्रवाहाप्रमाणें हिंवाळ्याच्या दिवसांत एका जागीं तुंबून बसलेले मानवपरिवार आतां प्रवाहित होऊं लागले. आपलीं हत्यारे, चामडी, आणि मुलें यांना घेऊन व घरांतल्या विस्तवाची जतन करून ते उघड्या जागीं येऊं लागले. जसजसे दिवस लोटले तसतसे पशु व वनस्पति यांच्या प्रमाणेंच त्यांच्याहि सुकटलेल्या कातडीखाली मास आणि चर्बी यांचे थर जमूं लागले. कधीं त्यांचे लांब केसवाले मोठमोठे कुत्रे शेळयामेंढ्यांची शिकार करतात, तर कधीं ते स्वतःच जाळें, बाण किंवा काठीचा भाला यांच्या साहाय्यानें एखादें सावज मारतात. नद्यांत मासळ्या आहेत; नि या वोल्गाच्या वरच्या भागांतल्या रहिवाशांचें जाळें नदींतून कधी देखील रितें किंवा हलकें निघायचें नाहीं.

अजून देखील रात्रीं थंडी पडायची, पण दिवसा मात्र ऊब वाटायची. मा चे नांव निशा. हा निशापरिवार आजकाल दुसऱ्या परिवारांच्या बरोबर वोल्गाच्या किनाऱ्यावर तळ देऊन होता. निशेप्रमाणेंच इतर परिवारांत देखील त्याच्या मातांची हुकमत होती; पित्यांची नाहीं. खरें सांगायचे म्हणजे तिथे कोण कुणाचा बाप हें सांगणेंच शक्य नव्हतें. निशाला आठ मुली आणि सहा मुलगे झाले, त्यांपैकीं चार मुली आणि तीन मुलगे आतां देखील तिच्या पंचावन्नीच्या उमरींत हयात होते. हीं सारीं निशेचींच संतानें यांत संशय नाहीं. कारण ती त्यांना प्रसवली होती, परंतु त्यांचा बाप कोण हें सांगतां येत नाहीं. निशेच्या आधीं जेव्हां तिची आई–म्हातारी आजी–हिचा अधिकार होता तेव्हां त्या म्हातारीला–तेव्हांच्या प्रौढेला–कितीतरी बंधुपति होते, कितीतरी पुत्रपति होते. त्या साऱ्यांनीं निशेबरोबर नाचून गाऊन तिला आपली प्रेमिका बनविण्यांत यश मिळवलें होतें. आणि मग स्वतः राणी बनल्यावर निशेची वारंवार बदलणारी प्रेमेच्छा झिडकारण्याची हिंमत तिच्या

भावांत किंवा वयांत आलेल्या पुत्रांत नव्हती. म्हणूनच निशेच्या जिवंत असलेल्या सात संतानांपैकीं कोण कुणाचा बाप असेल याचा पत्ता लावणें असंभव होतें. निशेच्या परिवारांत ती स्वतःच सर्वांत वडील आणि अधिकारसंपन्न देखील आहे, पण आतां तिचा तो अधिकार फार काळ टिकणें शक्य नाहीं. वर्षा दोन वर्षांत ती स्वतः म्हातारी आजी बनेल आणि मग सर्वांत बलवान असलेली निशापुत्री लेखा हिचें राज्य होईल. त्यावेळीं लेखाबरोबर तिच्या बहिणींचें भांडण झाल्याशिवाय राहणार नाहीं. दरवर्षी नैवेद्यादाखल परिवारांमधली कांहीं माणसे लांडग्याचित्त्यांच्या दाढा, आस्वलांचे पंजे, बैलांचीं शिंगें, वोल्गाचे पूर, यांना बळी जात असल्यामुळें प्रत्येक राणीमातेचें कर्तव्य आपला परिवारक्षय न होऊं देण्याचे असतें. आतांपर्यंत असेच होत आले. लेखाच्या बहिणींतून एकाददुसरी तरी स्वतःचा सवता परिवार निर्माण करायला समर्थ होईल याची आम्हांला जाणीव आहे. जसें अनेक वीर्यांचें एक क्षेत्र होतें तसेंच जर अनेक रजांचें एकच वीर्यक्षेत्र असते तर मात्र ही परिवारांची वाढ खुंटली असती.

परिवाराची राणी निशा आपली कन्या लेखा हिचे शिकारींतलें यश बघत असते. ही एखाद्या हरिणीप्रमाणें पहाडावरून चढत्ये. एक दिवसाची गोष्ट. एका उंच सुळक्यावर एक मधाचे मोठें पोळें नजरेस पडलें. तें इतके उंचावर होतें कीं मधाला लालचावलेल्या अस्वलांना देखील तिथे चढून तोंड खुपसतां येत नव्हतें. पण लेखानें काठीला काठी बांधली नि एखाद्या पालीप्रमाणे हळू हळू पुढें सरकत तिनें एका रात्री मशालीनें पोळ्यावरच्या मोठमोठ्या जहरी गांधीलमाशांना जाळायला, पळवायला सुरुवात केली, पोळ्याला एक भले मोठे तोंड फोडलें. खाली धरलेल्या चामड्याच्या बुधल्यांत तीस शेरापेक्षां कमी सहद पडलेलें नसावें. नुसत्या निशा-परिवारानेंच नव्हे तर आसपासच्या इतर परिवारांनीं देखील लेखाच्या या धाडसाची प्रशंसा केली. परंतु निशेला तिचें कौतुक वाटलें नाही. तरुण निशापुत्र लेखाच्या कटाक्षावर जसे नाचू लागत, तसे तिच्या आर्जवाला देखील वश व्हायला तयार नसतात, असें तिला आजकाल दिसू लागलें. मात्र ते तिची उघड उघड अवज्ञा करण्याची हिंमत करीत नाहींत.

निशा बऱ्याच दिवसांपासून कुठला तरी उपाय शोधत होती. कधीं तिला वाटे, झोपेंत लेखाचा गळा दाबून प्राण घ्यावा; पण ती आपल्यापेक्षां बलिष्ठ असल्यामुळें आपण तिचें एकटीचें कांहींच वांकडे करूं शकत नाहीं याची देखील तिला जाणीव होती. बरें, आणिक दुसऱ्यांचें सहाय्य मागावे तर देणार कोण? परिवारांतले सारेच पुरुष लेखाच्या प्रीतीला नि कृपेला पात्र होऊं इच्छीत होते.

निशेच्या कन्या देखील "मा"ला साथ द्यायला तयार नव्हत्या, इतकी त्यांना

लेखाची भीति वाटत होती. उगाच प्रयत्न फसला तर लेखाच्या हातून कशा प्रकारें आपलें मरण ओढवेल हे त्यांना माहित होतें.

निशा एकटीच कसला तरी विचार करूं लागली. एकाएकीं तिचा चेहरा प्रफुल्लित झाला. लेखाचा कांटा काढून टाकण्याची एक युक्ति तिला सुचली.

दिवसाचा पहिला प्रहर– सारे परिवार आपापल्या चामड्याच्या राहुटीमागें नग्नावस्थेंत अंगावर ऊन घेत, कांही बसलेले तर कांहीं पहुडलेले. परंतु निशा मात्र राहुटीच्या पुढें बसून राहिली. तिच्या जवळ लेखाचा तीन वर्षांचा मुलगा खेळत होता. निशेच्या हातांतल्या द्रोणांत लाल लाल स्ट्रॉबेरीचीं फळें होतीं. जवळच वोल्गा वहात होती. निशेच्या पुढे सरळ मुळक्यावाणी तिचा कांठ होता. कांठापर्यंत उतरणीची जमीन ; त्या उतरणीवर निशेनें एक फळ सरकवलें. मुलगा धांवला नि त्यानें पकडून खाऊन टाकले. मग दुसरे सरकवलें पण तें जरा पुढें गेल्यावरच त्याला सांपडूं शकलें. निशेने खूप वेगानें एका मागून एक कितीतरी फळें फेकलीं व तीं सांवडण्यासाठीं केलेल्या धांदलीत त्याचा पाय कांठावरून घसरला आणि तो घप्पकन वोल्गाच्या वेगवान धारेंत कोसळला. वोल्गाकडे नजर फेंकून निशेनें किंकाळी फोडली. जवळच पण जरा दूरवर बसलेल्या लेखाचे तिकडे लक्ष गेले. आपला मुलगा दिसेना म्हणून तिनें धारेंत उडी घेतली. अजून तिचा मुलगा धारेंत खालीवर गटंगळ्या खात होता. तिनें हात मारून त्याला धरलें. पोटांत पाणी गेल्यामुळे मुलगा गळून गेला होता. वोल्गाचे बर्फाळ पाणी शरीराला कांट्यासारखें खुपत होतें. लेखेने धार तोडून कांठाकडे जाणें 'म्हणजे एक दिव्यच होतें. तरी पण तिनें एका हातात मुलगा घेऊन दुसऱ्या हातानें आणि पायानें पाणी तोडण्याचा प्रयत्न चालू ठेवला. त्याच वेळीं आपल्या गळ्यावर कुणाच्या तरी मजबूत हातांची पकड बसल्याचें तिला कळून चुकलें. आतां सारा कांही प्रकार लेखाच्या ध्यानीं आला. बऱ्याच काळापासून ती निशेची बदललेली मनोवृत्ति पहात होती. आतां निशा आपल्या मार्गांमधला लेखाचा कांटा उपटूं पहात होती. आतां देखील लेखा आपल्या बळाचा पडताळा निशेला आणून देऊं शकली असती पण तिच्या हातांत मुलगा होता.

लेखा अजूनहि जोर करत्ये असें निशेला दिसून येतांच तिनें आपली छाती तिच्या डोक्यावर दाबली. लेखा बुडाली. त्या धडपडींत तिच्या हातून मुलगा निसटून गेला. अजून देखील तिला निशेनें आपल्या पकडींतून सोडलें नाहीं. एकाएकीं तिच्या गळ्याभोंवतीं लेखाच्या हातांचा विळखा बसला. बेशुद्ध लेखाच्या गळभारासह निशा पोहूं शकत नव्हती. तिनें थोडा फार प्रयत्न केला पण व्यर्थ. मायलेकी वोल्गाच्या तळाशीं गेल्या. परिवारांतली बलिष्ठ स्त्री रोचना राणी बनली.

# २—दिवा

**देश**-वोल्गा. तट (मध्य). **जाति**-हिंदी-स्लाव.

**काल**. इ. स. पूर्व ३५०० वर्षे.

– १ –

"दिवा, उन बघ कसं कडकलंय, घामाच्या धारा बघ कशा ओहळताहेत तुझ्या देहावरनं. ये इथं या शीलेवर बसू!"

"येत्ये हं, सूरश्रवा!" असें म्हणून दिवा सूरश्रवाबरोबर एका विशाल देवदारुच्या सावलींत असलेल्या शीलाखंडावर बसली.

ग्रीष्माचे दिवस, माध्याह्न, त्यातून मृगाचा पाठलाग केलेला; मग दिवेच्या ललाटी मोत्यांच्या कांतीचे घर्मबिंदु कसे झळकणार नाहींत बरे? परंतु हे स्थानच असे होतें की तिथे त्याच्या श्रमांचा परिहार व्हायला उशीर लागत नसे. आपादमस्तक हिरवळ नेसलेली टेकडी, विशाल देवदारूने आपल्या फांद्या-पानांच्या विस्तारानें सूर्यकिरणांना अडवलेलें, तळाशी नानाप्रकारच्या वेली आणि लतांकुर ; जरा वेळ बसल्यानेंच त्या तरुण युग्माला आपल्या कष्टांचा विसर पडला. भोवतालच्या फुलझाडांचीं रंगी बेरंगी फुले नि त्यांचा दरवळणारा मधुर सुवास त्यांच्या मनाला मोहित करूं लागला. तरुणाने आपले धनुष्यबाण नि पाषाण-परशु शिलेवर ठेवून दिले आणि जवळच झुळझुळणाऱ्या स्फटिकाप्रमाणें स्वच्छ जलप्रवाहाच्या कांठीं उगवलेल्या फुलांच्या ताटव्यांतून पांढरीं, जांभळी नि लाल फुलें खुडायला त्यानें सुरवात केली. तरुणीनें देखील हत्यारे खाली ठेवून आपल्या लांब सोनेरी केसांशीं चाळा करायला प्रारंभ केला ; अजून देखील त्यांच्यांत ओलसरपणा होताच. तिनें खालीं प्रशांत प्रवाहिनी वोल्गाच्या धारेकडे एकवार दृष्टिक्षेप केला. तिचें ध्यान क्षणभर पक्षीगणांच्या गोड किलबिलीकडे गेले, नि मग तिने ओणव्यानें फुलें खुडणाऱ्या तरुणाकडे पाहिले. तरुणाचे केश तिच्या सारखेच सोनेरी होते पण आपल्या केसांबरोबर त्यांची तुलना करायला ती तयार नव्हती. त्याचे केश तिला अधिक सुंदर वाटत होते. तरुणाचें मुख दाट पिंगट स्मश्रूने झांकलेलें होतें. त्या मधून नासिका, कपोलभाग आणि ललाट यांच्या वरला लालिमा प्रस्फुटित होत होता. तिची दृष्टि मग सूरश्रवाच्या भरदार पण केंसाळ भुजांवर गेली. एके दिवशी त्यानें

याच भुजबळांच्या जोरावर आपल्या दगडी फरसाने एका मजबूत सुळे असलेल्या बलाढ्य रानडुकराचे पेकाट एकाच वारासरसे कसें मोडून टाकले होतें याची तिला आतां आठवण झाली. त्यावेळी वज्रकठोर वाटणाऱ्या भुजा आतां फुलें खुडतांना किती सुमकोमल वाटत होत्या. त्याच्या दंडांतून फुगून उठणारे स्नायु, त्याच्या मनगटांतून उमटून दिसणाऱ्या शिरा, यांच्यामुळे बाहूंना येणारे विषम आकार त्याच्या सामर्थ्याची साक्ष पटवीत होते. एक वेळ तिच्या मनांत आले—उठावं नि त्या बाहूंना चुंबून घ्यावं. त्यांच्याबद्दल तिला त्यावेळी इतकें प्रेम उचंबळून आलें होतें. नंतर तिची दृष्टि तरुणाच्या जंघांवर गेली. प्रत्येक हालचालीनें त्यांमधले स्नायु सळसळत. मांड्यांत चर्बीचे नांव नाही, नुसत्या स्नायूंनी युक्त; पिंडऱ्या भरीव आणि घोटे क्षीण ; हे सारें दिवेला खरोखरच अभिनव वाटत होते. सूरने दिवेचें प्रीतिधन मिळावे म्हणून कितीदा तरी इच्छा दाखविली होती– पण शब्दाने नव्हे, तर हावभावाने! नृत्य प्रसंगीं अनेकदां त्याने आपले श्रम, आपले कौशल्य दाखवून तिला प्रसन्न करून पाहिले. परंतु दिवेने जिथे स्वजनातील अनेक तरुणांना नृत्यसमयी आपल्या बाहूंचा आसरा दिला, कितीदां तरी त्याना आपली अधर-चुंबने दिली, कितीदां तरी त्याचे अंक उशाला घेतले, पण बिचाऱ्या सूरला मात्र एखादे चुंबन, एखादे आलिंगन तर जाऊंच द्या, पण एक वेळ हातात हात घालून जोडीने नृत्य करायला देखील मिळाले नाही.

सूर फुलांची ओंजळ भरून दिवेकडे येत होता. त्याचे नग्न सर्वांग किती पूर्ण वाटत होते. केवळ स्नायूंनी युक्त असे त्याचे विशाल वक्ष, चर्बी नसलेले त्याचे कृशोदर, किती मनोहर! दिवेच्या डोळ्यांत आज हे सारे भरले आणि आपल्या लक्षांत आधी हे कसे आले नाहीं याची तिला खंत वाटूं लागली. पण यांत वस्तुतः तिचा जरा देखील अपराध नव्हता ; अपराध होता सूरच्या तोंडाला लागलेल्या संकोचाच्या टाळ्याचा. ज्यानें दार ठोठावले त्याच्यासाठी ते उघडे झाले. सूरजवळ येतांच दिवेनें सस्मित म्हटले, "ही फुलं किती सुंदर आहेत, किती सुवासिक आहेत."

सूरनें फुलें शिलातलावर ठेवीत म्हटले, "ही फुलं मी तुझ्या सोनेरी केशांत माळलीं म्हणजे अधिकच सुंदर दिसतील."

"म्हणजे? सूर, हीं फुलं तूं माझ्याचसाठी आणलींस?"

"होय दिवा ; मी या फुलांना पाहिलं, तुला पाहिलं, नि मला जलदेवतांची आठवण झाली."

"जलदेवता?"

"हूं, असीम सौंदर्यवती जलदेवता.–त्या प्रसन्न झाल्या कीं मनकामना पूर्ण करतात आणि रागावल्या तर प्राण देखील घेतात."

"तर मग सूर, सांग मी कशा प्रकारची जलदेवता आहे?"

"न रागावणारी!"

"पण मी तर तुझ्यावर कधींच सुप्रसन्न झाल्यें नाहीं."–दिवेनें एक दीर्घ उसासा टाकला आणि ती गप्प बसली.

सूरनें म्हटले, "नाही दिवा, तूं माझ्यावर कधींच रागावली नाहींस. आठवतात ते बाळपणातले दिवस?"

"तेव्हा देखील तू लाजाळूचं झाड होतास!"

"पण तूं माझ्यावर रागवत नव्हतीस!"

"तेव्हां मी आपणहूनच तुझी चुंबनं घ्यायची!"

"हूं, ती चुंबनं किती गोड वाटायची!"

"पण जेव्हां माझे हे गोल गोल स्तन आकार धारण करू लागले, माझ्या चेहेऱ्यावर स्वजनांतले तरुण भाळूं लागले, तेव्हां मी तुला विसरून गेल्ये."–दिवा जरा खिन्नपणानें हे बोलली.

"पण दिवा, यात तुझा दोष तो काय?"

"मग कुणाचा दोष?"

"माझा. कारण जनांतले सारे तरुण तुझं चुंबन मागत असत, तूं त्यांना देत होतीस; सारे तरुण तुला आलिंगन मागत आणि तूं देत होतीस. मृगयाचतुर, नृत्यकुशल, धडधाकट, आणि सुंदर अशा कोणत्याहि जनतरुणाचा तूं आशाभंग केलेला नाहींस."

"परंतु सूर! तूं देखील तसाच नाहींस का? त्या सर्वांच्यापेक्षां चतुर, कुशल, बलिष्ठ, आणि तुझ्या आशेचा मात्र मी भंग केला."

"दिवा, पण मी कधी आशा दाखवली तरी का?"

"शब्दानं नसेल! बालपणीं आपण जेव्हां एकत्र खेळत असूं तेव्हां देखील तूं कधीं आशा बोलून दाखविली नाहींस, परंतु दिवेला सारं कांहीं समजत असे. आणि दिवेला आता सूरचा विसर पडला होता. पण ही दिवा (दिवस) त्या चमकत्या सूरला (सूर्याला) कधींतरी विसरल्ये का? नाही सूर, आतां मी तुला नाहीं विसरायची!"

"तर मग मी तोच सूर आणि तूंही पण तीच दिवा होणार!"

"होय, आणि बघ हें असं तुझ्या ओठांचं चुंबन घेणार!"

ल्हान बालकांप्रमाणे त्या नग्न सौंदर्यमूर्तींनीं आपले अतीव आरक्त अधर एकमेकांशीं जुळवले. मग दिवेने आपले जवसाच्या फुलांप्रमाणें निळे असलेले डोळे सूरच्या तशाच निळ्या नेत्रांनां भिडवून म्हटले, "तूं माझ्या आईचा मुलगा असून तुला मी विसरल्ये होत्यें."

दिवेचे डोळे ओले झाले. सूरने आपल्या गालाने तिचे डोळे पुशीत म्हटलें, "नाही ग, तूं विसरली नाहींस, जेव्हां तूं वयांत आलीस, तेव्हां तुझी वाणी, तुझे नेत्र, तुझं सर्वांग मला जरा दुसरंच भासूं लागलं, नी म्हणून मी तुझ्यापासून दूर सरूं लागलो."

"पण हे तुला आवडत नव्हतं, सूर!"

"अग पण दिवा—"

"ते कांही नाही, साग, आतां पुन्हां लाजायला लागशील का?"

"नाही लाजणार! बरं आता ही फुलं तरी माळूं दे!"

सूरने एका डहाळीची साल काढली आणि तींत तो लाल, पांढरी, जांभळी फुले गुंफूं लागला. फुलांच्या क्रमांत अभिरुचि होती. तिचे केश त्याने व्यवस्थितपणे पाठीवर पसरून टाकले. उन्हाळ्याच्या दिवसात वोल्गा-तीरावरील तरुणतरुणी जलक्रीडेचा आनंद उपभोगत असत. त्यामुळे दिवेचे केश मोकळे सडसडीत होते. सूरने तिपदरीं कमरपट्ट्याप्रमाणें वेणी घालून तिचा केशकलाप सजवला आणि जांभळ्या फुलांचे गोंठ असलेला एक पांढऱ्या फुलांचा गुच्छ कपाळपट्टीवरच्या केशांत खोचला. दिवा शिलातलावर बसून राहिली. सूरने जरा मागे हटून तिच्या मुखाकडे पाहिलें. त्याला ती सुंदर वाटली; आणखी जरा दुरून पाहिलें, आणि ती अधिकच सुंदर दिसूं लागली. पण तिथें फुलांचा सुवास येत नव्हता. सूरने जवळ बसून आपला गाल दिवेच्या गालाशी टेंकला. तिनें आपल्या सोबत्याचें नेत्रचुंबन घेतलें आणि आपला उजवा हात त्याच्या स्कंधभागीं ठेवला. त्याने आपल्या डाव्या हातानें दिवेच्या कटिभागाला वेढा देत म्हटलें, "दिवा, ही फुलं आधीपेक्षां आतां अधिक सुंदर वाटतात."

"फुलं कीं मी?"

सूरला उत्तर सुचले नाही; जरा थांबून तो म्हणाला, "मी मागं सरून न्याहाळलं, तर तूं अधिक सुंदर दिसूं लागलीस. आणखी मागं सरलो नि बघितलं तर तूं आणखी अधिक सुंदर भासूं लागलीस."

"आणिक वोल्गाकांठून बघायचं होतंस?"

"छेः, तितक्या दुरून नाही."—त्याच्या डोळ्यांत चिंता झळकून गेली.—"दुरून तुझा सुगंध लोपतो नि रूप पण दुरावतं."

"तर मग सूर, तूं मला दुरूनच बघणार कीं माझ्याजवळ रहाणार?"

“जवळ रहाणार दिवा, जसा दिवेच्या जवळ सूर चमकतो तसाच अगदीं!”

“आज माझ्याबरोबर नृत्य करशील?”

“करीन तर!”

“आज माझ्या सहवासांत रहाशील?”

“अर्थात!”

“सारी रात्र?”

“अर्थात!”

“तर मग मी आज जनवासी तरुणांपैकी इतर कोणाजवळ रहाणार नाहीं–” असे म्हणून तिने सूरला आलिंगन दिलें.

अशांतच आणखी किती तरी तरुणतरुणी त्या जागी आल्या. त्यांचा चाहाळ लागला तरी देखील सूर–दिवा तसेच आलिंगनबद्ध अवस्थेत उभे राहिले. जवळ आल्यावर त्यांनी विचारले, “दिवा, आज तूं सूरला आपला सोबती निवडलंस?”

“हूं” असे म्हणून त्यांच्याकडे वळत ती सांगू लागली, “हें बघितलंत, हा फुलांचा शृंगार सूरनं घातला!”

एक तरुणी—“सूर, तूं फुलं चांगली माळलीस. माझ्या केसांत माळ ना?”

दिवा--“आज नाहीं, उद्यां! आज तो माझा!”

तरुणी--“मग उद्या तो माझा!”

दिवा—“उद्यां? ऊहूं –उद्यां देखील तो माझाच!”

तरुणी म्हणाली– “दररोज सूर तुझाच! दिवा, ही रीत नव्हे!”

दिवेच्या ध्यानांत आपली चूक आली. ती म्हणाली--“दररोज नाही स्वसर (बहिणी)! आज आणि उद्यां! झालं?”

हळूं हळूं कितीतरी आणखी प्रौढ शिकारी आले; एक काळा धिप्पाड कुत्रा देखील! त्यानें येतांच सूरचे पाय चाटायला सुरवात केली. सूरला आतां आपण मारलेल्या लांडग्याची आठवण झाली. दिवेच्या कानांत कायसेंसे सांगून त्यानें धांव घेतली.

– २ –

कुडाच्या भिंती आणि गवताचे छप्पर असलेलें एक विशाल खोपट होतें. दगडाचे परशु तीक्ष्ण असले तरी त्यांनीं इतका लांकुडफांटा तोडणें शक्य नव्हतें. त्यांनीं लांकडे कापण्यासाठीं विस्तवाचें सहाय्य घेतले होतें परंतु पाषाण परशूंनीं बराचसा कार्यभाग उरकला होता यांत संशय नाहीं. आणि हें येवढें विशाल खोपट? –यांतच सारे निशाजन–(जुन्या काळांत होऊन गेलेल्या एका निशा नामक स्त्रीपासून जन्मलेला वंशविस्तार)–रहात होते. सारा विस्तार एका छपराखालीं रहात होता, एकत्र शिकार करीत होता आणि एकत्रच फळांचा आणि मधाचा संचय करीत होता.

साऱ्या जनविस्ताराची नायिका एकच होती, जनविस्ताराचा कारभार एक समिती पहात होती. या कारभाराबाहेर असा जनविस्तारांतल्या व्यक्तीच्या जीवनांतला एकहि अंश मोकळा नसे. शिकार, नृत्य, प्रेम, घर बांधणे, चामड्याचीं वस्त्रे तयार करणें या संबंधींचे संचालन जनसमिती करायची. या समितीत जनमातांचे प्राधान्य असायचें. निशाजनांच्या या खोपटांत १५० स्त्रीपुरुष रहात होते. हा काय सगळा एकच परिवार होता? तसे ते कितीतरी परिवार होते असे म्हणावे लागेल. कारण आईच्या जिवंतपणीच तिच्या वंशविस्ताराचा एक लहान परिवार होत असे; तो अशा अर्थाने की त्या परिवारामधील व्यक्ति त्या आईच्या नांवाने ओळखल्या जात असत. उदाहरणार्थ–दिवेची आई वारली आणि दिवा कितीतरी मुलांमुलींची माता झाली तर त्यांना दिवासूनु (दिवापुत्र) आणि दिवादुहिता (दिवापुत्री) या नांवाने ओळखण्यांत येईल. इतकें झालें तरी दिवेच्या अपत्यांची आपली स्वतःची मांसफळे आदि संपत्ति असूं शकणार नाहीं. सगळेच जण–स्त्री पुरुष दोघेहि–बरोबरीने कमाई करतील, बरोबरीनेच तिचा उपभोग घेतील आणि संपत्तीच्या अभावी बरोबरीनेच उपाशीहि मरतील. जनापासून व्यक्तीला वेगळे रहाण्याचा अधिकार नव्हता. जनाची आज्ञा, जनाचे रीतिरिवाज, यांचे पालन करणें त्याना इतके अंगवळणी पडले होतें की जणुं काय ते हे सारे स्वेच्छेनेच करीत.

आणिक खोपट? हे एक जुजबी खोपट उभारलेले होते. जेव्हां जवळपासची शिकार दूर निघून जाई, आसपासची कंदमूळफळे संपून जात, तेव्हां सारा जनगण दुसऱ्या जागी निघून जायचा. शतकानुशतके चालत आलेल्या अनुभवावरून त्याना शिकारीचें स्थलांतर केव्हां होतें याचे ज्ञान आहे. इथून गेल्यावर गवताचे छप्पर नासधूस होईल पण दगडी किंवा लांकडी भिंती मात्र कितीतरी वर्षे टिकाव धरतील. नव्या जागीं जाऊन या अशाच प्रकारच्या भिंतीवर गवत शाकारलें कीं नवें "दम" (घर) बनविण्यांत येई. त्यांत एक सामान ठेवण्याची जागा, एक स्वयंपाकाची. जनगण हाताने मातीची भांडी तयार करीत. मृतांच्या डोक्याच्या कवट्या देखील भांड्याप्रमाणें उपयोगांत आणीत. मांस कधी कच्चेच खाण्यात येई, तर कधीं ताजें मांस भाजून खात. वाळलें मांस भाजणें निषिद्ध मानण्यांत येई. वोल्गाच्या त्या भागांत मध पुष्कळ मिळायचा; त्यामुळे तेथे मध्वद अस्वले देखील पुष्कळ असत. निशाजनांस मध खूपखूप आवडतो; मधु खाद्य म्हणून आणि मद्याच्या रूपाने देखील!

आणिक हें संगीत?–स्त्रिया नि पुरुष मधुर स्वरांत गात आहेत. नेसायची चामडीं तर बडवीत नाहींत ना हे?–जन प्रत्येक काम नुसतें सम्मीलित रीतीनेंच करीत नाहीं तर तींत मनोरंजकता निर्माण करतात. सम्मीलित कामाचें एक अंग

गीत असते; संगीताच्या योगाने केलेल्या कष्टांचा विसर पडतो. परंतु आतां चालले होतें तें गीत श्रमसंगीत नाहीं. यावेळी एकदां स्त्रियांच्या कंठांतून कोमल मंजुळ स्वर निघतात आणि मग पुरुषांच्या कंठांतून गंभीर कर्कश ध्वनि बाहेर येतो. बघूं या तरी काय ते!

खोंपटाच्याच पण एका वेगळ्या भागांत जनांतले बाल, तरुण व वृद्ध नर-नारी एकत्र जमले होते. मध्यभागी छप्पर कापून झरोका ठेवलेला होता. त्याच्या खालीं देवदाराच्या लांकडांचा विस्तव धगधगत होता. स्त्रीपुरुष मोठ्या प्रीतीनें कांही तरी गात होते. त्यांतून हे शब्द ऐकायला येत—"ओ—ो—ो—ग—ग्—न्—ा—ा—आ—ा—या—ा—"

काय ते अशा रीतीनें अग्नीची प्रार्थना तर करीत नसतील? बघा ती जन-नायिका आणि जनसमितीच्या व्यक्ती अग्नींत मांस, चर्बी, फळे आणि मध टाकीत आहेत. यावेळी जनांस खूप शिकार मिळाली, फळे आणि मध यांची सुबत्ता राहिली, पशु आणि मानवजातीच्या शत्रूकडून जनसंतानाची हानि झाली नाहीं म्हणून आज पौर्णिमेच्या रात्री जन अग्निदेवाला पूजा अर्पण करून आपली कृतज्ञता व्यक्त करीत होते. आताच जननायिकेनें मधापासून केलेल्या मद्याचा एक चषक विस्तवावर ओतला; लोक उभे राहिले. ते सारे नग्न आहेत, अगदी जन्माच्या वेळी होते तसेच. थंडी नव्हती म्हणून त्याना या गर्मीच्या दिवसांत आपले चामडे दुसऱ्या कुणाच्या चाम-ड्याने झांकून घेणे उचित वाटत नाहीं. पण यांचे देह किती सुडौल आहेत! यात कुणाचे तरी पोट सुटलेले दिसते का? चर्बीमुळे कुणाच्या तरी देहाची लोथपोथ झालेली आहे का? याला म्हणतात सौंदर्य नि आरोग्य! या सर्वांचे चेहरे मात्र एका घडणीचे—एकसारखे! कां नसतील? आपले बाप-भाऊ-मुलगे यांच्या पासून निशेला झालेल्या मुलांमुलींची ही वंशावळ! सगळेच बलिष्ठ आणि निरोगी; निर्बल रोगी व्यक्ति, या असल्या निसर्ग आणि पशु यांच्याशी शत्रुत्व असलेल्या जीवनात, जगूंच शकत नव्हती.

जननायिका उठून एका दुसऱ्या मोठ्या जागेकडे गेली. तेथें लोक मातीच्या ओट्यावर बसूं लागले. मधुमद्याचे बुधल्यामागून बुधले येऊं लागले. आणि चषक कसले म्हणाल तर—कित्येकांजवळ डोक्याच्या कवटीचे; कित्येकांजवळ हाडांचे किंवा शिंगाचे ; तर कित्येकांजवळ नुसत्या देवदाराच्या पानांचे द्रोण ! तरुण—तरुणी, प्रौढ—प्रौढा, वृद्ध—वृद्धा, वेगवेगळ्या जागीं बसून मद्यप्राशन आणि वार्तालाप करीत होते. पण हा नियम मात्र नव्हता. कितीतरी वृद्ध स्त्रियांना वाटे कीं आपण आपल्या ऐन भरांत जीवनाचा आनंद पूर्णपणें लुटला ; आतां तरुणांची पाळी आहे.

कितीतरी तरुणी वृद्धांना त्यांच्या जीवनसंध्येच्या काळांत अमृताचा एक घोंट आपल्या हातून पाजण्याची तयारी दर्शवतात. ती दिवा पहा–तिच्या आसपास कितीतरी तरुणतरुणी बसलेल्या आहेत. आज तिचा हात ऋभूच्या खांद्यावर आहे, सूर दमेजवळ बसलेला आहे.

खान, पान, गान, नृत्य आणि मग याच मोठ्या जागेत प्रेमिकांचे अंकशयन! सकाळीं उठून कांहीं स्त्रीपुरुष गृहकृत्यांत मग्न होतील, कांहीं शिकारीला निघतील आणि कांहीं फळे गोळा करायला. आणि हे गुलाबी गाल असलेले लहान लहान वछडे! कांहीं आयाच्या कुसव्यांत दडून बसतलि, कांहीं वृक्षांच्या सांवलींत चामड्यावर लोळतील, कांहीं जरा वाढलेल्या मुलांच्या पाठीवर नाहींतर कडेवर राहतील आणि बरेचसे वोल्गाच्या वाळवंटात हुंदडत खेळत बसतील.

निशेच्या राज्यापेक्षां वृद्ध-वृद्धा आतां जास्त सुखी आणि संतुष्ट आहेत. जन एका जिवंत मातेचे राज्य नाही, तर अनेक जिवंत मातांच्या परिवारांचा एक मेळ होऊन एक जन होतो. येथे एका मातेचे अकंटक राज्य नाही. जनसमितीचें राज्य आहे म्हणून आता कोणत्याहि निशेला आपल्या लेकेला वोल्गांत बुडविण्याची गरज नाहीं.

– ३ –

दिवा चार पुत्र आणि पांच कन्यका इतक्या जणांची माता, वयाच्या पंचेचाळीसाव्या वर्षी ती निशाजनांची जननायिका निवडण्यात आली. गेल्या पंचवीस वर्षांत निशाजनांची संख्या तिप्पट झाली. या कारणासाठीं जेव्हां केव्हां सूर दिवेचे ओष्ठचुंबन घेऊन तिची प्रशंसा करतो, तेव्हां ती म्हणत्ये, "ही सारी अग्नीची कृपा; हा सगळा भग(वाना)चा प्रताप. जो अग्नीला शरण जातो, जो भग(वाना)ला शरण जातो, त्याच्या भोंवती मधाचा प्रवाह या वोल्गेच्या प्रवाहा प्रमाणे वाहत असतो, त्याच्या देवदारूच्या वनांत अनेक मृग चरायला येतात."

निशाजनांना आतां मोठा त्रास होतो. निशाजन स्थानांतर करतात तेव्हां त्यांना आधींच्या इतकें जंगल पुरेनासें होतें. त्यांना केवळ आपलें जनदम (जनगृह) तिप्पट मोठें बांधावे लागतें इतकेंच नव्हे तर त्या बरोबर त्यांना तिप्पट मृगयाक्षेत्र देखील ताब्यांत घ्यावें लागतें. आतां ज्या मृगयाक्षेत्रांत ते वस्तीला आले, त्याच्या उत्तरेस उषाजनांचें मृगयाक्षेत्र आहे. या दोन मृगयाक्षेत्रांच्या मध्यें असलेल्या थोड्याशा वनावर कोणाचेंच स्वामित्व नाहीं. निशाजन या अस्वामिक वनांतच नव्हें तर उषाजनांच्या क्षेत्रांत देखील शिकारीसाठीं कित्येकदां घुसले. जनसमितीनें उषाजनांशीं भांडण होण्याचा संभव देखील ओळखला पण त्यांना दुसरा उपाय सुचत नव्हता. दिवेनें जनसमितीपुढें एक दिवस सांगितलें, "भग(वंत)

प्रसादानें इतकीं तोंडें खाणारी झालीं, त्यांच्याच आहारासाठीं हें वन आहे. या वनांशिवाय या तोंडांना आहार देतां येणं शक्य नाहीं. म्हणून निशाजन या वनांतील गाई, घोडे आणि अस्वलं यांचा फन्ना उडवल्या शिवाय रहाणार नाहींत. वोल्गा मधले मासे आपण सोडले का?"

निशाजन आपल्यावर धडधडीत अन्याय करीत आहे हें उषाजनाला दिसत होतें. तेव्हां त्यांच्या जनसमितीनें निशाजनसमितीशीं बोलणें सुरूं केलें; कितीदां तरी समजूत घातली; सांगितलें, "सनातन कालापासून आपल्या दोन जनांत कधीं युद्ध झालं नाही. आम्हीं प्रत्येक शरदांत याच स्थळीं रहात आलों." परंतु उपाशी मरून न्याय करायला निशाजन तयार नव्हते. जेव्हां सर्व कायदे विफल होतात तेव्हां जंगलाच्या कायद्यापुढें मान तुकवावी लागते. दोन्हीं जनांतून आपापल्या परी युद्धतयारी सुरूं झाली. एकाची माहिती मात्र दुसऱ्याला मिळूं शकत नव्हती, कारण प्रत्येक जन लग्न आणि जीवनमरणाबाबत आपल्या पुरता स्वयंपूर्ण होता.

निशाजनाची एक टोळी परक्यांच्या मृगयाक्षेत्रांत शिकारीसाठीं घुसली; उषा-जनांतले लोक दबा धरून बसले होते, त्यांनीं त्यांच्यावर छापा घातला. निशा-जनांतले लोक लढले हिंमतीने पण त्यांचे संख्याबळ पुरेसे नव्हतें, ते सुसज्जहि पण नव्हते. कित्येक मारले गेले, कित्येक घायाळ झाले. घायाळांना उचलून घेऊन त्यांनीं पळ काढला. जननायिकेनें इतिवृत्तांत ऐकला, जनसमितीने विचारविनिमय केला आणि मग जनसभेची-साऱ्या स्त्रीपुरुष जनांची-बैठक झाली. त्याना झालेला प्रकार निवेदन करण्यांत आला. मेलेल्यांचीं नांवें सांगण्यांत आलीं. घायाळांचें प्रदर्शन करण्यांत आले. बंधु, पुत्र, माता, बहिणी व कन्या यांच्या सांडलेल्या रक्ताचा सूड घेण्यांत आला पाहिजे अशी ललकारी देऊन साऱ्या जनांस उत्तेजित करण्यांत आलें. खुनांचा बदला न घेणें हें जनधर्माच्या अत्यंत विरुद्ध आहे आणि जन आपल्या धर्मविरोधी अशा कृत्याला कधींहि कबूल व्हायचा नाहीं. मृतांच्या खुनाचा सूड उगविल्याशिवाय रहायाचें नाहीं, असा साऱ्या जनांनीं एक निश्चय केला.

नृत्यवाद्यांचे रूपांतर युद्धवाद्यांत झालें. बाल आणि वृद्धांचें संरक्षण करण्यासाठीं कांहीं नरनारींना मागें ठेवून साऱ्यांनीं कूच केले. त्यांच्या हातांत धनुष्य, पाषाण-परशु, काष्ठ-शल्य, व काष्ठ-मुद्गर होते. त्यांनी आपल्या देहावर जाड चामड्याचे कंचुक घातलेले होते. पुढें वाद्यें वाजत होतीं, पाठीमागून हत्यारबंद नरनारी जात होत्या. जननायिका दिवा आघाडीवर होती. दूरवर ऐकायला जाणारा वाद्यध्वनि आणि लोकांचा कोलाहल यांच्यामुळें सारें अरण्य निनादून उठलें; पशुपक्षी भयभीत होऊन यत्र-तत्र पळूं लागले.

आपलें क्षेत्र ओलांडून ते अस्वामिक क्षेत्रांत दाखल झाले. सीमाचिन्ह नव्हतें तरी प्रत्येक जनशिकारी आपली क्षेत्रसीमा ओळखतो व त्या बाबतीत तो कधीं खोटें बोलायचा नाहीं. खोटेपणा म्हणजे मानवांना अपरिचित व अत्यंत कठीण अशी विद्या वाटत होती. शिकाऱ्यांनी आपल्या जनाकडे बातमी नेली तेव्हां तेहि आपल्या जनपुरांतून (खोपटांतून) हत्यारबंद बाहेर पडले. उषाजनांस वस्तुतः न्याय हवा होता, त्याना फक्त आपल्या मृगयाक्षेत्राचे संरक्षण करायचे होते, परंतु त्यांचे अमित्र या न्यायाला तयार नव्हते. उषाजनाच्या मृगयाक्षेत्रांत उभय जनांचे युद्ध झाले. चकमकीच्या दगडाचे तीक्ष्ण फाळ असलेल्या बाणांची सूं सूं वर्षा होत होती. पाषाण-परशु खप्खप् एक दुसऱ्यावर घाव घालीत होते. ते भाल्यानीं आणि मुद्गरांनीं एकमेकांवर प्रहार करीत होते. हत्यारांची मोडतोड झाली किंवा ती गळून पडलीं तर नरनारी योद्धे जमिनीवर पडलेल्या दगडांचा उपयोग करीत. आपल्या हातांदांतांचा उपयोग शस्त्राप्रमाणे करीत.

निशाजनांची संख्या उषाजनांच्या संख्येपेक्षां दुप्पट होती, त्यामुळे त्यांच्यावर विजय मिळवणे उषाजनांना शक्य नव्हते. परंतु अखेरचे एक बालक जिवंत असेतोपर्यंत लढणें जरूर होते. दिवसाच्या पहिल्या प्रहरांत युद्ध सुरू झाले होतें. जंगलांतच उषाजनांतले दोनतृतीयांश लोक ठार झाले घायाळांच्या वाटेस कोणीहि गेले नाहीं, कारण घायाळ शत्रूंना त्रास देणे हा महा अधर्म मानण्यांत येई. उरलेल्या एकतृतीयांशाने वोल्गा तटी लढतां लढतां प्राण सोडले. वृद्ध आणि बालकांच्या सह मातांनीं दम (घर) सोडून पळ काढण्याचा प्रयत्न केला पण आतां वेळ निघून गेली होती.

निशाजनांतील क्रूर नरनारीनीं त्यांना शोधशोधून पकडले, दुधपित्या बालकांना दगडावर आपटून ठार मारले, वृद्ध नरनारींच्या गळ्यांत दगड बांधून त्यांना वोल्गाच्या प्रवाहांत बुडवून टाकलें. दमाच्या आंत ठेवलेले मांस, फळे, मध, मद्य आणि इतर सामान बाहेर काढले. आत उरलेल्या बालकांना व स्त्रियांना कोंडून खोपटाला आग लावली. वारंवार लपलपणाऱ्या भडकत्या ज्वालांतून ऐकूं येणाऱ्या करुण क्रंदनाचा आनंद उपभोगत, निशाजनाने अग्निदेवाची थोरवी गायिली आणि शत्रुसंचित मांस आणि मद्य याच्या योगाने आपली व आपल्या देवांची तृप्ति केली.

जननायिका दिवा अत्यंत खूष झाली. तिने तीन मातांच्या वक्षांना चिमटलेल्या त्यांच्या बालकांना हिसकून दगडावर आदळले होते. जेव्हां त्यांच्या डोक्यांची कवटी फुटल्याचा आवाज होई तेव्हां ती खदखदां हांसत होती. भोजन आणि पान झालें, नंतर अग्निप्रकाशांत नृत्याला प्रारंभ झाला. दिवा आज आपल्या वसु नामक तरुण पुत्राबरोबर नाचत होती. त्या दोन्हीं नग्न प्रतिमा नृत्याच्या तालावर कधीं एकमेकांचीं चुंबनें घेत, तर कधीं एकमेकांना आलिंगन देत, कधी गिरक्या व फेरे घेऊन भिन्न

भिन्न नाट्यमुद्रा करून दाखवीत. आज जननायिकेच्या प्रेमाला तिचा पुत्र वसु पात्र झाला हें साऱ्या जनाला माहित होते. विजयोन्मादानें मत्त झालेल्या आपल्या मातेचें प्रेम वसु अव्हेरूं शकत नव्हता.

निशाजनांचे मृगयाक्षेत्र आतां चौपटीनें वाढलेले होतें. शरदांतल्या निवासाची आतां त्यांना जरा देखील काळजी करायला नको. पण आतां एक नवीच काळजी त्यांना लागलेली होती. उषाजनांतील ठार झालेले लोक जिवंतपणी जें करूं शकले नाहींत ते ते आतां मरून भुतें होऊन करूं इच्छित होते. त्याच जळलेल्या दमाच्या जागीं भूतनगर वसलेलें होतें. त्याच्याजवळून एकटया दुकटया निशाजनाला जाण्याची भीति वाटत होती. कितीदा तरी शिकाऱ्यांनीं दूरवर पसरलेल्या आगीच्या पुढे शेंकडों नागव्या मूर्ति नाचतांना पाहिलेल्या होत्या. स्थानांतराच्या वेळीं जनांस त्याच वाटेनें जावे लागत असे परंतु ते त्यावेळी खूप मोठया संख्येने तेथून जात आणिक तेही दिवसाउजेडीं ! दिवेला कित्येक वेळां अंधारांत जमिनीमधून उसळून आपल्या हाताला दुधपितीं बालकें झोंबत आहेत असा भास होई. आणि त्यावेळीं ती ओरडून पळत सुटे.

– ४ –

दिवेची आतां सत्तरी उलटली होती. ती आतां निशाजनाची नायिका नसली तरी देखील त्यांच्यातली एक सन्माननीय वृद्धा होती. सतत वीस वर्षे ती जननायिका असल्यामुळे तिनें आपल्या वाढीला लागलेल्या जनासाठीं–त्यांच्या समृद्धीसाठीं खूप परिश्रम घेतले होते. या काळांत तिच्या जनानें अन्य जनांशीं किती तरी लढाया दिल्या, त्यांची किती तरी प्राणहानि झाली, परंतु शेवटी निशाजन सदा विजयी झाला. आतां त्याच्या जवळ कित्येक महिने पुरेसे होईल येवढे मृगयाक्षेत्र आहे. दिवेच्या मते ही सारी भग (वानाची) कृपा; तरीपण आपल्या हातांनीं आपटून मारलेलीं अर्भकें कधीं कधी तिला झोंपेतून दचकवून जागी करीत असतच.

थंडीचे दिवस. वोल्गाचा प्रवाह गोठलेला होता. महिनोमहिने हिमवृष्टि होत होती, त्यामुळें हिमराशी दुरून पाढऱ्या वालुकाकणांच्या ढिगाप्रमाणें किंवा धुनकलेल्या रुईप्रमाणें दिसायच्या. जंगलांत दुसरीकडे शिशिरामधली निर्जीव स्तब्धता पसरलेली होती. निशाजनांची संख्या आतां आणखीच वाढत होती, त्यामुळें त्यांच्या आहाराची मात्रा देखील वाढणें जरूर होते. परंतु त्याच वेळीं त्यांच्या जवळ राबणाऱ्या हातांचीं संख्या वाढल्यामुळें कामाच्या दिवसांत ते अधिक प्रमाणांत आहारसंचय करून ठेवीत. हिवाळ्यात देखील शिकवलेले कुत्रे बरोबर घेऊन निशापुत्र आणि निशापुत्री थोडी फार शिकार हुडकून काढीतच. या शिवाय शिकार मिळविण्याचा त्यांनीं आणखी एक नवा मार्ग शोधून काढला होता. चाऱ्याच्या अभावीं हरिणें, गाई, घोडे इत्यादि जनावरें एका जंगलांतून दुसऱ्या जंगलांत जात असत.

निशाजनांनीं जमिनीवर पडलेले दाणे जमतांना पाहिले. त्यांतून त्यांनीं गवताचे दाणे गोळा करून ते ओलसर जमिनींत टाकायला सुरवात केली. या उगवलेल्या गवतां-मुळें जनावरें आणखी कांही दिवस थाबूं लागली.

त्या दिवशी ऋक्षश्रवाच्या कुत्र्यानें सशाचा पाठलाग सुरू केला. ऋक्षश्रवा देखील त्याच्या पाठोपाठ धांवला. घाम सुटूं लागला तेव्हा त्याने आपल्या आंगा-वरचे चर्मकंचुक काढून खांद्यावर टाकलें व पुन्हां दौड मारायला सुरुवात केली. परंतु अजूनहि कुत्रा दिसत नव्हता; मात्र बर्फात त्याच्या पावलांचे ठसे उमटलेले दिसत होते. ऋक्ष धापा टाकूं लागला आणि विसांव्यासाठीं एका उन्मळून पडलेल्या वृक्षाच्या फांदीवर बसला. त्यानें जरा कुठें विश्रांति घेतली असेल तोंच दुरून आपल्या कुत्र्याचा आवाज त्याच्या कानीं पडला. तो पुन्हा उठला व धांवूं लागला. आवाज जवळ जवळ येऊं लागला. जवळ जाऊन बघतो तों एका देवदारूच्या आश्रयानें एक सुंदरी उभी होती. तिच्या देहावर पांढऱ्या चामड्याचें एक कंचुक होतें. पांढऱ्या टोपी-खालून डोकावणारे सोनेरी केश जिकडे तिकडे लोळत होते. पायाशीं एक मेलेला ससा होता. ऋक्षाला पाहून कुत्रा जवळ जाऊन जोरजोरानें भुंकूं लागला. ऋक्षाची नजर सुंदरीच्या मुखाकडे वळली; तिने सस्मित विचारले," मित्र! हा कुत्रा तुझा काय?"

" होय माझाच! पण मी तुला कधीं देखील पाहिलं नव्हतं. "

" मी कुरुजनांपैकीं आहे. ही कुरुजनांची भूमि आहे. "

" कुरुजनांची ? " ऋक्ष जरा विचारांत पडला. कुरु यावेळीं त्यांचे शेजारी जन होते. किती तरी वर्षांपासून त्या उभय जनांत धुसफुस चाललेली होती. कधींमधीं चकमकी देखील झडल्या. परंतु कुरु उषाजनांपेक्षां अधिक चतुर होते, त्यामुळें युद्धांत विजयाची आशा दिसेनाशी झाली की ते आपले पाय उपयोगांत आणीत. हातांनीं विजयप्राप्ति होत नाहीं असें पाहिलें की ते मग पायांनी जीवित रक्षण करण्यांत विजयी होत. निशापुत्र कुरुंचा संहार करण्याचा खूप निश्चय करीत; पण अजूनहि त्यांना आपल्या निश्चयाला कृतीचें स्वरूप देतां आलें नव्हतें.

ऋक्षाला गप्प बसलेला पाहून तरुणीने म्हटलें, " या सशाला तुझ्या कुत्र्यानं मारलं; तूं याला घेऊन जा. "

" पण हा कुरूंच्या मृगयाक्षेत्रांत मेला आहे ! "

" तें खरं, पण मी कुत्र्याच्या धन्याची वाट बघत होत्यें. "

" वाट ? "

" होय, कारण तो आला म्हणजे मला त्याचा ससा द्यायचा होता. "

कुरूचें नांव ऐकतांच ऋक्षाच्या मनांत जरा द्वेषाची उबळ आली होती, परंतु त्या सुंदरीच्या स्नेहपूर्ण शब्दांनीं ती दबली. त्यानें प्रत्युपकाराच्या भावनेनें

म्हटलें, "केवळ शिकारच नव्हे, तर माझा कुत्रा देखील तूं मला दिलास. हा माझा अत्यंत आवडता कुत्रा आहे."

"कुत्रा किती सुंदर आहे!"

"साऱ्या जनांत कुठंहि कां असेना, माझा शब्द ऐकतांच माझ्याकडे धांवत येतो."

"नांव काय याचं?"

"शंभू!"

"आणि तुझं, मित्रा?"

"ऋक्षश्रवा, रोचनासूनु!"

"रोचनासूनु! माझ्या मातेचं नांव देखील रोचनाच होतं! ऋक्ष, घाईंत नसशील तर बस ना जरा वेळ!" ऋक्षाने धनुष्य आणि कंचुक बर्फावर ठेवलें व तो सुंदरीच्या पायांजवळ बसला; "मग आतां तुला माता नाहीं तर?"

"नाहीं; निशाजनांच्या युद्धांत ती मारली गेली. ती माझा फारच लोभ करायची."– सांगतांना तरुणीचे डोळे आंसवांनीं डबडबले.

ऋक्षानें तिचे डोळे आपल्या हातानें पुसत म्हटलें, "हें युद्ध किती वाईट असतं!"

"होय; त्याच्यामुळं प्रिय व्यक्तींचा वियोग होतो."

"पण अजून तें बंद झालेलं नाही."

"कुणातरी एकाचा पूर्ण उच्छेद झाल्याशिवाय तें बंद कसं होणार? मी ऐकलं की निशापुत्र पुन्हां चढाई करणार आहेत. मला वाटतं ऋक्ष, ते तरुण तुझ्यासारखेच तर असतील!"

"आणि तुझ्याप्रमाणंच कुरुंमधल्या तरुणी असतील."

"तरी देखील एकमेकांना आपण ठार मारूं! हें कसं ऋक्ष?"

ऋक्षाला त्याचवेळीं आठवलें. तीन दिवसांनंतर त्याचा जन कुरुंवर हल्ला करणार होता. तो कांहीं बोलणार तोच तरुणीनें म्हटले, "पण यावेळीं आम्ही लढणार नाहीं!"

"काय? कुरु यावेळीं लढणार नाहींत?"

"होय, आमची संख्या इतकी घटली कीं आतां आम्हांला जयाची आशाच करायला नको."

"मग कुरु काय करतील?"

"वोल्गातटापासून दूर कुठं तरी जाऊं! वोल्गामातेचा प्रवाह किती प्रियकर वाटतो. तो पुन्हां बघायला मिळायचा नाहीं म्हणून तर मी तासन्तास इथं बसून त्या सुप्त प्रवाहाकडे बघत बसत्यें."

" तर मग तुला पुन्हां वोल्गा बघायला मिळायची नाहीं ? "

" पोहायला देखील मिळणार नाहीं. या गंभीर उदकांत पोहतांना किती आनंद वाटायचा ! " सुंदरीच्या कपोलांवर अश्रू ओघळत होते.

" केवढं हें क्रौर्य, केवढी ही निष्ठुरता ! " ऋक्ष उदासीनतेनें उद्गारला.

" परंतु हा जनधर्म आहे, रोचना-सूनु ! "

" आणि बर्बर-धर्म देखील ! "

[ सव्वादोनशें पिढ्या पूर्वीच्या एका आर्यजनाची ही कहाणी आहे त्यावेळीं भारत, इराण आणि रशिया मधल्या गौरजाति या एकच होत्या; त्यांना हिंदी-स्लाव किंवा शतं-वंश असें म्हणतात. ]

---

# ३—अमृताश्व

**देश**—मध्य आशिया; पामीर (उत्तर कुरु); **जाति**—हिंदी-इराणी;
**काळ**—इ. स. पूर्वी २८०० वर्षे.

-१-

फर्गानाचे हिरवेगार पहाड, जागोजागीं खळखळणाऱ्या नद्या आणि झुळझुळणारे निर्झर, किती सुंदर दिसतात याची कल्पना ज्यांनी काश्मीरची शोभा पाहिली असेल त्यांना येऊं शकेल. हेमंत संपला नि वसंताला प्रारंभ झाला. वसंतश्रीनें त्या पठाराला भूस्वर्गाची शोभा आणलेली होती. पशुपाळ आपल्या हेमंत-निवासांतून—गिरिगुहांतून बाहेर निघून बाहेरील विशाल नि गोचर प्रदेशांत रहायला आले होते. घोड्यांच्या केसांनी बनवलेल्या राहुट्या.-त्यांत लाल रंगाच्या जास्ती होत्या. राहुट्यांमधून धूर निघतांना दिसूं लागला एका राहुटीमधून एक तरुणी खांद्यावर पखाल टाकून खालीं खडकांतून खळखळणाऱ्या जलप्रवाहाकडे जायला निघाली. ती राहुटीच्या थोडी पुढें गेली नाहीं तोंच तिच्या पुढें एक पुरुष येऊन उभा राहिला. तरुणी प्रमाणेच त्याच्याहि अंगावर एक तलम पांढरें कांबळे लपेटलेलें होतें. उजव्या खांद्यावर कांबळ्याच्या दोन्ही पदरांची अशा रीतीनें गांठ बांधली होती कीं त्यामुळे उजवा हात, मोंढा आणि वक्षार्ध तसेंच घोट्यांखालचा भाग सोडून बाकी सारें शरीर त्याने झांकून टाकलेले होते. पुरुषाचे केंस पिंगट होते, मिशांना सुंदर वळण लावलेले होते. सुंदरी त्या पुरुषाला बघून थबकली. त्याने गालांतल्या गालांत हंसत तिला विचारले, "काय सोमा, आज पाण्याला उशिरानं निघालीस?"

"होय ऋज्राश्व, पण तूं इकडं कुठं वाट चुकलास?"

"चुकलों नाहीं सखे, मी तुझ्याकडेच मुद्दाम आलों होतों."

"माझ्याकडे? इतक्या दिवसांनंतर?"

"आज सोमेची आठवण झाली."

"बराय, मला पाणी घेऊन घरीं जायचं आहे. अमृताश्व जेवायला बसलाय."

बोलत बोलत दोघेंहि नदीवर गेलीं नि परत घराकडे आलीं. ऋज्राश्वानें विचारलें, "अमृताश्व आतां मोठा झाला."

"होय, तूं तर त्याला किती तरी वर्षापासून बघितलेलं नाहींस?"

" चार वर्षं झाली ? "

" आतां तो बारा वर्षांचा झाला. खरं सांगूं ऋज्राश्व, रूपानं तो अगदीं तुझ्या सारखाच दिसतोय."

" कुणी सांगावं ! त्या वेळीं मी देखील तुझ्या कृपेला पात्र झालेलों होतों. अमृताश्व इतके दिवस कुठं होता ?"

" आजोळीं, वाल्मीकांच्याकडे !"

सुंदरीने पाण्यानें भरलेली पखाल राहुटींत ठेवली आणि ऋज्राश्व आल्याचें वर्तमान आपला पति कृच्छ्राश्व याला सांगितले. तीं दोघें राहुटीबाहेर आलीं. त्यांच्या पाठोपाठ अमृताश्व देखील ! ऋज्राश्वाने सन्मान प्रदर्शित करून विचारले, " कसं काय मित्रा कृच्छ्राश्वा, ठीक तर आहे ना ?"

" अग्निदेवाची कृपा आहे ऋज्राश्व ! ये ये, सोम ( भांग ) मध आणि घोडीचं दूध यांच्या सह घोटून तयार आहे."

" मधु सोम ? परंतु येवढ्या सकाळींच ?"

" मी खिल्लाराकडे जात आहे. बाहेर बघितलंस ना, घोडा तयार आहे."

" तर मग आज संध्याकाळीं परत यायचं नाहीं वाटतं ?"

" बहुतेक नाहीं. म्हणूनच सोमाचा तुंबा आणि मधुर अश्वमांस तयार करून ठेवलेलं आहे."

" अश्वमांस ?"

" होय, आमच्या पशूंवर अग्निदेवाची कृपा आहे. मी तर अश्वांचंच पालन अधिक करतों."

" कृच्छ्राश्वा, तुझं नांव मात्र विपरीत आहे."

" आईबाबांच्या वेळीं आमच्या घरांत अश्वांची कृच्छ्रता ( कमतरता ) होती म्हणून तें नांव ठेवण्यांत आलं !"

" मग आतां तें ऋद्धाश्व व्हायला हवं !"

. " बरं, पण आंत तर चलशील ?"

" मित्रा, या देवद्रुमाच्या सांवलींत हिरव्या गवतावरच बसलों तर ?"

" बरं तर, सोमे, इथंच सोम आणि मांस आण, मित्राला तृप्त करूं या."

" परंतु कृच्छ्र, तूं अश्वांच्या खिल्लाराकडे जाणार होतास ना ?"

" जाईन, आज नाहीं तर उद्यां. बैस ऋज्राश्वा !"

सोमेनें सोमाचा तुंबा आणि प्याले आणले. दोघां मित्रांच्या मध्यें अमृताश्व देखील बसला. सोमेनें सोमरस आणि प्याले भुईवर ठेवून म्हटले, " जरा थांब, चटई आणत्यें."

" नको सोमे, चटईपेक्षां हें हिरवं गवत सुखकर वाटतं. "–ऋज्रा-श्वानें म्हटलें.

" बरं, ऋज्रा सांग तुला कोणतं मांस आवडतं? मिठासह शिजवलेलं कीं निखाऱ्यांत भाजलेलं? शिंगरूं आठ महिन्यांचं होतं; मांस अगदीं कोंवळं आहे."

" मला विचारशील, सोमे, तर भाजलेलं शिंगरूंच जास्त आवडतं. मी तर कधीं कधीं पूर्णच्या पूर्ण शिंगरूं निखाऱ्यांवर भाजून काढतों. जरा उशरि लागतो, परंतु मांस अत्यंत मधुर लागतं. अन् तुला देखील माझा प्याला तुझ्या ओंठलावणीनं गोड करावा लागेल!"

" होय सोमे, ऋज्र बऱ्याच दिवसांनंतर आज आलेला आहे." कृच्छ्राश्व म्हणाला.

" मी आतां येत्ये हं. विस्तव धगधगतोय, भाजायला वेळ लागायचा नाहीं."

कृच्छ्राश्वाला पेल्यामागून पेले उडवतांना पाहून ऋज्राश्वानें विचारलें,

" कां, येवढी कसली घाई सुटली?"

" सोम अत्यंत गोड आहे. सोमेचा हात आणि सोम!–सोम म्हणजे प्रत्यक्ष अमृत! सोम पिणाऱ्यांना ते अमृत करतं. तूं सोम पी आणि अमृत हो."

" तूं कसला अमृत होणार? ज्या प्रकारानं पेल्यामागून पेले फस्त करतो आहेस त्यावरून तूं येवढ्यांतच मृतसमान बनणार हे मात्र दिसतं खरं!"

" पण तुला तर माहित आहेच ऋज्र! मला सोम किती आवडतं तें!"

इतक्यांतच भाजलेल्या मांसाचे तीन तुकडे चामड्यावर ठेवलेले सोमा घेऊन आली आणि म्हणाली, " पण कृच्छ्र, तुला सोमा मात्र आवडत नाहीं."

" सोमा आणि सोम, दोन्ही!" कृच्छ्राने बदलत्या आवाजांत म्हटलें; त्याचे डोळे लाल होत होते; " आणिक सोमा, तुला आज कसली पर्वा?"

" खरंच, आज मी अतिथी ऋज्राची होणार!"

" अतिथी कीं जुना दोस्त?" हंसण्याचा प्रयत्न करीत कृच्छ्र म्हणाला.

ऋज्राश्वानें सोमेचा हात धरून तिला आपल्या जवळ बसवलें आणि सोमानें भरलेला पेला तिच्या ओंठाला लावला. सोमेनें दोन घोट घेऊन म्हटले, " आतां तूं घे ऋज्र! किती तरी काळ लोटल्यावर आज हा दिवस पुन्हां आला."

ऋज्राश्वाने सारा पेला एका दमांतच रिकामा करून खालीं ठेवत म्हटलें, " तुझ्या ओठांच्या स्पर्शानं, सोमे, सोमाला किती माधुर्य आलं ग!"

कृच्छ्राश्वावर सोमाचा परिणाम होऊं लागला. त्यानें झटपट आपला पेला भरून सोमेकडे केला आणि अडखळत तो बोलूं लागला :

" तरऽऽ सोऽऽमेऽऽ याऽऽलाऽऽ देऽखीऽल मऽऽधुऽऽरऽ बऽऽनऽऽवऽ!"

सोमेनें पेल्याला ओंठ लावून तो परत केला. अमृताश्वाला थोरांच्या प्रेमालापांत फारसा रस वाटला नाहीं, म्हणून तो समवयस्क बालबालिकांमध्ये खेळायला निघून गेला. कृच्छ्राश्वाने झांकूं पहाणाऱ्या पांपण्या आणि लटकूं पहाणारें मस्तक सांभाळत म्हटलें, "सोऽमेऽ! गाऽऽणंऽऽ म्हऽऽणूंऽऽ ?"

"गावं कीं. तुझ्यासारखा गायक साऱ्या कुरूमध्यें नाहीं!"

"ठीक, माझ्याऽ–सारखा गाऽयऽक नाऽहींऽ–तऽर ऐऽक मग!—"

"पिऽऊंऽऽ सोऽम–"

"असूं दे, कृच्छ्र! बघ, तुझ्या संगीतानं सारे पशुपक्षी जंगल सोडून पळूं लागले."

"हूंऽ!"

ती वेळ सोम पिऊन अमृत होण्याची नव्हती. सामान्यतः ती वेळ सूर्यास्तानंतरची असते; परंतु कृच्छ्राश्वाला कोणतातरी बहाणा लागत असे. त्याची शुद्धबुद्ध गेल्यावर सोमा आणि ऋज्राश्व यांनीं आपले प्याले खाली ठेवले व तीं दोघे नदीकिनारीं एका खडकावर जाऊन बसलीं टेकड्यांच्या मधून वहाणारी जलधारा या जागी जरा समतळ अशा जागेवरून वहात होती. तरी पण प्रवाहांत जागोजागी खडक होतेच. त्या खडकावर आदळणारा प्रवाह निनादून पुढे जात होता. खडकांच्या आडोशाने साचलेल्या पाण्याच्या खळग्यांत मासळ्या आपले पंख हालवून इकडून तिकडे ये जा करीत होत्या. किनाऱ्यावरच्या वाळलेल्या भूमीवर विशाल शाल, देवदार इत्यादि वृक्ष होते. पांखरांच्या गोड गीत स्वरांत आणि फुलांनीं सुगंधित केलेल्या मंदवायुस्पर्शात श्वसन आणि स्पर्शसुख याचा आनंद मिळणें अपूर्व होतें. कितीतरी वर्षांनंतर ती दोघे या स्वर्गतुल्य धराभागांत आपल्या जुन्या प्रीतीची नवी आवृत्ति काढीत होतीं. या वेळीं त्यांना ते जुने दिवस आठवूं लागले. तेव्हां पिंगलकेशी सोमा नुकतीच सोळा वर्षांची असेल नसेल. वसंतोत्सवानिमित्त ऋज्राश्व आपल्या मामाच्याकडे वाल्हीकांमध्यें गेला होता. सोमा त्याच्या मामाची मुलगी; तो देखील तिच्या प्रेमिकांपैकीं एक; त्या वेळीं तिचें प्रेम जिंकण्याची प्रेमिकांत चढाओढ लागली होती; जयमाळ कृच्छ्राश्वाच्या कंठांत पडली. इतरांबरोबर ऋज्राश्वानें देखील पराजय कबूल केला. आतां सोमा कृच्छ्राश्वाची पत्नी झाली असली तरी ती जिवंत युगांतली नारी होती. स्त्रीला त्या वेळी पुरुषांची जंगम संपत्ति मानण्यांत येत नसे. त्यामुळे तिला अस्थायी प्रेमसंबंध करण्याचा अधिकार होता. अतिथी आणि मित्र यांच्या स्वागतासाठीं आपल्या स्त्रीला पाठविणे हा त्या वेळचा सन्मान्य सदाचार होता. आज वस्तुतः सोमा ऋज्राश्वाचीच होती.

संध्याकाळीं ग्रामांतील नरनारी महापितराच्या (कबील्याचे मुख्य) विस्तृत आंगणांत जमा झाल्या. सोम, मधुसुरा, आणि स्वादिष्ट गो-अश्व-मांस आणण्यांत येत होतें. महापितर पुत्रोत्पत्ति महोत्सव साजरा करीत होते. कृच्छ्राला जरा देखील हालचाल करण्याइतकी शुद्ध राहिली नव्हती. त्याच्या जागीं सोमेसह ऋज्राश्व गेला. बरीच रात्र उलटे तों पर्यंत गीत, पान आणि नृत्य चाललें होते. सोमेचीं गाणी आणि ऋज्राश्वाचीं नृत्यें नेहमीं प्रमाणेंच लोकांना खूप खूप आवडलीं.

— २ —

" मधुरा, तूं दमली नाहींस ना ? "

" ऊंहूं, मला घोड्यावर बसणं आवडतं ! "

" पण, त्या दस्यूनीं तुला फारच वाईट तऱ्हेनं धरून ठेवलेलं होतं. "

" खराय, वाल्हीक पक्थांच्या गाई आणि घोडेच तेवढे लुटण्यावर त्यांचं थोडंच भागणार ? त्यांना मुली देखील लुटायच्या होत्या. "

" पशूंना लुटलं तर उभय जनांत कायमचा वैरभाव निर्माण होतो, परंतु कन्या लुटल्या म्हणजे कालांतरानं शेवटीं सासऱ्याला जांवयाचं स्वागत करणं भाग पडतंच ! "

" मला तर तुझं नांव देखील ठाऊक नाही ? "

" अमृताश्व, कृच्छ्राश्व-पुत्र, कौरव ! "

" कौरव ? कुरु तर माझं मामेकुळ आहे. "

" मधुरा, आतां तूं निर्धास्त ऐस. बोल, तुला कुठं जायची इच्छा आहे ? "

मधुरेच्या मुखावर प्रसन्नतेची इवलीशी रेखा झळकूं लागली पण ती लागलीच लुप्त झाली. अमृताश्वाच्या तें ध्यानांत आलें. त्यानें गोष्ट बदलून दुसराच विषय काढला.

" पक्थांच्या मुली तर आमच्या गांवांत देखील आहेत. "

" सगळ्या लुटलेल्याच ? "

" नाहीं ; त्यापैकीं बऱ्याचशा मामांच्या मुली आहेत. "

" तरीच ! पण ही मुलींची लूटमार मला कशीशीच वाटते. "

" मला देखील ! मधुरे, आपल्यामधीं प्रेमाची संभावना असूं शकते याची जाणीव देखील तिथल्या स्त्री-पुरुषांना नाहीं. "

" मामाच्या मुलीबरोबर लग्न करणं हे याहून चांगलं, कारण तिच्याशी निदान आधीं ओळख होण्याची संधि तरी मिळते. "

" तुझा कुणी असा एखादा प्रेमिक होता का मधुरे ? "

" नाहीं, तसा माझा कोणीच आतेभाऊ नाहीं ! "

" आणिक दुसरा कोणी ? "

" स्थायी असा कोणीच नाहीं. "

" तर मग तूं माझ्या भाग्याला उजळा आणशील ? "

मधुरेचे सलज्ज नयन पायांकडे वळले.

अमृताश्व म्हणाला, " मधुरे, असे देखील कांहीं जनपद आहेत कीं जिथं स्त्रियांवर कुणाचाच हक्क नसतो. त्यांच्यावर त्यांचाच हक्क असतो. "

" मला समजलं नाही, अमृताश्व ! "

" तिथं त्यांची लुटमार होत नाही. त्यांना कोणी जन्मभर आपली पत्नी बनवूं शकत नाहीं. तिथं स्त्री-पुरुषांत समानता असते. "

" तिथं त्या समानतेनं शस्त्रं चालवितात ? "

" होय, तिथं स्त्री स्वतंत्र असते. "

" कुठं आहे तें जनपद ? अमृत—ऊंहूं—अमृताश्व ? "

" नाही मधुरे, नुसतं अमृत म्हण ! ते जनपद इथून पश्चिमेकडे दूर दूर आहे."

" तूं तिथं कधीं गेला होतास, अमृत ? "

" होय तर, तिथं स्त्री आजीवन स्वतंत्र असते. अगदी वनांत स्वतंत्रपणे वागणाऱ्या मृगा प्रमाणं, वृक्षांवरून मुक्तपणें उडणाऱ्या चिमणी प्रमाणं ! "

" किती छान जनपद असेल तें. तिथं स्त्रीला कुणी लुटूंच शकत नाही ? "

" मोकळ्या वाघिणीला जिवंतपणी कोण लुटूं शकतो ? "

" आणि पुरुष, अमृत ? "

" पुरुष देखील स्वतंत्र असतो. "

" आणि मुलं बाळं ? "

" मधुरे, तिथं घरसंसार वेगळ्याच प्रकारचा असतो. साऱ्या ग्रामाचा एक परिवार होतो. "

" तिथं बापाचं कर्तव्य कोणतं ? "

" तिथं बाप सांगतां येत नाही मधुरे ! स्त्री ही कुणाची पत्नी नसते, तिचं प्रेम स्वच्छंदी असतं. "

" मग तिथं बापाची कुणाला ओळखच नसते तर ? "

" घरांतले सारेच पुरुष बाप ! "

" हा कसला रिवाज ? "

" कारण आहे त्याला. तिथं स्त्री स्वतंत्र असते. ती योद्धा असते, शिकारी असते. "

" आणि गाई-घोड्यांचं पालन-पोषण कोण करतं ? "

" तिथं गाई-घोडे जंगलांत स्वतःचं पालन करतात. आपल्या इथं नाहीं का हरिणांचं होत ! "

" आणि शेळ्यामेंढ्यांचं ? "

" तिथं लोकांना पशुपालनाची जाणीवच नाहीं. शिकार, मासे आणि वनफळे यांच्यावर ते आपली गुजराण करतात. "

" केवळ शिकार ? मग त्यांना दुध मिळत नसेल ? "

" फक्त मानवीचं दुध आणि ते देखील बाळपणींच. "

" घोड्यावर बसणं देखील नाही ? "

" नाही, आणि त्यांना चामड्याशिवाय इतर परिधान माहिती पण नाही. "

" त्यांना मोठा त्रास होत असेल, नाहीं ? "

" परंतु तिथल्या स्त्रिया स्वतंत्र आहेत. अगदी पुरुषाइतक्या स्वतंत्र ! त्या फळं गोळा करतात, शिकार खेळतात, युद्धात शत्रूंवर पाषाणपरशु आणि बाण चालवितात. "

" मला देखील तसं आवडतं. मी देखील शस्त्रविद्या शिकल्ये पण पुरुषा प्रमाणं स्त्रियांना युद्धावर जायला मिळतं तरी का ? "

" पुरुषानं हे कार्य स्वतःवर घेतलं. घोडे, गाई, शेळ्यामेंढ्या यांचं पालन देखील तोच करतो. त्यानं स्त्रीला पशूंची धनीण बनवली नाहीं तर घरधनीण बनवली आहे. "

" आणि मुलींना लुटीच्या योग्य बनवलं. तिथं तर मुलींना लुटत नसतील अमृत ? "

" एका जनांतले मुलगे-मुली त्याच जनांत नेहमी नांदतात. बाहेरची आंत न्यायची नाही, आंतली बाहेर जाऊं द्यायची नाहीं. "

" हा कसला बाई रिवाज ! "

" तसा रिवाज इथं चालायचा नाही. "

" आणि म्हणूनच मुलींची लूट होतच राहील ? "

" होय मधुरे, बरं तर तुझं काय म्हणणं आहे ? "

" कशाबाबत ? "

" माझ्या प्रेमाबाबत ! "

" मी तुझ्या ताब्यांत आहे, अमृत ! "

" पण तुला लुटून नेण्याची माझी इच्छा नाही. "

" तर काय मला युद्ध करूं देशील ? "

" जितकं मला शक्य असेल तेवढं कबूल ! "

" मला शिकार खेळूं देशील ? "

" जितकं मला शक्य होईल, तेवढं सारं कबूल ! "

" शक्य म्हणजे ? "

" त्याचं असं आहे मधुरे, मला महापितरांची आज्ञा मान्य करावी लागेलच. मी माझ्याकडून तुझं स्वातंत्र्य मान्य करीन मधुरे ! "

" प्रेमाच्या बाबतीत देखील ? "

" प्रेमामुळंच आपला संबंध घडतो आहे बरं, त्या बाबतीत देखील ! "

" तर मग अमृत, मी तुझ्या प्रेमाचा स्वीकार करत्ये. "

" आतां आपण कुठं चलायचं ? कुरूंत कीं पक्थांत ? "

" तुझी मर्जी असेल तिथं ! "

अमृतने घोडा फिरवला आणि मधुरेने दाखवलेल्या रस्त्यानें तो पक्थाच्या ग्रामांत येऊन दाखल झाला. ग्रामात कुणाच्या राहुटीमध्ये कोणी ठार झाला, तर कुणाच्या राहुटीत कुणी घायाळ पडलेला, कुणाची मुलगी लुटलेली. चहूंकडे एकच हलकल्लोळ माजलेला होता मधुरेची आई रडत होती आणि बाप तिला धीर देत होता. इतक्यांत अमृताश्वाचा घोडा त्यांच्या राहुटी बाहेर उभा ठाकला.

अमृताश्व घोड्यावरून उतरल्यावर मधुरेनें खाली उडी घेतली व त्याला राहुटी-बाहेर उभे करून ती आंत गेली. त्यांच्यापुढें मुलगी उभी राहिलेली दिसताच आई बापांचा विश्वास एकाएकी बसेना; पण लागलीच आईनें मुलीला मांडीवर घेतले व तिचे मुख आंसवांनी नाहून टाकले. तिचा उमाळा ओसरल्यावर बापाने विचारलें आणि लेकीनें सांगितले–" वाल्हीक पक्थ मुलींना लुटून नेत होते. मला लुटणारा जरा मागें रेंगाळला. संधि साधून मी घोडयावरून खाली उडी घातली. त्यानं मला धरून पुन्हां घोडयावर घालण्याचा प्रयत्न केला; मी त्याला विरोध करूं लागल्यें. त्याच वेळी एक तरुण स्वार आला, त्यानं वाल्हीकाला आव्हान दिलं आणि त्याला घायाळ केलं, तोच कुरु तरुण इथं मला आतां पोचवायला आला आहे. "

बापानें विचारलें, " त्या तरुणानं तुला नेण्याची इच्छा दर्शविली नव्हती ? "

" होती तर, पण बलात्कारानं नाहीं. "

" पण आपल्या जनपदाच्या नियमाप्रमाणं आतां तूं त्याची झालीस ! "

" आणिक तात, मी त्याच्यावर प्रेम पण करत्यें ! "

मधुरेच्या बापानें बाहेर येऊन अमृताश्वाचे स्वागत केलें आणि त्याला राहुटीच्या आंत नेलें. गांवकऱ्यांना ही घटना विचित्र वाटली. सर्वांचा आदरसत्कार आणि सहानुभूती प्राप्त करून अमृताश्वानें मधुरेसह सासुरवाडीहून प्रयाण केलें.

आतां अमृताश्व आपल्या कुरुग्रामाचा महापितर झाला होता. त्याच्याजवळ पन्नासाच्या वर गाई, घोडे आणि पुष्कळशा शेळ्यामेंढ्या होत्या. त्याचे चार मुलगे आणि मधुरा खिल्लार आणि घर यातली कामे सांभाळीत. ग्रामांतल्या दरिद्री कुळांतली कांहीं माणसे देखील त्यांच्या इथे राबत असत. पण नौकराच्या नात्याने नव्हे, तर घरामधल्या एका व्यक्तीच्या नात्यानेंच! एका कुरूला दुसऱ्या कुरूबरोबर समतेच्या नात्याने वागवावें लागत असे. अमृताश्वाच्या या हालत्या चालत्या ग्रामांत पन्नासाच्या वर परिवार होते. आपसांतले झगडे, तंटे फिसाद यांचा निवाडा महापितरालाच करावा लागत असे. याशिवाय पाणी, रस्ते आणिक दुसऱ्या सार्वजनिक कामाचा बंदोबस्त महापितरालाच करावा लागत असे. आणि सदा डोक्यावर लोंबत असणाऱ्या युद्धप्रसंगीं त्यालाच सेनानायक व्हावे लागत असे. तें तर महापितराचें सर्वश्रेष्ठ कर्तव्य मानले जाई. वस्तुतः युद्धांत विजय प्राप्त करणारा पुरुषच महा-पितराच्या पदावर अधिष्ठित होई.

अमृताश्व एक शूर वीर होता. पक्थ, वाल्हीक आणि इतर जन याच्या बरोबरच्या अनेक युद्धात त्याने आपले शौर्य गाजवले होते. मधुरेला दिलेले वचन त्याने पाळलें होते. तिने अमृताश्वाबरोबर नुसती अस्वले, लांडगे आणि वाघ यांची शिकार केली इतकेंच नव्हे, तर त्याच्या खांद्याला खांदा लावून ती युद्धांत लढत देखील असे. जनांमधील कित्येकांना तिचे हे कृत्य आवडत नसे; स्त्रीनें घर साभाळावें, असे त्याचें म्हणणे!

अमृताश्वाची जेव्हां अगदीं पहिल्यांदां महापितर म्हणून निवड झाली, त्या दिवशीं कुरुपुरांत महोत्सव साजरा होत होता. तरुण-तरुणींनी आज अस्थायी प्रणय-संबध जोडले होते. ग्रीष्माचे दिवस, नदीकांठच्या प्रदेशांत आणि पहाडांवर घोड्यां-गाईंची खिल्लारे स्वच्छंद चरत होती. गाववाल्याना आपल्याला शत्रू आहेत याची आठवण देखील उरली नव्हती. पशुधनाबरोबर त्यांच्या शत्रूंची वृद्धि होत होती. कुरुजन वोल्गातीरी होता तेव्हां त्याच्याजवळ पशुधन नव्हते. त्यावेळीं तो आपला आहार जंगलांतून मिळवून आणी. कधीं शिकार, मध वा फळें गवसली नाहींत तर त्याला उपास पडत असे. आतां कुरूंनीं शिकारी पशूंतले कांहीं–गाय, घोडा, मेंढी, बकरीं, खर, यांना पाळायला सुरवात केली. हे पशू त्यांना मांस, दूध, चामडेंच नव्हे तर वस्त्र देखील पुरवीत. कुरुस्त्रिया सूत कातण्यांत आणि कांबळीं विणण्यांत कुशल बनल्या. परंतु त्यांच्या या कुशलतेनें समाजांतले त्यांचे पूर्वीचे स्थान अढळ राहिलें नाही. आतां स्त्री ऐवजीं पुरुष राज्य करतो. जननायिका आणि जनसमिती यांचें राज्य गेले व जनमताची पर्वा करून देखील प्रसंगीं सगळे कांहीं आपल्या

एकट्याच्याच मनाप्रमाणे अंमलांत आणणाऱ्या लढवय्या महापितरांचें राज्य सुरू झालें. आणि संपत्ति? स्त्रीराज्य होतें तेव्हां सारा परिवार एकत्र रहात असे, एकत्र राबत असे; आतां आपापला परिवार, आपापलें पशुधन, आणि आपापला वेगळा हानिलाभ, असें सुरू झालें. मात्र संकटाच्या वेळीं सारा जन पुन्हां एकदां जुन्या काळच्या जनाचें स्वरूप धारण करी

अमृताश्व महापितराच्या महोत्सवांत मग्न झालेल्या जनाला आपल्या पशुधनाची फिकीर नव्हती. वाद्याच्या आवाजावर नाचणाऱ्या तरुणांना केवळ सोम, सुरा आणि सुंदरी यांचीच विशेष काळजी वाटत होती. एक प्रहर रात्र उरलेली होती, तरी देखील नृत्यांत खंड पडावा असें कुणालाच वाटत नव्हतें. याच वेळीं कुत्रे जोरजोरानें भुंकून किनाऱ्याच्या वरच्या भागाकडे धांवतात असें कळून आलें. डोळ्यावर लाली येई तों सोमपानाचा आनंद लुटायचा आणि आपली शुद्ध-बुद्ध तर गमवायची नाहीं, अशी कांही पुरुषांची संवय होती; अमृताश्व अशाच संवयीचा पुरुष होता. कुत्र्यांच्या भुंकण्याचा आवाज ऐकतांच तो मुकाट्यानें उठला आणि लांकडाचा दांडा असलेली आपली दगडी गदा उचलून आवाजाचा कानोसा घेत त्या दिशेकडे नदीकाठानें चालूं लागला. थोडा पुढे गेला तोंच अस्ताचली जाणाऱ्या चंद्राच्या प्रकाशांत त्याला एक स्त्री येतांना दिसली. तो थबकला, जवळ आल्यावर कळलें की ती मधुरा! मधुरेचा श्वासोच्छ्वास जोरानें चाललेला होता. तिनें उत्तेजित स्वरांत सांगितलें, "पुरु आमच्या पशूंना हाकून नेत आहेत."

"हांकून नेताहेत आणि इकडे आमचे सगळे तरुण नशेनं धुंद झालेले! तूं कुठवर गेली होतीस मधुरे?"

"हें सारं कळायला जितक्या लांब जायला हवं होतं तिथवर!"

"साऱ्या पशूंना नेतात अं?"

"बराच वेळ पावेतों ते पांगलेल्या खिल्लाराला गोळा करीत असावेत असं वाटतं!"

"तुझा काय विचार आहे मधुरे?"

"आतां उशीर करून भागायचं नाही."

"पण आमचे सारे तरुण धुंदावले आहेत."

"काय वाटेल ते करा, पण त्यांना घेऊन लागलीच पाठलाग करायला हवा."

"अवश्य करूं, पण मधुरे एक गोष्ट कर. तूं माझ्याबरोबर येऊं नकोस. या तरुणांची अर्धी नशा तर ही बातमी ऐकूनच उतरेल, पण बाकीच्यांना दही खायला घाल. ज्यांची ज्यांची नशा उतरेल त्यांना त्यांना पाठव."

"आणि कौरवींना?"

"कौरवांचा महापितर या नात्यानं मी त्यांना युद्धक्षेत्रांत उतरण्याची आज्ञा

देतों. विस्मृत प्राचीन प्रथा या वेळी आपण पुन्हां चालू करूं."

"मी मागं राहीन, पुढं येण्यासाठीं धडपडणार नाहीं. बर तर, मग निघा लवकर!"

महापितराची आज्ञा झाली; वाद्यें बंद झालीं. नरनारी महापितरांच्या भोंवतीं जमूं लागले. गो-अश्व-हरणाची बातमी ऐकतांच खरोखरच कित्येकांची नशा उतरली. त्यांच्या चेहेऱ्यावरले प्रेमलेख पुसून गेले; त्या जागीं आतां वीरलेख उमटले. महापितरानें मेघगंभीर स्वरांत सांगितलें, "कौरव आणि कौरवींनों, शत्रू पौरवांपासून आम्हांला आपलं धन परत मिळवून आणायचं आहे. लढाई ही होणारच. तुमच्यांपैकीं जे शुद्धीवर आलेले असतील त्यांनी हत्यारबंद होऊन आपापल्या घोड्यावरून माझ्या पाठोपाठ यावं. जे नशेत असतील त्यांनी मधुरेजवळून दही घेऊन खावं नि नशा उतरतांच धांव घ्यावी. कौरवींनो, आज मी तुम्हांला रणांगणी चलण्याचा आदेश देत आहे. जुन्या काळच्या कौरवी पुरुषांच्या बरोबरीनं युद्धाच्या आखाड्यांत उतरत असत असं आपण वृद्धमुखातून ऐकलेलं आहेच. आज तुमचा महापितर अमृताश्व तुम्हांला रणाची हांक देत आहे."

हां हां म्हणतां चाळीस घोडे गोळा झाले. गोळा करतां आले तेवढे पशु जमवून पौरव त्यांना किनाऱ्याच्या वरच्या भागाकडे पिटाळून नेत होते. दोन तासांच्या पाठलागानंतर उजाडण्याच्या वेळी कौरवांनीं त्यांना गांठले. गोड्या-गाईंचे कळप एकत्र जमवून त्यांना पहाडी भागामधून पिटाळून नेणे कांहीं सोपे नव्हते. पौरव स्वार आपल्या चामड्याच्या चाबकांचा हवेत आणि दगडांवर आवाज काढून पशूंना भिववीत होते. पौरवांची संख्या शंभराच्या जवळपास असावी असा अमृताश्वानें अंदाज केला आपल्या चाळीसांच्या तुकडीनें त्यांच्यावर हल्ला करावा कीं करूं नये याबद्दल व्यर्थ काथ्याकूट करण्याची त्याची इच्छा नव्हती. त्याने शिंगाचे लांब भाले रोखून दुष्मनांवर हल्ला करण्याची आज्ञा दिली.

कुरुवीर आणि वीरांगना–(त्या निदान अर्ध्या तरी असतील)–निर्भयपणानें घोडे पुढें फेंकूं लागल्या. त्यांना पाहतां क्षणीच पुरूंनी, पशूंना अडविण्यासाठीं कांहीं जणांना मागे ठेवून, खालच्या भागांत धांव घेतली आणि घोड्यांचा पूर्णतया उपयोग करून घेण्यासाठी नदीकांठीं मोकळ्या जागेत थबकून ते कुरूंची वाट पाहूं लागले. अमृताश्वाची आकृति तेव्हां अगदी पहाण्यास योग्य होती. त्याचा घोडा अमृत आणि तो स्वतः दोघेहि एकाच शरीराची दोन अंगें वाटत होतीं. त्याचा हरिणाच्या तीक्ष्ण शिंगाचा भाला ज्याच्या शरीरांत खुपसतो, तो पुन्हां आपल्या घोड्यावर बसलेला दिसूं शकत नाही. पौरवांनी धनुष्यबाण आणि पाषाणपरशु यांच्यावर जास्त भरंवसा ठेवण्याची चूक केली. त्यांच्याजवळ तितकेच शिंगाचे भाले असते तर कौरवांना त्यांचा मुकाबला खात्रीनें करतां आला नसता. एक तास युद्ध

चाललें तरी कुरू रणांगणी तसेंच लढत होते. त्यांचे एकतृतीयांश योद्धे हताहत झाले. त्यामुळें जरा चिंता निर्माण झाली होती. इतक्यांत तीस कौरव घोडेस्वार गर्जना करीत रणभूमीवर येऊन ठाकले. कुरूंची हिंमत आणखी वाढली. पुरूंची हानि बेसुमार होऊं लागली. त्यांची ही नाजुक परिस्थिति बघून पशूंना अडवून धरणारे राखीव घोडेस्वार देखील पुढें आले. परंतु तिकडून याच वेळीं चाळीस कौरव-कौरवीची एक तुकडी घेऊन मधुरा येऊन दाखल झाली. दीड तास युद्धाची धुमश्चक्री माजली. अधिकांश पुरु ठार झाले; कांहींनी पलायन केले.

घायाळांना ठार करून कुरुदळ पुरुग्रामाकडे वळले. चार कोसांवर असलेले तें गांव सुनसान होतें. लोक राहुट्या सोडून पळून गेले होते. त्यांचे पशु इतस्ततः चरत होते. परंतु आधी कुरूंना पुरू बरोबर निपटून घ्यायचें होते. पुरूंच्या भोंवतीं चांगलाच वेढा पडलेला होता. वरून पळ काढणे इतके सहज साध्य नव्हतें. दरड अरुंद आणि चढण कठीण; तरी पण प्राण वांचविण्याच्या आशेने नरनारी घोड्यांवरून पळण्याचा प्रयत्न करीत होते. शेवटीं अशी बिकट वाट आली कीं तिथें घोडे वर चढूं शकत नव्हते. लोक पायी पळूं लागले. कुरु अगदी त्यांच्या पाठीशीच येऊन भिडले होते. बालक, वृद्ध आणि स्त्रिया वेगाने पुढें जाऊं शकत नव्हतीं. तेव्हां त्यांना पळायला सुघड जावे म्हणून कांही पौरव एका अवघड जागीं रस्ता रोंखून उभे राहिले. कौरवांना आपलें संख्याबळ संपूर्णपणे उपयोगांत आणतां येत नव्हते. त्यामुळें त्यांना पुरूंनी अडवलेली वाट मोकळी करायला कांही तास झगडावें लागलें. पुरू आणि कुरू दोघेहि आतां पायी लढत होते परंतु मोठ्या माराकुटी नंतर दहाबारा पौरव जिवंत राहिले असतील. त्यांच्याकडून साऱ्या पुरु-परिवाराचें कसचें संरक्षण होणार होतें ? त्यांनी एके दिवशीं कांही साहसी स्त्रियांसह एका बिकट गोत्याच्या मार्गानें तो प्रदेश सोडला आणि पहाड ओलांडून दूर दक्षिणेकडे प्रयाण केलें. कौरवांनीं प्राणभयानें यत्रतत्र लपून बसलेल्या पुरु–बालकांना, वृद्धांना व स्त्रियांना कैद केलें. या पितृयुगात कैदी ठेवणे नियमबाह्य होतें. म्हणून त्यांनीं आबालवृद्ध पुरुषांना ठार मारले. स्त्रियांना त्यांनीं आपल्या बरोबर आणले. पुरूंचें सारें पशुधन देखील त्यांच्याच मालकीचे झाले. आतां तो हरित रोद (नदी) कांठचा प्रदेश संपूर्णपणें कुरूंच्या ताब्यांतले कुरण झालें. एका पिढीसाठी महापितरानें एकापेक्षां अधिक पत्नी करण्याचा कायदा चालू केला आणि तेव्हांपासून कुरूंमध्यें अगदी पहिल्यांदांच सपत्नी (सवत) अस्तित्वांत आली.

---

[ आजपासून दोनशे पिढ्या पूर्वीची एका आर्यजनाची ही कहाणी आहे. त्यावेळीं भारत आणि इराण मधील श्वेत जातींचा एकच कबिला ( जन ) होता व त्याचें नांव आर्य असें होतें. पशुपालन हें त्यांच्या उपजीविकेचें मुख्य साधन होतें. ]

# ४—पुरुहूत

**देश**—वक्षू कांठचा प्रदेश ( ताजिकिस्तान ). **जाति**—हिंदी-इराणी.

**काळ**—इ. स. पूर्वी २५०० वर्षे.

– १ –

वक्षूचा खळखळणारा प्रवाह मधून वहात होता. उजव्या बाजूला जलप्रवाहाला लागूनच पहाड उभा होता पण डाव्या बाजूला मात्र काठ उतरत उतरत आल्यामुळें नदीप्रदेश रुंदावलेला दिसे. दुरून पाहिलें तर घन हरित उत्तुंग देवदार वृक्षांच्या काळसरपणा शिवाय दुसरें कांहींही दिसत नाहीं. पण जवळ आले म्हणजे अधिक लांब लांब पसरलेल्या आणि वर लहान लहान होत गेलेल्या फांद्या व त्यांचे नोकदार बाणाप्रमाणें वाटणारे शेंडे दिसूं लागत. त्यांच्या तळाशीं लहान सहान वनस्पति आणि झाडें उगवलेली होती. ग्रीष्म संपत होता; पावसाळा अजून यायचा होता. या महिन्यांत उत्तर भारता मधल्या मैदानावरील रहिवासी उष्णतेने काहलून निघायचे, परंतु या सात हजार फूट उंचीच्या पर्वत-प्रदेशांत जणुं काय उष्णतेसाठी मोकळें द्वार कधींच नसावे. वक्षूच्या डाव्या कांठावरून एक तरुण जात होता. त्याच्या अंगांतली ऊनी बंडी, त्याच्या कितीतरी पदरांचे वेढे देऊन कंबरे भोंवती गुंडाळलेला दुपट्टा, त्याच्या खाली ऊनी सुतना, आणि पायांत पुष्कळशा पट्ट्यांच्या वहाणा ! डोक्यावरील कानटोपी काढून त्यानें आपल्या पाठीवरल्या पडशीवर ठेवली. आतां त्याचे पाठीवर रुळूं लागलेले चमकणारे लांब पिंगट केस वाऱ्याच्या इवल्याशा झुळकेनें देखील वारंवार इकडून तिकडे भुरभुरत होते. तरुणाच्या कमरेला चामड्याच्या म्यानांत ठेवलेलें तांब्याचें खडग लटकलेलें होते. त्याच्या पाठीवर वीरीच्या बारीक डहाळ्यांनीं विणलेली लांब आंगरखेवजा पडशी होती. त्यांत तरुणानें बऱ्याचशा जिनसा, बाणांनीं भरलेला भाता आणि सोडलेलें धनुष्य ठेवलेलें होतें. तरुणाच्या हातीं एक लाठी होती. तिचा टेंकू पडशीच्या बुडाला लावून तो मधून मधून उभ्या उभ्यानेंच विसांवा घेई. चढण आतां जरा बिकट होत चालली होती. त्याच्यापुढें सहा धट्टे कट्टे मेंढे, पाठीवर सत्तूनें भरलेल्या घोड्याच्या केंसांच्या पडश्या लादलेले, चालले होते. तरुणाच्या पाठोपाठ एक लाल झबरा कुत्रा चाललेला होता. जलधारेच्या खळखळण्याचा मधुर गंभीर पडसाद पर्वतामधून ऐकायला येत होता; त्यानें प्रभावित होऊनच कीं काय तो तरुण शीळ घालीत चाललेला होता.

एका कड्यावरून बारीक रजतधारेच्या स्वरूपांत खालीं उडी घेणारा हा निर्झर दिसतोय. धार कडयापासून वेगळी होऊन पडावी म्हणून कुणी तरी एक लांकडी नळकांडें लावून दिलेलें होतें. धांपा टाकणाऱ्या मेंढ्यानीं धारेला तोंड लावले. तरुणानें जवळच पसरलेल्या द्राक्षवेलींना लटकणारे लहानग्या द्राक्षांचे घोंस पाहिले. अजून द्राक्षांतला तुरट आंबटपणा गेलेला नव्हता. ते पिकून टंच व्हायला एखाद्या महिन्याचा अवकाश होता. परंतु तरुणाला द्राक्षें गोड वाटूं लागली. त्याने एक एक दाणा हळूं हळूं तोंडांत टाकायला सुरवात केली. कदाचित त्याला तहान लागलेली असावी. तरी पण चालून दमून आलेल्यानें लागलीच गार पाणी पिणें अपायकारक असतें म्हणून तो जरा थांबलेला असावा.

पाणी प्याल्यानंतर मेंढे चारी बाजूंला उगवलेल्या हिरव्या गवतांत चरूं लागले. झबऱ्या कुत्र्याला उन्हाचा तडाखा चांगलाच बसला होता. त्यामुळें त्याने आपल्या धन्याचें अनुकरण करण्याचे मनांत आणलें नाहीं, ना मेंढ्याचें! धारेखालीं पसरलेल्या पाण्यांत त्यानें आसन ठोकले. अजून देखील त्याचें पोट रिते भरतें होण्याची क्रिया करणाऱ्या भात्याप्रमाणें धापामुळें वरखालीं होत होतें आणि उघडया तोंडाबाहेर निघून त्याची लांब लाल जीभ लपलप करीत होती. तरुणानें धारेखालीं आ वासला आणि एका दमांत, पडणाऱ्या धारेनें, आपली तहान शमवली. ओंजळींत पाणी घेऊन कपाळावर आलेल्या केसांचे बुंधे ओले करीत तोंड धुतलें. त्याच्या लाल ओंठांना आणि आरुणी गालांना झांकण्यासाठीं पिंगल रोमांची प्रारंभींची तयारी सुरूं झालेली होती. मेंढे तृप्ततेनें चरत आहेत असें पाहून तरुण पडशीच्या जवळ जमिनीवर टेंकला, कान तिरके करून आपल्याकडे पाहणाऱ्या झबऱ्याच्या डोळ्यांतले भाव ओळखून त्यानें पडशींत हात घातला आणि मेंढ्याच्या वाळलेल्या मांसाचा एक तुकडा आपल्या कमरपट्ट्याला लटकलेल्या चामडयाच्या म्यानांतील तांब्याच्या धारदार सुऱ्याने कापून तो स्वतः खाऊं लागला. कांहीं त्यानें झबऱ्यापुढें देखील टाकला. याच वेळी काठीच्या टापराचा खणखण आवाज कानीं आला. तरुणाने पाहिले, दूर झाडीमधून अर्धवट दिसत असलेलें एक गाढव येत होतें, त्याच्या मागून आणखी दुसरें. आणि त्याच्या पाठीमागून येत होती एक षोडशी बाला!–तिचा पोशाख अगदीं याच्या सारखाच, व पाठीवर पडशी देखील. त्याच्या ओठांतून सहजपणे शीळ बाहेर पडली.–जेव्हां एखादा विचार मनांत येतो ना, तेव्हां शीळ घालणे ही त्याची संवय; अगदीं श्वासोच्छ्वासाप्रमाणें स्वाभाविक. त्या सोळा वर्षाच्या बालेनें शीळ ऐकली खास; कारण तिनें आवाजाच्या दिशेकडे नजर फेंकली; परंतु तरुण गुल्मवेलींच्या आड बसलेला असल्यामुळें तिला दिसूं शकला नाहीं. तरुणानें तिला पन्नास हात अंतरावरून पाहिलें तरी त्याच्या अंतस्तलावर षोडशीच्या मुखाचा अस्पष्ट परंतु

सुंदर ठसा उमटून गेला. ती कुणीकडे जात असावी हें समजून घेण्याची तो उत्सुकतेनें वाट पाहूं लागला. इकडे जवळपास वक्षूच्यावर एखादें गांव वसलेलें नव्हतें हें त्याला माहित होतें. त्यामुळेंच ती आपण निघालों त्याच वाटेने जाणार हेहि त्याला माहित होतें.

षोडशीचा अनोळखी चेहरा पाहून झबरा भुंकू लागला. पण तरुणानें "गप्प रहाण्याचा इषारा देतांच तो भुंकायचें थांबला. षोडशीचीं गाढवें पाणी पिऊं लागलीं आणि ती आपली पडशी काढूं लागली तेव्हां तरुणानें पुढे होऊन आपल्या बलिष्ठ भुजांनीं ती पडशी काढून खालीं ठेवून दिली. षोडशीनें स्मिताच्या योगानें कृतज्ञता व्यक्त करून म्हटलें– " उकडतंय खूप ! "

" उकडत नाहीं, चढण चालून आल्यामुळं असं वाटायचंच. जरा वेळ विसांवा घेतला कीं घाम निघून जाईल. "

" सध्यां दिवस बरे आहेत. "

" आणखी दहा पंधरा दिवस तरी पावसाची भीति नाहीं. "

" पावसाचं मला भय वाटतं. नाल्या ओहळांमुळं रस्ते लिडबिडीत होतात. "

" गाढवांनां चालतांना फारच बिकट जातं. "

" घरीं मेंढे नव्हते म्हणून मी गाढवंच आणलीं. खरंच, मित्रा, तुला कुठं जायचंय ? "

" घाटमाथ्यावर ! आजकाल तिथं आमचे घोडे, गाई, नि मेंढे असतात. "

" मी पण तिथंच चालल्यें. सत्तू, धान्य, फळं, मीठ पोंचवायचं आहे मला ! "

" तुझ्या जनावरांची देखरेख कोण करतं ? "

" माझा पणजोबा आहे ना ! तसे भाऊ नि बहिणी पण आहेत "

" पणजोबा ? फारच म्हातारा असेल. "

" फारच ! इतका म्हातारा क्वचितच कुठं असेल ! "

" मग तो पशूंवर कसली नजर ठेवणार ? "

" अजून देखील किती तरी मजबूत आंगकाठी आहे. त्याचें केंस, भिंवया पांढऱ्या, परंतु दांत मात्र म्हणाल तर सगळे नवे, दिसायला पन्नाशी उलटलेला दिसतो. "

" मग त्याला घरीं ठेवायला हवं ! "

" तसं ऐकतच नाहीं तो. मी जन्मायच्या आधी पासून त्यानं गांवांत पाऊल ठेवलं नाहीं. "

" गांवांत पाऊल ठेवलं नाहीं ? "

" त्याला जावंसंच वाटत नाहीं. गांवाबद्दल त्याला तिटकारा वाटतो. मनुष्य

एका जागीं बांधून ठेवायला कांहीं जन्माला आला नाहीं, असं त्याचं म्हणणं! खूप जुन्या जुन्या गोष्टी सांगतो. खरंच मित्रा, तुझं नांव? "

" पुरुहूत, माद्रीपुत्र पौरव! आणि तुझं नांव काय स्वसर (बहीण)? "

" रोचना माद्री. "

" तर मग, तूं माझ्या मातुल कुलांतली दिसत्येस, स्वसर! मद्र कोणता?– वरचा कीं खालचा? "

" वरचा मद्र! "

वक्षूच्या डाव्या तटावर पुरूंचीं गांवें होतीं, परंतु पायथ्याच्या मैदानाशी मिळू पाहणारा खालचा तटप्रदेश मद्रांच्या ताब्यांत होता. उजव्या तटाचा वरचा भाग मद्रांच्या व खालचा पर्शुच्या ताब्यात होता. जमीन आणि जनसंख्या यांच्या विस्तारांत पुरू मद्रांच्यापेक्षां कमी नव्हते. पुरूंच्या खालच्या भागातल्या मद्रांना खालचे मद्र म्हणत असत. रोचना वरच्या मद्रांपैकी होती. पुरुहूताचें मामेगांव देखील वरच्या मद्रांत होतें.

हें सगळें समजल्यानंतर त्यांना एकमेकांविषयीं आणखी अधिक आपुलकी वाटूं लागली. पुरुहूताने पुन्हां बोलणे चालूं केले, " रोचना, आज आपण कांहीं माथ्यावर जाऊन पोंचूं शकत नाहीं, मग तूं एकटी येण्याचं धाडस कसं केलंस? "

" रात्री चित्त्यांपासून गाढवांचं रक्षण करणं जड जाईल, हें होतं मला माहित! पण बाबांसाठीं खाद्य-पदार्थ नेणं आवश्यक होतं. त्यांचा माझ्यावर भारी लोभ आहे. वाटलं, वाटेत भेटेलच कुणीतरी; आजकाल माथ्याकडे बरीचशी रहदारी असते. नि शिवाय असं वाटलं कीं जाळ पेटवला म्हणजे काम निभेल. "

" पण चालत्या वाटेत अग्नि पेटवणं शक्य नसतं. तुझ्याजवळ अरणी आहे, रोचना? "

" आहे तर! "

" पण असून देखील अरणी घर्षण करून अग्निदेवता प्रगट करायची म्हणजे सोपं काम नाहीं. असो, माझ्याजवळ देखील पवित्र अरणी आहे. ती आमच्या कुळांत माझ्या आजोबापासून चालत आलेली आहे. या अरणीच्या योगानं प्रगट झालेल्या अग्निद्वारां किती तरी यज्ञ नि देवपूजा झालेल्या आहेत. मला अग्निदेवतेचा मंत्र पण येतो; त्यामुळें ती तात्काल प्रगट होत असते."

" पण पुरुहूत, आतां आपण दोघं असतांना चित्ता जवळ यायला धजावेल तरी का? "

" आणखी हा झबरा देखील आहे ना! "

" झबरा? "

" होय, या लाल श्वका(सग=कुत्रा)चे नांव आहे हे ! "

" झबरा, झबरा, " असें म्हणतां क्षणींच झबरा उभा झाला आणि आपल्या धन्याचे हात चाटूं लागला.

रोचना देखील " झबरा, झबरा ! " म्हणाली. त्यानें येऊन तिचें पाय हुंगले; तिनें त्याच्या पाठीवरून हात फिरविला तेव्हां तर तो आपली शेपटी हालवीत तिच्या पायांजवळ बसून राहिला.

पुरुहूत म्हणाला, " बघितलंस रोचना, झबरा किती समजूतदार श्वक आहे. "

" आणि मजबूत देखील ! "

" तर ! अस्वल, लांडगे आणि चित्त्यांना मुळीं देखील घाबरत नाहीं. "

मेंढे आणि गाढव आतां भरपोट चरले होते, थकवा देखील आतां दूर झालेला होता, त्यामुळें त्या दोन तरुण प्रवाशांनी पुन्हां चालायला सुरुवात केली. झबरा त्यांच्या पाठोपाठ जात होता. पायवाट वांकडी वळणे घेत घेत जात असली तरी चढण जरा बिकटच होती. त्यामुळे ते जपून पावले टाकीत हळूं हळूं पुढे जात होते. पुरुहूत कधीं धरणीला टेंकलेल्या लाल स्ट्रॉबेरी तोडायचा; कधीं करवंदें तोडायचा, आणि रोचनेला देखील द्यायचा. अजून चांगलीं चांगलीं फळें पिकायला झालीं नव्हतीं, याबद्दल तर पुरुहूताची सारखी कुरकुर चालू होती.

संध्याकाळपर्यंत अशा प्रकारे बोलत चालत ते वाट चढून गेले होते. सूर्यास्ताची वेळ झाली तेव्हां एका दाट गुल्म वृक्षाखाली कलरव करीत झुळझुळणारा निर्झर त्यांच्या दृष्टीस पडला. जवळच थोडीशी मोकळी जागा होती. तेथें अर्धवट जळलेल्या लांकडाचे कुंदे, राखड आणि घोड्याची लीद पडलेली आढळली. पुरुहूताने राखड उकरून पाहिली तेव्हां आंत दबलेले निखारे आढळले. त्यानें आनंदून म्हटलें, " रोचना, रात्रीच्या मुक्कामासाठीं याहून अधिक चांगली जागा मिळायची नाहीं. जवळच पाणी, गवत पण मुबलक, वाळलीं लाकडं देखील आहेत. आणखीन् आज सकाळीं इथून कूच करणाऱ्या पांथस्थानं राखेखालीं निखारे देखील दाबून ठेवले आहेत बघ. "

" होय, पुरुहूत, याहून अधिक चांगलं ठिकाण नाहीं मिळायचं. करूं या इथंच मुक्काम. पुढच्या झऱ्यावर जाई तों काळोख देखील पडायचा. "

पुरुहूत बसला आणि त्यानें आपली पडशी उतरून एका दगडाच्या टेंक्यानें जमिनीवर ठेवली. मग त्यानें रोचनेची पडशी उतरून घेतली. दोघांनीं मिळून गाढवांचा भार हलका केला आणि त्यांच्या पाठीवरची काठी सोडून ठेवली. गाढवांनीं दोन तीनदां जमिनीवर लोळ लोळ केले आणि तीं गवतांमध्यें घुसलीं. मेंढ्यांवरचें ओझें उतरवून घ्यायला जरा वेळ लागला, कारण त्यांना जबरीनें धरून आणावें

लागत होतें. रोचना तुंबा घेऊन झऱ्यावर पाण्यासाठीं गेली. पुरुहूतनें पानें, काटक्या गोळा करून विस्तव शिलगवला आणि मग मोठीं लांकडें घालून तो पेटता केला. रोचना पाणी घेऊन परतली तेव्हां पुरुहूत तांब्याची पातेली पुढें ठेवून गाईच्या पायाचा चौथाई हिस्सा चाकूनें कापून त्याचे तुकडे तुकडे करीत होता. तिला पाहून तो म्हणाला, " उद्यां संध्याकाळपर्यंत आपण माथ्यावर जाऊन पोचूं. तुझं गोष्ठ लांब तर नाहीं ना ? "

" आपण माथ्यावर पोचलों कीं पूर्वेळा तीन कोसांवर आहे. "

" माझा देखील पूर्वेलाच, पण सहा कोसावर ! "

" तर मग तुझ्या बाबाचं गोष्ठ माझ्या वाटेवर पडेल. "

" तर मग, तूं माझ्या बाबाला भेटूं शकशील, पुरुहूत. तुझी त्याची भेट कशी होईल याचाच मी सारखा विचार करीत होत्यें. "

" आतां एकच दिवस उरला तेव्हां हा पायाचा चौथाई हिस्सा पुरेसा वाटतो. बेहद (बहिला) चा हा मागच्या तंगडीचा पुठ्ठा आहे. "

" माझ्या जवळ शिंगराचं अर्ध तंगड आहे, पुरुहूत. आजकाल मांस जास्त काळ ठेवलं तर घाण मारूं लागतं ! "

" मीठ घालून मांस शिजवलं तर बरं होईल नाहीं ? "

" होईल ना !—अन् माझ्याजवळ ही गोडी पण आहे. मांस, गोडी आणि मागून थोडासा सातू मिसळला की सुंदर लापशी (सूप) तयार होईल. झोंपायच्या वेळेला अगदीं तयार सूप मिळेल. "

" मी एकटा असतो तर, रोचना, सूप बनवलं नसतं. खूप उशीर लागतो त्याला; पण तोपर्यंत आपण जनावरं बांधण्यांत नि गप्पागोष्टी करण्यात वेळ घालवूं."

" बाबाला माझ्या हातचं सूप खूप आवडतं, अन् शिवाय हे तांब्याचं पातेलं!"

" होय, पण तांबं खूप महाग आहे. या पातेल्याला एका घोड्याची किंमत द्यावी लागली. पण प्रवासांत याचा चांगला उपयोग होतो. "

" तुझ्या घरीं पुष्कळ जनावरं असतील, पुरुहूत ? "

" होय, आणि धान्य देखील ! म्हणून तर हें एका घोड्याच्या किंमतीचं पातेलं आहे. बरं, हें बघ मी मांस कापलं. पाणी नि मीठ घालून तूं मांस विस्तवावर ठेव. मी त्या बाजूला आणखी विस्तव पेटवतो. मध्यें थोडंसं गवत कापून टाकतों व तिथं गाढव आणि मेंढे यांना बांधतों. तुला माहित आहेच कीं जसं आपल्याला वासराचं मांस रुचकर लागतं तसंच चित्त्यांना गाढवांचं मांस लागतं. आणि हें बघ झबरा, तूं तोंपर्यंत चालव आपलं तोंड. "– असे म्हणून त्याने झबऱ्यापुढें जरासें मांस असलेलें हाडूक फेंकलें. आपली शेपटी हालवीत पायांमध्ये तें हाडूक दाबून

झबरा तें दातांनीं फोडण्याचा प्रयत्न करूं लागला.

पुरुहूतानें अंगांतली वरची बंडी काढली, कंबरबद सोडून ठेवला. बिन-बाह्यांच्या कुडत्या खालून त्याची चिरेबंदी छाती आणि पिळदार दंड त्या विशींतल्या तरुणाच्या अंगीं केवढे शरीरसामर्थ्य आहे हें दर्शवीत होते. काम करतांना पुरुहूत पुलकित होत होता. त्यानें पडशी मधून कोयता काढला व बोलता बोलता गवताचा एक भारा कापून आणला. मग खुंटा गाडून झाल्यावर गाढवांचे कान पकडून आणून त्यांना बांधले व त्यांच्या पुढे गवत घातलें. मेंढे देखील त्याने असेच बांधले.

हें सगळे काम संपल्यावर पुरुहूत आगटी जवळ येऊन बसला. रोचना पातेलीतून मांसाचे शिजवलेले तुकडे काढून चामड्यावर ठेवत होती. पुरुहूताने पडशींतून एक चामड्याचा तुकडा काढला व जमिनीवर आंथरला ; लाकडाचा एक सुंदर प्याला आणि तुंब्यांत भरलेले पेय बाहेर काढलें; तें काढतांना आंतून एक बांसरी निघून जमिनीवर आदळली. एखादे कोमल बालक जमिनीवर आदळतांच त्याला लागलें असेल या शंकेने जसा मातेचा जीव कासावीस व्हावा, तसे पुरुहूताला वाटले. त्यानें तात्काळ बांसरी उचलून कपड्याने पुसली आणि तिचे चुंबन घेऊन तिला फिरून पडशीत ठेवून दिले रोचना हे सगळें बघत होती. तिने मध्येच विचारले– "पुरुहूत तूं बांसरी देखील वाजवतोस ? "

" ही बांसरी मला किती आवडत्ये म्हणून सांगूं, रोचना ! असं वाटतं, माझा सारा प्राण या बांसरीत आहे. "

" मला ऐकव ना तुझी बांसरी ! "

" आतां कीं जेवल्यावर ? "

" जराशी आतांच ! "

" बरं. " पुरूहूतानें बांसरी ओठांना लावली आणि जेव्हां त्याने आपलीं आठहीं बोटें तिच्या छिद्रांवरून फिरवायला सुरवात केली.–विशाल वृक्षांच्या सांवल्यांतून बाहेर पसरत जाणाऱ्या व संध्येच्या काळोखी स्तब्धतेमधून दिगंतांत प्रतिध्वनित होणाऱ्या त्या मधुर ध्वनीमुळे चहूं दिशांना जणुं भारून गेल्यासारखें वाटलें. रोचनेची शुद्धबुद्ध हरपून ती तन्मयतेनें ते स्वर ऐकत होती. पुरुहूत कुणातरी उर्वशीच्या वियोगानें व्याकुळलेल्या पुरुरव्याचे व्यथापूर्ण गीत बासरीमधून गात होता. गीत संपलें तेव्हां रोचनेला वाटलें, एकाएकीं स्वर्गातून तिला कुणीतरी धरणीवर आणून ठेवलें. तिचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले.

" पुरुहूत, तुझं बांसरीचं संगीत किती तरी मधुर मधुर आहे. मी नव्हती ऐकली असली बांसरी. किती प्रियकर होती हिची लय ! "

" सगळे असंच म्हणतात. पण रोचना, मला हें समजतच नाहीं. बांसरी

ओठांला लावली की मग मी सगळं विसरून जातों. ही बांसरी माझ्याजवळ असली कीं मग माझं जगातल्या दुसऱ्या कुठल्याही वस्तूंवर मन धांवत नाहीं."

"पुरू, ये आतां, मांस गार होईल नाहीं तर!"

"आणिक रोचना, मातेनं निघतांना ही द्राक्षासुरा दिली होती. आहे थोडीशीच, परंतु मांसाबरोबर पितांना छान वाटेल."

"तुला सुरा आवडते पुरू?"

"आवडते असं नाही म्हणत, रोचना! आवडीत तृप्ति होत नसते. परंतु मी डोळ्यांवर किंचित लाली चढली की मग एक थेंब देखील पिऊं शकत नाही."

"माझी देखील तीच गत आहे, पुरू! नशेत चूर झालेल्या माणसाला बघून मला तिटकारा वाटतो."—रोचनेनें आपला लांकडी प्याला काढून खाली ठेवला.

मांसांतला तिसरा हिस्सा झबऱ्याला देण्यात आला दोघांनी खाण्यापिण्यांत बराच वेळ घालवला. चहूं बाजूंला काळोखाचे दाट आवरण पडलेले होते. मोठ्या लांकडांच्या धगधगल्या जाळाचा तांबडा उजेड आणि त्यामुळे दिसणारी आसपासची जागा यांशिवाय आणखी कांहीहि दिसत नव्हते थोडे फार ध्वनि ऐकायला येत, ते लहान सहान प्राण्यांचे आणि किड्यांचे असावेत. गप्पागोष्टी आणि मधून मधून बांसरीचे आलाप असे बराच वेळ चालले शेवटी सातू घातलेले सूप देखील शिजून तयार झालें. दोघानीहि ते कढत सूप आपापल्या पेल्यांमधून प्राशन केले. बरीच रात्र उलटली तेव्हां निजण्याची आठवण झाली. रोचनेनें चामड्याचा बिछाना सजवून आपले कपडे काढायला सुरवात केली; पुरुहूताने विस्तवावर आणखी लांकडे ठेवली, पशूंच्या पुढे गवत टाकले, आणि नंतर वनदेवतांची प्रार्थना करून आपले कपडे काढल्यावर तो झोपी गेला.

एका रात्रींतच आपण सख्खे बहीण भाऊ झालों असे त्यांना दुसऱ्या सकाळीं जागे झाल्यावर वाटूं लागले. रोचना जागी झाल्यावर पुरुहूताला आपले मन आवरणें अशक्य झाले. तो म्हणाला, "रोचना, स्वसर (बहीण), तुझ्या मुखाचं चुंबन घेण्याची मला इच्छा होत आहे."

"मला देखील होतेय, पुरु. या जगांत आपण बहीण भाऊ झालो."

पुरुहूताने तिच्या विखुरलेल्या केशांना मागें सारून तिचे दोन्ही गाल चुंबले. दोघांच्या चर्या प्रसन्न होत्या आणि डोळे ओले. मुखमार्जन केल्यावर त्यांनी थोडासा सातू आणि वाळले मांस खाल्लें, व पशूंवर ओझें लादून पुढची वाट धरली. मधून मधून दोन तीन जागीं ते विसांवले, परंतु बोलण्या बोलण्यांत वेळ इतका लवकर गेला कीं आपण माथ्यावर केव्हां पोचलो आणि माद्रबाबांच्या पुढे कसें गेलों याचें

देखील भान उरलें नाहीं. रोचनानें परिचय करून देतांच बाबानें पुरूच्या पराक्रमाची प्रशंसा करून पुरुहूताचें स्वागत केलें.

– २ –

या माथ्यावर मद्रांचें एक छोटेसें गांव वसलेले होतें. या गांवातलीं सगळीच घरें तंबूचीं नाहींतर बुराच्या झोंप्याचीं होतीं. खालीं उतरणीवर आणि उभ्या पहाडांवर दाट देवदाराचें जंगलच्या जंगल पसरलेलें दिसत होतें. पण वर या घाटमाथ्यावर नांवाला देखील वृक्ष दिसत नव्हता. जमीन अधिकतर चौरस असून तिच्यावर हिरव्या गवताचा जाड गालिचा आंथरलेला होता. याच हिरव्या मैदानांत कुठे कुठे गाई, मेंढें व घोडे चरत होते, त्यांच्यामध्ये कुठे कुठे लहान वांसरे, करडे आणि शिंगरे टुणटुण उड्या मारीत खेळत बागडत होती. याच भूमीकडे बघून माद्रबाबा म्हणत कीं, "मनुष्य एका जागीं बांधून रहायला जन्मास आला नाही." माद्रबाबाचा तंबू या महिन्यांत या जागी आहे, तर उद्या गवत कमी झालें की दुसऱ्या जागीं जाईल. दूध, दही, लोणी आणि मांस यांची या जागीं विपुलता आहे. तंबू याच वस्तूंनीं भरलेला आहे. दर पंधरा वीस दिवसांनी गांवाहून माणून येतो नि येथून मांस व लोणी घेऊन जातो. हिवाळ्यांत या जागी बर्फ पडायला सुरवात होते. बाबाच्या हातीं असते तर तेव्हां देखील तो येथेंच राहिला असता, परंतु पशु कांहीं बर्फावर जगूं शकत नव्हते. त्यामुळे वाटोळ्या वाटोळ्या वाटेनें तो खालच्या जंगलमय प्रदेशांत उतरे; आणि पशु मात्र खालच्या गांवांत रहायला जात. बाबाला गांवांत रहायला चलण्याविषयीं कुणी सुचवले तर तो त्याला मारायला धांवत असे.

बाबाच्या तंबूवर ते दोघे दिवसा उजेडीच जाऊन पोंचले. सामान उतरून घेतल्यावर बाबानें त्याना हंसवीत त्यांच्या पुढे घोडीच्या दुधाची दारु (कूमिस्) भरून लांकडाचा एक बुधला ठेवला. तीन चार पेले घेतां क्षणींच वाटेंतला सारा शीण पार नाहींसा झाला. संध्याकाळीं शिंगरा-वासरांना घेऊन रोचनाचे भाऊ बहीण आणि गांवातले इतर तरुण ढोरकी आले. इकडे रोचनाने बाबांच्या जवळ पुरुहूताच्या बांसरी-वादनाची प्रशंसा केलेली होती मग त्यांच्या सारखे हौशी बरे त्याला जाऊं देतील? त्यांना आणि गोत्रांतलि (गोष्ठ) साऱ्या तरुणांना पुरुहूताची बांसरी आवडली. रात्रीं नृत्य झाले तेव्हा देखील पुरुहूतानें आपलें कौशल्य दाखवलें.

सकाळी पुरुहूत जायला निघाला पण बाबा का त्याला इतक्या लवकर निघूं देणार? दुपारीं भोजनोत्तर बाबांनी आपली कहाणी सांगायला सुरवात केली. कथेला निमित्त मिळालें पडशीजवळ पडलेल्या तांब्याच्या पातेलीला बघून!—बाबा सांगू लागले——

"हें तांबं आणि हीं शेतं बघितलीं कीं माझ्या अंगाचा भडका होतो. वक्षूतटावर या वस्तू आल्या आणि चहूंकडे पाप व अधर्म बोकाळूं लागला. देवता असंतुष्ट झाल्या. महामारी वाढूं लागली आणि मारामाऱ्या होऊं लागल्या."

"तर मग या वस्तु आधी नव्हत्या का?" पुरुहूतनें विचारलें.

"नाहीं बेटा, या वस्तु माझ्या बाळपणी जरा जरा येऊं लागल्या; माझ्या आजोबानं तर यांचं नांव देखील ऐकलं नव्हतं. त्यांच्या वेळी दगड, हाडं, शिंगं आणि काठ्या यांचीं हत्यारं होती."

"मग काठ्या तोडीत कशानं?"

"दगडाच्या कुऱ्हाडीनं!"

"खूप वेळ लागत असेल. आणि इतक्या सफाईनं तुटत पण नसतील!"

"या घाईनंच तर, सारा घोटाळा माजवला. आतां जो घोडा आपल्याला दोन महिने खायला पुरूं शकेल किंवा अर्धा जन्म स्वारीला उपयोगी पडूं शकेल, तो देऊन एक अयः (तांबे) कुऱ्हाडी घ्यायची. आणि मग सारं जंगलच्या जंगल कापून वैराण करायचं, नाहीं तर सारा गांवचा गांव मारून उजाडून टाकायचा परंतु जंगलांतल्या वृक्षाप्रमाणं गाव निशस्त्र नसतो, त्याच्याही जवळ तसलीच धार असलेल्या कुऱ्हाडी असतात. या अयःकुठारांनी युद्धाला अधिकच क्रूरपणा आणला. याच्या घावानं विष निर्माण होतं. आधी बाणाचे फाळ दगडाचे असत, ते इतके तीक्ष्ण नसत, हें खरं असलं तरी चतुर हातानी ते अधिक कसब घडवून आणीत. आतां पहावं तर ज्यांचा ओठ पिळला तर दुध निघावं, अशी मुलं देखिल या तांब्याच्या फाळांनीं वाघाची शिकार करूं म्हणतात, मग आतां कोण निष्णात धनुर्धर व्हायला पाहील?"

"बाबा, तुझी एक गोष्ट मला पटते. मनुष्य कांही एका जागीं बांधून राहण्यासाठीं जन्मला नाहीं."

"खरं आहे तें वत्सा. पहिल्या दिवशीं जिथं मल विसर्जन केला तिथंच दररोज करीत राहिलं तर तें किती वाईट आहे बरं? आमचा तंबु आज इथं आहे, पशु इथलं गवत खातील, जवळपास माणसं आणि जनावरं मलमूत्रविसर्जन करतील तेव्हां आम्ही ही जागा बदलून दुसऱ्या जागीं जाऊं. तिथं नवं हिरवं विपुल गवत, नवी धरणी, नवं पाणी, हवा देखील अधिक शुद्ध!"

"होय बाबा, मला देखील अशीच धरित्री अधिक आवडत्ये. तिथं माझ्या बांसरीचा आवाज अधिक सुरेल होतो."

"किती छान बोललास, बाळ! आधीं आम्हीं या तंबू-राहुटयांच्या जमावालाच गांव म्हणत असूं. हा गांव एका जागीं वर्षभर तर राहूंच दे पण तीन महिने देखील

टिकत नसे. परतु आजचा गांव म्हणजे पुत्र-पौत्र नव्हें तर शंभर पिढ्या रहातील अशा रीतीनं वसवतात. दगडामातीच्या नि लांकडांच्या भिंती, त्यामुळं ऊन आणि वारा आंत जाऊं शकत नाहीं दगड, लांकूड आणि गवत यांचें वर मजबूत छतवजा छप्पर, मग कसली हवा आंत शिरकाव करणार? आज आम्हीं केवळ नांवापुरते अग्नि आणि वायु यांना देवता म्हणतों, परंतु त्यांच्या बद्दल आमच्या मनांत मुळीं देखील सन्मान नाहीं. यामुळंच नवनवे आजार उत्पन्न होतात. काय खरं कीं नाही? हे अग्नि, तूं या मानवांवर जो कोप प्रगट करतोस, तो योग्यच आहे."

"पण बाबा, हे अयःकुठार, अयःखड्ग व अयःशल्य यांच्याविना आम्ही जगूं शकणार नाहीं. यांचा आम्हीं त्याग केला तर शत्रू एका दिवसांत आमचा फडशा पाडतील."

"तें मला कबूल आहे, वत्सा. दोन दोन महिन्यांचं जेवण आणि अर्ध्या जन्माची स्वारी असलेले घोडे राजीखुषीनं विकून कांहीं लोकांनीं अयःखड्गें विकत घेतलीच का नाहीं! वक्षु मातेच्या कुसव्याला या खालच्या मद्रांनी व पर्शूंनी कलंकित केलं. वक्षु-रोद (नद) कुठवर जातो, हें मला माहित नाही, कुणालाच माहित नाही, पण असेच कांहीं बाताडे सांगतात की पृथ्वीच्या कंगोऱ्याला अपार पाणी भिडलेलं असून तिथं वक्षू जात्ये. येवढं मात्र खरं कीं मद्र आणि पर्शु यांची भूमि संपली कीं वक्षु-रोद पहाड सोडून मैदानांत जातो. त्याच्या पुढं खोटं बोलणाऱ्या देवशत्रूंची भूमि आहे. असं सांगतात कीं तिथं मोठमोठ्या तंगड्या असलेले लहानमोठ्या टेंकड्यां-येवढाले जीव आहेत. त्याला काय बरं म्हणतात? बेटा, आतां म्हातारपणामुळं स्मृति क्षीण होत चालली."

"उष्ट्र (शुतुर, ऊंट)! पण बाबा, ते पहाडा येवढे कांहीं उंच नसतात. एके दिवशीं एका तळच्या मद्रानं उष्ट्राचं पाडस आणलं होतं. सांगत होता सहा महिन्यांचं. पण दिसत होतं आमच्या घोड्याच्या बरोबरीचं!"

"होय वत्सा, हे बाहेर देशांमधून फिरून येणारे लोक खोटं बोलायला खूप शिकतात. म्हणत होते—काय बरं म्हणतात त्या ह्याला?"

"उष्ट्र!"

"हां, उष्ट्र! उष्ट्राची मान म्हणे इतकी लांब असते कीं वक्षूच्या ऐल तीरीं उभा राहून तो पैल तीरावरचं गवत खाऊं शकतो. खोटं आहे ना हें?"

"होय बाबा, त्या पाडसाची मान घोड्याच्या मानेपेक्षां लांब होती हें मात्र खरं, पण गवत खाण्याची ही गोष्ट निव्वळ खोटी आहे."

"याच खोटाड्या मद्रांनीं आणि पर्शूंनीं अयःकुठार व अयःखड्गाची सांथ पसरवलेली आहे. पर्शूंनीं आम्हां उत्तर मद्रांवर या हत्यारांनीं हल्ला केला. माझ्या

पित्याच्या वेळची गोष्ट आहे ही. आम्हीं दोन दोन घोडे देऊन तळच्या मद्रांपासून एकेक अयःकुठार विकत घेतलं."

"अयःकुठारापुढं पाषाण-कुठार निकामी ठरले ना बाबा?"

"होय वत्सा, म्हणूनच नाइलाजानं अय-शस्त्रं खरीदणं भाग पडलं. आणि जेव्हां पुरूंवर तळमद्रांनीं आक्रमण केलं तेव्हां तुमच्या लोकांनी आम्हां मद्रांपासून अयःशस्त्रं विकत घेतलीं. उत्तरमद्र आणि पुरु यांच्यांत कधींहि भांडण झाल्याचं ऐकिवांत नाही, पण हे पर्शु आणि तळमद्र नेहमी दस्यू प्रमाणं वागत आले; नेहमी जुना धर्म सोडून नवनव्या गोष्टी करतात, आणि त्यामुळं आम्हांला देखील स्वतःच्या प्राणरक्षणासाठीं त्यांच्याच प्रमाणं वागावं लागतं. माझ्या मतें जोंवर तळमद्र आणि पर्शु अयःशस्त्रांचा त्याग करीत नाहींत तोंपर्यंत आम्हीं वरच्या मद्रांनी त्यांचा त्याग करणं आत्मघाताचं होईल. परंतु तांब्याचा इतका प्रसार होणं वाईट आहे यांत मला मुळींच शंका नाहीं, वत्स! या पापाचे प्रसारक हे दोघे "जन" आहेत. यांना देवांचा आशीर्वाद कधींहि मिळायचा नाही. घोर अंधःकार असलेल्या पाताळांत हे जातील. यांचं बघूनच, याच्याच भयामुळं आम्ही दगडामातीची गांवं वसवली. आधी अशींच तंबुवाली, आणि आज इथं उद्यां तिथं, अशी फिरतीं गांवं वक्षूच्या कुसव्यांत होतीं. परंतु या मद्रानी व पर्शूनी ही प्रथा तोडली. कुठून पाहिलं नि यांनीं धरती-मातेचं वक्ष या अयःशस्त्रानी चिरून काढलं. असं पाप कुणी कधी केलं नसेल. धरणीला माता म्हणतात ना वत्सा?"

"होय बाबा, धरणीला माता म्हणतात, देवी म्हणतात, तिची पूजा करतात."

"आणि त्याच धरणी माईचं वक्ष-स्थळ या पाप्यांनी चिरून टाकलं. आणि काय बरं केलं?–नांव विसरलों, स्मृति आतां बेकाम होऊं लागली बाळ!"

"कृषि, शेती."

"हां, कृषि केली, शेती वाहिली. गहूं पेरला, व्रीहि (तांदूळ) पेरला, जव पेरला. आजपर्यंत असं कुणी केलेलं ऐकिवांत नव्हतं. आमच्या पूर्वजांनीं कधी धरणीमाईचं वक्ष चिरलं नव्हतं. देवीचा अपमान केला नव्हता. धरणीमाई आमच्या पशूंना गवत द्यायची. तिच्या जंगलांत नाना प्रकारचीं गोड गोड फळं होतीं. तीं आम्हीं कितीहि खाल्लीं तरी संपतां संपत नव्हतीं. परंतु या मद्रांचीं आणि त्यांचें बघून आम्ही केलेलीं पापं, यां मुळं तें पेरदार गवत आतां उगवेनासं झालं. आतां पहिल्या प्रमाणं धष्टपुष्ट गाई देखील नाहींत,–तेव्हां एक गाय साऱ्या मद्रजनाला एका दिवसाच्या भोजनाला पुरेशी व्हायची. आतां ना त्या तशा गाई, ना ते घोडे, ना ते मेंढे! जंगलांतलीं हरणं, कोल्हे आतां तितकीं मोठीं नसतात. माणसांचं आयुष्य देखील कमी होऊं लागलं. हें सगळं पृथ्वीदेवतेच्या कोपामुळं झालं बरं वत्सा! दुसरं कांहीं नाहीं!"

" बाबा, तुम्हीं किती शरद पाहिलेत ?"

"शंभराच्या वर असतील ! वत्सा, त्या वेळीं आमच्या गांवांत दहा तंबू होते, आतां दगडामातीच्या भिंतींची शंभर घरं झालीं. तेव्हां शेतं नव्हतीं; आमची हिंडतीं फिरती घरं आणि गांवं होतीं. जेव्हां शेतं झाली तेव्हां त्यातला गहूं हरणापासून आणि दुसऱ्या पशूंपासून वांचवण्याची काळजी लागली. शेतं म्हणजे माणसांना बाधून ठेवणारे खुंटे ठरले. पण वत्सा, माणसं एका जागीं बांधून रहायला का जन्मलीं ? जी गोष्ट देवांनीं मानवांसाठी निर्माण केली नव्हती ती या मद्रांनीं आणि पर्शूंनीं करून दाखवली."

"पण बाबा, काय आपण आज शेतीचा त्याग मनास येईल तेव्हां करूं शकतों ? आज धान्य आमचं अर्धं भोजन बनलेलं आहे."

"ते मला कबूल आहे. पण वत्सा, आमचे पूर्वज धान्य खात नव्हते. इथून पंचवीस कोसांवर दक्षिणेला गव्हाचं जंगल आहे. तिथं गहूं आपसूक उगवतो, फुलतो, फळतो आणि झडतो. तो खाऊन गाईचं दूध वाढतं, घोडे धष्टपुष्ट होतात, दरसाल आमचे पशु तिथं जातात. धरणी मातेनं धान्य माणसासाठी पैदा केलं नाही, पशुसाठी केलं. त्या धान्याचे कण आमच्या शेतींतल्या गव्हांपेक्षां लहान असतात. हा जंगली गहू समूळ नष्ट होऊन जाईल अशी मला नेहमी भीति वाटते. आमच्या खाण्यासाठी या गाई, घोडे, शेळ्या मेंढ्या आहेत, जंगलांत डुकरं, हरणं, अस्वलं अशी किती तरी प्रकारची शिकार आहे. द्राक्षादि फळं आहेत. हा सगळा आहार आम्हांला धरणीमाता आनंदानं देत होती. पण या मद्रांचं नि पर्शूंचं तळपट होवो, यांनीं जुना मार्ग मोडतोड करून आतां या नव्या वाटेनं जायला सुरवात करून मानवांवर देवांचा कोप ओढवून घेतला. वत्सा, या वक्षु-वासीयांच्या भाग्यांत अजून काय काय लिहिलेलं आहे हे सांगवत नाहीं. मी तर पंचवीस वर्षांपासून हें पठार सोडून गांवांत गेलो नाही. थंडीच्या दिवसांत जरा खालीं एका झोपडीच्या आश्रयाला जातों. जाऊन तरी काय करूं ? प्रत्येकजण पूर्वजाची रीतभात सोडूं पहातो. पूर्वजांच्या मुखांतून निघणारीं वचनं मी इतके दिवस जतन करून ठेवलीं. ज्याला शिकावंसं वाटतं तो अजून देखील माझ्याजवळ येतो. परंतु त्या वचनावर विश्वास न ठेवणारेच वाढूं लागले आहेत. आतां ऐकलंय कीं मद्रपर्शूंचा निर्वाह नुसत्या शेतींनं होत नाही. आतां ते वक्षु-वासीयांचे आहार परिधान वाहून वाहून कुठंतरी नेतात व बदल्यांत देतात काय तर एका घोड्याऐवजी मिळणारं हे पातेलं ! भुकेनं मरायची पाळी आली तर या पातेल्यानं पोट भरेल कां ? आतां पुरूंना अन्नवस्त्रांविना पहाण्याची पाळी येईल आणि त्यांच्या घरांत मात्र या पातेल्याच पातेल्या दिसतील."

" आणखी बाबा, मी असं ऐकलंय कीं तळमद्रांनीं स्त्रियांच्या कानांत व कंठांत पिवळे पांढरे दागिने घालायला सुरवात केली आहे. कानांतल्या एका दागिन्याची किंमत एका घोड्याबरोबर असते. अन् बाबा, त्याला अयः म्हणत नाहींत, हिरण्य (सोनें) म्हणतात, आणि पांढऱ्याला रजत म्हणतात. "

" अरे, कोणी या अधर्म्यांना मारून टाका रे. हे सारे वक्षुजन-मंडळाचा सत्यानाश केल्याशिवाय रहाणार नाहींत. आमच्या आहारपरिधानासाठीं जें कांहीं शिल्लक उरलेलं आहे, त्याच्यावर देखील यांचा डोळा आहे. आमच्या स्त्रिया देखील त्यांचं बघून दोन घोड्यांच्या किमतीचीं कुंडलं कानांत घालूं लागतील. हे कृपाळु अग्नि देवा, आतां कशाला रे मला या मानवांत अधिक दिवस ठेवतोस? मला पितृलोकांत घेऊन चल बाबा. "

" बाबा, आणखी एक भारी पाप करतात हे. मद्र आणि पर्शु यानीं कुठून तरी माणसांना पकडून आणलं. त्यांच्याकडून हे अयःखड्ग, अय कुठार बनवून घेतात ते फारच चतुर शिल्पी आहेत, पण मद्रपर्शु त्यांना पशू प्रमाणं वाटेल तेव्हां बाळगतात आणि विकतात. शेती, काबळी विणणं आणि अशीच आणखी कामं या पकडून ठेवलेल्या लोकांकडून करवून घेतात. यांना ते दास म्हणतात. "

" माणसांचा क्रय विक्रय! आम्ही तर अन्न वस्त्रं विकणं देखील पाप मानीत होतो. आमच्या पूर्वज पितरांना कल्पना देखील नसेल की या मद्र–कुल–कलंकांचा येवढा अधःपात होईल म्हणून! जेव्हां बोट सडूं लागतं तेव्हां त्यावर उपाय एकच असतो आणि तो म्हणजे तें सडकं बोट तोडून टाकणं; नाहींतर सारं शरीर सडून जाण्याची भीति असते. या मद्रपर्शूंना वक्षु तटांवर राहूं देणं देखील पाप आहे, वत्सा. मी आतां हे बघण्यासाठी अधिक काळ जगणार नाही. "

माद्रबाबाच्या कथा खूपच मनोरंजक आणि बोधकारक होत्या. परंतु मनुष्य आपल्या हातीं आलेलीं शस्त्रे त्यागून आपण मानव आणि पशू-शत्रूंच्या विळख्यांत जगूं शकत नाही, हें समजण्याइतकी बुद्धि पुरुहूताला होती.

तिसऱ्या दिवशीं जेव्हां तो जायला निघाला, तेव्हां वृद्धानें त्याच्या कपाळाचें व भिवयांचें चुंबन घेऊन त्याला आशीर्वाद दिला. रोचना त्याला पुष्कळ लांबवर पोंचवायला आली आणि वियोगाच्या प्रसंगीं त्यांनीं एकमेकांचे गाल अश्रुजलांनी धुवून काढले.

– ३ –

माद्रबाबाचें म्हणणें पंचवीस वर्षांनंतर कां होईना पण खरें निघालें. तळमद्र आणि पर्शु दिवसेदिवस वरच्या पुरूंना आणि मद्रांना दडपूं लागले. या वरच्या

जनांत कापड व कांबळ्या बनविणारे स्वतंत्र स्त्री-पुरुष होते, त्यांचा अन्नवस्त्रांवर जास्त खर्च होई, त्यामुळें त्यांनीं केलेल्या वस्तु चांगल्या असल्या तरी किंमतीला महाग असत. याच्या उलट तळमद्र आणि पर्शु यांच्या जवळ दास होते. त्यांनीं बनवलेल्या वस्तु तितक्या चांगल्या नसल्या तरी स्वस्त पडत. तिथले व्यापारी या सर्व वस्तु उंटांवर नाहींतर घोड्यावर लादून बाहेर देशी पाठवत व त्यांची खूप विक्री होई. वरच्या जनांत देखील आतां तांब्याच्या वस्तूंची गरज अधिकाधिक वाढूं लागली. एक तर दरवर्षी तांबें थोडें फार स्वस्त होत होते आणि शिवाय लांकडामातीच्या वस्तूंपेक्षां तांब्याच्या वस्तू खूपच टिकाऊ होत्या. पंचवीस वर्षांपूर्वी जिथें एखाद्याच घरांत तांब्याचें पातेलें आढळत असे, तिथे आतां पातेले न आढळणारें घर विरळाच. सोन्या-चांदीचा प्रसार देखील वाढूं लागला होता. आणि या सर्वांच्या मोबदल्यांत या जनांना आपला आहार, कांबळीं, चामडे, घोडे व गाई द्याव्या लागत असत. त्यामुळें त्यांची परिस्थिति खालावूं लागली होती. वरच्या जनांमधलि कांहीं लोकांनीं स्वतंत्रपणें व्यापार करण्याचा प्रयत्न केला, कारण तळमद्रांतले आपले शेजारी आपल्याला ठकवूं पहात आहेत असा दाट संशय त्यांना येऊं लागला होता. परंतु वक्षूच्या खालाणांत जाण्याचा मार्ग त्यांच्याच जनभूमींतून होता, तो मोकळा ठेवण्याची तळमद्रांची तयारी नव्हती. यावरून कित्येक वेळां लहानमोठे खटके पण उडाले. कित्येक वेळां उत्तर मद्रांनीं आणि पुरूंनीं बाहेरच्या देशाबरोबर संबंध जोडण्यासाठीं दुसरे आणिक मार्ग शोधून पाहिले परंतु त्यांत त्यांना यश येऊं शकलें नाहीं.

वरच्या तळच्या जनांतील या झगड्यांत एक महत्त्वाची गोष्ट मात्र अशी होती कीं तळच्या जनांत आपसांत एकजूट नव्हती; याच्या उलट वरच्या जनांत एकी असून ते आक्रमण प्रत्याक्रमण एकजुटीनें करीत. या युद्धांत आपलें वीरत्व आणि बुद्धिमत्ता यांचें तेज पाडून दाखवल्यामुळें पुरुहूत आपल्या जनांचा आवडता झालेला होता. आणि अवघ्या तीस वर्षांच्या अल्पवयांत पुरुजनाने त्याला आपला महा-पितर निवडलें.

पुरुहूताला स्पष्ट कळून चुकलें कीं मद्रांच्या या व्यापारी अन्यायाचा प्रतिकार केला नाहीं तर वरच्या जनांना कसलीच आशा करायला जागा उरायची नाहीं. तांब्याचा प्रचार कमी होण्याच्या ऐवजीं दिवसेंदिवस वाढतच होता. हत्यारें, भांडींकुंडीं, आणि अलंकार यांच्यासाठीच नव्हे तर विनिमयासाठी त्याचा उपयोग होऊं लागला. मणमण मांस किंवा कांबळी विनिमयासाठीं घेऊन जाण्याच्या ऐवजीं लोक तांब्याची सुरी किंवा तरवार घेऊन जाणे अधिक पसंत करीत. पुरुहूतानें आपल्या जनांच्या बैठकीपुढें आपल्या दुःखाचें मूळ या तळाकडील जनांच्या व्यापारी

अन्यायांत आहे असें सांगितलें. या मार्गकंटक मद्रांना वाटेंतून उचलून टाकलें नाहीं तर आपण त्यांच्या हातांतील बाहुलीं बनूं या एका निर्णयावर सर्व जन पोंचला होता. कदाचित एखाद्या दिवशी आपल्याला त्यांचे दास देखील बनावें लागेल हीहि भीति त्यांना वाटत होती. पुरु आणि उत्तर मद्राचे महापितर एकत्र जमून त्यांनीं असाच निष्कर्ष विचारविनिमयानंतर काढला. दोन्ही जनांनी युद्धसंचालनासाठीं पुरुहूताला आपला संयुक्त सेनापति नेमलें आणि त्याला इंद्र ही पदवी दिली. अशा प्रकारे पुरुहूत हा पहिला इंद्र झाला.

पुरुहूताने धडाक्यानें सैनिक-तयारी चालवली. इंद्र बनतांक्षणींच त्यानें हत्यारें घडविण्याची व्यवस्था व्हावी म्हणून दोन लोहार दासांना आश्रयाखालीं घेतलें. वरचे जन वागणुकीला फार चांगले होते, ते त्यांच्या सहाय्याने लौह ( लाल धातु-तांबें ) शिल्पात निपुणता प्राप्त करून घेण्यांत सफल झाले. अशा प्रकारे मद्रांत व पुरूंत किती तरी लोहशिल्पी शिकून तयार झाले. आपल्या लोहार दासांना परत करायला भाग पाडण्यासाठीं त्यांच्या शेजाऱ्यांनीं नुसत्या तोंडी वाटाघाटीच नव्हेत, तर शस्त्रे देखील चालवून पाहिलीं. परंतु तळच्या जनांत व्यापारी वृत्ति वाढली तशी वीरवृत्ति घटूं लागली होती. युद्धांत यश आलें नाहीं, तेव्हां त्यांनीं तांबे देणें बंद केलें. परंतु लवकरच त्यांना असें कळून आले कीं त्यामुळें त्यांच्याच व्यापाराचें वाटोळे होईल. कारण पुरुमद्रांनीं मागें विकत घेतलेली भांडींकुंडीं व पातेलीं यांच्यापासून ते आपली पुरेशीं हत्यारें करण्यासाठीं एक पिढीभर तरी समर्थ होते.

शेवटीं इंद्र आणि त्याचे दोन्ही जन यांनीं मद्र पर्शूंचा नायनाट करण्याचा संकल्प सोडला. पुरुहूत स्वतः लोहाराचें काम शिकलेला होता आणि त्यानें आपल्या कल्पना-चातुर्यानें खड्ग, भाले, आणि बाणाचे फाळ यांत सुधारणा घडवून आणल्या. त्यानें बलवान वीरांच्या छातीचे कुठल्याहि घावापासून रक्षण व्हावें म्हणून तांब्याचीं वक्ष-त्राणें बनविलीं.

इंद्रानें प्रथम एकच शत्रु लढवण्याचे ठरविले व त्यासाठीं त्याने पर्शूंची निवड केली. हिवाळ्यांत पर्शु बहुसंख्येनें व्यापारासाठीं बाहेरदेशीं जात असत. इंद्रानें ती संधि सर्वोत्कृष्ट ठरवली. उत्तरमद्र आणि पुरु यांमधील योद्धयांना त्यानें युद्धकौशल्य शिकविलें. पर्शु आणि मद्र यां मधील वैर सनातन असलें तरी पर्शूंना कल्पना नव्हती कीं वैरी एकाएकीं घातक आक्रमण करून वक्षूच्या खोऱ्यामधून आपल्याला नामशेष करून टाकतील. इंद्राने स्वतःच्या नेतृत्वाखालीं निवडक मद्र आणि पुरु योध्यांसह हल्ला चढवला. युद्धाचा हेतु ओळखायला फारसा अवधि लागला नाहीं आणि तो ओळखतांक्षणींच पर्शु प्राण पणास लावून मोठ्या शौर्यानें लढले. परंतु ते घाईमध्यें साऱ्या पर्शुग्रामांची एक आघाडी करूं शकले नाहींत. इंद्राच्या सेनेनें एका मागून एक

अशीं पर्शुगांवें काबीज केलीं आणि पर्शूंचा संहार केला. एकालाहि बंदीत ठेवलें नाहीं. तिकडे तळच्या मद्रांना संकटाचा सुगावा लागला पण वेळ निघून गेली होती. शेवटची कांहीं गांवें उरली होतीं त्यांना पुरून उरतील येवढे वीर मागें ठेवून पुरुहूत इंद्र कुरु-भूमीकडे निघाला. तळमद्रांनीं आक्रमण केलें परंतु त्यांची गत थेट पर्शूप्रमाणेंच झाली. तळमद्र आणि पुरुजनांपैकीं जो कोणी पुरुष–बाल, तरुण, वृद्ध–त्यांच्या हातीं लागला त्याला त्यांनीं जीवदान दिलें नाहीं. स्त्रियांचा मात्र आपल्या स्त्रियांत समावेश करून घेतला. हातीं सांपडलेल्या दासांपैकीं ज्यांना आपल्या देशांत परत जावेंसें वाटलें त्यांना परत पाठवलें. कांहीं तळमद्र आणि पर्शु स्त्रीपुरुष जीव वाचवून वक्षूचें खोरें सोडून पश्चिमेकडे पळाले. त्यांचेच वंशज पुढें इराणमध्ये पर्शु ( पर्शियन ) आणि मद्र ( मिडियन् ) नांवाने प्रसिद्धी पावले. त्यांच्या पूर्वजांवर इंद्राच्या नेतृत्वाखाली जो अत्याचार झाला त्याचा विसर त्यांना पडला नाही. म्हणूनच इंद्राला इराणी आपला सर्वात भारी शत्रू मानूं लागले. वक्षूचे संपूर्ण खोरें आता उत्तरमद्र आणि पुरू यांच्या ताब्यांत आले. दोघांनीं डावे उजवे तटप्रदेश आपसात वाटून घेतले.

वक्षुवासीयानीं खूप प्रयत्न केला तरी नव्या गोष्टी बाजूला सारून जुन्यांचें पुनरुज्जीवन ते करूं शकले नाहींत. तांबें टाकून दगडांची हत्यारें त्याना आता वापरता येणे शक्य नव्हतें व तांब्यासाठी त्यांना वक्षूच्या पर्वतमय खोऱ्याबाहेर आपला व्यापारी संबंध प्रस्थापित करणें आवश्यक होते.

मात्र त्यांनीं दासप्रथेचा स्वीकार केव्हांहि केला नाहीं. तसेंच बाहेरच्या लोकांना वक्षूच्या खोऱ्यांत रहाण्याचा अधिकार पण दिला नाहीं. किती तरी शतकांच्या नंतर जेव्हां लोक पुरुहूत इंद्राला विसरूं लागले होते व त्याला देवता बनवून चुकले होते, तेव्हां तर वंशविस्तार इतका झाला कीं सर्वांच्या भरणपोषणाला वक्षू अपुरी पडूं लागली. तेव्हां त्यांतली किती तरी संतानें नाइलाजानें दक्षिणेकडे पुढे पुढें सरकूं लागली.

याच्या आधीं एक जन दुसऱ्या जनापासून स्वतंत्र असे. महापितर प्रमुख असून देखील सर्व निर्णय जनांच्यावर अवलंबून असत. परंतु वक्षुतटावरील अंतिम संग्रामाच्या प्रसंगीं अनेक जनांचा एक सेनापति इंद्र निर्माण झाला.

---

[ आजच्या आधीं एकशे ऐंशी पिढ्या पूर्वींच्या आर्यजनांची ही कथा आहे. याच जनांपैकीं कित्येकांचे वंशज आतां भारताकडे प्रस्थान करणार होते. त्यावेळीं शेती व तांबें यांचा प्रचार चालू झालेला होता. आर्यांनी दासप्रथा स्वीकारली व पुन्हां ती विस्मृत करण्याची त्यांची इच्छा होती. ]

# ५—पुरुधान

**देश**—वरचा स्वात.  **जाति**—हिंदी-आर्य.

**काळ**—इ. स. पूर्वी २००० वर्षे.

– १ –

सुवास्तूचा तो डावा तटप्रदेश–हिरवे कंच पर्वत, झुळझुळणारे निर्झर, दूरवर पसरलेल्या शेतांतील डुलणारे गव्हाचे रोपे, यांच्यामुळें अत्यंत सुंदर दिसत होता. परंतु आर्यांना अभिमान होता आपल्या दगडी भिंतींच्या आणि देवदारांच्या बल्ल्यांनीं शाकारलेल्या घरांचा; म्हणून तर त्यांनीं या प्रदेशाला सुवास्तु (सुंदर घराचा प्रदेश, स्वात) हे नांव दिले होतें. वक्षुतट पार करून आर्यांनी पामीर व हिंदुकुशाच्या दुर्गम पठारां मधून आणि कुनार, पंजकोरा, यांजसारख्या नद्या पार करून कशी वाट काढली याची स्मृति त्यांना बरेच दिवस होती. आणि आज कदाचित मंगलपुरांत (मंगलोर) इंद्रपूजेची जी जंगी तयारी चाललेली आहे, ती या दुर्गम पथांतून आपल्याला सकुशल पार पाडणाऱ्या आपल्या इंद्राबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं देखील असेल.

आज मंगलपुरांतील पुरुंनीं आपापलीं सुंदर घरें देवदाराच्या हिरव्या डहाळ्या आणि रंगी बेरंगी निशाणें यांनीं सुशोभित केली होती. पुरुधानाला एका विशिष्ट तऱ्हेचीं लाल निशाणें लावतांना पाहून, त्यांतले एक हातीं घेऊन त्याचा शेजारी सुमेध म्हणाला, "मित्र पुरु, हीं तुझी निशाणं खूपच हलकीं आणि मुलायम वाटतात. आपल्या इथं तर असलं कापड बनत नाही; ही दुसऱ्याच प्रकारचीं मेंढरं असतील?"

"ही मेंढ्याची लोकर नव्हे सुमेध!"

"तर मग?"

"ही लोंकर झाडावर उगवत असते."

"आमच्या इथं जशी मेंढ्यावर लोंकर उगवते, तशीच ही लोंकर जंगलांतल्या वृक्षांवर उगवते?"

"असं ऐकलंय खरं, मित्रा. मी स्वतः कांहीं तो वृक्ष पाहिलेला नाहीं."

सुमेधनें जांघेला चाटणाऱ्या तकल्याला झोला दिला, त्याच्यावर लोंकरीचा नवा पेळू लावला व म्हटले, "किती भाग्यवान असतील तिथले लोक! त्यांच्या जंगला-

मधील वृक्षांवर लोंकर तयार होते. काय आपल्या इथं असले वृक्ष लावतां यायचे नाहींत ?"

"तें सांगतां येणार नाहीं. थंडी वाऱ्याच्या बाबतींत ते वृक्ष किती सहनशील आहेत याची मला कल्पना नाहीं. परंतु सुमेध, मांस कांहीं झाडांतून पैदा होत नाहीं."

"जर एखाद्या देशांत लोंकर वृक्षावर निर्माण होऊं शकते, तर मग मांसाचीं देखील झाडं असूं शकतील. याची किंमत किती आहे?"

"किमत ऊनी कापडापेक्षां खूपच स्वस्त. पण टिकण्यांत देखील लोंकरीची बरोबरी करूं शकत नाहीत."

"कुठं विकत घेतलंस?"

"असुरांच्या जवळून! इथून पन्नास कोसावर त्यांचा देश आहे. तिथं लोक हेंच कापड वापरतात."

"इतकं स्वस्त आहे तर आम्ही देखील हेच कां वापरूं नये?"

"परंतु यानं थंडी राहत नाही."

"मग असुर बरे वापरतात?"

"त्यांच्या इथं थंडी कमी असते. बर्फ तर बघायला देखील मिळत नाहीं."

"तुम्हीं उदीमासाठी पूर्व, उत्तर किंवा पश्चिमेकडे न जातां दक्षिणेकडेच कां जात असतां?"

"कारण तिथं अधिक नफा राहतो आणि शिवाय नाना तऱ्हेच्या वस्तु पण मिळतात. परंतु एक त्रास भारीच आहे. तिथं कडक उन्हाळा असतो. गोड गार पाण्यावांचून जीव कासावीस होतो."

"तिथले लोक कसे दिसतात, पुरुधान?"

"ते ठेंगणे ठुसके, तांब्यासारखा वाण, दिसायला खूपच कुरूप, नाक तर आहे की नाही याचीच भ्रांत पडते, इतकं चपटं नि भोडं! तिथं एक मोठीच वाईट रूढि आहे. माणसांची खरेदी विक्री होते."

"खरेदी विक्री? माणसांची?"

"होय, त्यांना दास म्हणतात."

"दास आणि स्वामी यांच्या चेहेऱ्या मोहऱ्यांत कांहीं फरक असतो का?"

"नाहीं. मात्र, दास खूप गरीब आणि परतंत्र असतात; त्यांची जीवकुडी स्वामीच्या मुठींत असायची."

"इंद्र आमचं रक्षण करो. असल्या लोकांचं तोंड पाहण्याचा प्रसंग न येवो."

"पण मित्रा सुमेधा, तुझा तकला अजून फिरतोच आहे! यज्ञांत चलायचं नाहीं का?"

" चलायचं नाहीं तर काय! इंद्रकृपेनं पीवर पशु आणि मधुर सोम मिळत असतो. मग असा कोण अभागी असेल कीं जो त्या इंद्राच्या पूजेंत भाग घेणार नाहीं?"

" बरं तुझ्या गृहपत्नीची काय खबरबात आहे? आजकाल कुठं बाहेर दिसत नाहीं ती?"

" चटक लागली वाटतं, पुरुधान?"

" यांत चटक कसली? तूं तर जाणून बुजून म्हातारपणीं तरुणीबरोबर प्रणय करूं पाहिलास!"

" पन्नाशी म्हणजे म्हातारपण नव्हे!"

" पण विशी पन्नाशींत अंतर कितीचं पडतं?"

" मग तिनं त्या दिवशीच नकार द्यायला हवा होता!"

" त्या दिवशीं तर मिशी दाढी मुंडून अठरा वर्षांचा पाडा बनला होतास; उषेच्या आईबापांना तुझी पन्नाशी दिसली नाहीं. त्यांना तुझे पशु दिसत होते."

" राहूं देत या गोष्टी, पुरू! तुम्ही तरुण लोक नेहमींच–"

" राहिलं बरं सुमेध. बघ वाद्यं वाजूं लागलीं, यज्ञाला आरंभ होईल आतां."

" उशीर तूं करशील आणि शिव्या ऐकाव्या लागतील बिचाऱ्या सुमेधला!"

" चल तर, उषेला देखील नेऊं बरोबरच!"

" ती आतांपर्यंत काय घरांत बसली असेल?"

" हा तकला नि लोंकर तर ठेवून देशील कीं नाहीं?"

" यज्ञांत विघ्न यायचं नाहीं यामुळं!"

" म्हणूनच तर उषेला तूं आवडत नाहींस!"

" तसा आवडतो रे, पण तुम्ही मंगलपुरांतले तरुण तिला आवडूं द्याल तेव्हां ना?"

गप्पा गोष्टी करीत दोघे मित्र नगराबाहेरील यज्ञवेदीकडे जात होते. ज्या ज्या तरुण-तरुणींची पुरुधानशीं दृष्टभेट होई ते ते हंसूं लागत. पुरुधान डोळ्यांनींच त्यांना खुणावून तोंड फिरवून घेई. एका तरुणाच्या या चेष्टा सुमेधाच्या नजरेस पडल्या आणि मग काय लागला तो बडबडायला–"हे तरुण म्हणजे मंगलपुराचा कलंक!"

" काय झालं मित्रा?"

" मित्र बित्र कसला काय? मला पाहून हंसतात लेकाचे."

" बदमाश आहेत हे! त्यांचं काय मनावर घेतोस?"

" मला तर साऱ्या मंगलपुरांत एकहि भला माणूस दिसत नाहीं."

यज्ञवेदीजवळ विस्तृत मैदान होतें. तेथे जागोजागीं मंच सजविले असून, देवदारांच्या सपर्ण खांबांवर तोरणें टांगलेलीं होतीं. ग्रामामधील बरेचसे स्त्री-पुरुष

वेदीच्या आसपास जमलेले होते. परंतु अजून खरा जमाव रात्रीं व्हायचा होता. त्या वेळीं पुरुजनांतील साऱ्या नरनारींचा मेळा मंगलपुरांत एकत्र होईल आणि त्यांत स्वात नदीच्या दुसऱ्या कांठावर रहाणारे मद्र देखील सामील होतील.

येत असलेल्या या दोघां मित्रांना उषेने पाहिले. ती चटकन् सुमेधाजवळ आली व त्याचे दोन्ही हात आपल्या हातांत धरून तरुण तरुणीना साजेसा प्रेमाभिनय करीत ती म्हणाली, "सुमेधा, लाडक्या ! सकाळपासून शोधून शोधून प्राण कंठाशीं आले, पण तुझा मात्र थाग पत्ता देखील नसावा अं !"

"मी कांही कुठं मेलो नव्हतों !"

"हें काय? असं भलतंच नको बोलूंस, सुमेध ! जिवंतपणींच मला विधवा बनवणार वाटतं ?"

"विधवांना देवर वाटेल तितके पुरूंमध्ये !"

"आणि सधवांना काय देवर विषासारखे वाटतात ?" पुरुधान म्हणाला.

"बघ तरी पुरुधान ! ही मला ठकवूं पहात्ये. सकाळपासून घरांतून निसटली. कोण जाणे गावांत किती घरीं वाणं वांटली तीं ! आतां रात्रीं एक म्हणेल, माझ्याबरोबर नाचायला ये ! दुसरा म्हणेल, नाही, माझ्याबरोबर ! भांडणं होतील, रक्तपात होईल आणि या स्त्रीमुळं बदनाम होणार सुमेध !"

उषेनें त्याचे हात सोडून डोळे मुरडले आणि स्वर बदलून म्हटले, "असं कर, एक पेटारा आणून त्यांत तुझ्या उषेला कोंडून ठेव. चुलींत जा तूं. मी जात्यें आपल्या वाटेनं !"

उषाने त्याची नजर चुकवून पुरुधानकडे एक स्मितपूर्वक कटाक्ष फेंकला व वेदी भोंवतालच्या गर्दीत ती मिसळून दिसेनाशी झाली.

वर्षातून एकदांच येणारा आजचा दिवस, आज स्वात नदीच्या खोऱ्यामध्यें वक्षुतटावरल्या प्रमाणें जुन्या काळच्या इंद्राला सर्वात मोठ्या घोड्याचें मांस खायला मिळते. घोडा साऱ्या जनांमधून निवडून घेण्यांत येतो. येरव्ही इकडे घोडा खात नाहींत, पण इंद्राच्या या वार्षिक पूजेचा यज्ञशेष म्हणून त्याचें भक्तिपूर्वक सेवन सगळेच करतात. जनाचे महापितर–( त्यांना आतां जनपति म्हणतात )–आज आपल्या जन-परिषदेसह इंद्राला त्याचा प्रियबलि अर्पण करायला हजर आहेत. जनपतींना बलिदानाचे सारे विधी–नियम ठाऊक आहेत. ज्या मंत्रांनीं वक्षुतटवासी इंद्राची स्तुति करून त्याला बलि अर्पण करीत, ते देखील त्यांना सगळे माहित आहेत. वाद्यें आणि स्तुतिमंत्र यांच्या गजरांत अश्वाचे स्पर्श, प्रोक्षणापासून तों आलंभना ( वधा ) पर्यंत साऱ्या क्रिया करण्यांत आल्या. मग अश्वाचें चामडे सोलून काढून त्याचे शरीरावयव वेगवेगळे करण्यांत आले. मग त्यांच्या पैकीं कांहीं तळून तर कांहीं कच्चेच आहुति

म्हणून अग्नीला अर्पण करण्यांत आले. यज्ञ-शेष वांटतां वांटतां संध्याकाळ होऊं लागली. तों पर्यंत सारें पटांगण नरनारींनीं फुलून गेलें. अत्यंत सुंदर वस्त्रें आणि अलंकार लेवून सर्वजण आले होते. स्त्रियांचें नेसणें म्हणजे रंगीत विरविरीत धाबळी, उजव्या खांद्यावरून घेऊन खाली भिन्न रंगाच्या कमरपट्टयांत खोंचलेली, खांद्यावर तांब्याच्या जरीची वेलबुट्टी. अंगांत सुंदर कंचुक. बहुतेक साऱ्याच जणींच्या कानांत सोन्याची कुंडलें; वसंत संपायचा काळ, खोऱ्यांत उमललेलीं फुलें जणुं आजच्या साठीच विकसलीं. तरुण तरुणींनीं आपले लांब सडक केश या फुलांनीं खूपच शृंगारले होते. आज त्यांना स्वैर प्रणयाचा पूर्ण हक्क होता. संध्याकाळी नटून थटून सजलेली उषा पुरुधानच्या हातांत हात घालून मिरवूं लागली हे सुमेधच्या नजरेला पडलें पण त्याने दुसरीकडे तोंड फिरवले. काय करील बापडा ? इंद्रोत्सवाच्या दिवशीं त्याला रागावायची देखील सोय नव्हती. मागच्या वर्षीच असें केल्याबद्दल जनपतीनें त्याला फटकारले होतें.

आज खरोखरच मधु-क्षीर-मिश्रित सोमरसाच्या (भांगेच्या) नद्या वाहूं लागल्या होत्या. गांवां गांवांतील लोकांनीं वांसरांचें कोवळे स्वादिष्ट मांस आणि सोम रसाचे घट आणून ठेवले होते. अभिनव प्रणयातुर तरुण तरुणींचे जागोजाग याने स्वागत व्हायचें. ते मांसाचे घांस घेत, सोमाचा पेला पीत, मनास आलें म्हणजे वाजत असणाऱ्या किंवा वाटेल तेव्हां वाजविल्या जाणाऱ्या वाद्यांच्या तालावर जरासें नाचत, आणि मग दुसऱ्या गांवाच्या स्वागत स्थानाकडे जायला निघत. साऱ्या जनांनी भव्य प्रमाणावर तयारी केलेली होती; नृत्यांगण देखील खूप विशाल केलेले होतें.

इंद्रोत्सव मुख्यत. तरुणांचा सण. त्या एका दिवस-रात्रीपुरते तरुण साऱ्या बंधनांच्या पलीकडे जात होते.

– २ –

स्वात नदीचा हा वरचा भाग पशुधान्याने परिपूर्ण होता, त्यामुळें येथले लोक खूप सुखी आणि समृद्ध होते. त्यांना मुख्यतः उणीव भासायची तांब्याची, आणि सोनें, चांदी व कांहीं रत्नें, अशा हौसेच्या जिनसांची! या वस्तूंची मागणी दिवसें-दिवस वाढत होती. या वस्तूंसाठी दरसाल स्वात व कुभा ( काबुल ) यांच्या संगमावर वसलेल्या असुरनगरांत जावें लागे. या असुर नगराला नंतर आर्य लोकांनीं पुष्कलावती ( चारसद्दा ) हें नांव दिलें. आपण देखील तेंच नांव मान्य करूं. थंडीच्या मध्यांत स्वात, पंजकोरा नि आणिक दुसऱ्या खोऱ्यांत रहाणाऱ्या पुरु, कुरु, गंधार, मद्र, मल्ल, शिवि, उशीनर इत्यादि पहाडी जाति आपले घोडे, कांबळया, व दुसऱ्या विकाऊ वस्तु घेऊन पुष्कलावतीच्या बाहेरच्या पटांगणांत डेरे राहुट्या ठोकीत. या जागीं असुर व्यापारी त्यांच्या वस्तु घेऊन त्यांच्या बदल्यांत त्यांना इच्छित वस्तु

देत. अनेक शतकांपासून हा क्रम उत्तम रीतीनें चालत आलेला होता. या वर्षी पुष्क-लावतीला आलेल्या पुरूंच्या मार्थाचें ( तांड्याचें ) नेतृत्व पुरुधानकडे होते. इकडे कित्येक वर्षापासून पहाडी लोकांची कुरकुर होती कीं त्यांना असुर खूप ठकवतात. असुर नागरिक व्यापारी या पहाडी लोकांपेक्षां जास्त चतुर होते यांत शंकाच नको. पण त्याच बरोबर ते यांना निव्वळ गॉवढे जंगली देखील समजत असत. या समजु-तींत थोडें फार तथ्य होतें; नाहीं असें नाहीं; परंतु पिवळ्या केसांचे व निळ्या डोळ्यांचे आर्य घोडेस्वार स्वतःला या असुर नागरिकांपेक्षां कमी दर्जाचे मानायला तयार नव्हते. हळूं हळूं जेव्हां पुरुधानासारखे कित्येक आर्य असुरांची भाषा समजूं लागले व ते त्यांच्या समाजांत मिसळूं लागले. तेव्हां असुर आर्यांना पशु-मानव मानतात असे कळून चुकले. त्या दोन जातींमधील वैमनस्याचे गळूं पिकूं लागायला यामुळें आरंभ झाला.

असुरांची नगरें सुंदर होतीं. त्यांत पक्क्या विटांची घरे, पाणी वाहण्याच्या मोऱ्या, स्नानगृहें, सडका, तलाव, होते. आर्य देखील पुष्कलावतीचे सुंदरपण नाकबूल करीत नव्हते. कांही कांही असुरसुंदरीचे सौंदर्य–नाक, केश आणि बांधा यांतील वैगुण्य डोळ्यांआड करून देखील ते कबूल करीत असत. परंतु देवदारांनीं आच्छादित पर्व-तांनीं वेढलेलें आणि लांकडांच्या चित्रविचित्र अट्टालिकांनी सुसज्जित स्वच्छ गृहपंक्ति-युक्त मंगलपुर पुष्कलावतीपेक्षां कसल्याहि बाबतींत कमी प्रतीचें आहे हे केव्हांहि मान्य करायला त्यांची तयारी नव्हती. पुष्कलावतीमध्ये एक महिना काढणे देखील त्यांना जड जाई आणि वारंवार त्यांना आपली जन–भूमि आठवत असे. तीच स्वात पुष्कलावती वरून वहायची परंतु त्याना तिथल्या पाण्याची तशी चव लागत नसे. ते म्हणत, "असुरांच्या हस्तस्पर्शानं हें पवित्र जल कलुषित झालं." तें कांहींही असो, आर्य देखील असुरांना आपल्या बरोबरीचे समजत नसत. विशेषतः त्यांचे हजारों दासदासी आणि आपल्या शरीर विक्रयासाठी दुकान थाटून बसलेल्या वेश्या पाहिल्या-वर त्यांचें हे मत बनलें होतें.

परंतु व्यक्तिशः आर्यांचे असुरांत व असुरांचे आर्यांत किती तरी मित्र होते. असुरांचा राजा पुष्कलावतीहून दूर सिंधु तटावरील कुठल्याशा नगरांत रहात होता, त्यामुळें पुरुधाननें त्याला पाहिलें नव्हतें. मात्र राजाच्या स्थानिक अधिकाऱ्याला त्यानें पाहिलें होतें. तो ठेंगू, गलेलठ्ठ आणि भारीच सुस्त होता. दारूच्या योगानें त्याच्या जाड पापण्या नेहमीं मिटलेल्या असायच्या. त्याच्या सर्वांगावर कितीतरी सोन्याचांदीचीं आभूषणें होती. कान टोंचून त्यानें ते खांद्यापर्यंत लोंबवले होते. हा अधिकारी पुरुधानच्या मतें कुरूपता आणि बुद्धिहीनता यांचा एक नमुना होता. ज्या राज्याचा असला प्रतिनिधी, त्या राज्याबद्दल पुरुधान सारख्याचें चांगलें मत कसें

होऊं शकेल ? पुरुधाननें असें ऐकलें होतें की या पदावर पोंचायला त्याचा एकच गुण कारण झाला; हा म्हणजे तो असुर राजाचा साळा होता.

कित्येक वर्षांच्या येऊन जाऊनच्या सहवासामुळें पुरुधानला असुर समाजांतल्या बऱ्याचशा उणीवा माहित झाल्या. उच्च वर्गातले असुर कितीहि हुशार असले तरी त्यांत भेकडच अधिक होते आपल्या ताब्यांतलि लढवय्ये व दास यांच्या बळावर शत्रूंला ते तोंड देऊं पहात होते. यामुळें दुबळ्या शत्रूंवर विजय मिळतहि असेल परंतु बलवान शत्रूंपुढे असलें सैन्य टिकाव धरूं शकत नव्हते. असुरांचे शासक असलेले राजा व त्याचे सामंत यांनीं भोगविलास हाच आपल्या जीवनाचा एकमात्र उद्देश ठेवलेला होता. प्रत्येक सामंताच्या शेंकडो स्त्रिया आणि दासी असत. स्त्रियांना देखील ते दासीप्रमाणे वागवीत. कांही काळापूर्वी असुर राजानें कांही पहाडी (आर्य) स्त्रियांना बळजबरीनें आपल्या राणिवशांत दाखल केले होते. यामुळे आर्य जनांत पुष्कळ खळबळ देखील माजली होती. परंतु इतके बरे होतें कीं असुरराजधानी सरहद्दीच्यापासून पुष्कळ दूर आत असल्यामुळें तेथवर आर्य अजून जाऊं शकत नव्हते. त्याचमुळें लोक आर्य स्त्रियांची गोष्ट म्हणजे एक दंतकथा मानीत असत.

पुष्कलावतीच्या बाजारांमधील तऱ्हेतऱ्हेचे दागिने, कार्पासवस्त्रे, अस्त्रशस्त्रें, आणिक इतर वस्तु सुवास्तूच काय पण कुनारच्या वरच्या टोंकाला रहाणाऱ्या घर ना दार पाठीवर बिऱ्हाड असणाऱ्या लोकांपर्यंत देखील जाऊन पोचल्या होत्या.

सुवास्तूच्या स्वर्णकेशी सुंदरी तर असुर कारागिरांच्या हातून घडवलेल्या अलंकारांनीं मुग्ध होऊन जात; यामुळेंच त्या सार्था (तांड्या) बरोबर दरसाल अधिकाधिक प्रमाणांत येऊ लागल्या. सुमेध खरोखरच उषेला विधवा करून निघून गेला होता आणि आतां ती आपला चुलत दीर पुरुधान याची पत्नी झालेली होती. या वर्षी ती देखील पुष्कलावतीला आली.पुष्कलावतीच्या नगराधिपतीच्या सेवकांनीं पिवळ्या केसवाल्यांच्या तंबूत अनेक सुंदरीना पाहिलें व त्याची बातमी आपल्या धन्याला दिली. सार्थ परत देशीं जातांना पहाडी वाटेंत शिरला कीं त्याच्यावर हल्ला करून त्यांची लूट करायची असा त्यांनीं बेत केला. हा बेत मूर्खपणाचा होता; कारण पिवळ्या केंसाचे ते लोक किती लढवय्ये आहेत याची त्यांना जाणीव होती; परंतु नगराधिपतीला बुद्धीचा गंध देखील नव्हता नगरांतले मोठमोठे शेट सावकार त्याचा तिटकारा करीत. पुरुधानशी मैत्री असलेल्या एका सौदागराची सुंदर मुलगी नुकतीच बलात्कारानें नगराधिपतीनें आपल्या घरात घातली होती, त्यामुळें त्याचा तो सौदागर हाडवैरी बनला होता. उषा देखील त्या असुर सौदागराच्या घरीं अनेकदां गेली होती. सौदागर-पत्नीची भाषा तिला समजत नसली तरी पुरुधानाच्या दुभाषीपणानें आणि सौदागरणीच्या वागणुकीनें त्या दोघी आर्य असुर स्त्रिया मैत्रिणी बनल्या होत्या. परत

निघायला दोन दिवस होते तेव्हां सौदागरानें आपलें थोर गिऱ्हाईक पुरुधान याला पाहुणचार केला. त्याच वेळीं त्यानें पुरुधानच्या कानांत नगराधिपतीनें रचलेल्या नीच डावाची बातमी सांगितली. त्याच रात्रीं पुरुधानानें आर्य सार्थाच्या नायकांना बोलावून त्यांचा विचार घेतला. ज्यांच्याजवळ चांगलीं हत्यारें नव्हतीं, त्यांनीं नवीं हत्यारें खरेदी केलीं. विकाऊ घोडे आणि दुसरे भारी गठ्ठे विकून झाल्यामुळे, आणि स्वारींचे घोडे व विकत घेतलेली आभूषणें व धातूंच्या इतर वस्तु यांचे लटांबर त्या मानानें कमी असल्यामुळे, त्यांना फारशी फिकीर वाटत नव्हती. स्वात मधल्या आर्य स्त्रियांची दागिन्यांनीं नटण्याची हौस वाढत होती तरी देखील त्यांच्या तारुण्य-काळातल्या शिक्षणांत गीत नृत्याबरोबरच शस्त्र विद्येचा देखील समावेश होत असे. यामुळे संकटाचा सुगावा लागतांच त्या देखील आपापल्या तलवारी व ढाली घेऊन सज्ज झाल्या.

पुरुधानला कळलें कीं असुर योद्धे सरहद्दीवरील पहाडातल्या दरीचा रस्ता रोखून हल्ला चढवतील, आणि त्याच वेळीं पिछाडीकडून एक मोठी तुकडी त्यांना घेरून टाकील. यामुळें पुरुधानने पूर्ण तयारी करुन ठेवली होती. आधी बातमी नसती तर, पंचकोर, कुनार आणि स्वात यांचे तांडे तसे एकमेकांची पर्वा न करतां वेगवेगळे निघाले असते. परंतु आतां सारेच सज्ज होते. जरी त्यांनीं शत्रूला सुगावा लागूं नये म्हणून एक दोन दिवस आगें मागे पुष्कलावतीमधून कूच केले तरी पण अब्जा ( अबाजई )च्या तोंडाजवळ सर्वांनी एकाच वेळीं जाऊन पोचायचे हें आधींच ठरलें होतें दार ( दरी ) कोस राहिलेली पाहून पुरुधाननें पंचवीस स्वार पुढें पाठवले. ते दरींत शिरूं लागतांच असुरांनीं त्यांच्यावर बाण सोडायला सुरवात केली. हल्ल्याची बातमी खरी निघाली. स्वार मागें हटले आणि त्यांनी आपल्या सार्थनायकाला खबर दिली. पुरुधानने आधीं पिछाडीवरून येणाऱ्या शत्रूंचा समाचार घेण्याचें ठरवलें. यांत एक फायदा पण होता. कारण दर वर्षी जरी असुर हजारों घोडे आर्यांपासून विकत घेत, तरी पण ते कुशल घोडेस्वार बनूं शकले नव्हते.

सार्थ थांबला आणि संरक्षणासाठीं बऱ्याच योद्धयांना तेथे ठेवून, पुरुधानानें आपल्या स्वारांसह मागे मुरड घेतली. पीतकेशी आर्य आपल्यावर एकाएकी तुटून पडतील याची असुर सैन्याला कल्पना देखील नव्हती. पीत केशीच्या लांब भाल्यांपुढें आणि पल्लेदार तरवारींपुढे त्याना फार वेळ टिकाव धरतां आला नाहीं. परंतु आर्यांचें सैन्य त्यांना फक्त पराभूत करून सोडायला तयार नव्हतें. पीत केशींच्याकडे डोळा वर करून पाहणें किती धोक्याचें असते याची पूर्ण जाणीव ते या नकट्या, काळ्या असुरांना करून देणार होते. असुर सैन्यानें पळ काढलेला पाहून पुरुधाननें सार्थाला सूचना पाठवली आणि आपले स्वार घेऊन त्याने पुष्कलावतीवर हल्ला चढविला. असुर सैनिकांच्या प्रमाणेंच त्यांच्या नगराधिपतीला हें असें कांहीं होईल असें

वाटलें नव्हतें. असुरांना आपल्या बळाचा पूर्णपणें उपयोग करण्याची संधि देखील मिळूं शकली नाहीं आणि असुरदुर्ग व नगराधिपति हे अनायासें पीतकेशींच्या हातीं आले. असुरांच्या या विश्वासघातामुळे पीतकेश फारच उत्तेजित झाले होते; त्यांनीं अत्यंत निर्दयपणानें असुर पुरुषांची कत्तल उडवली. नगराधिपतीला तर नगराच्या चौरस्त्यावर नेऊन असुर प्रजेच्या समक्ष एकेक अवयव तोडून मारण्यांत आलें. त्यांनीं व्यापारी, मुले व स्त्रिया यांच्या अंगाला हात लावला नाहीं. त्या वेळीं दास बनविण्याची जर पीतकेशींची ( आर्यांची ) इच्छा असती तर संभवतः त्यांनीं येवढी अधिक कत्तल उडवली नसती. पुष्कलावतीच्या बऱ्याचशा भागाची त्यांनीं जाळ-पोळ केली. असुर–दुर्गाचा पहिला पाडाव हा असा झाला.

असुर आणि पीतकेशींच्या महान् विग्रहाला–देवासुर संग्रामाला–या अशा प्रकारें प्रारंभ झाला. पुरुधानाने परतून अब्जादरीत असलेल्या असुर सैनिकांचा फडशा पाडला व मग सारे पीतकेशी सार्थ आपापल्या जनभूमीला परतले.

कित्येक वर्षे पुष्कलावतीचा व्यापार बुडाला. पीतकेशींनी असुरपण्य घ्यायला नकार दिला परंतु तांब्यापितळेवर ते तरी किती काळ बहिष्कार घालूं शकणार ?

———

[ आजच्या आधीं एकशें साठ पिढ्या पूर्वी आर्य (देव) असुर संग्राम झाला होता, त्याची ही कथा आहे. आर्यांच्या या पहाडी समाजाने दासतेला मान्यता दिली नव्हती. तांब्या पितळेच्या हत्यारांचा व व्यापाराचा जोर वाढतच चाललेला होता. ]

# ६—अंगिरा

**स्थान**—गंधार (तक्षशिला). **जाति**—हिंदी-आर्य.

**काल**—इ. स. पूर्वी १८०० वर्षे.

– १ –

" निकामी आहेत ही कार्पास वस्त्रं ! ना यांनीं थंडी रहात्ये, ना होतो पावसा पासून बचाव. " आपली भिजली बंडी काढून कांबळी पांघरीत तरुण म्हणाला.

" परंतु उन्हाळ्यांत याच्यासारखं वस्त्र नाहीं." –दुसऱ्या तरुणानें देखील आपली बंडी कवाडावर पसरत म्हटलें.

संध्याकाळला अजून बराच अवकाश होता. परंतु आवसथ (पांथशाळा) मधल्या आगटी भोवतालीं लोक आतांपासूनच जमूं लागले होते. दोघां तरुणांनीं धूर खात बसण्या ऐवजीं गवाक्षाजवळ हवा मिळेल या आशेने आपापल्या कांबळ्या पांघरून बैठक मारली.

पहिला तरुण–"आपण अजून एक योजन जाऊं शकलों असतों आणि मग उद्यां सकाळींच गंधार नगर (तक्षशिला) गांठलं असतं. पण या पावसाचं आणि वाऱ्याचं कोण काय करणार ? "

दुसरा–" थंडीतलं हें वादळ तर आणखीनच वाईट ! पण जेव्हां पाऊस नसतो तेव्हां आमचे किसान तो यावा म्हणून इंद्राच्या प्रार्थनांवर प्रार्थना करतात आणि पशुपाल अधिक क्रंदन करतात. "

पहिला–" तें तर खरंच आहे मित्रा, फक्त पांथस्थच पावसाला नांवं ठेवतात आणि कुणी देखील नित्याचा पांथस्थ रहात नाहीं. " मानेमागच्या घावाचा मोठा वण बघून त्यानें पुढें विचारलें, " मित्रा तुझं नांव काय ? "

" पाल माद्र. तुझं काय ? "

" वरुण सौवीर ! तूं पूर्वेकडून आलास ? "

" होय, मद्रा मधून आलों मी ! अन् तूं दक्षिणेकडून आलास होय ? मित्रा, सांग ना. तिकडे म्हणे अजून देखील असुर आर्यांबरोबर लढत आहेत. "

" फक्त समुद्र तटावर त्यांचं एक नगर उरलेलं आहे. आमच्या मघवा इंद्रानं कशा रीतीनं असुरांच्या शंभर नगरदुर्गांचा भेद केला हें तुला माहीत आहे ना मित्रा ? "

"ऐकलंय खरं! आणि असुरांचे नगरदुर्ग लौहा (तांबें) चे होते हे खरं ना?"

"असुरांजवळ तांबं जास्ती आहे. परंतु नगरदुर्ग बनविण्या इतकं मात्र खास नाहीं. मग ही दंतकथा कशी पसरली समजत नाही. असुरांचीं घरं पक्क्या चौकोनी लांबट भाजलेल्या विटांची असतात, त्यांच्या नगरांचे परकोट देखील विटांचेच असतात. या विटा लौह (लाल) रंगाच्या असतात. परंतु लौह (तांबे) धातु व विटा यांत किती तरी फरक आहे! त्यांना लौह म्हणता येणार नाहीं."

"परंतु वरुणा, आम्ही तर असुरांच्या लौहदुर्गाबद्दलच ऐकलं आहे."

"कदाचित आमच्या इंद्राला हे दुर्ग भेदतांना जी शक्ति खर्च करावी लागली, तीमुळं हें नांव पडलं असावं."

"आणि शंबराच्या पराक्रमाच्या देखील खूप मोठमोठ्या कथा ऐकायला मिळतात. म्हणे त्याचं घर समुद्रांत होतं, त्याचा रथ आकाशामधून चालत होता."

"रथाची गोष्ट तर बिल्कुल चुकीची आहे. असुर जर कुठल्या युद्धविद्येंत निर्बल असतील तर अश्वारोहणाच्या. आज देखील उत्सवाच्या वेळीं असुर अश्वरथां-ऐवजीं वृषभरथ उपयोगांत आणतात. मला तर असं वाटतं, पाल, कीं आमच्या विजयाचं कारण आमचे अश्वच होत, नाहीं तर आम्ही असुरपुरांना जिंकू शकलों नसतो. शंबराला मरून दोनशे वर्षं झाली, परंतु माझी खात्री आहे की त्याच्या जवळ अश्वरथ देखील नसावा मग आकाशामधून रथ चालविण्याची गोष्ट तर सोडूनच दे."

"मग शंबर इतका सामान्य शत्रु असतांना त्याला जिंकल्या बद्दल आमच्या इंद्राचे पोवाडे कां गातात?"

"कारण शंबर फार शूर होता. त्याचं स्वर्णजडित लौहकवच मी सौवीर पुरांत पाहिलं. किती बळकट आणि विशाल आहे! असुर सामान्यतः बांध्यानं ठेंगणे पण शंबर खूपच तगडा, उंच, भरदार बांध्याचा, आणि जरा लठ्ठ देखील! आमचा मघवा इंद्र त्याच्या मानानं सडपातळ तरुण. सिंधुतटावर अजून देखील असुरांचे पुर-दुर्ग बघायला मिळतात. आतील शे दोनशें धनुर्धर हजारो शत्रुसैनिकांना दुर्गाजवळ येऊं न देतां रोखून ठेवूं शकतात. वस्तुतः असुरांच्या या पुरी अयोध्या (अपराजेय) होत्या. आणि अशा अयोध्या पुरीना भेदणारा आमचा मघवा इंद्र—नव्हे आमची आर्यसेना—पराक्रमी होती."

"दक्षिणेंत काय अजूनहि असुरांचं सामर्थ्य टिकलेलं आहे, वरुणा?"

"आताच नाही का सांगितलं कीं त्यांचा समुद्रकांठचा शेवटचा दुर्ग नुकताच पडला म्हणून! —त्या युद्धांत मी पण भाग घेतला होता."—सांगताना वरुणाच्या अरुण मुखावर अधिकच लाल छटा दिसली. त्यानें आपले दीर्घ चकाकणारे पिवळे केंस मागें सारून म्हटलें, "असुरांचा शेवटचा दुर्ग पडला."

"तुमचा इंद्र कोण होता?"

"आम्ही इंद्रपद नष्ट केलं."

"नष्ट केलं?"

"होय. कारण आम्हां दक्षिणी आर्यांना त्याची भीति वाटूं लागली."

"भीति कां म्हणून?"

"इंद्र म्हणजे सेनानायक, हे खरं ना?"

"होय, मग!"

"आर्य केवळ सेनानायकालाच सर्वेसर्वा मानीत नाहींत. युद्धकाळीं त्याची आज्ञा आम्ही कितीहि शिरसावंद्य मानूं; तरी पण आर्य आपल्या जनपरिषदेला सर्वेसर्वा मानतात. त्या परिषदेत प्रत्येक आर्याला आपले विचार उघडपणे मांडण्याचा अधिकार असतो."

"असतोच."

"परंतु याच्या उलट असुरांचा इंद्र वा राजा असून तोच सर्वाधिकारी बनतो; तो कसल्याहि जनपरिषदेचा अधिकार मानीत नाही. असुरराजाच्या मुखातून जे शब्द बाहेर पडतील तेच प्रत्येक असुरानं प्रमाण मानले पाहिजेत. नाही तर मृत्यू हा त्याच्यासाठीं ठेवलेलाच."

"अशा इंद्राला आम्हीं कधींहि मान्यता देणार नाही."

"परंतु असेच इंद्र असुरांनीं मान्य केलेले होते. ते राजाला मनुष्य समजत नव्हते तर देवता मानीत होते. आणि त्याची जिवंत पूजा करण्यासाठीं ते जे जें कांही करीत असत, तें ऐकलंस तर, मित्रा, तुझा विश्वास देखील बसायचा नाहीं."

"होय, मी पाहिलं तें. असुर-पुरोहित आपल्या लोकांना गाढव बनवतात."

"त्याच्याहि पलीकडे; महागाढव! ते शिश्न आणि उपस्थ याची पूजा करतात हें ऐकलंस ना? स्त्रीपुरुषांच्या आनंदाचीं हीं दोन साधनं आहेत, यांच्यामुळं आमची वंशवेली वाढते हें जरी सारं खरं असलं तरी पण त्यांना प्रत्यक्ष किंवा दगडामातीची घडवून पुजणं किती भयंकर मूर्खपणा आहे बरं!"

"यांत काय संशय?"

"आणि असुर राजे शिश्नदेवाचे कट्टे भक्त होते. परंतु यांत मला तरी केवळ लबाडी दिसते. असुरराजा व त्याचे पुरोहित मूर्ख आहेत असं मी मानायला तयार नाहीं. ते आमच्या आर्यांपेक्षां जास्त चतुर असतात. त्यांच्या नगरां सारखं नगर बनवूं म्हटलं तर त्यांच्या जवळून आम्हांला बरंचसं शिकावं लागेल. त्यांच्या पण्यवीथि (बाजार), त्यांची कमलशोभित सरोवरं, त्यांच्या उच्च अट्टालिका, त्यांचे राजपथ, या वस्तु शुद्ध आर्यभूमींत दिसत नाहींत. मी उत्तर सौवीरांतील असुरांनीं टाकून दिलेल्या

नगरी पाहिल्या व आतां नवीनच जिंकलेली नगरी देखील पाहिली. त्या जुन्या नगरींची जोडतोड केली तरी आम्हीं आर्य त्यांचें मूळ स्वरूप पुन्हां दुरुस्तीनं आणूं शकलों नाहीं. आणि ही नवी नगरी–ही तर स्वतः शंबरानं वसवली होती म्हणतात –साक्षात् देवपुराप्रमाणं आहे."

"देवपुर?"

"देवपुर! आणि पृथ्वीवर कशाची उपमा द्यावी मित्रा त्या नगरीला? एका परिवाराला रहाण्यालायक घरच बघ ना; त्यांत एक किंवा दोन दिवाणखाने, धूमनेत्रक (धुरांडें) असलेले वेगळें स्वयंपाकघर, आंगणांत विटांनी बांधलेली विहीर, स्नानागार, शयनागार, कोष्ठागार! साधारण व्यापाऱ्यांची घरं दोन दोन, तीन तीन मजल्यांचीं असलेली मीच पाहिलीं. कितीहि वाखाणणी करावी तरी असुरपुरांना फक्त देवपुरांचीच सर येईल."

"पूर्वेला देखील असुरांची नगरं आहेत, परंतु आम्हां मद्रांच्या भूमीपासून (सियालकोट) ती पुष्कळच पुढं आहेत.

"मी बघितलीं. हीं असलीं नगरं वसविणारे असुर आमच्या पेक्षां अधिक चतुर होते हे कबूल करणं भाग आहे. सागराबद्दल ऐकलं नसशीलच?"

"नांव ऐकलंय!"

"नुसतं नांव ऐकून किंवा वर्णन करून कल्पना करतां येत नाहीं. सागरतटावर उभं राहून पाहिलं म्हणजे जरा जरा कळून येतं. वर पुढं निळं पाणी निळ्या आकाशाला भिडलेलं दिसतं."

"आकाशाला भिडलेलं? होय रे वरुण?"

"होय. जितकं पुढं बघावं, तितकं पाणी ताडमाड वर उसळलेलं दिसतं व शेवटीं आकाशाला जाऊन भिडतं. दोहोंचा रंग देखील एक सारखाच. नाहीं म्हणायला सागराचं पाणी जरा जास्त निळं दिसतं. आणि या अपार सागरावर असुर आपल्या विशाल नौका निर्भयपणे चालवितात. वर्षां महिन्यांचे मार्ग असतात त्यांचे आणि सागरांतून नाना प्रकारचीं रत्नं पण आणतात. असुरांच्या साहसांचा व चातुर्याचा हा एक नमुनाच होय. इतकंच नाही. आणखी एक विचित्र गोष्ट तूं ऐकली नाहींस मित्रा; असुर मुखावाटें एक शब्द न काढतां देखील संभाषण करूं शकतात."

"काय म्हणतोस मित्रा? एक शब्दही न काढतां?"

"होय, एक शब्दहि न काढतां. माती, दगड, चामडं, कांहींहि घेऊन एक असुर त्यावर कांहीं चिन्हं काढतो व दुसरा त्याच्या मनचं समजून जातो. जेवढं आम्हीं दोन तास बोलून सांगूं शकत नाहीं, तेवढं ते पांच दहा चिन्हं काढून सांगून

टाकतात. हें आर्यांना कधींहि माहित नव्हतं. आतां आमचे आर्य तीं चिन्हं शिकूं लागले. परंतु किती वर्षे झालीं तरी अजून तें शिकणं संपतच नाही."

" मग असुर आमच्यापेक्षां अधिक चतुर खास होते तर!"

" आणि त्यांचे लोहार, शिल्पकार, कुंभकार, रथकार, वंशकार, चर्मकार, तंतुकार यांच्या कारागिरीचीं कामं बघून आम्ही दंग होतों. मग असुर अधिक चतुर होते याबद्दल कुणाला संदेह वाटेल?"

" आणिक तूं म्हणालास कीं असुर वीर देखील होते?"

" होते तर; पण संख्येच्या मानानं कमी प्रमाणांत! आर्यांच्या प्रमाणं त्यांचा प्रत्येक दुध तुटलेला मुलगा हत्याराशीं खेळत नाहीं. त्यांचा योद्धयांचा एक वेगळाच वर्ग आहे. शिल्पी, व्यापारी, दास असे देखील त्यांचे वेगळाले वर्ग आहेत. योद्धा-वर्गाचे व्यतिरिक्त इतर वर्गांचे लोक युद्धविद्या शिकत नाहीत. योद्धावर्ग इतर वर्गाला आपल्याहून कनिष्ठ मानतात आणि दासदासींची अवस्था तर पशूं पेक्षां देखील वाईट असते. त्यांची नुसती खरेदी विक्रीच होते असें नाही तर त्यांच्या देहांचं नि प्राणांचं काय वाटेल तें करण्यांत येतं."

" त्यांच्यांत योद्धयांचं प्रमाण किती असेल?"

" शंभराला एक देखील नाहीं. दासदासी शेंकडा चाळीस, अर्धदास शेंकडा चाळीस–शिल्पी आणि किसान हे अर्धदास–शेंकडा दहा व्यापारी आणि बाकी इतर दुसरे!"

" म्हणूनच आर्यांपुढं असुर हरले."

" होय. त्यांच्या पराजयाचं हें एक मुख्य कारण होतं. आणखी एक मोठं कारण म्हणजे असं कीं त्यांच्या राजाला सर्व जनतेपेक्षां श्रेष्ठ असा देव मानण्यांत आलं."

" आम्ही आर्य हे असं कधींच कबूल करणार नाहीं."

" म्हणून तर आम्हांला इंद्रपद नष्ट करावं लागलं. मघवाच्या नंतरच्या कुठल्या तरी इंद्राची गोष्ट आहे ही. त्यानं असुरराजा प्रमाणं सर्वश्रेष्ठ होण्याचं योजलं."

" असुरराजा प्रमाणं? आर्य जनाबरोबर मन मानेल तसं वर्तन करणं?"

" होय, आणि तोच एकटा नव्हे तर त्याच्या नंतर दुसऱ्यानं देखील. या त्यांच्या योजनेंत सहाय्य करतांना कांही आर्य देखील सांपडले."

" सहाय्य करतांना?"

" कुळाच्या आणि परिवाराच्या प्रतिष्ठेसाठी. त्यामुळं सौवीर जनानं ठरवलं कीं या पुढं इंद्र म्हणून कुणी असणारच नाहीं. इंद्र हें अशनिहस्त देवतेचं (विजेचं) देखील नांव असतं, त्यामुळं लोकांत भ्रम पसरण्याचा संभव आहे."

" सौवीर जनानं बरं केलं एकूण!"

"परंतु आर्याला काळिमा लावणारे किती तरी निपजले, त्यांना असुरांची प्रत्येक बाबतींत प्रशंसा केल्याशिवाय राहवतच नाहीं. त्यांच्या ज्या गोष्टी प्रशंसनीय आहेत त्यांची मी नाहीं का प्रशंसा केली? त्यांचं आपण अनुकरण करायला हवं. त्यांची हत्यारं आम्हीं उचलली. त्यांचे वृषभरथ बघून आमच्या मघवा इंद्रानं अश्वरथ बनवले. धनुर्धरांना घोड्यां पेक्षां रथावर अधिक सोयीचं असतं. तिथं तो वाटेल तितके बाणांचे भाते ठेवूं शकतो; शत्रूंच्या बाणांपासून सुरक्षित रहाण्यासाठीं आवरण राखूं शकतो. त्यांचं कवच, गदा, शक्ति इत्यादि आम्हीं बरंचसं शिकलों. त्यांच्या नगरांतून देखील आम्ही बऱ्याचशा पद्धति उचलल्या. त्यांची सागरयात्रा आम्हीं शिकायला हवी, कारण लोह (तांबे), दुसऱ्या धातु, रत्न आणि बऱ्याचशा वस्तु सागरापल्याडून येतात. आतां हा सर्व व्यापार असुर व्यापाऱ्यांच्या हातीं आहे. जर आम्हांला त्यांच्यावर अवलंबून रहायचं नसेल तर सागरांतील नौकानयन आपण शिकलंच पाहिजे. परंतु असुरांच्या आम्हांला घातक वाटणाऱ्या गोष्टी–शिश्नपूजा–"

"परंतु शिश्नपूजा कोणत्या आर्याला आवडेल मित्रा?"

"विचारूं नकोस मित्रा!– किती तरी आर्यांचा आग्रह आहे कीं आपण देखील असुरांच्या प्रमाणं पुरोहित निर्माण केले पाहिजेत. आपल्याकडे पुरोहित, योद्धा, शिल्पी, कृषक, व्यापारी–हे भेद नाहींत. आपण सगळींच कामं आपल्या इच्छेनुसार करूं शकतो. परंतु असुरांनीं वेगवेगळे वर्ग निर्माण केलेले आहेत. आज आर्यांत पुरोहित निर्माण झाले कीं आणखी कांहीं वर्षांनीं शिश्नपूजा सुरू झालीच म्हणून समज. असुरपुरोहित मोठे लबाड असतात. लाभाच्या लोभानं आर्य-पुरोहित देखील तसलीच लबाडी करूं लागतील."

"हें तर मोठंच घातक होईल वरुणा!"

"असुरांच्या गेल्या दोनशें वर्षांच्या संसर्गानं आर्यांत जे अनेक दोष शिरूं लागले, ते पाहून वृद्ध आर्यांना निराशा वाटूं लागली. पण मी निराश होऊं शकत नाहीं. जर आर्य जनास आपल्या जुन्या गोष्टी नीट समजावून सांगितल्या तर तो पथ-भ्रष्ट होणार नाही. गंधार नगरांत अंगिरा नामक एक आर्य ऋषि रहातात असं ऐकलंय; ते आर्यांच्या प्राचीन विद्येचे मोठे विद्वान आहेत. ते आर्यांना आर्य मार्गावरच अढळ राहण्यासाठीं शिक्षण देतात. मी आर्यांच्या विजयासाठीं तरवार गाजवली; आतां आर्यत्वाच्या संरक्षणासाठीं देखील थोडं फार करण्याची इच्छा आहे."

"काय योगायोग आहे पहा. मी देखील अंगिरा ऋषीकडेच युद्धविद्या शिकायला निघालोंय."

"परंतु पाल, तूं पूर्वेच्या आर्य जनां बद्दल सांगितलं नाहींस?"

" पूर्वेत आर्य जन वणव्या प्रमाणं पसरत आहेत. या गंधारा पुढची भूमि आम्हीं मद्रांनीं व्यापली. त्याच्या पुढं मल्लांनीं आपलं जनपद कायम केलं. त्याच प्रमाणं कुरु, पंचाल, इत्यादि जनांनीं देखील मोठमोठे प्रदेश हस्तगत केले."

" मग तिथं आर्य लोक खूप अधिक संख्येंत जात असतील ?"

" खूप अधिक संख्येंत मात्र नाही. जितकं जितकं पुढं सरकत जावं, तितकी तितकी असुरांची व दुसऱ्या लोकांची संख्या वाढलेलीच दिसते."

" हे दुसरे कोण ?"

" असुर मंगुराच्या चामड्याच्या किंवा तांबट वर्णाचे दिसतात. पूर्वेत आणखी एका जातीचे लोक रहातात, त्यांना कोल म्हणतात. वर्ण बिलकूल कोळशासारखा ! हे कोल गांवं वसवूनहि राहतात, आणि जंगलांत देखील मृगांच्या प्रमाणं ! जंगली लोकांचीं कित्येक हत्यारं देखील दगडांचीं असतात."

" तर मग आर्य जनांना अनार्यांबरोबर खूप लढावं लागत असेल !"

" नेटानं असं फारसं लढावं लागत नाही. आर्यांचे घोडे बघितले कीं अनार्य पळ काढतात, परंतु रात्री ते आमच्या वस्तीवर छापे घालतात. त्यामुळंच बहुधा आम्ही त्यांच्याशी अत्यंत क्रौर्यानं वागतो. परिणाम असा झाला कीं असुर (शंबर) आणि कोल यांचीं गांवंचीं गांवं रिकामीं झालीं आणि ते पूर्वेकडे पळत सुटले."

" तर मग तुझ्या इकडे असुरांच्या चालीरीतींचा शिरकाव होण्याचं भय नाहीं."

" मद्र जनांत नाही; आणि मल्लांत देखील नसावं. पुढचं कुणी सांगावं ? आमच्या इकडे अनार्य आतां वस्तुतः जंगलांतच आढळतील."

दोघा मित्रांच्या गप्पागोष्टी अंधार होईतो चालल्या होत्या. आवसथ-रक्षिकेनं त्यांना खाण्यापिण्याच्या बाबतीत विचारलं नसतं तर त्या संपल्याहि नसत्या. आवसथ ग्रामातर्फे बांधलेली होती, व तीत केवळ प्रवासी पीतकेशींना रहाण्याची व्यवस्था करण्यांत आलेली होती हें सांगायला का पाहिजे ? प्रवाशांपैकीं ज्यांच्या जवळ खाद्य-पदार्थ नसत, त्यांना आवसथ मधून सातु व गोमांसाचा रस्सा मिळत असे. सामान किंवा बदली वस्तू दिल्या म्हणजे आवसथ-रक्षिका भोजन तयार करून देत असे. सोम व सुरा यांसाठीं ती आवसथ फारच गाजलेली होती. वरुण व पाल यांनीं विस्तवांत भाजून काढलेलें गोमांस आणि सुरा यांच्या आस्वादानें आपली मैत्री दृढ केली.

– २ –

अंगिरा ऋषि सिंधूच्या पूर्वेकडील गंधार जनाच्या जनपतिच्या उच्चतमपदीं जाऊन पोंचले होते. जरी (चारसद्दा) पुष्कलावतीहून पहिल्या युद्धानंतर असुर हटूं लागले होते तरी पण दुसऱ्या पिढीत कुनारतटावरून आलेल्या गंधार जनाच्या एका

शाखेनें पश्चिमी गंधारला पराजित केलें तेव्हां जीवदान मिळालेले असुर मोठ्या झपाट्यानें पश्चिम गंधार सोडून जाऊं लागले. त्यानंतर तीस वर्षांनींच सिंधूच्या पूर्व किनाऱ्या वरील प्रदेशावर गंधार आणि मद्र जनांची चढाई झाली आणि वितस्ता (झेलम) व सिंधू यांच्या दुआबांत गंधार, आणि वितस्ता व इरावती (रावी) यांच्या दुआबांत मद्र, अशी आपसांत वांटणी झाली. मागाहून यांनांच अनुक्रमें पूर्वगंधार व मद्र या नांवांनी प्रसिद्धी मिळाली. या प्रारंभींच्या देव (आर्य) असुर सग्रामांमध्यें दोन्हीं जातींनीं अमानुष क्रौर्य प्रकट करण्यांत चढाओढ लावलेली होती. परिणामतः गंधारांत असुर औषधाला देखील उरले नाहींत व मद्रांत फारच थोडे! परंतु कालांतरानें असुरांचा विरोध कमी होत गेला व पीतकेशींनीं आपलें युद्धक्रौर्य आंवरलें. इतकेंच नव्हे तर पीत केशींच्यावर असुरांचा अनेक बाबतींत प्रभाव पडूं लागला. ऋषि अंगिरा वक्षुतटापासून चालत आलेल्या आर्य परंपरेचे नुसते थोर पंडितच नव्हते तर आर्यांनीं आपलें रक्त व आचार व्यवहार शुद्ध राखावेत असाहि आग्रह धरीत. पूर्व गंधारांत होत असलेलें अश्वमांसभक्षण जे आतां सुटल्यासारखें झालें होतें, तें अश्वपालनाला प्रोत्साहन देऊन त्यांनीं फिरून चालू केलें. त्यांचें हें आर्यत्वाचें प्रेम, विद्वत्ता व युद्धविद्येतली चातुरी यांची प्रख्याति इतकी वाढली कीं दूर दूरच्या आर्य जनपदांतून देखील आर्यकुमार त्यांच्या जवळ शिक्षण घ्यायला येऊं लागले. आणिक त्या वेळीं कुणाला कल्पना देखील नव्हती कीं गंधारपुरांत अंगिरानें रोंवलेलें हें विद्येचे रोपटे तक्षशिलेच्या स्वरूपांत एक विराट वृक्ष बनेल व त्याच्या छायेचा व मधुर फळांचा लाभ घेण्यासाठीं शेकडो योजन अंतरावरले आर्यविद्याप्रेमी चालत येतील.

ऋषि अंगिराचें वय पासष्ट वर्षांचें होते. त्याचे ते पांढरे केश, नाभीपर्यंत रुळणारी त्याची ती पांढरी चकाकणारी दाढी, त्यांच्या प्रशांत गंभीर मुखामुळें अत्यंत आकर्षक वाटे. अजून लेखणी, शाई आणि भूर्जपत्र यांचा उपयोग व्हायला किती तरी शतकांचा अवकाश होता. त्यांचें सारें अध्ययन तोंडानें चालायचें. जुनीं जुनीं गीतें व कविता विद्यार्थी फिरफिरून म्हणून कंठगत करीत होते. दूरचे विद्यार्थी आपल्या बरोबर खाद्य सामुग्री आणूं शकत नव्हते, म्हणून त्यांच्या अन्नवस्त्राची व्यवस्था अंगिरा ऋषींनाच करावी लागे. अंगिरानें आपल्या पैतृक शेता व्यक्तिरिक्त विद्यार्थ्यांच्या सहाय्यानें जंगल कापून नवी जमीन कसली. ती मधून वर्षभर पुरेल इतका गहूं पिकत असे. अजून बागबगीचांचा रिवाज पडलेला नव्हता परंतु जंगलांतलीं फळें पिकण्याचा हंगाम आला कीं ते आपल्या शिष्यगणासमवेत फळें गोळा करायला तिकडे जात. शेतांतली नांगरणी, पेरणी व कापणी करतांना, आणि फुलें, फळें व काष्ठें गोळा करतांना, ऋषि व त्यांचें विद्यार्थी वक्षु आणि सुवास्तूंच्या किनाऱ्यांवर

स्फुरलेलीं गायनें मोठ्या प्रेमानें गात .असत. साऱ्या गंधारांत सर्वात मोठें अश्वत्थ (अश्व-पालन-स्थान) कुणाचें असेल तर अंगिरा ऋषींचें. दूरदूर पर्यंत आपले शिष्य व परिचित यांच्या कडून त्यांनीं उच्च जातीच्या घोड्या व घोडे शोधून गोळा केले व त्यांच्या वंशाची वाढ केली. सैंधव (सिंधुतटवर्ती) घोड्यांचें पुढें जें खूप नांव झालें त्यांचा प्रारंभ ऋषि अंगिरा यांच्या अश्वत्था मुळेच! या शिवाय त्यांच्या जवळ हजारो गाई व मेंढ्या होत्या. त्यांच्या शिष्यांना विद्याध्ययना बरोबरच राबावें देखील लागत असे. खुद्द ऋषि देखील वेळोवेळीं त्यांना हातभार लावीत असत. असें करणें आवश्यकच होतें. कारण त्यामुळे शिष्यांना अन्नवस्त्राच्या बाबतीत कसल्याहि प्रकारचा त्रास होत नसे.

तक्षशिलेच्या पूर्वेस असलेले सारे पहाड सुजल सुफल होते; पिकाऊ होते. ऋषि अंगिरांच्या बरोबर त्या वेळीं वरुण आणि पाल यांची टोळी पशुधनाची देखभाल करीत होती. तंबूच्या बाहेर जरा अंतरावर लाल उजळ शिगरें फुदकत होती. ऋषि आपल्या शिष्यांसह बाहेर हिरवळीवर बसलेले; त्यांच्या डाव्या हातांत बारीक लोकरीची पेळू, उजवा हात लांकडाची मोठी तकली फिरवण्यांत गुंतलेला. शिष्य देखील कोणी तकली चालवीत, कोणी लोकर पिंजीत, तर कोणी लांब लांब पेळू तयार करीत. आज ऋषि प्राचीन व नवीन आणि आर्य व अनार्य रीति रिवाज व शिल्पव्यवसाय, ग्राह्य कोणते व त्याज्य कोणते हें समजावून सांगत होते.

"वत्सांनों, नवं ते सगळंच त्याज्य, आणि प्राचीन ते सगळंच ग्राह्य असं म्हणणं चुकीचं होईल, आणि तसं वागणं तर असंभवच आहे. वक्षुतटीं आर्यांत जेव्हां पहिल्यांदां दगडाच्या ऐवजी तांब्याच्या हत्यारांचा प्रचार होऊं लागला तेव्हां किती जणांनी तरी त्याला विरोध केला."

ऋषींचा प्रिय शिष्य वरुण विचारूं लागला– "पण दगडाच्या हत्यारांनीं काम निभत असेल तरी कसं?"

"वत्सा, आज तांब्याचीं हत्यारं उपयोगांत आहेत. उद्यां याच्या पेक्षां अधिक तीक्ष्ण हत्यार निघालं म्हणजे लोक विचारूं लागतील–तांब्याच्या हत्यारांनीं कसं काम निभत असेल? ज्यावेळीं जे हत्यार प्राप्य असतं, त्यानंच मनुष्य आपलं काम निभवतो. जेव्हां दगडाच्या परशूनं युद्धं होत असत तेव्हां दोन्हीं पक्षांच्या वीरांजवळ दगडाचेच परशु असत. पुढं एका पक्षाजवळ तांब्याचा फरस आला तसा दुसऱ्या पक्षाला देखील दगड सोडून तांब्याचा फरस हातीं घ्यावा लागला. त्यानं तसं केलं नसतं तर त्याला जगांत जगतां आलं नसतं. म्हणूनच मी म्हणतों कीं सगळ्याच नव्या गोष्टी धिःकारून चालणं चुकीचं होईल. मी नाविन्याचा विरोधी असतों तर मी इतके सुंदर घोडे, इतक्या सुंदर गाई पैदा करूं शकलों नसतों. मी पाहिलं–चांगलीं

घोडा-घोडी असली कीं चांगलं शिंगरूं होऊं शकतं. मी कांहीं कांहीं चांगल्या घोडे-घोड्या निवडल्या व आज पस्तीस वर्षा नंतर तुम्हांला अंगिराच्या घोड्यांची ही अशी अवलाद बघायला मिळत आहे. असुर शेतांत खतांची चांगली व्यवस्था करीत; पहाडी नद्यांमधून कालवे काढून शेतांना पाणी देत. आम्हीं गंधारांत त्यांचं अनुकरण केलं. त्यांच्या शहर वसविण्याच्या योजना, त्यांचे चिकित्सेचे उपाय, जे चांगले वाटले ते आम्ही उचलले. आहार, परिधान, जीवनरक्षण यांच्या दृष्टीनं ज्या ज्या वस्तु उपयोगी असतील त्यांचा स्वीकार करण्यांत यावा. मग त्यावेळीं ही वस्तु आर्य कीं अनार्य, प्राचीन कीं नवीन याचा काथ्याकूट करीत बसूं नये. सुवास्तुमध्यें आणि त्याच्यापूर्वी देखील आर्यांना कापसाचं वस्त्र असतं हें देखील माहित नव्हतं. पण आपण आतां तीं वापरतोच कीं नाहीं. उन्हाळ्यांत तीं सुखकारक वाटतात. पण असुरांच्या कितीक गोष्टी आम्हीं विषवत त्याज्य समजल्या पाहिजेत. असुरांचा शिश्न-पूजा-धर्म आम्ही निंदनीय मानतो. त्यांचा जातिभेद आम्हांला त्याज्य वाटतो; कारण त्यामुळं सगळेच जण आपल्या जनाच्या रक्षणासाठीं हत्यारं उचलीत नाहींत; आपापसांत उच्चनीच हा भेदभाव वाढूं लागतो. असुरांच्या बरोबर रक्तसंकर होतां कामा नये; कारण यामुळं असुर व्हायला मुक्तद्वार मिळेल व मग आर्यांत देखील नाना प्रकारच्या शिल्पव्यवसायांनुसार लहानमोठ्या जाती बनूं लागतील."

पाल–"रक्तसंकर तर सगळेच आर्य अत्यंत वाईट मानतात!"

ऋषि–"होय, पण याचा ते फारसा विचार करायला तयार नाहींत. असुर किंवा कोल स्त्रियांबरोबर आर्य समागम करीत नाहीत काय?"

वरुण–"सीमान्तावर करतात, आणि असुरपुरांतील वेश्यांच्याकडे आमचे वीर सामान्यतः जात असतात."

ऋषि–"याचा परिणाम काय होईल? वर्णसंकरता वाढेल. असुरांत देखील पीत-केश बालक-बालिका जन्माला येतील. त्यांना भ्रमवश आर्य आपल्यांत घेतील, मग रक्तशुद्धता कशी टिकेल? म्हणूनच रक्तशुद्धतेसाठीं आमच्या स्त्रीपुरुषांनी दोन्हीं बाजूंनी पूर्ण सावध असलं पाहिजे. इतकंच नव्हे तर आमच्या आर्य जनपदांत दास-प्रथेचा स्वीकार होतां कामा नये; कारण रक्तसंकर करायला हिच्यापेक्षां अधिक भयंकर संधि कोणतीच नसेल. इतकंच काय, पण मी तर म्हणतो कीं आर्यजन-पदांत अनार्यांचा वास होणारच नाहीं अशी खबरदारी घेण्यांत यावी.

"सर्वांत मोठं भय आणि सर्व दोषांचं मूळ जर कोणतं असेल तर असुरांची राजप्रथा;–तिचंच एक अंग म्हणजे पुरोहितप्रथा! असुर-जनाला कोणताच अधिकार नाही, असुर-राजा जें म्हणेल त्या प्रमाणं वागणं असुर आपला धर्म समजतात. असुर-पुरोहित असं शिकवतो कीं जनतेचा सर्व सांभाळ वर देवता आणि जमिनीवर राजा

करीत असतो; जनाला स्वतःला कांहींहि बोलण्या चालण्याचा अधिकार नाहीं. राजा स्वतः पृथ्वीवरचा देव! शिबि-सौवीरांनीं इंद्रपद तोडून टाकलं, असं जेव्हां मी ऐकलं तेव्हां मला खूप आनद झाला. असुर राजाला जें स्थान आहे तें जरी आर्यांच्या इंद्राला मिळालं नसलं, जरी इंद्र हा जनद्वारा निवडलेला एक थोर योद्धा मात्र होता व त्याला जनांवर सत्ता गाजवण्याचा मुळींच अधिकार नव्हता, तरी पण या पदामुळं धोका निर्माण होण्याचा संभव होता. आणि कांहीं लोकांनीं त्याच्या आडून आर्यांत राजप्रथा कायम करण्याचा प्रयत्न पण केला होता. आर्य जर आपलं आर्यत्व कायम ठेवूं इच्छीत असतील तर त्यानीं कोणत्याहि इसमाला राजाचे अधिकार देऊं नयेत. आर्यांना असुरांच्या धर्माविषयीं निःसंशय अतिशय तिटकारा असला तरी ज्या दिवशीं आर्यांत राजा शिरेल, त्याच दिवशीं असुरांप्रमाणं पुरोहित पण येईल. आणि मग आर्यत्वाला जलसमाधीच मिळाली म्हणून समजा. जनाच्या परिश्रमावर राजा मौज लुटील, देवतांचं सहाय्य मिळविण्यासाठीं तो पुरोहिताला लांच देऊन आपल्या बाजूला ओढून घेईल. अशा प्रकारें राजा आणि पुरोहित मिळून जनाला आपला दास बनवून सोडतील.

"आम्हीं आर्यांच्या प्राचीन प्रथा मोठ्या दृढतेनं अंगिकारल्या पाहिजेत व जो कोणी आर्यजन त्यापासून विचलित होईल, त्याला आर्यांच्या जातीतून बहिष्कृत केलं पाहिजे."

— ३ —

सौवीरच्या दक्षिण भागांतून (कराचीच्या जवळपास) कितीतरी चिंताजनक बातम्या वरुणाकडे आल्या. त्यावरून असें समजलें कीं शेवटचा असुरदुर्ग पडला तेव्हांपासून आर्यांत भयंकर अंतःकलह पेटूं पाहत आहे. वरुणानें आपल्या गुरूबरोबर सौवीर मधल्या या प्रश्नाबाबत अनेक वेळां प्रत्येक बाजूनें विचार विनिमय केला. अंगिरा ऋषींचें म्हणणे असें कीं हा कलह पहिल्यांदां सौवीरांत झाला असला तरी या कलहांतून साऱ्या आर्य जनांना एकदां जावें हें लागणारच. आर्य नेहमीच व्यक्तीवर जनांची सत्ता मानीत आले. तिकडे असुरांची निरंकुश राजसत्ता बघून कित्येक आर्य-नेत्यांना अधिकार आणि भोगविलास याचं प्रलोभन होणं शक्य आहे. या दोन वर्गांचा संघर्ष झाल्याशिवाय रहायचा नाहीं आणि ज्या जनपदांत असुरांची संख्या जितकी अधिक त्यांतच या संघर्षाचा तितका अधिक संभव. कारण तिथले पराजित असुर आर्यांच्या दुफळीपासून लाभ करून घेण्याची इच्छा करतील." .

गंधारपुरला आठ वर्षें राहिल्यानंतर वरुणाला सौवीरपुरांतील (रोरुक, रोडी) बातम्या अधिकच चिंताजनक वाटायला लागल्या म्हणून त्यानें तें नगर सोडलें. आवसथ मधला त्याचा पहिला सोबती पाल माद्र देखील बरोबर निघाला. गंधाराची

सरहद्द ओलांडून ते मिठाचे डोंगर असलेल्या सिंधु जनपदांत शिरले. मिठाच्या खाणींतून काम करणारांत अजून देखील असुर व्यापारी व कामगार अधिक होते, त्यांचा प्रभाव पीतकेशी आर्यांवर वाईट प्रकारे पडत होता. ते कामाला आळसूं लागले, आपलें काम अनार्य कर्मकारांपासून करून घेणें त्यांना जास्त आवडत असे. आपलें काम घोड्यावर स्वारी करणें व तलवार गाजवणें आहे, असें ते मानू लागले होते. असुर राजांच्या प्रमाणें अनार्यां पुढें आपला दिमाख दाखवूं इच्छिणारे आर्य म्हणजे राजसत्ता अंकुरित करायला योग्य भूमि होती. परंतु मिठांचे डोंगर ओलांडून सौवीरांच्या मूलस्थानीं (मुल्तान) आल्यावर तिथें परिस्थिति जरा बरी दिसली. येथले रहिवासी सारे आर्यच होते, परंतु त्यांची तारीफ करण्या लायक गोष्ट म्हणजे तेथला भीषण उन्हाळा सोसून देखील त्यांनीं तें जनपद आर्य बनवले होतें. वरुण आणि पाल उन्हाळ्यांतच प्रवास करीत होते. मात्र सिंधु मधून नावेने प्रवास केल्यानें वाट कमी कष्टदायक वाटत होती.

सौवीरपुरांतल्या गर्मीचे विचारायलाच नको. विशेषतः गंधारपुर आणि त्याच्या जवळील पहाडी प्रदेशांतून आल्यामुळें तर उन्हाचा फारच ताप होत होता. आर्यांमध्यें अजून लेखन संकेत (लिपी) प्रचलित झालेला नव्हता. म्हणून ज्या ज्या वेळी सौवीरांतील सार्थांच्या बरोबर वरुणाने आपल्या मित्रांना निरोप पाठवले ते जसेच्या तसे पोंचूं शकले नाहींत. त्या वेळी त्याला कितीदां तरी असुरांच्या लिपीची आठवण झाली. सौवीरपुराला पोंचल्या नंतर त्याला एकंदर प्रकार फारच विकोपाला गेल्याचें कळून आले. खुद्द सौवीरपुरांत सुमित्राचे समर्थक फार थोडे होते परंतु दक्षिण सौवीरांत शेवटच्या असुरदुर्गांचा नाश करणाऱ्या सुमित्राचे पक्षपाती आर्य अधिक होते. या शेवटल्या दुर्गपतनाच्या वेळीं सेनापति सुमित्रानें असुर नागरिकांवर वाजवी पेक्षां अधिक दया दाखवली होती. त्या वेळीं वरुण जरी या कारणानें सुमित्राचा एक थोर प्रशंसक बनला होता तरी पण तो सुमित्राचा एक डाव होता हे आता लक्षांत आले होते. त्या पराजया नंतर असुर पुन्हा आर्यांविरुद्ध लढायला डोकें वर करूं शकणार नाहींत हे सुमित्राला कळून चुकले होतें. व म्हणूनच या दयेच्या प्रदर्शनानें सागरा पल्याडच्या सार्थवाह असुरांची संपत्ति व शक्ति यांचा उपयोग आपल्या व्यक्तिगत लाभासाठी करतां यावा म्हणून त्याने तो डाव टाकला होता.

सुमित्र अजून देखील सैन्यासह सागरतीरावरील असुरपुरांत तळ देऊन होता व बनावटी युद्धाच्या बहाण्यांनीं तेथून परतण्याचें नांव घेत नव्हता. वरुणानें आधीं जनांच्या सामान्य नायकांच्या भेटी घेतल्या; त्यांना सुमित्राच्या संबंधीं स्पष्टपणे ठाऊक नव्हतें. त्यांना वाटत होतें कीं कांहीं जननायक व्यक्तिगत द्वेषामुळें त्याला विरोध करीत असावेत. नंतर तो अशा प्रमुख नायकांना भेटला कीं ज्यांच्यावर

जनांच्या कारभाराची जबाबदारी होती. त्यांनीं सारी कहाणी सांगितली आणि असेंहि बजावलें कीं जरी आम्हांला सुमित्राची नियत ढळलेली स्पष्ट दिसत असली तरी जनांतील सामान्य लोकांना ते कळत नाहीं; ते त्याचा दुसराच अर्थ करतात.

असुरपुराच्या विजयाच्या वेळी वरुण सुमित्राचा उपनायक होता. त्यामुळे आतां नऊ वर्षे होऊन गेलीं तरी लोकांत त्यानें गाजवलेल्या तलवारीची प्रशंसा अजून चाललेलीच होती. जनांना खरा प्रकार समजून सांगण्यापूर्वी खुद्द सुमित्राबद्दल खात्रीलायक पत्ता काढण्याची वरुणाची इच्छा होती. त्यासाठीं एके दिवशी दोघेहि मित्र दक्षिण सौवीराला नौकेने जायला निघाले. त्यांनी गांधार व्यापाऱ्यांचा वेष घेतलेला होता. असुरपुर बघितल्यावर वाटत होते कीं खरोखरच तें असुरांचे पुर आहे, आर्यांचे नव्हे. तेथल्या पण्यवीथींमध्ये मोठमोठ्या असुर-सागर-वणिकांचे महाल आणि देशांविदेशांतील पण्यवस्तु होत्या. किती तरी असुर सामंत-परिवारांनीं आपले मोहल्ले वसवले होते. त्यांच्या सेवेला पूर्वी प्रमाणेच दासदासी हात जोडून तत्पर उभे होते. त्या दोघांच्या मनांत जिज्ञासा निर्माण झाली. सुमित्र असुर राजाच्या महालांत राहात होता. एके दिवशीं वरुणाने गांधार-व्यापाऱ्यांच्या वतीनें नजराणा घेऊन पाल माद्राला त्याच्याकडे पाठविलें. परत आलेल्या पाल माद्राने सांगितलें कीं पीतकेश व गौरमुख सोडले तर सुमित्र बिलकूल असुर राजा बनला आहे. त्याचे निवासस्थान म्हणजे कोणा आर्य सेनापतीचे साधें सुधे घर नसून, एक सोन्याचांदीनें लखलखणारा असुरांचा दरबार आहे. त्याच्या पार्श्वचर सैनिकात देखील साधेपणा नांवाला देखील उरलेला नव्हता. आठवड्यानंतर समजले की तेथे आर्यांचा पत्ता असुरकन्यकांच्या नृत्याच्या जागी किंवा दारूच्या गुत्त्यावर लागू शकतो. किती तरी आर्य स्त्रिया आपल्या पतीकडे यायला उत्सुक आहेत परंतु त्यांना बहाणे सांगून येऊं देण्यांत येत नाही. सुमित्राने पण आपल्या पत्नीचे अनेक निरोप येऊन देखील तिला येऊं दिलें नाहीं. तो स्वतः असुर पुरोहिताच्या कन्येच्या प्रेमपाशांत सांपडला होता. आणि ती एकटीच नव्हे तर नगरांतील किती तरी असुरसुंदरी त्याच्या अंतःपुर-चारिणी बनलेल्या होत्या. आपल्या आर्य सैनिकांना देखील त्यानें तशीच सवलत देऊन ठेवली होती. दुसरे आर्य जेव्हां तेथे येत तेव्हां तो दासांकडून दंगेधोपे घडवून आणी, त्यामुळे रक्तपात होई व मग आर्य येण्याचे थांबत.

वरुणानें या साऱ्या प्रकारांचा नीट कानोसा घेतला व एके दिवशी आपल्या मित्रासह गुपचुप तो सौवीरपुराला चालता झाला.

सौवीरपुरांत त्यानें जननायकांना सारें सांगितलें : " सुमित्र आपलें बळ येवढें दृढ करून बसला आहे की आम्हांला आतां असुरपुरांतल्या आर्य वीरांबरोबरच

नुसतं लढावं लागणार नसून असुरांच्या बळाला देखील तोंड द्यावं लागेल. त्यासाठीं तयारी करण्यापूर्वी आपल्या लोकांच्या काना खरी हकीकत घालणं अवश्य आहे. ''

वरुण नृत्यांगणांत सर्वाचा आवडता होता आणि अनेक वर्षांपासून पतिमुखाचे दर्शन न झालेल्या आर्यस्त्रिया जेव्हां या सुंदर नर्तकाच्या मुखांतून एकांतांत आपल्या पतीच्या लीला ऐकत, तेव्हां त्यांचा त्याच्यावर पूर्ण विश्वास बसे. मग कानोकानी त्या लीला वेगानें फैलावूं लागत. वरुण कवि देखील होता. त्यानें आर्य महिलांचे असुर-कन्यकांना दिलेले अभिशाप, आणि सुमित्राचे विलासपूर्ण स्वार्थमय जीवन यांवर किती तरी सुंदर गीतें रचली आणि ती साऱ्या सौवीरांतील आर्यग्रामांतून वणव्या प्रमाणें पसरून गाण्यात येऊं लागली. शेवटी शेवटीं त्यानें आर्यपत्नींना टोळ्या टोळ्यांनीं त्यांच्या पतीकडे पाठविले. त्यांना अव्हेरून परत पाठविण्यांत आल्याचा परिणाम आणखीनच वाईट झाला. सुमित्राला परत येण्याविषयी कळविण्यांत आले तरी त्याने ते नाकारल्यामुळे जनानें त्याच्या जागीं वरुणाला सेनानायक म्हणून नियुक्त केलें. मोठी आर्यसेना घेऊन असुरपुराकडे वरुणाने कूच केलें. वरुण आला हे ऐकून सुमित्राच्या सेनेत फूट पडली आणि किती जणांना तरी आपल्या अनार्य आचाराबद्दल अंत:करणपूर्वक पश्चात्ताप झाला. उरलेल्या सैन्याच्या बळावर लढून सुमित्राला विजय मिळविण्याची आशा नव्हती म्हणून त्याने नगर वरुणाच्या स्वाधीन करून सौवीरपुराला परत जाण्याची इच्छा प्रगट केली. अशा प्रकारें आर्यजन पहिल्या भीषण परीक्षेत यशस्वी झाले. वरुणानें असुरांची खोडी काढली नाही कारण ते आतां अस्त्रांनी लढत नव्हते. मात्र आर्यांना असुरांच्या प्रभावा पासून वेगळे ठेवण्यासाठीं त्याने एक निराळेच आर्यपुर वसवले आणि ऋषि अंगिरा यांनी सांगितलेल्या किती तरी गोष्टींना मूर्त स्वरूप द्यायला सुरवात केली.

———

[ आजपासून १५२ पिढ्यां आधीची आर्यकथा. ]

# ७—सुदास्

**देश**—कुरुपंचाल ( पश्चिम संयुक्तप्रांत ). **जाति**—वैदिक आर्य.

**काळ**—इ. स. पूर्वी १५००

– १ –

वसंत समाप्त व्हायची वेळ. चनाब (चंद्रभागा) कांठच्या पाणचिकणी जमिनीत दूरवर तयार गव्हाची सोनेरी रोंपटी उभ्या उभ्या वाऱ्यांच्या झोंक्यांनीं डोलत असलेली दिसत होती. जागोजाग त्यांची संवगणी करणारे स्त्री-पुरुष गीत गात होते. संवगलेल्या शेतांत उगवलेल्या हरळीत चरायला बऱ्याचशा घोड्या शिंगरासह सोडलेल्या होत्या. एक पांथस्थ हातांत एक लाठी घेऊन उन्हांतून मंदगतीने येत होता. त्याने डोईला बांधलेल्या फाटक्या कपड्याच्या उष्णीषा ( पागोटे ) मधून पुढच्या बाजूला त्याच्या भुऱ्या केसांचा जुंडा बाहेर दिसत होता. शरीरावर एक जुनी चादर लपेटलेली, घोट्यापर्यंत अंतरवासक ( धोतर ) नेसलेले! तहानेनें त्याची टाळू सुकायला लागली होती. त्यानें हिमत बांधली होती पुढच्या गावीं पोंचण्याची, परंतु वाटेच्या कडेला एक कच्ची विहीर आणि लहानसा शमी वृक्ष पाहतांच त्याचा उरला सुरला धीर खचला. त्याने आधी आपलें उष्णीष वस्त्र, मग नग्न होऊन कमरेचें वस्त्र व नंतर एक वेळ दोन्ही वस्त्रे एकास एक जोडून त्याचे टोंक पाण्यांत भिजविण्याचा यत्न केला. परंतु त्यात त्याला यश आले नाही. शेवटी निराश होऊन तो जवळच्या शमीवृक्षाला टेकून बसला. त्याला वाटले आतां कसचे आपण या जागेवरून उठूं शकतो! त्याच वेळीं एका खांद्यावर पखाल, दुसऱ्या खांद्यावर दोर आणि हातात चामड्याची बादली घेऊन एक तरुणी तिकडे येतांना त्याला दिसली. पांथस्थाची जाऊं पाहणारी आशा परत फिरली. तरुणी विहिरीजवळ पखाल ठेवून बादली पाण्यांत सोडणार तोच तिची नजर प्रवाशावर गेली. त्याचा चेहरा कोमेजून गेलेला होता; ओंठ उललेले, गाल बसलेले, डोळे खोल गेलेले, शीणावलेले; अनवाणी पाय धुळीनें माखलेले! परंतु या सर्वांच्या आडून त्याच्या तारुण्याचें तेज पण दिसत होतेंच.

पथिकाने पाहिले, तरुणीच्या सोनेरी केशावर कुमारिकेची संजा (रुमाल), अंगावर उत्तरासंग (चादर), कंचुक व अंतरवासक, असा साधा परंतु विनयी वेश होता.

उन्हांतून चालल्यामुळे तरुणाचे मुख अधिक लाल झालें होतें, त्याच्या कपाळावर आणि वरच्या ओठावर घर्मबिंदु झळकत होते. कुमारिका थोडा वेळ त्या अपरिचित पुरुषाला न्याहाळतच राहिली. नंतर आपल्या सुंदर ओठांवर मार्द्रीना सहज असलेले स्मित आणून त्या तरुणाची अर्धी तहान शमविणाऱ्या मधुर स्वरांत तिनें म्हटलें :

"भ्रातर, तूं तहानेजून गेलेला दिसतोस ?"

आपल्या गळून गेलेल्या काळजाला सांभाळण्यांत असफल झालेल्या त्या प्रवाशाने साहसपूर्वक म्हटले, "होय, मला खूप तहान लागली आहे."

"मग मी पाणी आणत्यें हं !"

तरुणीनें बादली पाण्यानें भरली, तोंवर तरुण देखील तिच्या जवळ येऊन उभा राहिला. त्याच्या दीर्घ गात्रांवरून आणि मोठ्या हाडापेरांवरून सहज कळून येत होते कीं त्याच्या मधले असाधारण पौरुष अजून लुप्त झालेले नाही. पखालीला लटकलेला चामड्याचा पेला प्रवाशाच्या हातात देऊन तरुणीने तो बादलीतल्या पाण्याने भरला. प्रवाशाने एक मोठा घोट घेतला व तो घशाखाली उतरल्यावर तो खाली मान टाकून बसला. मग एका श्वासांत पेल्यांतले पाणी त्यानें पिऊन टाकलें. पेला त्याच्या हातांतून गळून पडला व तोल सांभाळतां सांभाळतां तो उताणा पडला. तरुणी जरा वेळ गोंधळली, मग तिने पाहिले, तरुणाची बुबुळे गरगरलीं, तो बेशुद्ध पडला. तरुणीनें लागलीच आपल्या डोक्याला बांधलेला रुमाल सोडला व तो भिजवून त्याचें कपाळ व तोंड पुसायला सुरवात केली. कांही क्षणांनंतर त्यानें डोळे उघडले; तो किंचित संकोचल्यासारखा झाला. क्षीण स्वरात तो म्हणाला, "तुला त्रास दिला याचं वाईट वाटतं मला कुमारिके !"

"कांहीं त्रास झाला नाही. उलट मला तर असं कसं झालं याचीच भीति वाटली होती."

"विशेष कांहीं नाहीं, उपाशी पोटीं तहान शमवायला खूप पाणी प्यायलो इतकंच ! पण आतां कांहीहि होणार नाहीं."

"उपाशी पोटीं ?" असें म्हणून प्रवाशाला कांहींहि बोलायला अवसर न देतां तरुणी तेथून पळतच निघाली व जरा वेळानें एका वाडग्यांत दहीं, सातु व मध घेऊन परत आली. तरुणाच्या चेहऱ्यावर संकोच आणि लाज यांची छटा दिसतांच कुमारिकेने म्हटलें, "पथिका, संकोचूं नकोस, माझा पण एक भाऊ कितीक वर्षांपासून घरं सोडून निघून गेला. तुला ही थोडीशी मदत करतांना मला त्याची आठवण येत आहे."

पथिकानें वाडगा धेतला, तरुणीनें बादलींतून पाणी दिलें, तरुणानें सातू घोळून हळूं हळूं पिऊन टाकला. पिऊन झाल्यावर त्याच्या चेहेऱ्यावरचा अर्धा मलूलपणा नाहीसा झाला, आणि आपल्या संयत मुखावरील मूक मुद्रेनें कृतज्ञता प्रकट करून तो पुढें कांही बोलण्याचा विचार करतो की नाहीं तोंच तरुणीनें जणुं त्याचा आशय ओळखून म्हटलें, "भ्रातर, संकोच करण्याची गरज आहे का? तूं दुरून आलेला दिसतोस!"

"होय, पुष्कळ दुरून. पूर्वेकडून. पांचालाहून!"

"कुठं जायचं?"

"कुठंहि. वाट फुटेल तिकडं!"

"तरी पण?"

"आपल्या अन्नावस्त्राची तरतूद करण्यासाठीं कुठं तरी काम शोधायचं आहे मला तूर्त!"

"शेतांत राबूं शकशील?"

"कां नाही? मी स्वतः कापणी, पेरणी, नांगरणी करूं शकतो. खळ्यातलं कामं देखील करतों मी. गाई-घोड्याची रखवाली देखील करूं शकतों. माझ्या देहात बळ आहे, आतां वाळलो म्हणून काय झालं? पण थोडा काळ गेला कीं मी सामर्थ्याची कामं देखील करूं शकेन. कुमारिके, मी कधींहि आपल्या कोणत्याहि धन्याला नाराज केलं नाही."

"तर मग मला वाटतं, पिताजी तुला काम देतील. मी पाणी भरून घेत्ये, मग चल माझ्या सवं!"

तरुणानें पखाल घेऊन चालण्याची कितीतरी कोशीस केली परंतु तरुणी त्याला राजी झाली नाहीं. शेतात एक लाल तबू लावलेला होता, बाहेर चाळीसेक स्त्रीपुरुष बसलेले होते; त्यांच्या पैकी तरुणीचा पिता कोण असावा हे तरुणाला ओळखता आले नाही. सर्वांची एकसारखी साधी वस्त्रे, एकसारखे पिवळे केश, गोरी शरीरें, अदीन चेहेरे. तरुणीनें पखाल व बादली उतरून मधोमध आंथरलेल्या चामड्यावर ठेवली. आणि एका साठीतल्या वृद्ध परंतु सुदृढ बलिष्ठ पुरुषाजवळ जाऊन ती म्हणाली, "पितर, या परदेशी तरुणाला काम हवं आहे."

"शेतीचं? दुहितर?"

"होय, कुठंहि!"

"मग करूं दे इथंच. जे वेतन इतर पुरुषाना मिळेल, तेच याला देखील देऊं."

तरुण ऐकत होता, वृद्धाने तेच त्याला देखील पुन्हां सागितले व त्याने तें कबूल केलें. मग वृद्ध म्हणाला, "ये तरुणा, तूं देखील ये. आपण सगळे आतां मध्यान्ह-भोजन करूं."

" आतांच मी मातू प्यायलो. तुझ्या दुहितेनंच दिला तो, आर्य ! "

" आर्य-वार्य नाहीं, मी जेता ऋभु-पुत्र माद्र आहे. तुला जे कांहीं खातां पितां येणं शक्य आहे ते खा, पी. अपाले, मेरय (कच्ची दारू) दे बरं अश्विनी-क्षीराचं. उन्हाच्या वेळेला बरं असतं तें तरुणा! गप्पा संध्याकाळी मारूं, आतां फक्त नाव काय ते सांग ! "

" सुदास पाचाल."

" सुदास नव्हे , सुदा — सुंदर दान देणारा. तुह्मां पूर्वेकडल्याना भाषा देखील नीट बोलतां येत नाही. पंचाल जनपदांतला आहेस ? बराय अपाले, हे पूर्वेकडले मोठे लाजाळू असतात, त्याला खायला लाव, म्हणजे संध्याकाळपावेतो हा जरासा काम करण्यालायक होऊं शकेल. "

सुदासने अपालेच्या आग्रहावरून मेरयाचे दोन तीन पेले घेतले व एकाद दुसरा पोळीचा चतकोर कसाबसा घशाखाली लोटला. दोन दिवसाचा उपाशी असल्याने त्याची भूक देखील मरून गेलेली होती.

जसजशी सूर्याची चंडता मंदावूं लागली, तसतशा आपल्यामध्ये नव्या स्फूर्ति येतात असें सुदासला भासूं लागले आणि संध्याकाळी काम संपवायच्या सुमारास तो गव्हाची कापणी करण्याच्या कामांत कुणाच्याहि मागे पडला नाही.

रात्री लोक तेथून लांब असलेल्या खळ्यावरल्या घरांजवळ गेले. जेताची शेती मोठी होती हे खळ्यावर रात्री जमलेल्या दोनशें अधिक कामगारावरून दिसून येत होतें. खळ्यावरल्या घरांत राधपाणी करणारे आपल्या कामांत गर्क होते एक थोरला बैल मारून त्याची हाडे, आतडी आणि कांही मास मोठमोठ्या भांड्यांतून तिसऱ्या प्रहरीच चुल्ह्यावर चढविलें होते. उरलेल्याचे अर्धा अर्धा शेराचे तुकडे मिठांतून वेगवेगळे उकळले जात होते घराच्या बाहेर एक चोपडे मैदानवजा आंगण खळ्यासाठी केलेले होते. त्याच्या एका अंगाला एक बांधलेली विहीर होती; जवळच पाण्याने भरलेले कुंड होते. स्त्री-पुरुषांनी कुंडावर जाऊन हातपाय धुतले, ज्यांना आंघोळ करायची होती, त्यांनी तसे केले. अंधार झाल्यावर पंक्तीने बसलेल्या स्त्रीपुरुषांच्या पुढ्यांत पोळया, मांसाचे तुकडे व सुराभांड ठेवण्यांत आलें. सुदासच्या संकोचाची आठवण येऊन अपालेनें (पाणी आणणारीने) त्याला आपल्या जवळ बसवून घेतले. तसें करण्यांत तिला त्याच्या संकोचापेक्षां स्वतःच्या परदेशी गेलेल्या भावाचीच आठवण अधिक होती. खाणे पिणें संपले, व नाच-गाण्याला प्रारंभ झाला. त्यांत सुदास

त्या रात्री भाग घेऊं शकला नाहीं परंतु कालांतराने तो सर्वांचा आवडता नर्तक व गायक बनला.

शेताचे संवगणे-चुरणे चांगले दीड महिन्यापर्यंत चालले. परंतु दोन आठवड्यात सुदासचे स्वरूप पालटले. त्याचे मोठे निळे डोळे आता टपोर दिसूं लागले, गालावर स्वाभाविक लाली खेळूं लागली; शरीरातली हाडे व शिरा यांच्यावर आता मास चढले होते. जेताने आठवडा लोटताच त्याला नवे कपडे दिले होते.

खळे आता जवळ जवळ मोकळे होत आले होते. ही बापलेक व सुदास धरून सहा सात माणसे सोडली तर सारी जणं आपापलं धान्य घेऊन निघून गेलीं होतीं या लोकांच्या जवळ शेते फार थोडीं, म्हणून ते आपली कापणी झाल्यावर जेताच्या शेतावर राबायला आले होते. या दीड महिन्यात जेता व त्याची मुलगी आपल्या तरुण कामकऱ्याचा सरळ, हंसतमुख स्वभाव खूप ओळखूं लागले होते. एके दिवशीं साध्यसुरा घेतल्यावर जेताने सुदास बरोबर पूर्वेकडल्याबद्दल बोलायला प्रारंभ केला. अपाला देखील जवळ बसून ऐकत होती. जेता म्हणाला, "सुदाः, पूर्वेकडे मी अधिक दूर गेलो नाहीं, परंतु पंचालपुर ( अहिच्छत्र ) मी पाहिलं; आपले घोडे घेऊन मी हिवाळ्यात तिथं गेलो होतो "

"पंचाल (रोहिलखंड) कसं काय वाटलं आर्य वृद्ध ?"

"जनपदात कसलाच दोष नाहीं, मद्राप्रमाणंच तिथंहि सुबत्ता आहे, उलट तिथलीं शेतं इथल्यापेक्षा अधिक पीक देणारी आहेत-पण—"

"पण काय ?"

"क्षमा कर सुदा., पण तिथं मानव राहात नाहीत."

"मानव राहात नाहीत ! तर काय देव किंवा दानव रहातात ?"

"मी इतकंच म्हणेन की तिथं मानव राहात नाहीत "

"मी नाराज होणार नाही, आर्य वृद्ध ! पण तुझं असं मत का झालं ?"

"सुदा , तूं माझ्या शेतात राबणाऱ्या दोनशे नरनारी पाहिल्यास ना ?"

"होय !"

"माझ्या शेतांत राबताना, माझ्याकडून वेतन मिळतं म्हणून, त्यांना माझ्यापुढं दैन्य दाखवतांना तूं पाहिलस का ?"

"नाहीं, उलट ते सारे तुझ्या परिवाराचेच आहेत असं वाटायचं."

"हे यांना मानव म्हणायचं. हे माझ्या परिवारातले आहेत. सगळेच माद्र माद्री आहेत. पूर्वेत असं दृश्य बघायला डोळे आतुरतात. तिथं दास आणि स्वामी दिसतात, मानव दिसत नाहींत, बांधव दिसत नाहीत."

" खरं सांगितलंस आर्यवृद्ध. मानवाचं मोल मी शतद्रूच्या (सतलज) पलीकडे -विशेषतः या मरुभूमीत आल्यावर निरखलं. मानवांत रहायला मिळणं हे आनंद, अभिमान आणि भाग्याचं आहे."

" पुत्र, तुला बोलणं बोचलं नाहीं याचा मला आनंद वाटतो. आपापल्या जन-भूमीबद्दल सर्वांनाच प्रेम वाटत असतं."

" परंतु प्रेमाचा अर्थ दोषाकडे डोळेझांक करणं असा होतां कामा नये."

" मी कुरुपंचालचा प्रवास करतांना पुष्कळदा विचार केला; इथं देखील पंडिताबरोबर चर्चा केली मला हा दोष शिरण्याचं कारण समजलं, पण नाहीसा करण्याचा उपाय मात्र समजत नाही."

" कोणतं कारण आहे आर्यवृद्ध ?"

" पंचालजनपद जरी पंचालांचा मानण्यांत येतो तरी पण त्यातले अर्धे रहिवाशी देखील पंचालजन नाहीत."

" कबूल, आगंतुकच पुष्कळ आहेत."

" आगंतुक नव्हत पुत्रा, मूलनिवासी! तिथल्या कारागीर जाती, तिथले व्यापारी, तिथले दास, पंचालजनांनी त्या भूमीवर पाऊल ठेवण्यापूर्वी देखील तिथंच राहात होते. त्यांचा वर्ण पाहिलास ना ?"

" होय, पंचालजनापासून बिलकूल वेगळा, काळा, सावळा, नाही तर तांबुस!"

" आणि पंचालजनांचा वर्ण मद्रांच्या प्रमाणं गौर !"

" बराचसा !"

" होय, बहुतेक तसाच, कारण दुसऱ्या वर्णवाल्यांबरोबर मिश्रण झाल्यामुळे वर्णात विकार होतोच. मला वाटतं जर मद्राप्रमाणं तिथं देखील केवळ पिंगलकेश आर्यच वसले असते तर तिथं देखील मानव दृष्टीला पडले असते. आर्य व आर्य-भिन्नांच्या उच्चनीच भावना भिन्नवर्ण निर्माण व्हायला कारण होतात."

" आणि कदाचित, आर्य वृद्ध, तुला माहीत असेलच कीं या आर्यभिन्नांमध्ये पूर्वीपासूनच उच्चनीच आणि दास-स्वामी असे भेद होते. या आर्यभिन्नांनाच पूर्वज असुर म्हणत."

" होय, परंतु पंचाल तर एका रक्तामांसाचे आर्यजन होते. पण त्यांच्यांत देखील उच्चनीच भाव तसाच दिसून येतो. पंचालराज दिवोदास् यानं माझे कांहीं घोडे विकत घेतले होते म्हणून मी एके दिवशी त्याच्याकडे गेलो होतो. त्याचं पुष्ट गौर तरुण शरीर सुंदर होतं, परंतु त्याच्या डोक्यावर लाल-पिवळा भारी भक्कम मुकुट होता. फाटलेल्या कानांत मोठमोठे छल्ले; हातांत व गळयांत देखील काय काय सोंगं होती. हें सगळं बघून मला त्याची दया आली. वाटलं, राहू चंद्राला ग्रासूं लागला. त्याच्या

शेजारी त्याची स्त्री देखील बसली होती, ती स्वरूपांत मद्रसुंदरींपेक्षां कमी नव्हती पण या लाल-पिवळ्या ओझ्यानं बिचारी वांकून गेलेली होती."

सुदासचें हृदय वेगानें चालू लागले. त्यानें आपल्या चेहेऱ्यावरील भाव प्रगट होऊं न देण्याचा खूप प्रयत्न केला परंतु ते साधत नाही असे पाहून त्यानें विषय बदलण्यासाठी म्हटलें, "पंचालराजानं घोडे घेतले का आर्यवृद्ध ?"

"घेतले व किंमत पण बरी दिली. किती हिरण्य दिलं ते आठवत नाही, परंतु मला तिथं हेच बघून संताप आला की पंचालजन देखील त्याच्यापुढं गुडघे टेकून वंदन करीत होते, याचना करीत होते. प्राण गेला तरी एकहि मद्र असं करूं शकणार नाही, पुत्र!"

"तुला तर तसं करावं लागलं नाही ना, आर्यवृद्ध?"

"मला असं करायला सांगितलं असतं तर मी भांडायला निघालो असतों. पूर्वेकडले राजे आम्हांला तसं सांगत नाहींत. सनातन कालापासून असंच चालत आलं."

"का बरं?"

"कां म्हणून काय विचारतोस पुत्र? याची मोठी कथा आहे. जेव्हां पश्चिमेतून पुढं पुढं सरकत पंचालजन यमुना, गंगा, हिमवानाच्या मध्ये (उत्तरदक्षिण पंचालच्या) या भूमीत गेले तेव्हां ते बिलकूल मद्रांप्रमाणंच एक परिवार, एक जाती, असे राहात होते. असुरांचा संसर्ग वाढला, तेव्हां त्याचं पाहून या आर्य पंचालांतील कित्येकजण राजा, सरदार, पुरोहित बनण्यासाठीं लालायित होऊं लागले."

"लालायित होण्याचं कारण?"

"लोभामुळं, परिश्रमाविना दुसऱ्याची कमाई खायला मिळावी म्हणून! याच राजां-पुरोहितांनी पंचालांत भेदभाव उभारले. त्यांना मानव राहूं दिलं नाही." असें म्हणत जेता कांही तरी कामासाठी उठून गेले.

– २ –

मद्रपुरांत (शाकला-सियालकोट) जेताच्या कुलांत राहून सुदासला चार वर्षे लोटून गेली होती. जेताची स्त्री मरण पावली होती. त्याच्या विवाहिता बहिणी व मुली पैकीं एकदोघी त्याच्या घरीं नेहमी रहात असत; पण घरांतले स्थायी निवासी म्हणजे तो स्वतः, अपाला व सुदास. अपालेला आतां विसाव्वे लागले होतें. सुदासचे व तिचे एकमेकांवर प्रेम जडले होतें. मद्रपुरांतल्या सुंदरींमध्यें तिची गणना होत होती व तेथे सुंदर तरुणांची देखील कमतरता नव्हती. तसेच सुदाससारख्या सुंदर तरुणासाठीं देखील तेथें सुंदरींना तोटा नव्हता. परंतु लोकांनी नेहमी सुदासला अपालेबरोबर व अपालेला सुदासबरोबर नाचतांना पाहिले. जेताला हे माहित होतें, व सुदास मद्रपुरांत रहायला तयार झाला असता तर त्यानें याला आपली पसंति

देखील दर्शवली असती. परंतु सुदास कधी कधी आपल्या मातापितरांसाठी उत्कंठित होत असे. तो आपल्या मातापितरांचा एकुलता पुत्र आहे हेंहि जेताला माहीत होतें.

एके दिवशीं सुदास व अपाला प्रेमिकांची नदी चंद्रभागा (चनाब) हिच्यांत स्नानाला गेले. कित्येकदां स्नान करतांना सुदासनें अपालेचें नग्न अरुण शरीर पाहिलें होतें परंतु आज पांच पन्नास नग्न सुंदरींच्या घोळक्यांत तिच्या सौंदर्याची तुलना करून जणुं त्याला आजच अपालेच्या लावण्याची पूर्ण पारख झाली. परत येतांना वाटेंत त्याला अबोल बघून अपाला म्हणाली, "सुदास, आज तूं बोलत कां नाहींस? थकलास होय? चंद्रभागेची धार तोडून दोनदां पार जाणं कांहीं कमी श्रमाचं नव्हतं!"

अपाले, तूं देखील नाहीं कां दोनदां आर-पार पोहून आलीस? मी तर दोन-दांच काय, पण वेळ पडल्यास दहांदां चंद्रभागा-पार पोहूं शकतो"

"बाहेर निघालास, तेव्हां पाहिलं, तुझी छाती किती रुंदावली होती? तुझ्या दंडाचे नि मांड्यांचे गोळे दुप्पट मोठे झालेले दिसले."

"पोहणं हा कठिण व्यायाम आहे. तो शरीराला बलिष्ठ व सुंदर बनवतो. पण त्यानं तुझ्या सौंदर्याची कोणती वाढ होणार अपाले? तूं तर आताच तिन्ही लोकांत अनुपम सुंदरी आहेस."

"सुदासला डोळे आहेत तर?"

"पण मोह नाही, हे तुला माहीत आहेच."

"होय, मद्र तरुणी चुंबनदानांत उदार असल्या तरी तूं मला एक चुंबन देखील मागितलं नाहींस!"

"परंतु मागितल्याशिवायच ते देण्याची उदारता तूं दाखवलेली आहेस."

"पण ते केव्हां? त्यावेळीं मी तुला दादा श्वेतश्वाचं रूप मानीत होत्यें."

"आणि आतां देणार नाहींस का?"

"मागून तरी पहा, चुंबनाला कसली हरकत?"

"आणि मी मागणी घातली तर तूं माझी --!"

"तेवढं मात्र म्हणूं नकोस. सुदास, नकार देतांना मला वाईट वाटेल."

"पण ते वाईट न वाटूं देणं तुझ्या हातीं आहे"

"नाही, ते तुझ्या हातीं आहे."

"कसं?"

"तूं सदाचा माझ्या पित्याच्या घरीं रहायला कबूल होतोस का?"

त्या कोमल ओठांतून हें कठोर वचन निघायची भीति सुदासला कितीदां तरी वाटली होती. आज अशनि(वज्र)प्रमाणे एकाएकी ते वचन त्याचे कान फोडून

त्याच्या हृदयावर आदळले. कांहीं क्षण त्याचे चित्त उद्विग्न झाले, परंतु अपालेला आपलें हें नग्न हृदय दिसावे अशी त्याची इच्छा नव्हती म्हणून क्षणभऱ्याने त्यानें आपल्या स्वराचे संयमन करून म्हटलें, " मी तुझ्यावर कितीतरी प्रेम करतों, अपाले."

" तें मला माहित आहे. आणि माझं मन पण तुला ठाऊक आहे. मी कायमची तुझीच राहूं इच्छित्ये. पिता देखील यामुळं प्रसन्न होईल, पण तुला पंचाल कायमचा सोडून द्यावा लागेल !"

" पंचाल सोडणं कठीण नाही. पण तिथं माझे वृद्ध आईबाप आहेत. आईला माझ्या विना दुसरा पुत्र नाही. तिला तिच्या मृत्यू आधी एकवार भेटण्याचं मी वचन दिलेलं आहे."

" आईचं वचन मोडायला मी सांगत नाही. मी तुझ्यावर नेहमी प्रीति ठेवीन सुदास ! तूं गेलास तरी ! जीवनाच्या अंतापर्यंत मी तुझ्यासाठी अश्रू ढाळीन. पण आपण आपापली वचनं पाळूं— तूं आपल्या आईला दिलेलं आणि मी माझ्या हृदयाला दिलेलं !"

" तुझ्या हृदयाला दिलेलं ? कोणतं ते अपाले ?"

" मानव भूमी मधून अमानव भूमीत न जाण्याचं !"

" अमानव भूमि म्हणजे पंचाल जनपद ?"

" होय, जिथं मानवाचं मोल नाही, स्त्रीला स्वातंत्र्य नाही."

" तुझ्या प्रमाणंच मलाहि वाटतं !"

" आणि म्हणूनच मी तुला चुंबन देत्यें." असे म्हणून आपले आंसवांनी ओले झालेले गाल अपालेने सुदासच्या ओंठापुढे केले. सुदासने चुंबन घेतल्यावर तिनें पुन्हां म्हटले, " तूं जा, एक वेळ आईची भेट घेऊन ये. मी मद्रपुरांत तुझी प्रतीक्षा करीन."

अपालेच्या साध्या भोळ्या शब्दानीं सुदासच्या अंतःकरणांत स्वतःविषयीं जो अपार तिरस्कार निर्माण झाला, तो कधीहि त्याच्या मनांतून निघूं शकला नाही. आईबापाला भेटून परत येण्याचे कबूल करूनच सुदास् जेताजवळ घरी जाण्याची आज्ञा मागूं शकत होता. जेता व अपाला या दोघांनी त्याला कबुली दिली.

प्रस्थानाच्या एक दिवस आधी अपालेने सुदास-बरोबर जास्तीत जास्त वेळ घालवला. दोघांचेहि कमलासारखे निळे नयन निरंतर आंसवांनीं ओथंबलेले होते, व ते त्यांनीं एकमेकांपासून लपवण्याचा प्रयत्न केला नाही. दोघेंहि तासनतास एकमेकांच्या अधरांची चुंबनें घेत, आत्मविस्मृत होऊन आलिंगने देत अथवा नीरव अश्रुपूर्ण नेत्रानी एकमेकांकडे पहात बसली.

सुदास् निघाला तेव्हां अपाला त्याला आलिंगनपूर्वक म्हणाली, "सुदास्, तुझी मी मद्रपुरांत प्रतीक्षा करीन!"

अपालेचे हे शब्द आयुष्यभर सुदासच्या काळजांत सलत होते.

– ३ –

सुदास्चा आपल्या आईवर भारीच जीव होता. सुदास्चा पिता दिवोदास प्रतापी राजा होता. त्याची प्रशंसा करण्यासाठी वशिष्ट, विश्वामित्र, आणि *भरद्वाज यांच्या सारख्या महान् ऋषींनी मंत्रावर मंत्र रचले होते, आणि ते ऋग्वेदांत समाविष्ट केले तरी त्यांमुळे त्या मंत्रातला हाजीखोरपणा लपत नाहीं. सुदास्चे केवळ आपल्या मातेवर प्रेम होते. दिवोदास्ला आपल्यासारख्या किती तरी पत्नी व किती तरी दासी आहेत हे तिला माहीत होते. पण ती त्याच्या ज्येष्ठ पुत्राची–पंचाल सिंहासनाच्या उत्तराधिकाऱ्याची–माता असल्यामुळें तो तिची थोडीफार कदर करीत असे; तरी पण तरुण सुंदरींनीं राणीवसा गजबजलेला असतांना तो त्या दंतहीन वृद्धेवर कशाला प्रेम करील? आईचा एकुलता एक पुत्र असून देखील सुदास बापाचा एकुलता नव्हता, तो नसता तर प्रतर्दन दिवोदासचा उत्तराधिकारी झाला असता.

वर्षे लोटली तेव्हा आई मुलाबद्दल निराश झाली, रडता रडता तिच्या डोळ्यांतले तेज मंदावले. सुदास् एक दिवस गुपचूप कुणालाहि न कळूं देतां, पित्याला न भेटता, आईच्या पुढे जाऊन उभा राहिला. आपल्याकडे तिला निष्प्रभ डोळ्यांनीं बघताना पाहून तो म्हणाला, "आई मी तुझा सुदास्!"

तिच्या डोळ्यांना तेज आले, तरी पण मंचकावरून न हलतांच ती म्हणाली, "तूं जर खरोखरच सुदास् आहेस, तर मग नाहीसा होण्यासाठीं का दूर उभा आहेस? ये, माझ्या गळ्याला मिठी मार, माझ्या मांडीवर आपलं डोकं ठेव!"

सुदासनें आईच्या कुसव्यात डोके टेकले. आईने हात फिरवून पाहिला. हवेंत विलीन होणारे ते डोके नव्हते. खरोखरचे होते. तिने त्याचे मुख, गाल, कपाळ, आणि केश यांचे वारंवार मुके घेतले, आंसवांनी त्यांचें सिंचन केले, अनेक वेळां गळ्याशी गळा लावला. आईची अश्रुधार खळत नाहीं असे पाहून त्याने विचारलें, "आई, आतां मी तुझ्याकडे आलो ना? मग कां बरं रडत्येस?"

"फक्त आजच रडून घेत्ये, वत्सा आजच घडीभर! हे शेवटले अश्रू समज. माझ्या डोळ्यांतल्या चंद्रा!"

अंतःपुरांतून राजाला सूचना मिळाली. तो धांवतच आला आणि सुदास्ला कवटाळून आनंदाश्रू ढाळूं लागला.

---

* ऋग्वेद ६।२६।२॥२५.

दिवसामागून दिवस आणि महिन्यामागून महिने जाऊन दोन वर्षे झाली. आई-बापांच्या समक्ष सुदास् प्रसन्नमुख दिसण्याचा प्रयत्न करी परंतु एकांतांत मात्र त्याच्या कानीं वज्रछेदी ध्वनि पडत असे, "सुदास्, तुझी मी मद्रपुरांत प्रतीक्षा करीन." आणि मग त्याच्या पुढे तेच हलणारे लाल ओठ दिसूं लागत; अश्रूंनीं त्याचे डोळे डबडबले म्हणजे मग ते दिसेनासे होत. सुदासपुढे दोन स्नेह होते, एकीकडे अपालेचें अकृत्रिम प्रेम आणि दुसरीकडे वृद्ध मातेचें वात्सल्यपूर्ण हृदय! मातेचें असहाय्य हृदय विदीर्ण करणे म्हणजे त्याला अत्यंत नीच स्वार्थांधता वाटत होती, त्यामुळेच आईच्या ह्यातींत त्याने पंचाल न सोडण्याचा निश्चय केला, परंतु राजपुत्राचें आमोदी-प्रमोदी जीवन स्वीकारणे त्याला आपल्या सामर्थ्याबाहेरचे वाटत होते. पित्याचा तो नेहमीच सन्मान राखी, व त्याच्या आज्ञेचे तत्परतेनें पालन देखील करी.

वृद्ध दिवोदास् एके दिवशी पुत्राला म्हणाला, "वत्स सुदास्, मी आतां जीवनाच्या अंतिम टप्प्यावर येऊन पोचलो. आतां माझ्यानं पंचालाचा भार उचलणं होत नाही."

"मग आर्य, हा भार पंचालावरच सोंपविला तर?"

"पंचालावरच? तुझं बोलणं माझ्या लक्षांत आलं नाही, पुत्र!"

"शेवटी, आर्य, हे राज्य पंचालाचंच ना? आमचे पूर्वज पंचालजनांतले सामान्य पुरुष होते. त्यावेळी पंचालाचा कोणीहि राजा नव्हता. पंचालजनच सारा राज्यकारभार करीत. आज देखील मल्ल, मद्र, गंधार यांच्यांमध्यें जनच कारभार चालवीत असतात. मग आमचे आजोबा वध्र्यश्व यांच्या कोणा पूर्वजाला भोगविलासाचा आणि दुसऱ्याच्या श्रमाची कमाई लुबाडण्याचा लोभ सुटला. तो जनपति किंवा सेनापति असेल, त्यानं जनांच्या वतीनं एखादं युद्ध जिंकून त्याचं प्रेम, विश्वास व संपत्ति प्राप्त करुन घेतली असेल व त्याच्याच बळावर पुढं जनाचा गळा कापला असेल. जनाची सत्ता बाजूला सारुन त्यानं असुरांच्या प्रमाणं राजाचं राज्य स्थापन केलं असेल. असुरांच्या प्रमाणं विश्वामित्र, वशिष्ट यांच्या आज आठवणींत देखील नसलेल्या कोणा पूर्वजांना पुरोहिताच्या पदवीची लांच दिली असेल. त्यांनीं जनाच्या डोळयांत धूळ फेंकून म्हणायला प्रारंभ केला असेल — इंद्र, अग्नि, सोम, वरुण, विश्वदेव यांनी या राजाला तुमच्यावर सत्ता गाजवायला पाठविलं आहे. याची आज्ञा माना. यांना बलि-शुल्क-कर द्या. पण ही निव्वळ धोकेबाजी होती, चोरी होती. ज्याच्या जवळून अधिकार हिरावले, त्याचं नांव देखील विसरायचं, त्याच्या बद्दल कृतज्ञतेचा एक शब्द देखील काढायचा नाही."

"नाहीं पुत्र! विश्व(सर्व)जन आम्ही आमचे राजकृत (राजा बनविणारा) मानतो. अभिषेकाच्या प्रतिज्ञेच्या वेळीं तेच आम्हाला राजचिन्ह म्हणून पलाशदंड देतात."

" अभिषेक प्रतिज्ञा आतां समज्या (नाटक) झालेली आहे. काय खरंच जन राजाचे स्वामी आहेत ? नाही, हे तर स्पष्टच दिसतं. राजा आपल्या जनांच्या बरोबरीनं बसत नाही; त्याच्या बरोबरीनं सहभोजन किंवा सहयोग करीत नाही; मद्र किंवा गंधार यांमधला जनपति असं करूं शकेल ? "

" इथं जर आम्ही असं करूं लागलो तर एखाद्या दिवशीं वैरी घात करील किंवा विष घालील. "

" हें असलं भय फक्त चोर व अपहरण करणारे यानाच वाटतं. जनपति चोर किंवा अपहारक नसतात ते वस्तुत: स्वतःला जनपुत्र मानतात. ते आपला सारा व्यवहार तसाच करतात म्हणून त्याना भय नसतं. राजा चोर असतो. तो जनाच्या अधिकाराचं अपहरण करणारा आहे, म्हणून त्याला प्रत्येक वेळी भिऊन वागावं लागतं. राजाचा राणीवसा, त्याचा सोने, रुपे व रत्ने यांचा संग्रह, त्याच्या दासदासी, त्याचा सारा विलास, हा त्याने मिळवलेला नसतो, तो लुटलेला असतो "

" पुत्र, यासाठी तूं मला दोषी ठरवतोस का ? "

" मुळींच नाहीं. आर्य, तुझ्या जागीं मी आलो तर मला देखील स्वेच्छेनं किंवा अनिच्छया तसंच वागावं लागेल. मी आपला पिता दिवोदास याला दोष देत नाहीं. "

" तूं राज्य जनाला परत देऊं म्हणतोस, पण ते शक्य आहे का ? पुत्रा, लक्षांत ठेव, जनाच्या भोगांचं अपहरण करणारा फक्त एकटा पंचालराज दिवोदासच नाही, तर तो अनेक अपहारक चोर सामंतांपैकी एक आहे. तो श्रेष्ठ असेल परंतु त्याच्या संयुक्त बळापुढं मात्र पागळा आहे. अनेक प्रदेशपति, उग्र राजपुत्र (राजवंशिक) व सेनापति यांच्या अतिरिक्त, सर्वात बलिष्ठ सामंत-पुरोहित आहे. "

" मला पुरोहिताचं बळ माहित आहे. राजाचे धाकटे पुत्र राजपद मिळू शकत नसल्यामुळे पुरोहित बनतात. मला वाटतं माझा धाकटा भाऊ प्रतर्दन देखील तसंच करील. आतां राजा व पुरोहित यांच्यामध्ये केवळ सिंहासनवेदी व यज्ञवेदी यांच्या इतकंच अंतर आहे. पण कुणी सांगावं, पुढं क्षत्रिय व ब्राह्मण हीं दोन वेगळी बळं दोन वेगळ्या जातींत परिवर्तित होतील. मद्र-गंधारांत खड्ग आणि स्रुवा दोन्ही एकाच हातांत असूं शकतात पण पंचालपुरात स्रुवा विश्वामित्राच्या हातीं व खड्ग वध्र्यश्वपुत्र दिवोदासच्या हातीं. जनाच्या वांटण्या तर आतांच तीन भागांत झालेल्या आहेत. सामंताच्या नात्यानं, जनभोग-अपहारकांच्या नात्यानं, आवाह विवाहाच्या नात्यानं, माता पित्याच्या नात्यानं राजा पुरोहित एकच असले तरी पण दोघांची नावं-क्षत्रिय-ब्राह्मण-वेगवेगळाली ओळखली जातातच. आणिक दोघांच्या स्वार्थात टक्कर देखील लागूं लागली आतां ! म्हणूनच ब्रह्मक्षत्र-

बळांत मैत्री व्हावी याचे प्रयत्न चाललेले आहेत. एकाच कुळांतील या दोन वर्गाच्या बाहेरील जनाची संख्या खूप आहे, त्याचा तिसरा वर्ग बनला. आतां त्या महाजनाचं नांव बदलून त्यांना विश (विट) किंवा प्रजा (पुत्र) म्हणण्यांत येतं. कशी बिटम्बना आहे ही ! जो जन (पिता) होता, त्यालाच आज प्रजा (पुत्र) म्हणण्यांत येतं ! आर्य, ही फसवणूक नाही का होत ? ”

“ पुत्रा, तूं आणखी एक भारी संख्या लक्षांत घेतलीच नाहीस ! ”

“ खरंच. आर्यजनाहून भिन्न प्रजा–शिल्पी, व्यापारी, दास-दासी. बहुधा यांच्याच मुळं जनांचे अधिकार हिरावून घेण्यांत सामंत यशस्वी झाले. आपल्या शासक जनांना आपल्याच प्रमाणं कुणाच्या तरी हातून परतंत्र झालेले पाहून आर्येतर प्रजेला संतोष वाटला. यालाच राजानं न्याय असं नांव दिलं. ”

“ पुत्र, तूं चुकत नसावास ! पण आतां हे साग की राज्य परत कुणाला करायचं ? चोर आणि अपहारक यांत सामंतांबरोबरच व्यापारी देखील आले, यांना वगळून आर्यजन व अनार्य प्रजा यांची भारी संख्या आहे; काय ते राज्याचा सांभाळ करतील ? इकडं मी राज्य सोडताच धर्मसामंत आणि राजसामंत हे गिधाड प्रजेचे लचके तोडायला टपलेले असतील ! कुरु पंचालांत जनाच्या हातून राज्य हिसकल्याला सहा सात पिढ्या लोटल्या असतील, म्हणून आपल्याला जनाचे दिवस आठवतात. त्या वेळीं या भूमीला दिवोदासचं राज्य, नव्हे, तर पंचालाः असं म्हणत व समजत. पण आज त्या स्थितीकडे परत जाण्याची वाट सांपडत नाही. ”

“ होय, कारण वाटेंत हे विश्वामित्र वशिष्टासारखे ग्रह आडवे पडलेले आहेत. ”

“ ही आपली परवशता मान, पण येवढं मात्र खरं कीं आम्हीं काळ बदलूं शकत नाही व उद्यां काय होणार तेंहि सांगू शकत नाही. मला येवढाच संतोष वाटतो कीं तुझ्यासारखा पुत्र मला लाभला. मी देखील एके काळी तरुण होतों; त्या वेळी वशिष्ट आणि विश्वामित्रांच्या कविता व त्याचं प्रजेची मति गुंगवणारं धर्माकर्माचं मायाजाळ इतकं पसरलेलं नव्हतं. मी विचार करायचा–राजाची ही दस्युवृत्ति कमी केली तर ? परंतु तसं करण्याच्या बाबतींत मी असमर्थ ठरलो. त्या वेळीं तुझी आईच माझं सर्वस्व होती. परंतु पुढं भग्न मनोरथ, निराश झालों व या पुरोहितांनीं मला आपल्या कवितांच्या नव्हे, तर कन्यकांच्या पाशांत जखडलं, इंद्राणीच्या दासींची उपमा देऊन शेकडो दासींनीं राणीवसा गजबजून गेला. दिवोदासच्या पतनापासून धडा घेऊन तूं सावध रहा, प्रयत्न करून पहा, कदाचित एखादा मार्ग सुचेल व दस्युवृत्ति दूर करतां येईल. परंतु सुदाससारख्या सहृदय दस्यूला बाजूला सारून प्रतर्दनासारख्या हृदयहीन वंचक दस्यूच्या हाती पंचाल देणं योग्य होणार नाही. तुझे प्रयत्न मी मोठ्या संतोषानं पितृलोकातून बघत राहीन, पुत्रा ! ”

दिवोदास् देवलोकीं गेला. आतां सुदास पंचालाचा राजा झाला होता. ऋषि-मंडळी त्याच्या भोंवती पिंगा घालीत होती. त्या पांढऱ्या दाढीवाल्यांनीं इंद्र, वरुण, अग्नि, सोम यांच्या नांवावर लोकांना कसे आंधळे बनवले हें आतां सुदास्ला कळून चुकलें होते. त्यांच्या कठीण पाशांत आपण देखील सांपडलो असें सुदास्ला वाटूं लागलें. ज्यांच्यासाठी कांही तरी करण्याची त्याची इच्छा होती, ते त्याच्या कृत्याचा थेट विपरीत अर्थ करून त्याला अधार्मिक राजा म्हणून घोषित करायला सिद्ध होते. सुदास्ला ते दिवस आठवले; त्या वेळीं तो फाटके कपडे घालून अज्ञात देशांत अनवाणी भटकत असे; त्या वेळी तो स्वतंत्र होता. सुदास्ची हृदयव्यथा समजूं शकणारा, त्याला सहानुभूति दाखविणारा तेथे आतां एकहि नव्हता. पुरोहित-ऋषि त्याच्याकडे आपल्या तरुणी नाती–पणती पाठवीत होते, आणि राजन्य–प्रादेशिक सामंत आपल्या कुमारिकांना पाठवीत होते; परंतु सुदास्ला स्वतःला जळत्या घरात रहाण्याचा अनुभव येत असे. तो चंद्रभागेच्या कांठीं मार्गप्रतीक्षा करीत असलेल्या त्या दोन निळ्या डोळ्यांना विसरूं शकत नव्हता.

सुदास्ने साऱ्या जनाची–आर्या अनार्यांची सेवा करण्याचा विचार ठरविला परंतु त्यासाठीं देवतांच्या दलदलींत फसलेल्या जनाला आधा असा विश्वास द्यायला हवा होता कीं सुदास्वर देवतांची कृपा आहे. आणि या कृपेची साक्ष द्यायला ऋषि ब्राह्मणांनीं त्याची स्तुति करायला हवी होती. ऋषींची प्रशंसा मिळविण्यासाठीं त्यांना हिरण्य सुवर्ण, पशु धान्य, दास दासी, दान दिल्याशिवाय गत्यंतर नव्हते. पीवर गो-वत्साचें मांस आणि मधुर सोमरस यांच्यामुळें तोंद फुगलेले ऋषि यांच्या मतें तो आतां वस्तुतः सुदास् (विपुल दान देणारा) ठरला. या चाटुकार ऋषींनीं रचलेल्या सुदास्च्या दानस्तोत्रांपैकी किती तरी अजून देखील ऋग्वेदांत सांपडतात, परंतु हीं दानस्तोत्रें ऐकणारा सुदास् ती रचणाऱ्या कवीकडे किती तिरस्काराच्या नजरेनें बघत होता याची माहिती किती जणांना असेल?

सुदास्चें यशोगान साऱ्या उत्तरपंचालामध्येच (रोहिलखंड) नव्हें तर दूरदूर ऐकायला येऊं लागलें. आपल्या भोगशून्य जीवनांत त्याला जे कांहीं करणे शक्य होतें, ते करून तो विश्वजनाचें हित साधूं लागला.

पित्याच्या मृत्यूनंतर बऱ्याच वर्षांनी त्याची आई वारली. वर्षानुवर्षें जो घाव साधारणपणें वाहात असल्यामुळे त्याला संवय होत चालली होती, तो एकाएकीं चिघळून फुटला. अपाला हर क्षणीं त्याला आपल्या पुढें उभी असलेली दिसायची व अश्रुपूर्ण नेत्रांनीं व कंपित अधरांनीं ती म्हणायची, "सुदास्, मद्रपुरांत मी तुझी मार्गप्रतीक्षा करीन." त्या व्यथेची आग सुदास आंसवांनीं विझवूं शकत नव्हता.

हिमवानांत शिकार करण्याचा बहाणा सांगून सुदास् एके दिवशीं पंचालपुर ( अहिच्छत्र ) येथे जायला निघाला.

मद्रपुरांत ( सियालकोट ) ज्या घरी त्याला अपालेचे प्रेमनिधान गवसले ते अजून शाबूत होते, पण तेथे ना जेता होता, ना त्याची प्रेयसी अपाला !

दोघेहि मेले होते; अपाला तर एका वर्षापूर्वीच वारली. त्या घरांत अपालेचा तेव्हां परागंदा झालेला पण मग परत आलेला भाऊ व त्याचा परिवार रहात होता. सुदासला त्या घराबरोबर आणखी स्नेह वाढविण्याचे साहस झाले नाहीं तो अपालेच्या एका सखीला भेटला तिने अपालेची नवीं रंगीत वस्त्रे–अंतरवासक, उत्तरीय, कंचुक, उष्णीष–त्याच्यापुढे आणून ठेवली व भरलेल्या डोळ्यांनी सांगितलें–" माझ्या सखीनं अंतकाळी ही वस्त्रं परिधान केलीं होती. अन् तिच्या ओठावरले शेवटचे शब्द असे होते–'ताई, मी सुदासला वचन दिलं होतं कीं मी तुझी मद्रपुरात मार्गप्रतीक्षा करीन ! ' "

सुदासनें ती वस्त्रें उचलून आपल्या हृदयाने व नेत्रांनीं कुरवाळली. त्यांना अपालेच्या देहाचा सुगंध येत होता.

— —

[ आजच्या पूर्वी १४४ पिढ्यां आधीच्या आर्यजनांची ही कथा आहे. याच वेळीं पुरातनतम ऋषि वशिष्ट, विश्वामित्र, भारद्वाज, हे ऋग्वेदांतील मंत्राची रचना करीत होते. याच कालांत आर्य पुरोहितांच्या मदतीनें कुरुपंचालांतील आर्य-सामन्तांनी जनतेच्या अधिकारावर शेवटचा जबरदस्त आघात केला. ]

# ८—प्रवाहण

**स्थान**—पंचाल (संयुक्त प्रांत). **काल**—इ. स. पूर्वी ७०० वर्षे.

– १ –

"एकीकडे हिरवं हिरवं रान, त्यातल्या पिकल्या करवंदाचा मादक गंध, पक्षांचं मधुर कूजन आणि दुसरीकडे गंगेची निर्मळ धार, तिच्या खोऱ्यात चरणाऱ्या आमच्या हजारो कपिला–श्यामा गाई, त्याच्यामध्ये डकरणारे आमचे विशाल बलिष्ठ वृषभ.—कधी कधी या दृश्यांनीं देखील डोळ्यांना तृप्त करायला हवं, प्रवाहण ! तूं तर सदान्‌कदा उद्‌गाथ (साम) गायनात नाही तर वशिष्ट-विश्वामित्रांचे मंत्र पठण करण्यात गढलेला असतोस!"

"लोपा, तुझे डोळे ती दृश्यं पाहतात नि माझे डोळे तुला बघूनच तृप्त होतात."

"हूं, गप्पा मारण्यात देखील चतुर आहेस तर! मात्र ज्या वेळी तूं जुनी गीतं श्वानस्वरात आपल्या सहपाठकाच्या बरोबर पुनः पुन्हा म्हणूं लागतोस, तेव्हा वाटूं लागतं, माझा प्रवाहण जन्मभर दुधपितं बाळच राहणार!"

"खरंच, या प्रवाहणाबद्दल तुझं असं मत आहे, लोपा?"

"मत कसं का असेना, येवढं मात्र खरं की प्रवाहण सदाचा माझाच आहे."

'याच आशेवर आणि विश्वासावर माझ्यांत श्रम आणि विद्यार्जन करण्याची शक्ति येत्ये, लोपा! आपल्या मनावर खूप ताबा ठेवण्याची मी संवय करून घेतलेली आहे. तरी पण कित्येक वेळा तरी माझं मन या जुन्या पुराण्या गाथा, हे जुनाट मंत्र आणि उद्‌गीथ रटण्यापासून झुकाड्या देऊं इच्छितं. ज्या वेळी खूप परिश्रम करून ते थकून जातं आणि सगळं कांही सोडून बसूं पाहतं तेव्हा मला कुठलाहि उपाय सुचेनासा होतो; मग लोपेच्या सहवासात कांही क्षण घालवावेसे वाटतात."

"अन् मी देखील त्या क्षणासाठी आतुर असत्ये." लोपेचे घारे डोळे दूर कुठे तरी रोखलेले होते. तिचे मृदु सोनेरी केश प्रातःसमीरासवे भुरभुरत होते; वाटत होते जणुं त्या जागी लोपा अस्तित्वातच नाही. प्रवाहणानें तिच्या केशांत बोटांनी अफरातफर करीत म्हटले, "लोपा, तुझ्या पुढं मी कःपदार्थ आहे."

"कः पदार्थ! नाही, माझा प्रवाहण!" त्याच्या देहावर आपल्या कपोल-स्पर्शाची उधळण करीत ती म्हणाली, "मला तुझा कित्ती कित्ती अभिमान वाटतो.

मला ते दिवस अजूनहि आठवतात. माझ्या आऱ्याबरोबर आलेल्या एका आठ वर्षाच्या बाळाचं रूप मी माझ्या बाळनेत्रांनी पाहिलं. त्या वेळीं मी असेन तीन किंवा चार वर्षांची. परंतु माझी स्मृति त्या बालचित्राला अंकित करण्यांत मुळीच चुकली नाहीं मला ते पिंगट कुरळे केश, पोपटाच्या चोचीवाणी असलेलं ते नाक, ते नाजुक लाल ओंठ, ते तेजस्वी निळे टपोरे डोळे, ती तापवलेल्या सोन्या सारखी अंगकांति, सगळं कांही आठवतंय मला! आणिक असं पण आठवतं की—आई म्हणाली होती—बाळ लोपा, हा तुझा भाऊ! मी लाजल्ये, तेव्हा तुझा मुका घेऊन ती म्हणाली होती—बाळ प्रवाहण, ही तुझी मामेबहीण लोपा लाजत्ये, तूंच आता हिची लाज पळव."

"आणि मग मी तुझ्या जवळ आलो, तूं मामीच्या सुगंधित काळ्या केशात आपलं तोंड लपवलंस!"

"पण लपवताना मी माझ्या डोळ्यासाठी झरोके ठेवले होतेच ना! तू काय काय करतोस, हे मी बघत होत्येच. आई, दासी व त्यांची मुलं या शिवाय तिथं कोणीहि नव्हतं. पित्याचं आचार्यकुल अजून व्हायचं होतं. मी त्या घरात स्वतःला एकटीच मानीत आल्ये अन् म्हणूनच तुला बघून मला आनंदी आनंद झाला."

"खेळायला मिळेल म्हणून ना? तरी देखील तूं मला बघून दडून बसलीस! मी तुझा उघडा नागडा गोरा देह पाहिला, तुझा गोल गोल चेहरा पाहिला. माझ्या बाळ डोळ्यांना तो आवडला. मी येऊन तुझ्या खांद्यावर हात ठेवला. तेव्हा आई नि मामी यांनी काय केलं हे आठवतं का?—दोघीहि हासल्या नि म्हणाल्या ब्रह्मा आमची कामना पुरी करो—त्यावेळी मला कामना म्हणजे काय हे ठाऊक नव्हतं!"

"मला नाहीं हे आठवत, प्रवाहण! पण तुझ्या कोमल हातांच्या स्पर्शाचा अनुभव माझ्या खांद्यांना मिळाल्याची सुखकर आठवण असणं येवढंच मला पुरेसं वाटतं."

"आणि तूं संकोचानं अंग चोरलं होतंस?"

"तूं माझे हात आपल्या हातीं घेतलेस, पण तुझे ओठ मात्र शिवून घेतले होतेस जसे कांही! तेव्हां आई काय म्हणाली होती?"

"मामीची एकेक गोष्ट मला आठवत्ये. तिला मी विसरूं शकेन का? आई मला गार्ग्यमामाजवळ ठेवून परत गेली. पण मामीच्या मायेनं मला आईचा विसर पडू शकला. कसा बरं मी मामीला विसरेन?"—प्रवाहणचे डोळे आसवांनी डबडबले. त्याने लोपेचे अधरचुंबन घेऊन म्हटले, "लोपा, मामीचा मुखडा देखील अगदी असाच होता. आपण दोघे एकत्र झोपत असूं. तुझे नसले तरी माझे डोळे कितींदा तरी उघडेच राहात. पण मामीला येतांना पाहिलं की मिटलेच मी ते! मग मंद निःश्वासयुक्त अशा तिच्या ओठांचा स्पर्श माझ्या गालांना व्हायचा. मी डोळे

उघडायचा! मामी म्हणायची,–' उठा बाळानो!"–मग ती तुझी मुका घ्यायची पण तूं कसली–गाढ झोपेत असायचीस!"

लोपेच्या डोळयांत देखील आसवें जमूं लागली तिनें उदासपणानें म्हटलें, "आईला अशा स्थितीत मी फार थोड्या वेळा पाहूं शकल्ये"

' हूं, तर मग तेव्हा तुझ्याजवळ मला मुकाट्यानं उभा बघून मामी म्हणाली होती– ही तुझी बहीण आहे, बाळ, हिचा मुका घे आणि बोलाव तिला घोडा घोडा खेळायला!"

"हूं, तूं तेव्हां माझ्या ओठाचा मुका घेतलास, आणि मग मला घोडा घोडा खेळायला बोलावलंस. मी आईच्या केसाबाहेर तोंड काढलं, तूं लागलीच तिथं घोडा झालास व मी तुझ्या पाठीवर बसल्ये."

"आणि मी लागलीच तुला बाहेर घेऊन गेलो."

"तेव्हा मी किती धीट होत्ये!"

"तूं नेहमींच निर्भय होतीस, लोपे! आणि तूंच माझं सर्वस्व होतीस. मामाच्या भीतीनं आपला पाठ घोकत बसायचा मी आणि कंटाळा आला की तुझ्या जवळ यायचा."

"आणि तुझ्यासाठीच मी तुझ्याजवळ बसायची."

"मला वाटत लोपे, तूं जर माझ्या निम्मे श्रम घेतीस, तरी देखील मामाच्या कोणत्याही निकटवर्तीयांपेक्षां पुढं गेली असतीस!"

"पण तुझ्या नाही!" लोपेनें प्रवाहणचे डोळे नीट न्याहाळले आणि मग ती म्हणाली, "मला तुझ्या पुढं जायचं नाही."

"पण मला बरं वाटलं असतं!"

"पण आपल्या दोघात वेगवेगळं मी-तूं-पण आहे तरी कुठं?"

"लोपे, तूं माझ्या मनाला उत्साहच नव्हे तर शरीराला देखील बळ दिलंस. मी रात्री किती कमी झोंपायचा! स्वत. पाठ म्हणण्यांत व दुसऱ्याकडून पाठ म्हणवून घेण्यांत मी खाणं पिणं देखील विसरून जात असे. तूं मला स्वाध्याय गृहाच्या अंधारांतून जबरीनं ओढून काढायचीस आणि कधीं बागेंत, कधी वनांत, तर कधीं गंगेच्या धारेंत घेऊन जायचीस. मला देखील हे सारं आवडतं लोपा, पण तिन्ही वेद आणि ब्राह्मणांच्या साऱ्या विद्या शीघ्रातिशीघ्र संपवून टाकायची माझी इच्छा आहे!"

"आतां काय समाप्ति व्हायची राहिली? बाबा तर म्हणतात कीं प्रवाहण आतां माझ्या बरोबरीला आला."

"हे मला देखील मान्य आहे; ब्राम्हणांची विद्या आतां फारच थोडी शिकायची उरलेली आहे, पण विद्या ब्राह्मणांपर्यंतच मर्यादित का आहे?"

" हेंच मी तुला सांगणार होत्यें. मग पुढं देखील तुझा हा पलाशदंड आणि या वळलेल्या जटा तशाच राहतील ? "

" नाहीं ग, याची काळजी करूं नकोस लोपा ! पलाशदंड आतां जाईल लवकरच आणि सोळा वर्षे वळलेल्या या जटांना सुगंधित तेल लावायला तुला मोकळीक मिळेल. "

" प्रवाहण, मला हे समजत नाही कीं या जटांवर येवढा जोर कां ? तूं तर माझ्या ओठांचे मुके घ्यायला कधींही कमी केलं नाहीस ! "

" ती एक बाळपणापासून जडलेली संवय आहे मला ! "

" तर काय आचार्य कुलातले दुसरे अंतेवासी या कठोर व्रताचं पालन करीत असतात ? "

" नाइलाजानं ! लोपा, हे सारं मान प्रतिष्ठा मिळावी ह्मणून करावं लागतं ! लोक याला ब्राह्मण कुमारांची कठीण तपस्या मानतात. "

" नी मग कुरुराज बाबांना गांव गन्ने, हिरण्य सुवर्ण, दास दासी आणि वडवा ( घोडी ) रथ दान देतात. माझ्या घरी आधी पासूनच पुरेशा दास-दासी आहेत. आतां नुकत्याच कुरुराजानं आणखी तीन पाठवल्या; त्यांना तर द्यायला काम देखील नाहीं. "

" मग विकून टाक त्यांना, एकेकीचे तीस तीस निष्क येतील ! "

" वाईट याचं वाटतं की आह्मी ब्राह्मण आहोत. आह्मी इतरांच्या पेक्षां जास्त शिकलों, ज्ञानी झालों, याचं कारण आम्हांला तशा सोयी प्राप्त आहेत येवढंच. पण जेव्हां मी या दासांचं आयुष्य बघत्यें तेव्हां मला ब्रम्हा, इंद्र, वरुण या साऱ्या आपल्या देवतांचा तिरस्कार वाटतो. तिटकारा वाटतो मला वशिष्ट, भरद्वाज, भृगु, अंगिरादि ऋषींचा; किळस येते बाबा सारख्या साऱ्या श्रोत्रिय महाशाल (धनी) ब्राह्मणांची ! सगळ्या ठिकाणी व्यापार, सौदा, लाभ, लोभ, दिसूं लागतो. त्या दिवशीं कालीदासीच्या पतीला बाबांनी कोसल मधल्या त्या व्यापाऱ्याला पन्नास निष्कांना विकलं. बिचारी काली माझ्याजवळ रडूं लागली. मी बाबांजवळ रदबदली केली तेव्हां ते म्हणाले, 'सारेच दास घरी ठेवले तर घर पुरायचं नाहीं, आणि घरींच ठेवायचे म्हटलं तर मग तें धन कसलं ?' ताटातूटीच्या आदल्या रात्री बिचारे रडरड रडले. त्यांची लहानगी मुलगी दोन वर्षांची असेल; तिचा चेहेरा बापासारखा आहे-सारेजण म्हणतात. सकाळी उठल्यावर ती किती तरी वेळ आक्रोश करीत होती. तरी पण कालीच्या पतीला विकण्यांत आलं, जसा कांहीं तो माणुस नव्हता; जणूं तें जनावर होतं. ब्रम्ह्यानं जणुं काय त्याच्या शेंकडो पिढ्या याच कामासाठीं निर्माण केलेल्या आहेत. हें मला पटत नाहीं, प्रवाहण ! तुझ्या इतकं तिन्ही वेदांचं पठण मी केलेलं

नाहीं, पण समजावताना मी ऐकलेलं आहे. त्यांच्यांत फक्त डोळ्यांना न दिसणाऱ्या वस्तु, लोक व शक्ति यांचा लोभ किंवा भय मात्र दाखविण्यात आलेलं आहे."

प्रवाहणानें लोपेच्या आरक्त कपोलावर दृष्टि रोखून म्हटलें—"आपलं प्रेम मतभेद असावेत म्हणूनच जुळलेलं दिसतं!"

"या मतभेदामुळंच आपलं प्रेम अधिकच बळावतं!"

"खरं आहे लोपा! तूं बोललीस हेंच जर आणिक कोणी बोललं असतं तर मी किती तरी रागावलो असतों म्हणून सांगू;—पण या तुझ्या ओठातून साऱ्या देवता, ऋषि आणि आचार्य यांच्यावर प्रखर बाण सोडण्यात येत असलेले पाहून देखील मला वारंवार त्या ओठाचीं चुंबनं घ्यावींशीं वाटतात. का बरं असं?"

"कारण आमच्या अंतःकरणात दोन प्रकारच्या विचाराचीं द्वंद्वं नेहमीं चाललेलीं असतात! आणि त्याबद्दल आम्हीं सहिष्णुता दाखवतों याचं कारण तीं आमच्या पासून अभिन्न आहेत."

"तूं देखील माझ्या पासून अभिन्न आहेस, लोपा."

— २ —

"ना कधी तूं हे शिविचे शाल पांघरलेस, ना कधीं काशीच्या चंदनानं आणि सागरातल्या मोत्यांनीं आपला शृंगार केलास! प्रिये, तूं इतकी उदासीन का बरं असत्येस?"

"तर काय याच्या योगानं मी अधिक सुंदर दिसेन?"

"माझ्या दृष्टीत तूं नेहमीच सुंदर आहेस!"

"मग ही ओझीं लादून शरीराला कष्ट देण्यापासून कोणता बरं लाभ आहे? खरं सांगू प्रिया, जेव्हा तूं ते मुकुटाचं जड ओझं आपल्या डोक्यावर लादून घेतोस, तेव्हां तर मला भारीच वाईट वाटतं!"

"परंतु दुसऱ्या स्त्रिया तर वस्त्रालंकारासाठीं लालायित असतात."

"पण मी तशातली नव्हे."

"तूं पंचाल राजाच्या हृदयावर सत्ता गाजवणारी आहेस!"

"प्रवाहणची पत्नी आहे मी, पंचालाची राणी नव्हे."

"होय प्रिये, मी तरी कुठं या दिवसाची कल्पना केली होती? मी पंचाल राजाचा पुत्र आहे हें मामानं आपल्या पासून अजीबात लपवूनच ठेवलं होतं."

"त्या वेळीं बाबा आणखी काय करूं शकते? पंचाल राजाच्या शेकडों राण्यांपैकीं एक माझी आत्या; आणि तुझ्या पेक्षा राजाचे दहा मोठे मुलगे! त्यामुळं तूं एक दिवस पंचालांच्या राजसिंहासनाचा अधिकारी होशील याची कुणाला कशी आशा वाटावी?"

"बरं झालं, पण काय ग, तुला हे राजभवन कां आवडत नाही?"

"कारण आर्धीच मी गार्ग्य ब्राह्मण महाशाल यांच्या प्रासादाला कंटाळून गेल्यें होत्यें. तो आम्हांला प्रासाद वाटायचा पण तिथल्या दास-दासींना वाटे का? मग हा राजप्रासाद तर त्या महाशालाच्या प्रासादापेक्षां हजार पटीनं वरचढ आहे. इथं मी नि तूं सोडून सगळे दास नि दासी. दोन अदास असले म्हणून दासांनी भरलेलं हे भवन अदासभवन म्हणता येईल का? परंतु मला आश्चर्य वाटतं, प्रवाहण, तुझं हृदय किती कठोर आहे रे!"

"म्हणून तर ते कठोर वाग्बाण सहन करूं शकतं!"

"छे, मानवानं असं होऊन चालणार नाही."

"प्रिये, मी योग्य होण्याचा प्रयत्न केला, मानव बनण्याचा नव्हे. मात्र ती योग्यता मिळवताना मला कधींहि वाटलं नव्हतं की कधी काळीं या राजभवनांत मी येऊं शकेन."

"प्रवाहण, माझ्यावर प्रेम केल्याचा तुला पश्चात्ताप तर होत नाहीं ना?"

"प्रिये, तुझं प्रेम मला आईच्या दुधाप्रमाणं अनायासें मिळालं, व ते माझ्या आपलेपणाचं एक अंग बनलं. मी संसारी पुरुष आहे लोपा! तरी देखील तुझ्या प्रीतीचं मोल मला कळतं! मनाचा प्रवाह सदा एकसारखा असत नाही. जेव्हा केव्हा मनांत अवसाद निर्माण होतो, तेव्हा मला जीवन दुर्लभ होऊन जातं. त्यावेळीं तुझी प्रीति व तुझे सुविचार मला आपल्या हातानी वर उचलून घेतात."

"पण जेवढं तुला वर उचलायला हवं तेवढं माझ्याच्यानीं होत नाहीं याचं वाईट वाटतं मला, प्रवाहण!"

"कारण राज्य करायला मी जन्माला आलो."

"पण तेव्हा तर महाब्राह्मण बनण्याची तळमळ तुला लागलेली होती."

"त्या वेळीं मला माहित नव्हतं की मी पंचालपुरच्या (कनोज) राजभवनाचा वारस आहे म्हणून!"

"मग तूं राज्यकारभारा व्यतिरिक्त अवांतर गोष्टींत का मन घालतोस? काय गरज आहे याची?"

"म्हणजे ब्रम्ह्याला सोडून ब्रह्मा पर्यंत उड्डाण घेतलं हेच ना? पण लोपे, ही कांहीं राजकारणावेगळी वस्तु नाही. राज्याला आसरा देण्यासाठीच आमच्या पूर्वज राजांनी वशिष्ठ विश्वामित्रांना येवढं सम्मानित केलं होतं. ते ऋषी इंद्र, अग्नि आणि वरुण यांच्या नांवावर लोकांना राजाज्ञा मानायला प्रेरित करीत असत. त्या वेळचे राजे जनतेचा विश्वास संपादन करण्यासाठीं या देवतांच्या नांवावर खूप संपत्ति खर्च होणारे यज्ञ करीत असत. आज देखील आम्हीं यज्ञ करतो व ब्राह्मणांना दान-दक्षिणा

देतो. हे सारं आम्ही करतो याचं कारण जनतेनं देवतांच्या दिव्य शक्तीवर विश्वास ठेवावा आणि असं मानावं की हा गंधशालीचा भात, हा गोवत्साच्या मधुर मांसाचा रस्सा, हीं विरल वस्त्रं, आणि माणिक मोत्यांचे अलंकार यांचा उपभोग आपल्याला देवतांच्या कृपेनं मिळत आहे. "

" त्यासाठी या जुन्या देवता पुरेशा होत्या. त्यात या नव्या ब्रह्माची भर घालण्याची गरज कोणती ? "

" पिढ्या लोटल्या तरी कोणी देखील इंद्र, वरुण, ब्रह्मा या देवता प्रत्यक्ष पाहिलेल्या नाहीत. आता कित्येकाच्या मनात संदेह निर्माण होऊं लागला. "

" मग ब्रह्म काय संदेहातीत राहील ? "

" ब्रह्मस्वरूप मी असं सांगितलं आहे की त्यामुळे कोणीहि त्याला बघण्या बद्दल आग्रह धरणार नाही. जे आकाशा प्रमाणं असतं पण दिसत नाही, किंवा ऐकायला येत नाही, जे इथं तिथं सर्वत्र व्यापलेलं आहे ते बघण्याचा मुळीं प्रश्नच उद्भवत नाहीं. प्रश्न उद्भवतो साकार देवतांच्या बाबतींत ! "

" तूं सारे आकाश आकाश म्हणून सामान्यांनाच नव्हे, तर आरुणि उद्दालक यांच्या सारख्या ब्राह्मणाना देखील भ्रमांत पाडलंस, ते काय प्रजेला भ्रमांत ठेवण्यासाठींच ? "

" लोपा, तूं मला ओळखलंस, तुझ्या पासून मी काय लपवून ठेवणार ? हा राजभोग नित्य हातीं ठेवायचा म्हणजे एक गोष्ट करणं आवश्यक असतं. या संदेह निर्माण करणाऱ्यांचीच मति कुंठित करायला हवी, कारण देवता व त्यांची यज्ञपूजा यांच्या बद्दल संदेह निर्माण करणारेच आमचे अति भयंकर शत्रु होत. "

" परंतु तूं तर ब्रह्माचं दर्शन व सत्ता या बद्दल बोलत असतोस ! "

" सत्ता असली तर दर्शन पण व्हायला हवंच. पण ते इंद्रियाच्या योगानं नव्हे. इंद्रियाच्या योगें दर्शन व्हायची गोष्ट बोलली तर संदेहवादी त्याचं प्रत्यक्ष प्रमाण मागतील. म्हणूनच मी म्हणतो की त्याच्या दर्शनासाठी दुसरंच सूक्ष्मेंद्रिय असतं, व तें इंद्रिय निर्माण करण्याची मी अशीं कांही साधनं सांगतो, की लोक छप्पन्न पिढ्या भटकत राहतील आणि श्रद्धा पण कायम राखतील. पुरोहितांचीं स्थूल शस्त्रं निकामी झाली असं पाहून मी हें सूक्ष्म शस्त्र निर्माण केलं. तूं शबरांच्या जवळचीं तांब्या दगडांचीं शस्त्रं पाहिलीस, लोपा ? "

" तुझ्या बरोबर दक्षिणेतल्या जंगलात गेल्ये होत्ये, तेव्हां पाहिलीं मी ! "

" यमुनेच्या पलीकडे ! शबरांचीं तीं दगडांचीं व तांब्याचीं शस्त्रं काय आमच्या कृष्ण लोहाची (अस्सल लोखंड) बरोबरी करूं शकतील ? "

" नाहीं. "

" त्याच प्रमाणं वशिष्ठ आणि विश्वामित्र यांच्या जुन्या देवता आणि यज्ञ शबरांच्या इतकी बुद्धि असणाऱ्यांनाच काय ते संतुष्ट करूं शकतील. पण या शहाण्या संदेहवाद्यांच्या कुशाग्र बुद्धी पुढं त्यांना टिकाव धरतां यायचा नाहीं."

" मग त्यांच्या पुढं तुझं ब्रम्ह देखील फिकं पडेल. तूं बाहेर ज्ञानी ब्राह्मणांना शिष्य बनवून ब्रह्मज्ञान शिकवतोस व मी तुझ्या घरांतच तुझ्या गोष्टी असत्य व फसव्या आहेत असं म्हणत्ये"

" कारण तुला खरं रहस्य ( उपनिषद् ) ज्ञात आहे."

" ब्राम्हण ज्ञानी असून देखील त्यांना तुझं रहस्य का कळत नाहीं ?"

" तूं बघत आलीसच! कांहीं कांही ब्राह्मणांना रहस्याचा पत्ता लागला तरी देखील ते माझं हे रहस्य ( उपनिषद् ) आपल्याला फायदेशीर शस्त्र मानतात. त्यांचं पुरोहितपण, त्यांची गुरुबाजी आता लोकांना अविश्वासकारक वाटूं लागली होती. परिणामतः त्यांना त्या दक्षिणेपासून वंचित व्हावं लागलं असतं कीं जिच्यामुळं त्यांना वाहनादाखल उत्तम वडवा-रथ, उत्कृष्ट आहार, निवासाला सुंदर प्रासाद, व भोगासाठीं सुंदर दासी मिळूं शकतात."

" हा तर व्यापार झाला !"

" होय. व्यापारच, आणि तो देखील असा की त्यांत मुळी तोटयाचं भयच नाहीं. यासाठीच उद्दालका सारखे शहाणे ब्राम्हण हातांत समिधा घेऊन शिष्य होण्यासाठीं माझ्याजवळ येतात. मी देखील ब्राह्मणांचा गौरव करून उपनयन केल्याशिवाय-विधिवत् गुरु झाल्याशिवाय-त्यांना ब्रम्हज्ञान शिकवतों."

" किती निकृष्ट भावना आहे ही प्रवाहण ?"

" कबूल, पण आमच्या उद्दिष्टाच्या दृष्टीनं हे सर्वात उपयुक्त साधन आहे. वशिष्ट व विश्वामित्र यांची नौका हजार वर्ष देखील कामी पडूं शकली नाही. प्रवाहण जी नौका तयार करीत आहे ती राजे, सामंत व परधनाचा भोग घेणाऱ्यांना पुढची दोन हजार वर्ष उपयोगी पडेल. यज्ञरूपी नौका मला बळकट वाटली नाही, लोपे! – म्हणून मी ही बळकट नौका तयार केली. तिचा ब्राह्मण व क्षत्रिय यांनीं मिळून योग्य उपयोग केला तर ते ऐश्वर्याचा अक्षय भोग घेऊं शकतील. आणिक लोपे, या आकाश-ब्रह्मापेक्षां देखील मोठा असा मी दुसरा शोध लावला."

" कोणता ?"

" मरून पुन्हां परत जगांत येणं. पुनर्जन्म !"

" हें तर मोठं मजबूत जाळं दिसतं."

" आणि सर्वात अधिक उपयुक्त देखील. ज्या ज्या प्रमाणांत आम्हां सामंत, ब्राह्मण, व्यापाऱ्यांच्या जवळ अपार संपत्ति एकत्रित होऊं लागली, त्या त्या प्रमाणांत

परिणामतः साधारण प्रजा निर्धन होऊं लागली. या निर्धन कारागिरांना, शेतकऱ्यांना व दास-दासींना उत्तेजित करणारे देखील आतां दिसूं लागले. ते सांगतात–' तुम्हीं आपली कमाई दुसऱ्यांना देऊन स्वतः मात्र कष्ट करतां. ते तुम्हांला फसवायला सांगत सुटतात कीं या त्याग, कष्ट दानांच्या योगानं तुम्हीं स्वर्गात जाल. कोणी देखील मरून तें स्वर्गसुख पाहिलेलं नाही.' – याचं उत्तर हे असं आहे– 'या जगांत जे उच्चनीच भेद, लहानमोठ्या जाती, निर्धन धनिक वर्ग हे सारे पूर्वजन्मांतल्या कर्मफलामुळं!' अशा रीतीनं आम्हीं पूर्वजन्मीच्या सुकृत-दुष्कृताचं प्रत्यक्ष फळ दाखवून देतों."

"तर मग चोर देखील आपल्या चोरीच्या मालाला पूर्वजन्माची कमाई म्हणेल!"

"परंतु त्या साठींच आम्हीं आर्धापासून देवता, ऋषी व जनश्रद्धा यांची मदत घेतलेली आहे: त्यामुळं चोरीचं धन हे पूर्वजन्माची कमाई मानीत नाही. या जन्मी परिश्रम केल्याशिवाय कमावलेलं धन हे आम्ही देवतेच्या कृपेनं मिळालं म्हणून आधीं सांगत होतों पण जेव्हां देवता व त्यांची कृपा यांच्या बद्दल संदेह निर्माण होऊं लागला तेव्हां आम्हाला दुसरा नवा उपाय शोधणं जरूर होतं. ब्राह्मणांत हा उपाय शोधण्याची शक्ति उरली नाही. जुन्या ऋषींचे मंत्र व वचनं घोकण्यातच ते आयुष्याची चाळीस पंचेचाळीस वर्षे घालवितात, त्यांना कुठली एखादी नवीन गंभीर गोष्ट सुचणार?"

"पण प्रवाहण, तूं देखील घोकंपट्टीत बरंचसं आयुष्य घालवलंस?"

"फक्त सोळा वर्षे! चोविशीमध्ये मी ब्राम्हणांची विद्या पार करून बाहेरच्या जगांत आलों होतों. इथंच मला अधिक शिकायला मिळालं. राज्यकारभाराच्या अंतरंगांत शिरल्यानंतर मला आढळून आलं की ब्राम्हणानी बनवलेली जुनी नौका खिळखिळी झाली."

"म्हणून तूं ही बळकट नाव बनवलीस?'

"सत्य आणि असत्य याचा मी विचार करीत नाही, माझं लक्ष्य आहे कार्यभागावर! लोपे, जगांत पुन्हां जन्म घेऊन परत येण्याची गोष्ट आज नवी वाटते व तुला तिच्या आड दडलेला स्वार्थ दिसतो पण माझ्या ब्राह्मण चेल्यांनी ती आतांच डोक्यावर घेऊन नाचायला सुरुवात केली. पितरांचे व देवताचे रस्ते (पितृयान, देवयान) समजून घेण्यासाठीं लोक बारा बारा वर्षं गाई चारायला सिद्ध आहेत. लोपे, तूं नी मी त्यावेळीं असणार नाहीं, परंतु एक काळ असा येईल कीं त्यावेळी साऱ्या दरिद्री प्रजा या पुनर्जन्माच्या भरंवशावर जीवनांतली कटुता, कष्ट आणि अन्याय सहन करण्यासाठी तयार होतील. स्वर्ग व नरक समजावून सांगायला हा किती सोपा उपाय मी काढला, लोपे?"

"पण आपल्या पोटासाठीं शेंकडों पिढ्यांना आगींत लोटण्या सारखं होतं हें!"

"वशिष्ठ आणि विश्वामित्रांनीं पोटासाठींच वेद रचले, उत्तर पंचालचा राजा दिवोदास यानं कांहीं शबरदुर्ग जिंकले म्हणून त्याच्या विजयावर कविताच कविता रचल्या. * पोटाची व्यवस्था लावणं कांही वाईट नसतं, आणिक आम्ही जेव्हां आमच्याच नव्हे, तर आमच्या मुला नातवाच्या, भाताबंदांच्या पोटांची सोय हजारो वर्षापर्यंत करूं शकतो, तेव्हां तर आम्ही शाश्वत यशाचे भागीदार बनतों. प्रवाहण असं कार्य करीत आहे की जे पूर्वज ऋषी करू शकले नाहीत, जे धर्माच्या नांवावर अन्नार्जन करणारे ब्राह्मण देखील करूं शकले नाहींत"

"तूं फार निष्ठुर आहेस, रे प्रवाहण!"

"पण मी माझं कार्य योग्यतापूर्वक पार पाडलं!"

– ३ –

प्रवाहण मेला. पण त्याचा ब्रह्मवाद, पुनर्जन्मवाद, किंवा पितृयानवाद यांची विजयदुंदुभि सिंधु पासून सदानीरा (गंडकी) पर्यंत दुमदुमत होती. यज्ञांचा प्रचार अजून देखील कमी आलेला नव्हता कारण ब्रह्मज्ञानी यज्ञ करण्याच्या बाबतीत विशेष उत्साह दाखवीत असत. क्षत्रिय प्रवाहणाने काढलेल्या ब्रह्मवादांत ब्राह्मण अत्यंत दक्ष झालेले होते आणि त्यांतल्या त्यात याज्ञवल्क्याने तर खूपच ख्याति मिळविली कुरुपांचालांत–ज्या भूमीत एके काळी मंत्रांचे प्रणेते व यज्ञांचे प्रतिष्ठाते वशिष्ठ, विश्वामित्र आणि भारद्वाज होऊन गेले त्या भूमीत–याज्ञवल्क्य व त्याचे सहकारी ब्रह्मवादी आणि ब्रह्मवादिनी याचा खूपच गाजावाजा होऊं लागला. ब्रह्मवाद्यांची परिषद बोलावणाऱ्यांचे यज्ञ करणाऱ्यापेक्षा देखील अधिक नाव होऊं लागले. यामुळेच राजेलोक राजसूयादि यज्ञाच्या प्रसंगीं अशा वेगळ्या परिषदा बोलावीत असत आणि वादात जिंकणाराना पुरस्कार म्हणून हजारो गाई, घोडे आणि दासदासी देण्यांत येत. या ब्रह्मवाद्यांना विशेषत: दासी, त्या देखील राजाच्या अंत:पुरात पाळलेल्या, अधिक प्रिय वाटत असत

याज्ञवल्क्यानें किल्येक परिषदां मधून अजिंक्य पत्रें घेतलीं. आतां त्यानें विदेह (तिरहूत) राज जनक याच्या परिषदेमध्ये विजय मिळविला, व त्याचा शिष्य सोमश्रवा याने हजार गाई मिळविल्या याज्ञवल्क्यानें विदेहांतून कुरु पर्यंत या हजार गाई वळवून नेण्याची दगदग कां म्हणून करावी? त्यानें त्या तेथल्याच ब्राम्हणांना वांटून टाकल्या; त्यामुळें ब्रह्मवादी याज्ञवल्क्याची कीर्ति झाली. मात्र हिरण्य सुवर्ण, दासदासी आणि अश्वतरी (खेंचरी) रथ यांनीं किल्येक नावा लादून तो कुरु देशी परतला.

---

* त्वं तदुक्थमिन्द्र वर्हणा कः प्रयच्छता सहस्रा शूर दर्षि। अव गिरेर्दासं शंबरं हन् प्रावो दिवोदासं चित्राभिरुती॥ ऋग्वेद ६।२६।२५.

साठ वर्षांपूर्वी प्रवाहण मेला तेव्हां याज्ञवल्क्याचा जन्म देखील झालेला नव्हता. मात्र शंभर वर्षांच्यावर वय झालेली लोपा पंचालपुरा (कनोज) बाहेर असलेल्या राजोद्यानांत अजून देखील राहात होती. उद्यानांतल्या आम्र-कदली-जंबू वृक्षांच्या छायेंत राहणेंच तिला अधिक आवडत असे. आयुष्यभर तिनें प्रवाहणाचे दोष काढून त्यांना विरोध केला होता, पण आतां या साठ वर्षांत ती त्याचे दोष विसरून गेली होती. फक्त तिला प्रवाहणाच्या प्रेमाच्या काय त्या आठवणी येत. अजून देखील त्या वृद्धेच्या डोळ्यांत तेज होतें, तिची प्रतिभा अजून देखील फारशी धूमिल झालेली नव्हती, परंतु तिला ब्रह्मवाद्यांच्या बद्दल मात्र अजून देखील चीड वाटत असे. त्या दिवशीं पंचालपुरांत गार्गी नांवाची ब्रह्मवादिनी आली होती. तिला मोठ्या मान मरातबानें राजोद्याना जवळच्या एका बागेंत रहायला जागा देण्यांत आली. जनकाच्या येथल्या परिषदेत याज्ञवल्क्यानें तिला पराभूत करण्यासाठीं जी फसवणूक केली, तिचा विसर अजूनहि गार्गीला पडत नव्हता. "या पुढं तूं प्रश्न विचारशील तर तुझं मस्तक गळून जाईल, गार्गी!"—असें म्हणणें म्हणजे कांहीं वादाची रीत नव्हे. ज्यांचे हात रक्ताने माखलेले असतात अशा उग्र-लोहितपाणींनाच हें बोलणें शोभलें असतें, असें गार्गीला वाटत होतें.

गार्गी लोपेच्या पितृकुलांतली होती. तिच्या ब्रह्मवादाला जरी लोपेचा विरोध होता, तरी पण त्यांचा सुपरिचय होता. नुकतेंच वादाच्या प्रसंगीं याज्ञवल्क्यानें जें हलकट अस्त्र तिच्या विरुद्ध वापरलें होतें, त्याच्यामुळे गार्गी जळत होती. म्हणूनच जेव्हां ती आपल्या आते पणजीला भेटायला गेली तेव्हां तिच्या विचारांत बरेंचसें परिवर्तन झालेले होतें. लोपेनें भेटायला आलेल्या गार्गीच्या कपाळाचे व डोळ्यांचे मुके घेतले, तिला हृदयाशीं कवटाळले आणि मग प्रकृतीची चौकशी केली. गार्गी सांगूं लागली—

"आत्या, मी विदेहाला गेल्यें होत्यें."

"मल्लयुद्धासाठी बेटा?"

"होय, मल्लयुद्धच म्हणायचं! या ब्रह्मवाद्यांच्या परिषदा मल्लयुद्धांइतक्याच निपटाऱ्या आहेत. मल्लांच्या प्रमाणं यांत देखील प्रतिपक्षाला वाटेल त्या कपटाघाताच्या डावपेचानं चीत करण्याची बुद्धि शिरलेली आहे."

"तर मग कुरु पंचालांतले बरेंचसे ब्रह्मवादी आखाड्यांत उतरले असतील?"

"तर!—आतां कुरु पंचाल, या ब्रह्मवाद्यांचा एक बालेकिल्ला बनूं पाहात आहे."

"माझ्या देखत या ब्रह्मवादाची एक लहानशी ठिणगी, ती देखील पापी बुद्धीनें, माझ्या प्रवाहणानं पेटवली होती. पण आतां तिचा वणवा होऊन कुरु पंचालच काय पण विदेहापर्यंत ज्वाला पोंचूं लागलेल्या आहेत."

"आत्या, तुझ्या बोलण्यांतलं सार मला थोडं थोडं आतां पटूं लागलंय.

वस्तुतः हा भोगार्जनाचा एक राजमार्ग दिसतो. विदेहांत याज्ञवल्क्याला लक्षावधि संपत्ति प्राप्त झाली, आणि दुसऱ्या ब्राह्मणांना देखील खूप धन मिळालं ! ”

“ यज्ञापेक्षां देखील अधिक फायदा देणारा व्यापार आहे हा, बेटा. राजे व ब्राह्मण यांच्या भोगप्राप्तीसाठीं तयार केलेली ही बळकट नौका आहे असं माझ्या पतीचं म्हणणं होतं. असं, मग याज्ञवल्क्यानं जनकाच्या परिषदेंत विजय मिळवला तर ? आणि तूं बोलली देखील नाहींस ? ”

“ बोलायचं नसतं, तर इतक्या दूर गंगेंतून नौकेनं प्रवास करायची गरजच काय होती ? ”

“ नौकेला चोरां चिलटांचा तर उपद्रव झाला नाहीं ना ? ”

“ कसा होईल आत्या ? व्यापाऱ्यांच्या मोठमोठ्या सार्थां(जहाजां)मध्यें लढवय्यांचा बंदोबस्त असतो. एकट्या दुकट्यानं आपले प्राण संकटांत टाकण्याइतके आम्हीं ब्रह्मज्ञानी मूर्ख नसतों. ”

“ याज्ञवल्क्यानं सगळ्यांचा पराभव केला ? ”

“ त्याला पराभव म्हणतां येणार नाहीं ! ”

“ कां बरं ? ”

“ कारण प्रश्नकर्ते याज्ञवल्क्याचं उत्तर ऐकून गप्प बसले. ”

“ तूं देखील ? ”

“ होय, मी देखील ! परंतु मला त्यानं वाद करून गप्प बसवलं नाहीं; बकवाद करून ! ”

“ बकवादानं ? ”

“ होय, मी ब्रह्माच्या बाबतींत त्याला प्रश्नावर प्रश्न विचारले आणि याज्ञवल्क्याला इतका अडवला कीं त्याला उत्तर सुचेना. त्या वेळीं त्यानं असे शब्द उच्चारले कीं, त्याची मला कधीं कल्पना देखील आली नसती. ”

“ कोणते बेटा ? ”

“ त्यानं मला प्रश्नाचं उत्तर विचारण्याची मनाई केली, आणि तो म्हणाला, ‘ या पुढं प्रश्न विचारशील तर, गार्गी, तुझं मस्तक देहापासून गळून पडेल.’ ”

“ बेटा, तुला याची कल्पना नसेल ! पण मला सारं कांहीं शक्य वाटत होतं. याज्ञवल्क्यानं प्रवाहणचं पक्कं शिष्यत्व शाबीत केलं. प्रवाहणचा मिथ्यावाद त्यानं पूर्णत्वाला नेऊन पोंचवला. बरं झालं गार्गी, तूं त्याला पुढं प्रश्न विचारला नाहींस ! ”

“ हे तुला कसं कळलं आत्या ? ”

“ तुझं मस्तक धडावर शाबूत राहिलेलं पाहत्ये, या वरून ! ”

" तर काय ? तुला असं खरंच वाटतं आत्या कीं मी प्रश्न विचारतांच माझं मस्तक गळून पडलं असतं ? "

" अलबत ! पण तें याज्ञवल्क्याच्या ब्रह्मबळानं नव्हे, तर जशीं इतरांची गळून पडतात तसं ! "

" भलतंच कांहीं तरी सांगत्येस आत्या तूं ! "

" तूं अजून पोरगी आहेस, गार्गी ! तुला वाटतं हा ब्रह्मवाद म्हणजे केवळ मनाचं उड्डाण, मनाची कल्पना ! नाही ग, त्याच्या पाठीमागं राजा-ब्राह्मणांचा मोठा आपमतलबीपणा दडलेला आहे ज्या वेळी या ब्रह्मवादाचा जन्म झाला, त्या वेळी त्याचा जन्मदाता माझ्या बाहुपाशांत झोपलेला होता. हा ब्रह्मवाद राजसत्ता आणि ब्राह्मणसत्ता दृढ करण्याचं एक प्रभावी साधन आहे. याच्या बळाची तुलना केवळ कृष्ण-लोहाचं खड्ग आणि उग्र-लोहितपाणि योद्धा यांच्या बरोबरच होऊं शकेल ! "

" आत्या, मला नव्हतं असं वाटलं ! "

" पुष्कळांना हे समजत नाहीं. जनक वैदेह याला देखील हे रहस्य समजत असावं असं मला वाटत नाही परंतु याज्ञवल्क्याला ते माहित आहे माझ्या प्रवाहणाला तें माहित होतं देवलोक, पितृलोक, यक्ष, ब्रह्मवाद किंवा कोणतीहि देवता यांच्यावर प्रवाहणचा विश्वास नव्हता. त्याचा विश्वास होता फक्त भोगावर; त्यानं आपल्या आयुष्याचा क्षण नि क्षण भोगांत घालवला. मृत्यूच्या तीन दिवस आधी विश्वामित्राच्या कुळांतली एक सुवर्णकेशी पुरोहित कन्या राणीवशांत दाखल झाली. जगायची आशा नव्हती तरी देखील त्या वीस वर्षाच्या सुंदरीशी तो प्रेम-चेष्टा करीत होताच. "

" गाई दान करून विदेह-राजानं दिलेल्या सुंदर दासी मात्र याज्ञवल्क्यानं आपल्या बरोबर आणल्या "

" मी आतांच सांगितलं ना ? तो प्रवाहणचा पक्का चेला आहे ! बघून घे हा त्याचा ब्रह्मवाद ! आणिक हे सारं ढोंग तूं दुरून बघितलंस माझ्या सारखं जवळून बघायला मिळालं असतं, तर कळलं असतं तुला ! "

" तर काय आत्या, मी प्रश्न विचारला असता तर खरंच माझं मस्तक गळून पडलं असतं ? "

" निस्संशय, पण ते याज्ञवल्क्याच्या ब्रह्मतेजानं नव्हे; या दुनियेत कित्येकांची डोकीं गुपचूप मारली जातातच ना ? "

" माझं तर डोकं फिरायला लागलं, आत्या ! "

" आतां ?– आणि माझं डोकं तर तेव्हांपासूनच फिरायला लागलं होतं; जेव्हां मला कळायला लागलं तेव्हांपासून बघत्येय मी हें सारं ढोंग, ही वंचना !

प्रजेच्या निढळाची कमाई फुकटांत गडप करण्यासाठी शोधलेले मार्ग आहेत हे राजवाद, ब्राम्हणवाद आणि यज्ञवाद ! जो पर्यंत प्रजा स्वतः शुद्धीवर येत नाही, तों पर्यंत त्यांना या जाळ्यांतून कोणींहि सोडवूं शकणार नाहीं. आणि त्यांना शुद्धीवर येऊं देणं या आपमतलब्यांना कसं आवडेल ? "

"या वंचनेचा तिटकारा करण्याची प्रेरणा आम्हांला मानवहृदय देणार नाही कां ? "

" खात्रीनं देईल बेटा ! आणि त्याचीच काय ती मला आशा वाटते. "

---

[ आजच्या पूर्वी १०८ पिढ्या आधींची ही एक कथा आहे. त्यावेळीं वरच्या अंतर्वेदीमध्ये उपनिषदान्तर्गत ब्रम्हज्ञानाची रचना व्हायला सुरुवात झालेली होती. त्याकाळीं उद्यान आणि शुद्ध लोखंड यांचा प्रचार भारतांत होऊन चुकला होता. ]

# ९— बंधुल मल्ल

( इ. स. पूर्वी- ४९० )

— १ —

वसंत यौवनांत आलेला होता. वृक्षांची जुनी पानें गळून त्यांना पालवी फुटूं लागली होती. शालवृक्ष आपल्या श्वेत पुष्पांनीं वनाला सुगंधित करीत होते. सूर्याचीं किरणें प्रखर व्हायला अजून अवकाश होता. घनदाट शालवनांतील पाचो-ळयावर मानव चालत असल्याचे पदरव ऐकायला येत होते. एका मोठया वारुळाजवळ उभें राहून दोन तरुण तरुणी त्याला निरखीत होते. तरुणीच्या अरुण गौर मुखावर रुळणारे लांब कुरळे निळे केश अस्ताव्यस्त रुळलेले असून ते तिच्या सौंदर्यांत भर टाकीत होते. तरुणाने आपला सबळ बाहू तरुणीच्या खांद्यावर ठेवून म्हटलें, " मल्लिके, वारुळ बघण्यांत इतकी कां गढून गेलीस ? "

" बघितलंस, हें दोन पुरुष उंच आहे. "

" होय, सामान्य वारुळापेक्षा मोठं आहे. पण याच्याहि पेक्षां मोठीं वारुळं अस-तात. तुझ्या मनांत येत असेल, खरंच कां पाऊस पडला म्हणजे यातून जाळ आणि धूर निघतो ? "

" नाहीं, बहुधा ती खोटी दंतकथा असावी. पण मुंग्यां सारखे लहान कीटक आणि त्यांहूनहि कोमल असलेल्या लालमुखी पांढऱ्या वाळवी हीं येवढालीं वारुळं बनावितात अं ? "

" माणसांनीं बांधलेले महाल त्यांच्या शरीरांच्या प्रमाणानं पाहिलं तर किती तरी पटीनं अवाढव्य असतात. हे कांहीं एका वाळवीचं काम नाहीं, लाखों वाळवींनीं मिळून हें बांधलं. मानव देखील असेच एक मेळानं आपली कामं करतात. "

" म्हणूनच तर मी येवढ्या उत्सुकतेनं बघत होत्यें. याची आपसांत किती तरी एकी दिसते. हे अगदीं क्षुद्र जीव समजले जातात, पण लाखांनीं आपला समुदाय करून येवढालीं वारुळं बांधून काढतात. मला वाईट वाटतं याचं कीं आमचे मल्ल या वाळवींपासून कांहींच धडा घेत नाहींत. "

" समुदाय करून राहण्यांत मानव इतर प्राण्यांपेक्षां मागासलेला नाहीं. उलट मानव सर्वश्रेष्ठ प्राणी बनला याचं कारण ही सामुदायिक राहणीच. त्यामुळेंच तो

आज येवढालीं नगरं, निगमं ( कसबे ), गावं वसवण्यांत यशस्वी झाला आहे; त्यामुळेंच त्याची जलयानं अपार सागरांच्या पल्याड जाऊन द्वीप द्वीपांतरांतली संपत्ति आणतात; त्यामुळेंच त्याच्या पुढं हत्ती, गेंडे, सिंह, माना वांकवतात. ''

'' परंतु त्याची ईर्ष्या ? ती ईर्ष्या नसती तर किती तरी बरं झालं असतं ! ''

'' तुला मल्लाच्या ईर्ष्येची आठवण झाली ? ''

'' होय; कां बरं त्यांनी तुझी ईर्ष्या करावी ? मी तुला कधी कुणाची निंदा करताना ऐकलं नाही, कधी कुणाचं वाईट करताना पाहिलेलं नाही. तुझ्या वागणुकीनं दास कर्मकर देखील किती प्रसन्न होतात, हे साऱ्याना माहिती आहे. तरी देखील बरेच संभ्रांत मल्ल तुझा मत्सर करतातच ! ''

'' याचं कारण त्याना माझी सर्वप्रियता दिसते. आणि गणामध्ये सर्वप्रिय व्यक्तींचा मत्सर करणारेच अधिक सांपडतात, याचं कारण सर्वप्रियतेमुळं इथं पुरुषाला गणप्रमुख होतां येतं. ''

'' पण तुझे गुण पाहून त्यांना प्रसन्नता वाटायला हवी. मल्लांमधल्या दुसऱ्या कुणाला तक्षशिलेत इतका मान सन्मान मिळाल्याचं आजवर ऐकिवांत नव्हतं. आज देखील राजा प्रसेनजित् कोसलावरून तुला बोलावण्यासाठीं लेखा(पत्रा)मागून लेख पाठवीत आहे, हे काय त्यांना माहित नाही ? ''

'' आम्ही तक्षशिलेंत दहा वर्षं एकत्र शिकत होतो. त्याला माझी योग्यता माहीत आहे. ''

'' आणि ती कुसीनाराच्या मल्लाना माहीत नाही, असं मी कधीच कबूल करणार नाही. महा-लिच्छवि जेव्हां इथं तुझा पाहुणा म्हणून आलेला होता, तेव्हां त्याच्या तोंडून तुझी वाखाणणी बऱ्याचशा कुसीनारावाल्यांनीं ऐकलेली आहे. ''

'' परंतु मल्लिके, माझा मत्सर करणारे माझे गुण ओळखूनच तसं करतात. गुणी आणि सर्वप्रिय होणं हेच गणांमध्ये मत्सराचं मोठ कारण ठरतं. मला स्वतःचं कांहींच वाटत नाही, मल्लिके ! पण वाईट याचंच वाटतं की याच मल्लांच्या सेवेसाठी मी येवढ्या परिश्रमानं तक्षशिलेत शस्त्रविद्या शिकलो. आज वैशालीच्या लिच्छवींना कोसल आणि मगध आपल्या बरोबरीचे मानतात परंतु कुसीनारा कोसल राजाला आपल्या पेक्षां श्रेष्ठ मानते. मी योजलं होतं की आम्ही पावा, अनूपिया, कुसीनारा इत्यादि नऊ मल्लगणांचे स्नेह संबंध दृढ करून लिच्छवींप्रमाणं आपला एक मजबूत गणसंघ तयार करूं. नऊ मल्लांची एकजूट झाल्यावर प्रसेनजित् आमच्यावर वांकडी नजर टाकू शकणार नाहीं. याचीच काय ती मला काळजी वाटते. ''

बंधुलाची गौर मुखकांति उतरून गेलेली पाहून मल्लिकेला वाईट वाटलें व तिनें

त्याचे लक्ष दुसरीकडे वेधण्यासाठी म्हटले, "तुझे साथीदार शिकारीसाठीं सज्ज झालेले असतील प्रिया !-मी देखील येणार हं ! घोड्यावर की पायींच ?"

"गव्याची शिकार घोड्यावरून नीट करतां येत नाहीं मल्लिके ! आणिक शिवाय हें घोट्यापर्यंत लोंबणारें अंतरवासक (कमरे भोवती गुंडाळलेले वस्त्र), हे तीन हात पर्यंत वाऱ्यावर फडफडणारें उत्तरासग (अंगावरची चादर), आणि हे काळ्या नागिणींच्या प्रमाणें दिसणारे, अस्ताव्यस्त वाऱ्यावर भुरभुरणारे केश, या अशा वेषांत का तूं शिकार करणार आहेस ?"

"तुला आवडत नाहींत माझे केश ?"

"आवडत नाहींत ?" मल्लिकेच्या ओठांचे चुंबन घेऊन तो म्हणाला, "मल्लिका नांवाशीं ज्या ज्या वस्तू निगडित झालेल्या आहेत त्या त्या मला कशा आवडणार नाहीत ? पण शिकारीच्या वेळी जंगलांत झाडां झुडपां मधून धांवावं लागतं."

"तर मग मी तुझ्याच देखत यांची नीट व्यवस्था लावते."- असे म्हणून मल्लिकेने अंतरवासक कमरेला कसून घट्ट बांधले, केश सावरून त्यांचा डोक्यावर जुडा बांधला आणि ती त्याला म्हणाली, "माझं उत्तरासंग डोक्यावर फेट्या प्रमाणं बांधून दे, बंधुल !"

फेटा बांधणें झाल्यावर बंधुलानें कचुकीतून वर उठून आलेले तिचे लहान बेल-फळांबरोबर स्पर्धा करणारे स्तन अर्धवट कुरवाळून म्हटले, "आणि हे तुझे स्तन ?"

"सगळ्याच मल्ल कुमारिकांना स्तन असतात !"

"परंतु हे किती सुदर दिसतात ?"

"कोणी हिरावून का नेणार आहे त्याना ?"

"तरुणांची दृष्ट लागेल !"

"यांच्यावर बंधुलाची मालकी आहे, हे त्यांना माहित आहे."

"नाही, पण तुझी हरकत नसेल तर मी हे आंतून आपल्या उत्तरीयानं कसून बाधतो."

"कपड्यां मधून दिसतात तेवढ्यानं तुझी तृप्ति होत नाही तर !" मल्लिकेने स्मित-पूर्वक त्याचें मुख चुंबून म्हटले.

बधुलाने तिची कंचुकी काढून तिच्या शुभ्र स्फटिकाप्रमाणें दिसणाऱ्या वक्षावरील ते आरक्त गोल स्तन आपल्या उत्तरीयानं बांधले. मल्लिकेनें पुन्हां आपली कंचुकी घातली आणि ती म्हणाली, "आतां तरी तुझ्या मनांतली भीति गेली ना, बंधुल ?"

"बंधुलाला आपल्या वस्तू बद्दल कसलीच भीति वाटत नाहीं, प्रिये ! आतां धांवतांना हे जास्ती थलथलणार पण नाहींत."

सगळेच मल्ल तरुण तरुणी शिकारी वेशात या युग्माची प्रतीक्षा करीत होते.

आणि हे येतांक्षणीच आपापलीं धनुष्ये, खड्ग, भाले सावरून सान्यांनी कूच केले. गव्याचे दुपारचे विसांव्याचे स्थान एकाला माहीत होते. त्याने दाखवलेल्या वाटेनें लोक जाऊं लागले. एका मोठ्या वृक्षाच्या सावलीत गव्यांचा कळप स्वस्थ करीत बसलेला होता कळपाचा म्होरक्या नीळ उभारलेले कान मागे पुढे ताणून कानोसा घेत पाहरा करीत होता. मल्लांचे दोन भाग झाले एक आपली शस्त्रास्त्रे सावरून एका बाजूला वृक्षाच्या आडोशाने दबा धरून बसला आणि दुसरा दोन तुकड्यांमध्ये विभागून पिछाडी कडून घेरा द्यायला निघाला. या तुकड्या ज्या दिशेला पुन्हां एकत्र भेटायच्या होत्या तिकडूनच वारा वाहात होता. नीळ अजून देखील आपली हरणाच्या-सारखी तोकडी शेपटी हालवीत होता. दोन्ही तुकड्या एकत्र होण्यापूर्वीच बाकीचे गवे उठले आणि नाकपुड्या फुगवून, कान पुढे उभारून त्याच एका दिशेकडे अस्थिर-पणे पहात राहिले त्याना क्षणभरातच संकटाचा संशय आला आणि वारा वाहत होता त्या दिशेने त्यानी नीळाच्या पाठोपाठ पळायला सुरवात केली. त्यानी अजून संकट काही प्रत्यक्ष पाहिलेले नव्हते म्हणूनच मधून मधून ते मागे वळून बघायला थाबत असत. दबा धरून बसलेल्या शिकान्याच्या जवळ येऊन ते पुन्हा एकवार मागे वळून बघायला थाबले न थाबले तोच कित्येक धनुष्ये टंकारली. बंधुलाने नीळाच्या काळजावर अचूक निशाण साधले. मल्लिका आणि इतर मंडळी यानी देखील त्याच्या-वर नेम धरले होते पण बंधुलाचा बाण हुकता असता तर तो नीळ काहीं हाती लागला नसता हे मात्र निश्चित! नीळ जागच्या जागी कोसळला. कळपातले इतर पशु पागापाग होऊन निराधन गेले. बंधुलाने जवळ जाऊन पाहिले, नीळ शेवटचे आचके देत होता. ठिबकणाऱ्या रक्ताच्या थेंबावरून शिकान्यानी दोन गव्याचा माग काढला आणि त्यापैकी एक त्याना कोसभर अंतरावर जमिनीवर पडलेला आढळला. या सफलतेमुळे आजच्या वनभोजनात आनंदी आनंद वाटूं लागला

काही जण लाकडे पेटवून निखाऱ्याचा मोठा आहाळा करण्यात गुंतले तर मल्लिनी पत्रावळी तयार करूं लागल्या. काही पुरुषानी गव्याला उचडून त्याच्या मासाचे तुकडे कापायला प्रारंभ केला. सर्वाआधी त्याच्या पुढे निखाऱ्यात भाजलेले काळीज आणि सुरेचे चषक आले. बंधुलाचे दोन्ही हात मासाचे तुकडे करण्यात गुंत-लेले असल्यामुळें मल्लिकेने आपल्या हाताने त्याला भाजलेल्या तुकड्याचा घास दिला आणि त्याच्या ओठाशी सुरेचा चषक लावला.

अजून मास शिजायचे होते, तोच संध्याकाळ देखील झाली. लाकडाच्या धग-धगणाऱ्या विस्तवाच्या ज्वालाचा लाल प्रकाश पुरेसा होता, त्या प्रकाशांत मल्लांचें नृत्य-गायन सुरू झाले. कुसीनाराच्या सुंदरतम तरुणीने—मल्लिकेने—शिकारी वेशांतच आपल्या नृत्यकौशल्याची कमाल करून दाखविली. अवध्या जंबुद्वीपाचें मोल असलेल्या

त्या नारीरत्नाचा अधिकार बंधुलाला मिळाला म्हणून त्याचे दोस्त त्याची वाहवा करूं लागले.

– २ –

कुसीनाराच्या संस्थागारांत ( प्रजातंत्र-भवनांत ) आज खूप गर्दी होती. गण-संस्थेचे ( पार्लमेंट ) सारे सभासद भवनांत बसलेले होते कितीतरी स्त्रीपुरुष प्रेक्षक बाहेरच्या मैदानांत उभे होते भवनाच्या एका टोकाला एका विशेषस्थानी गणपति बसले होते. त्यानीं सभासदांकडे गौरवाने बघत उभे राहून म्हटलें, " भन्ते ( पूज्य ) गण, ऐका; आज ज्या कार्यासाठीं आपला हा सन्निपात ( बैठक ) झालेला आहे ते मी गणांना निवेदन करतो. आयुष्मान् बंधुल तक्षशिलेवरून युद्धविद्या शिकून मल्लांची गौरववृद्धि करीत परतला. त्याचं शस्त्रनैपुण्य कुसीनारा बाहेरच्यांना देखील माहित आहे. त्याला इथं येऊन चार वर्षं झालीं. मी गणांची लहान मोठी कार्यं माझ्या अधिकारांत त्याच्यावर सोंपवलीं व त्यानं प्रत्येक काम अत्यंत तत्परतापूर्वक व सफलतापूर्वक बजावलं. आतां गणानीं त्याला एक स्थायीपद–उपसेनापतीचं पद–द्यावं हीच ज्ञप्ति ( सूचना ) आहे.

" भन्ते गण, ऐका; गण आयुष्मान् हा बंधुल याला उपसेनापतिपद देत आहे. ज्या आयुष्मानाला हें मान्य असेल त्यानं गप्प बसावं, ज्याला अमान्य असेल त्यानं बोलाव. "

" दुसऱ्यांदां, भन्ते गण, ऐका; गण आयुष्मान् हा बंधुल याला उपसेनापतिपद देत आहे. ज्या आयुष्मानाला हें मान्य असेल त्यानं गप्प बसावं, ज्याला अमान्य असेल त्यानं बोलावं. "

" तिसऱ्यांदां, भन्ते गण, ऐका; गण आयुष्मान् हा बंधुल याला उपसेनापतिपद देत आहे. ज्या आयुष्मानाला हे मान्य असेल त्यानं गप्प बसावं, ज्याला अमान्य असेल त्यानं बोलावं. "

आतां मात्र एक सभासद रोजमल्ल उत्तरासंग बाजूला करून आपला उजवा खांदा उघडा ठेवीत उभा झाला. गणपति म्हणाले, " आयुष्मान् कांहीं बोलायचं आहे का, बोल तर ! "

रोजमल्ल म्हणाला, " भन्ते गण, ऐका; मी आयुष्मान् बंधुल याच्या योग्यतेच्या बाबतींत संशय घेत नाहीं. पण त्याला उपसेनापति करायला खास कारणानं विरोध करतों. आमच्या गणाचा नियम आहे कीं कोणालाहि उच्चपद देण्यापूर्वी त्याची परीक्षा घेण्यांत यावी. मला वाटतं, आयुष्मान् बंधुल याला देखील तो नियम लागू करण्यांत यावा. "

रोजमल्ल बसल्यावर दोन तीन सभासदांनीं देखील हाच मुद्दा उपस्थित

केला. कांहीं सभासदांनीं परीक्षेची आवश्यकता नाही, असे प्रतिपादन केले. शेवटीं गणपति म्हणाले--

"भन्ते गण ! ऐका. आयुष्मान् बंधुल याला उपसेनापति बनवायच्या बाबतींत गणांत थोडासा मतभेद दिसतो. म्हणून छन्द (मते) घेण्याची आवश्यकता वाटते. शलाका-ग्राहक छन्द-शलाका (मतनिदर्शक लांकडी चकत्या) घेऊन तुमच्या जवळ येत आहेत. त्यांच्या एका हातांतल्या परडींत लाल शलाका आहेत व दुसरींत काळ्या; लाल शलाका होकारार्थी व काळ्या नकारार्थी. जे आयुष्मान् रोज प्रमाणंच मूळ-ज्ञप्तीला विरोधी असतील त्यांनी काळी शलाका घ्यावी आणि मूळ ज्ञप्तीचा स्वीकार कर-णाऱ्यांनीं लाल घ्यावी."

शलाका-ग्राहक छन्द-शलाका घेऊन एकेका सदस्याजवळ गेले सगळ्यांनी आपापल्या इच्छेनुसार एकेक शलाका उचलली. ते परत आल्यावर गणपतीने उर-लेल्या शलाका मोजल्या. लाल शलाका अधिक होत्या. काळ्या कमी ! याचा अर्थ असा की काळ्या शलाका अधिक लोकानी उचलल्या. गणपतीने घोषित केले—

"भन्ते गण ! ऐका. काळ्या छन्द-शलाका अधिक उचलण्यांत आलेल्या आहेत. या मुळं मी असं मानतो की गण आयुष्मान् राजमल्ल याच्याशी सहमत आहे. आता आयुष्मान् बंधुल याची परीक्षा कोणत्या रीतीनं घेण्यांत यावी याचा गणानं निश्चय ठरवावा."

बऱ्याचशा वादविवादानंतर आणि छन्द-शलाका उचलून निर्णय केल्यावर असे ठरले की बंधुल मल्ल याने लांकडाचे सात खुंटे एका दमात तलवारीने कापून काढा-वेत. या साठी सातवा दिवस निश्चित करून सभा विसर्जन झाली.

सातव्या दिवशी कुसीनाराच्या मैदानांत स्त्री पुरुषांचा खूप जमाव गोळा झाला. मल्लिका पण तेथे हजर होती. जरा जरा अंतरावर टणक लांकडाचे सात खुंटे रोवलेले होते. गणपतीने आज्ञा देतांच बंधुलानें तरवार उचलली. सारी जन मंडळी श्वास रोखून पहात होती. बंधुल मल्लाच्या त्या सुदृढ हातांतले ते लांब सरळ तरवारीचें पातें पाहतांच प्रेक्षकांना त्याच्या यशाची निश्चित खात्री वाटू लागली. बंधुलाची विजेसारखी लपलपणारी व लखलखणारी तरवार वर खालीं होतांना त्यांना दिसूं लागली. पहिला खुंटा सप्पकन कापला; हा दुसरा; हा तिसरा; हा चवथा; पांचवा आणि—सहावा खुंटा कापतांना बंधुलाच्या कानीं झन्न असा आवाज पडला, त्याच्या कपाळावर आंठ्या पडल्या, आणि त्याचा उत्साह थंडावला. बंधुलाची तलवार सातव्या खुंट्या-च्या शेवटच्या भागावर आदळायच्या आधीच थांबली. बंधुलानें चटदिशीं एकवेळ साऱ्या खुंट्यांच्या टोकांवरून नजर फिरवली. त्याचें सर्वांग थरथरत होते; तोंड रागानें तांबडेंबुंद झालें होतें; पण तो मुकाट्यानें उभा होता.

गणपतीनें घोषित केलं, "सातव्या खुंट्याचा छेद होऊं शकला नाही." लोकांना बंधुलाबद्दल हळहळ वाटली.

घरीं आल्यावर मल्लिकेनें त्याचा तो तांबडाबुंद गंभीर चेहरा पाहिला आणि ती आपली उदासीनता लपवून त्याचें सांत्वन करूं लागली. बंधुल म्हणाला, "मल्लिका, माझ्या बाबतींत भयंकर कपट करण्यात आलं. वाटलं नव्हतं मला असं करतील म्हणून!"

"काय झालं प्रिया?"

"एका एका खुंट्यात लोखंडाचे खिळे ठोकलेले होते. पाचव्या खुंट्यापर्यंत मला काहीहि कळलं नव्हतं. सहावा कापताना झन्न असा आवाज कानीं पडला. मला कपटाचा सुगावा लागला. मी जर तो आवाज ऐकला नसता तर सातवा खुंटा देखील साफ कापून काढला असता; पण माझं मन क्षुब्ध झालेलं होतं."

"हे असलं कसलं कपट? हा तर तसं करणाऱ्यांचा मोठा नीचपणा दिसतोय!"

"कुणी केलं हे, ते आम्हांला कळणं शक्य नाही. राजवर माझा मुळीच राग नाही. त्याचं म्हणणं अगदी वाजवी होतं आणि शिवाय त्याला गणातल्या बहुसंख्य सभासदांनी पाठिंबा पण दिलेला होता परंतु मला राग येतो तो याचा की कुसीनारात माझ्याशी स्नेहभावानं वागणाऱ्याचा अभाव आहे."

"तर काय बंधुल मल्लाला कुसीनाराचा राग आला होय?"

"कुसीनारा माझी माता आहे, इथंच माझं पालन-पोषण झालं! तरी पण मी आता कुसीनारांत रहाणार नाही."

"कुसीनारा सोडून जाणार?"

"होय आतां कुसीनाराला बंधुल मल्लाची गरज उरलेली नाही."

"मग कुठं चलायचं आपल्याला?"

"मल्लिके, तूं येणार माझ्या बरोबर!" बंधुलाचें मुख प्रफुल्लित झालें.

"अगदी छायेप्रमाणं, माझा बंधुल तो!" —मल्लिकेनें त्याच्या लाल डोळ्यांचे मुके घेत म्हटलें. त्यातली रुक्षता चटकन मावळली."

"मल्लिके, तुझे हात इकडे कर." तिचे हात आपल्या हातीं घेऊन बंधुल म्हणाला— "हे तुझे हात माझ्या सामर्थ्याचे स्रोत आहेत. याचा लाभ झालेला बंधुल कुठंहि निर्भयपणानं विचरण करूं शकेल."

"प्रिया, कुठं जायचंय? अन् कधी?"

"शक्य तितक्या लवकर! कारण खुंट्यांत ठोकलेल्या खिळ्यांचा पत्ता गणपतींना हा लागणारच. मग पुन्हां ते माझ्या परीक्षेचा दिवस ठरवतील. लोकांची गळ पडायच्या आधीच आम्ही निघालं पाहिजे."

"अन्यायाचं परिमार्जन कां होऊं देत नाहीस?"

"कुसीनारानं माझ्या बाबतींत आपला कौल देऊन टाकला, मल्लिके! माझं इथं काम नाहीं, त्यांतल्या त्यांत सध्यां तरी! कुसीनाराला जेव्हां बंधुलची गरज भासेल, त्या वेळी तो इथं हजर राहील."

त्याच रात्रीं सोबत घेतां येण्याजोग्या वस्तू घेऊन मल्लिका आणि बंधुल यांनी कुसीनारा सोडले. आणि दुसऱ्या दिवशीं तीं अचिरवतीच्या (रापतीच्या) कांठावर असलेले ब्राम्हणाचें गांव मल्लग्राम (मलांव, गोरखपूर) येथे येऊन पोचली. मल्लाच्या जनपदात मल्लग्रामचे सांकृत्य आपल्या युद्धशौर्याबद्दल प्रसिद्ध होते. तेथे बंधुलाचे मित्र पण होते, पण तो त्यांना भेटायला नव्हता गेला; तर तेथून नावेतून श्रावस्तीला जाण्यासाठी. मल्लग्रामात श्रेष्ठी सुदत्ताची माणसे राहत असत, आणि त्याच्यातर्फे नावा मिळणे सोपे जाई. सांकृत्य ब्राह्मणांनी आपल्या कुलाचाराप्रमाणें आपल्या दारी डुकराचे एक लठ्ठ पिल्लूं कापले, ब्राम्हणींनी आपल्या हातांनी ते रांधले. बंधुल मल्ल आणि मल्लिका यांना त्या शूकर-मार्दवाने संतृप्त केले.

– ३ –

कोसलाची राजधानी श्रावस्ती येथे राजा प्रसेनजिताने आपला सहपाठी मित्र बंधुल मल्ल याचे मोठ्या थाटाने स्वागत केले. तक्षशिलेत असतांना प्रसेनजिताने बंधुलला म्हटले होते, "मी राजा झालो की तुला माझा सेनापति व्हावं लागेल." राजा झाल्यावर त्याने कित्येकदा या बाबतींत बंधुलला लिहिले होते, परंतु कोसल-काशी सारख्या आपल्या काळांतल्या सर्वात समृद्ध आणि विशाल राज्याचा सेनापति होण्याच्या ऐवजी बंधुलला आपल्या कुसीनारासारख्या सामान्य गणाचा उपसेनापति होणे अधिक पसंत होते. परंतु आता कुसीनाराने त्याला ठोकरून लावले होते, म्हणूनच प्रसेनजिताने यावेळी आग्रह करतांच त्यानें अट घातली, "मी तुझं म्हणणं मान्य करायला तयार आहे सौम्य! – पण एका अटीवर!"

"सौम्य बंधुल! खुशाल साग ती अट!"

"मी मल्लपुत्र आहे!"

"ते मला आहे माहित, आणि मल्लांच्या विरुद्ध लढायला जाण्याची आज्ञा मी तुला कधींहि देणार नाहीं."

"येवढंच सांगायचं होतं."

'सौम्य! मल्लांच्या बरोबर आज आमचे जे संबंध आहेत, तेच मी कायम ठेवूं इच्छितो. मला राज्यविस्ताराची हांव नाही, हे तुला ठाऊकच आहे. यदाकदाचित् कोणत्याहि कारणांनीं मला मल्लाचा विरोध करण्याची पाळी आली तर

तुला वाटेल त्या पक्षाला मिळण्याचं स्वातंत्र्य राहील. मीं आणखी कांहीं अधिक आपल्या मित्रासाठीं करूं शकेन का ? ''

'' नाही, महाराज. येवढ्यानंच माझं समाधान झालं ! ''

– ४ –

बंधुल मल्ल कोसलांचा सेनापति झाला. प्रसेनजितासारख्या मवाळ, उत्साहशून्य राजाला अशाच योग्य सेनापतीची फार गरज होती. वस्तुत: बंधुलमल्लाची जोड जर त्याला लाभली नसती तर कदाचित मगध आणि वत्स यानी त्याच्या राज्याचे लचक्या-वर लचके तोडायला कमी केले नसते

श्रावस्तीला आल्यावर कांही दिवसानी मल्लिकेला गर्भलक्षण दिसूं लागले. बंधुल मल्लाने एके दिवशी तिला विचारले, '' प्रिये एखाद्या वस्तूचा डोहाळा झाला तर मला सांग बरं का ! ''

'' होय प्रियतमा; डोहाळा झाला, पण कठीण आहे तो ! ''

'' बंधुल मल्लाला कोणतीहि गोष्ट कठीण नाही, मल्लिके ! तूं सांगशील तर ? ''

'' अभिषेक पुष्करणीत नहायची इच्छा झाली. ''

'' मल्लांच्या का ? ''

'' नाही, वैशालीतल्या लिच्छवींच्या ! ''

'' तुझंच म्हणणं खरं आहे, मल्लिके ! तुझा डोहाळा कठीण आहे खरा, पण बंधुल मल्ल तो पुरा केल्यावांचून रहाणार नाही. तयारी कर, उद्यां सकाळी आपण रथानं निघूं ! '' दुसऱ्या दिवशी आपली खड्गधनुष्यादि शस्त्रे व इतर जामानिमा घेऊन ती दोघें रथाने निघाली. दूरची मजल असल्यामुळे अनेक आठवड्यांनंतर ते वैशा-लीच्या एका वेशीतून आंत शिरले. त्या वेशीचा अध्यक्ष महालि हा त्याचा एके काळचा सहपाठी असून लिच्छवींच्या मत्सराने आंधळा बनलेला होता. बंधुलच्या मनांत त्याला एकवार भेटावे असे आले परंतु डोहाळ्याच्या पूर्तीमध्ये विघ्न नको म्हणून त्याने तसें केले नाही.

अभिषेक-पुष्करिणीच्या घाटावर पाहरा होता. उभ्या आयुष्यामध्यें कोणत्याहि लिच्छवि-पुत्राला त्या पुष्करिणीत फक्त एकदांच अभिषेकाचे स्नान करण्याचे भाग्य प्राप्त होत असे, व ते देखील तो जेव्हां लिच्छवि गणांच्या ९९९ सभासदांपैकी एखादी रिकामी जागा भरून काढी तेव्हा ! रक्षकांनी बंधुलला अडवून पाहिलें पण त्यानें फटके मारून त्यांना हांकून दिलें. मल्लिकेचें स्नान झाल्यावर ताबडतोब ती रथावर आरूढ होऊन वैशाली बाहेर पडलीं. रक्षकांच्या तोंडून वार्ता ऐकतांक्षणींच पांचशें लिच्छवींनीं रथी बंधुलाचा पाठलाग आरंभला. महालीने तें ऐकलें तेव्हां त्यानें त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न करून पाहिला; परंतु गर्विष्ठ लिच्छवी कुठले ऐकणार ? दुरून

रथांच्या चाकांची खडखट ऐकायला आली तेव्हां मल्लिकेनें मागें वळून पाहिलें आणि ती म्हणाली–"प्रिया, मागून बरेचसे रथ येताहेत."

"असं करायचं प्रिये! ज्या वेळी रथ एका ओळींत येतील तेव्हां मला सूचना कर."

मल्लिकेनें योग्य वेळीं सूचना केली. जुन्या इतिहासकारांचे म्हणणे असे कीं बंधुलानें नेम धरून बाण सोडला आणि तो पाचशे लिच्छवींच्या कंबरबंदांना भेदून पार निघाला. लिच्छवींना जवळ पोंचल्यावर युद्धाचे आव्हान दिले. बंधुलाने सहजभावांत सांगितले, "मी तुमच्या सारख्या आधींच मेलेल्याशी लढत नसतो."

"बघून तर घे आम्ही कसे मेलो आहोत ते!"

"मी दुसरा बाण वाया घालवीत नसतो. घरी परत जा. आधी प्रिय बांधवांना भेटा आणि मग कंबरबंद सोडा"–असे म्हणून बंधुलाने मल्लिकेच्या हातातून लगामाचे कासरे घेतले आणि रथ वेगाने पिटाळून तो त्यांच्या दृष्टीच्या टप्प्यापलीकडे निघून गेला.

कंबरबंद सोडल्यावर खरोखरीच पांचशेंच्या पाचशे लिच्छवी मरून पडले.

– ५ –

श्रावस्ती (आजकालचे उजाड सहेटमहेट) त्या काळीं जंबुद्वीपांतले सर्वात मोठे नगर; त्या शिवाय साकेत (अयोध्या) आणि वाराणसी ही देखील आणखी दोन महानगरें प्रसेनजिताच्या राज्यात होतीं. श्रावस्तीचे सुदत्त (अनाथपिंडक) आणि मृगार, साकेतांतले अर्जुन यांच्या प्रमाणे कितीतरी कोट्याधीश काशी कोसलाच्या संयुक्त राज्यात रहात होते. त्यांचे सार्थ जंबूद्वीपच नव्हे, तर ताम्रलिप्तावरून पूर्व समुद्र (बंगालचा उपसागर) आणि भरकच्छ (भडोच) व सुप्पारक (सोपारा) यांच्यावरून अपरसमुद्र (अरबी समुद्र) यांच्या मधल्या दूरदूरच्या द्वीपांतरीं जात असत. ब्राह्मण सामंत (महाशाल) आणि क्षत्रिय सामंत याच्या बरोबरीने त्या व्यापाऱ्यांना स्थान मिळत नसले तरी त्यांचा समाजात थोर दर्जा मानला जाई व धनाच्या बाबतीत तर त्यांच्या पुढे सामंतांना तुच्छ लेखण्यांत येई. सुदत्ताने जेत राजकुमाराचें उद्यान जेतवन हे त्या उद्यानाच्या भूमीवर मावतील तेवढी कार्षापण नाणी देऊन विकत घेतलें आणि गौतम बुद्धासाठी तेथे जेतवन विहार बांधून काढला. मृगारचा मुलगा पुण्ड्रवर्धन याच्या विवाहाला खुद्द राजा प्रसेनजित् दळभारांसह वधूपिता अर्जुनश्रेष्ठी यांचा पाहुणा म्हणून साकेतीं गेला होता. अर्जुनाची मुलगी आणि मृगाराची सून विशाखा हिनें आपल्या हाराच्या मोलांत हजार खोल्या असलेला एक सात मजली विशाल विहार बांधून काढला. त्याचे नाव पूर्वाराम मृगारमाता-प्रासाद असे पडले. देशदेशांतरीचे धन हे श्रेष्ठी धुवून आणत होते, मग त्यांच्या अपार संपत्तीबद्दल अधिक तें काय सांगायचें?

जैवलि, उद्दालक, याज्ञवल्क्य यांनीं यज्ञवादाला गौण-दुय्यम-स्थान देऊन, वास्तविक निस्तारासाठीं ब्रम्हवादाची दृढ नौका निर्माण करून ठेवली होती. जनका सारख्या राजांनी मोठमोठी पारितोषिकें ठेवून ब्रम्हज्ञानाचा शास्त्रार्थ करण्यासाठीं परिषदा बोलावण्याचा उपक्रम सुरू केला, त्यामुळे वेदबाह्य कल्पनांना देखील मार्ग मोकळा झाला. आता देशांत असा काळ येऊन ठेपला की स्वतंत्रपणे चिंतन विचार करणाऱ्यांची लाट उठूं लागली आणि विचारवंत ( तीर्थंकर ) आपापले विचार लोकांच्यापुढे साधारण सभांमधून ठेवूं लागले. कधी त्यांचे स्वरूप सामान्य उपदेशाचे ( अववाद, सूक्त ) असे, तर कुणी कुणी वादाने आव्हान देण्यासाठी जंबू शाखा रोवीत हिंडायचे. प्रवाहणाने छप्पन पिढ्यांपर्यंत घोंटाळ्यांत पाडण्यासाठीं ब्रम्हसाक्षात्काराचे पुष्कळसे उपाय सांगितलेले होते. त्यातच प्रव्रज्या ( संन्यास ), ध्यान, तपादिकाचा समावेश होत होता. आता उपनिषदे अमान्य असणाऱ्या आचार्यांनी देखील आपल्या स्वतंत्र विचाराबरोबरच प्रव्रज्या आणि ब्रम्हचर्य यांच्यावर जोर द्यायला प्रारंभ केला. अजित केसकम्बल हा पूर्णपणे जडवादी होता; भौतिक पदार्थां व्यतिरिक्त असे आत्मा, ईश्वरभक्ति, नित्यतत्त्व, स्वर्ग, नर्क, पुनर्जन्म या कशांवर देखील तो विश्वास ठेवणारा नव्हता: तरी पण तो स्वतः गृहत्यागी ब्रह्मचारी होताच. ज्या सामंताच्या हाती तेव्हा सत्ता होती, त्यांची सहानुभूति मिळवायलाच नव्हें तर त्यांच्या क्रोधापासून स्वतःचा बचाव करण्यासाठीं देखील स्वतःच्या जडवादाला धर्माचा मुखवटा चढवणे त्यांना आवश्यक होते. लौहित्य ब्राह्मण-सामंत आणि पायासी याच्यासारखे राजन्य-सामंत जडवादी होते. या त्यांच्या विचारांबद्दल ते लोकांत इतके प्रसिद्धी पावले की जडवादाचा त्याग करणे देखील त्यांना लोकलज्जेमुळे शक्य झाले नसते. तरी पण त्यांचा जडवाद समाजाला इतका भयप्रद झाला नाही.

जडवादाचा प्रचार चाललेला होता; परंतु ब्राह्मण–क्षत्रिय सामन्त, आणि धनकुबेर व्यापारी याची आस्था अधिकतर गौतमबुद्धाच्या अनात्मवादाकडे होती– कोसलामध्ये तर फारच! गौतम स्वत. कोसलांतर्गत असलेल्या शाक्य गणांचा रहिवासी होता हेहि या आस्थेचे एक विशेष कारण होतें. गौतम जडवाद्यांप्रमाणे म्हणत असत–आत्मा, ईश्वर वगैरे कोणतीहि नित्य वस्तु विश्वांत नाही, सगळ्यांच वस्तू उत्पन्न होतात आणि लवकरच नाश पावतात. हे जगत वस्तूंचा समूह नसून घटनांचा प्रवाह आहे. समजूतदार व्यक्तींना हे विचार खूपच युक्तिसंगत आणि हृदयंगम वाटत असत. परंतु अशा अनित्यता-वादामुळें लोकमर्यादा, गरीबश्रीमंत, दास-स्वामी या भेदांना ठोकर बसूं शकत होती. म्हणूनच तर अजितचा जडवाद सामन्त आणि

व्यापारी वर्गांत सर्वप्रिय होऊं शकला नाही. गौतमबुद्धाने आपला अनात्मवाद आणि जडवाद याच्यांत आणखी काही तत्त्वांचे गुळखोबरें घालून त्यांचा कडवटपणा दूर केला होता. त्याचे म्हणणे असे की–" आत्मा नित्य नसला तरी चेतनाप्रवाह स्वर्ग-नर्कादि लोकांत एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत–एका शरीरप्रवाहांतून दुसऱ्या शरीरप्रवाहांत बदलत असतो. " या विचारांत प्रवाहण जैवलि राजाने शोधून काढलेले पुनर्जन्माचे शस्त्र पुरेपूर जसेंच्या तसें राहात होते जर गौतमाने निव्वळ जडवादाचा प्रचार केला असता तर त्यांनें श्रावस्ती, साकेत, कौशांबी, राजगृह, भद्रिका वगैरेंच्या श्रेष्ठी--प्रमुखांनी आपल्या थैल्याची तोंडे मोकळी केली नसती, आणि ब्राह्मण–क्षत्रिय–सामंत आणि राजे यानी त्याच्या चरणीं मस्तके नम्र करण्यात चढाओढहि केली नसती.

श्रावस्तीच्या उच्चवर्गांतील स्त्रियाना गौतमबुद्धाच्या मताबद्दल मोठी आस्था वाटत होती. प्रसेनजिताची पट्टराणी मल्लिकादेवी बुद्धधर्मावर खूप अनुरक्त होती. तेथल्या नगरशेटाची सून आणि राणीची सखी विशाखा हिने आपली श्रद्धा दाखविण्यासाठी पूर्वाराम सारखा महाविहार बांधवून तो बुद्धाला दान दिला. बंधुल मल्ल सेनापतीची पत्नी मल्लिका, पट्टराणी मल्लिकेची अत्यंत प्रिय सखी, तिच्याच प्रेरणेने बुद्धाच्या प्रवचनाना जाऊं लागली आणि काही दिवसांनी बुद्धाची उपासिका बनली.

मल्लिकेचें घर आतां खूपच समृद्ध झाले होते. कोसला सारख्या महान् राज्याच्या सेनापतीचें घर समृद्ध हें असणारच. मल्लिकेला झालेले दहा वीरपुत्र आतां राजसेनेंत मोठमोठ्या हुद्यावर होते. बंधुल मल्लानें एक युगापर्यंत राजावर चांगलाच प्रभाव ठेवला; पण याच काळांत त्याला पुष्कळ शत्रु निर्माण झाले. परक्या जनपदांतला इसम एवढ्या मोठ्या हुद्यावर असलेला त्यांना सहन होत नव्हता. मत्सरी लोकांनी राजाजवळ चुगल्या करायला सुरवात केली. राजा जरासा बुद्धीने असा तसाच होता; " बंधुल मल्ल महाराजांना निर्बुद्ध म्हणतो, " असें सांगून त्यांनी त्या मंद-बुद्धीला चिथवायला सुरवात केली. शेवटीं तर सेनापति राज्य हिरावून घेऊं पाहत आहे, असें राजाच्या कानांत भरवण्यांत आले. प्रसेनजित्ला ते खरें वाटले आणि तो बंधुलाच्या व स्वतःच्या शत्रूंच्या हातांतले खेळणें बनूं लागला. बंधुल मल्लाला चिंताग्रस्त बघून एके दिवशीं मल्लिका विचारूं लागली,–" प्रिया, कसली काळजी करतोस? "

" राजा आजकाल माझ्यावर संशय घेऊं लागला. "

" तर मग सेनापतिपद सोडून कुसीनाराला जाऊं. तिथं आपल्या योगक्षेमासाठी आपली पुरेशी शेती ( कर्मान्त ) आहेच. "

" पण याचा अर्थ होईल राजाला त्याच्या शत्रूंच्या स्वाधीन करणं ! बघत नाहींस तूं मल्लिका, मगधराज अजातशत्रूनं कित्येकदां काशीवर आक्रमणं केलीं;

एक वेळ त्याला कैद देखील केलं होतं आह्मी, पण महाराजांनी उदारतापूर्वक त्याला सोडून देऊन त्याचं लग्न राजपुत्री वज्रा हिच्याशी लावून दिलं. पण अजातशत्रूला सगळ्या जंबुद्वीपाचा चक्रवर्ती व्हायचं आहे. तो या लग्नामुळं गप्प बसायचा नाही. त्याचे गुप्त हेर राजधानीभर पसरलेले आहेत. आपला दुसरा शेजारी अवन्तिराज आहे ना, त्याचा जामात वत्सराज उदयन याची नीयत देखील भली दिसत नाही. तो देखील सरहद्दीवर तयारी करीत आहे. अशा परिस्थितीमध्ये श्रावस्ती सोडून निघून जाणं भेकडपणाचं होईल, मल्लिके !"

" आणि मित्रद्रोह देखील ! "

" मला माझं कांहीहि वाटेनासं झालेलं आहे. युद्धांत कितीकदां मी मृत्यूच्या जबड्यांत जाऊन परतून आलों. म्हणून एखाद्या वेळी मृत्यू मला आपल्या दाढांनीं रगडून देखील टाकील, त्यांत काय मोठंसं ! "

सामान्य कामकऱ्याची–एका माळ्याची–मुलगी असून देखील आपल्या गुणांनी प्रसेनजित्‌ची पट्टराणी बनलेली मल्लिका आता जिवंत नव्हती; नाहीतर राजाच्या कानी येवढे किल्मिष निंदाखोरांना ओततां देखील आलें नसते. एके दिवशी राजाने सरहद्दीवर बंडाळी माजलेली आहे असे सांगून ती मोडायला बंधुल मल्लाच्या पुत्रांना पाठविले. ते यशस्वी होऊन परत येत असतांना, राजानें दगलबाजी करून बंधुल मल्लाला त्यांच्यावर पाठविले. अशा प्रकारे बाप आणि दहाहि पुत्र एकाच वेळी रणांगणांवर कामी आले. ज्यावेळी मल्लिकेला ही वार्ता कळविणारे पत्र आलें, त्यावेळीं ती बुद्ध व त्याचा भिक्षुसंघ यांना भोजन घालायला निघाली होती. तिच्या दहाहि तरुण सुना मोठ्या हौसेने नाना प्रकारचीं पक्वान्नें तयार करीत होत्या. मल्लिकेनें पत्र वाचले. तिच्या हृदयानें पेट घेतला, पण लागलीच तिनें आपलें मन काबूंत आणले, डोळ्यांत अश्रूच काय पण तोंडावर म्लानतेची छटा देखील येऊं दिली नाहीं. पत्र अंचलाच्या टोकाला बांधून ठेवले आणि साऱ्या संघाला तिनें भोजन घातले. भोजनोत्तर बुद्धाचा उपदेश भक्तिभावानें ऐकला आणि मग तिने पत्रांतला मजकूर वाचून दाखवला. बंधुलपरिवारावर जणुं वीज कोसळून पडली. मल्लिकेनें खूप धीर धरला परंतु त्या तरुण विधवांना धीर देऊन त्यांचे शांतवन करणे बुद्धाला देखील जड गेलें.

कालांतराने प्रसेनजितला खरा प्रकार समजला, तेव्हां त्याला खूप दुःख झालें. पण आतां उपाय नव्हता. प्रसेनजितने आपल्या मनाच्या समाधानासाठी बंधुलचा भाचा ( भागिनेय ) दीर्घकारायण याला आपला सेनापति नियुक्त केलें.

हिवाळ्याचे दिवस. कपिलवस्तूच्या जवळपासच्या शेतांत हिरवे टपोर गहूं, जंव, आणि फुलारलेलीं पिवळी मोहरी यांचे पीक आलेले होते. आज नगर खूपच शृंगारलेले होते. जागोजागी तोरणें लावलेली होतीं. संस्थागार (प्रजातन्त्र-भवन) विशेषेंकरून शृंगारलेले होतें. तीन दिवसां नंतरच्या अति श्रमानंतर आज जराशी उसंत मिळालेले कांही दास एका घराच्या कोपऱ्यांत बसून बोलत होते.

काक म्हणाला, "काय हे आम्हां दासांचं जिणं? माणसाऐवजीं बैल झालों असतों तरी बरं होतं. निदान आम्हाला माणसां प्रमाणं परिस्थितीची जाणीव तरी झाली नसती."

"खरं आहे काक, काल माझ्या धन्यानं–दंडपाणीनं–लोखंड लाल तापवून माझ्या स्त्रीला डागलं रे!"

"डागण्याचं कारण?"

"हे त्याना कोण विचारणार? त्याना दासांचे पतिपत्नीसंबंध देखील कबूल नाहीत. इतकं असून हा दंडपाणि स्वत:ला निगंठ श्रावक (जैन) म्हणवून घेतो; असा निगंठ की जो किड्यांना दूर सारण्यासाठी स्वत जवळ मोरपिसाचा कुंचला सतत ठेवीत असतो. आतां अपराध म्हणशील तर येवढाच की माझी स्त्री बऱ्याच दिवसा पासून खूप आजारी असलेल्या आमच्या पोरीच्या बेशुद्धीची बातमी सांगायला माझ्याकडे आली होती. बिचारी पोर शेवटीं दगावलीच. बरं झालं मेली ती सुखी झाली. तिला देखील आमच्या सारखंच जिणं घालवावं लागलं असतं. खरंच रे काक, आम्हां दासांना कसलंच जिणं नाही. इतकंच नव्हे तर ही धामधूम थांबल्यावर माझ्या स्त्रीला विकायचं असं देखील म्हणतो आमचा कसाब धनी!"

"लोखंडानं डागण्या देऊन देखील त्या कसाब दंडपाण्याचं समाधान झालं नाही तर?"

"नाहीं रे! तो म्हणतो, बारा वर्षांनंतर पोरीचे पन्नास निष्क मिळाले असते. जणुं काय आम्ही जाणून बुजूनच त्याचे पन्नास निष्क बुडवले."

"जणुं काय आम्हां दासांच्या अंत:करणांत आईबापांची मायाच नसते."

एका तिसऱ्याच वृद्ध दासाने मध्यें तोंड घातले: "आज ज्याच्या स्वागताची ही एवढी तयारी चाललेली आहे तो देखील एका दासीचाच पुत्र होता."

"कोण हो आजोबा?"

"हाच कोसल राजकुमार विदूडभ!"

"दासीचा पुत्र?"

" होय. महानाम शाक्यांची ती वृद्धदासी आहे ना माहित? आमच्या प्रमाणं काळी नाही–कुणा शाक्याच्या वीर्यापासून झालेली असावी."

" दासीमध्ये त्याची वानवा का आहे आजोबा?"

" होय. त्याच दासीपासून महानामला एक मुलगी झाली होती. खूपच गोरी, अत्यंत सुंदर, पाहिली तर शाक्यांना वाटायची!"

" कां नाही वाटणार? आणि सुंदर मुली, त्या दासी असल्या तरी, धनी मोठ्या हिफाजतीनं पाळतात, पोसतात."

" कोसलराज प्रसेनजितला एखादी शाक्य कुमारी हवी होती पण कोणीहि शाक्य आपली कन्या द्यायला तयार होईना. शाक्य स्वतःला तिन्ही लोकात सर्वांपेक्षां अधिक कुलीन मानतात पण नकार दिला असता तर कोसलराज शाक्यगणांवर खवळला असता. म्हणूनच महानामानं ही दासीपुत्री शाक्य कुमारी म्हणून प्रसेनजिताला अर्पण केली. याच वार्षभ क्षत्राणीचा मुलगा आहे हा विदूडभ राजकुमार!"

" पण तो देखील आमच्या रक्ताला एखाद्या शाक्याप्रमाणंच चटावलेला असेल."

वाद्ये वाजूं लागली. कोसल राजकुमाराला शाक्य सामोरे गेले, संस्थागारात [illegible] स्वागत झाले. मात्र आतून सगळेच त्याला दासीपुत्र म्हणून तुच्छ लेखीत होते

विदूडभाने आपल्या मातुल कुलाचे स्वागत स्वीकारले; आजा महानाम याचा आशीर्वाद [illegible] आनंदानें कपिलवस्तूचा निरोप घेतला. दासीपुत्राच्या पायरवानें संस्थागार अपवित्र झाले होते. त्यामुळे त्याची शुद्धि करायची होती. कित्ती तरी दासदासी आसनें दुधानें धुवून शुद्ध करण्यांत गुंतलेले होते. एक तोंडाळ दासी आसन धुतांना दासीपुत्र विदूडभ याला दहा हजार शिव्या मोजूं लागली. विदूडभाचा एक सैनिक आपला भाला संस्थागारांत विसरला होता, तो परत न्यायला आला आणि त्याच्या कानी त्या सगळ्या शिव्या पडल्या. हळूं हळूं सारा खरा प्रकार विदूडभाच्या कानी पडला. त्यानें लागलीच कपिलवस्तू निःशाक्य करण्याचा संकल्प केला व पुढें तो खराहि करून दाखवला. त्याच्या क्रोधाचें दुसरें लक्ष्य होतें प्रसेनजित्; त्यानेच दासी पासून त्याला जन्म दिलेला होता.

दीर्घकारायण आपला मामा व मामेभाऊ यांच्या हत्या विसरलेला नव्हता. तिकडे प्रसेनजित् म्हातारपणी आपल्या साऱ्या दोषां बद्दल पश्चात्ताप झाल्यामुळें त्याच्यावर अधिक विश्वास टाकून त्याच्याशीं मृदुतेनें वागूं लागला. एके दिवशी माध्यान्ह भोजन संपल्यावर त्याला बुद्धाची आठवण झाली. थोड्याशा योजनांवर तो शाक्यांच्या कोणत्याशा गांवीं मुक्कामाला राहिला ही बातमी ऐकून तो कारायण

व आणखी काही सैनिकांसह तिकडे निघाला प्रसेनजित्नें बुद्धाच्या वासगृहीं जातें वेळीं आपला मुकूट खड्ग इत्यादि राजचिन्हें कारायणाच्या स्वाधीन केली. कारायणाचे विदूडभाशीं सूत जमलेलें होतें; त्यानें एका राणीला तिकडे नेऊन सोडलें, विदूडभाला राजा म्हणून घोषित केले व तो स्वत. श्रावस्तीकडे निघाला.

किती तरी वेळ प्रवचन ऐकून प्रसेनजित् बाहेर आला, तेव्हा राणीनें हुंदके देत देत सारी हकीकत सांगितली. तेथून प्रसेनजित् आपला भाचा मगधराज अजातशत्रु याची मदत मागण्यासाठी राजगृहाकडे निघाला. म्हातारपणीं कित्येक आठवडे पायीं चालल्यामुळे वाटेतच त्याचे शरीर खिळखिळे झाले होते. संध्याकाळी राजगृहाला जाऊन पोचला तेव्हां नगरद्वार बंद झालेले होते. द्वाराच्या बाहेर असलेल्या एका झोपडींत त्या रात्रींच प्रसेनजितने प्राण सोडला. सकाळी राणीचा विलाप ऐकून अजातशत्रु व वज्रा धांव घेऊन आले, पण त्या प्राणहीन मातीचे थाटामाटानें दहन करण्या पलीकडे ते काय करूं शकत होते ?

बंधुलाच्या खुनाचा हा सूड होता. दासतेच्या दुष्कर्माचा हा परिणाम होता.



[ आजच्या पूर्वी शंभर पिढ्यां आधींची ही एक ऐतिहासिक कथा आहे. त्यावेळीं सामाजिक विषमता खूप वाढलेली होती. श्रीमंत व्यापारीवर्ग समाजांत एक महत्वाचें स्थान पटकावून बसलेला होता. परलोकाचा रस्ता दाखवणारे, नरकांतून उद्धार करणारे किती तरी पथप्रदर्शक निर्माण झालेले होते; परंतु गांवांगांवांतून दासतेचा नर्क धडधडत असून देखील त्या बाबतीत त्यांनीं आपल्या डोळ्यांवर कातडे ओढून घेतलेलें होते. ]

# १० — नागदत्त

( **काल** – इ. स. पूर्वी ३३५ वर्षे. )

– १ –

" उचिताकडे लक्ष द्यायला हवं आम्ही, विष्णुगुप्त! मनुष्य या नात्यानं आमचीं कांही कर्तव्यं आहेत. म्हणून आम्ही उचिताची आठवण सोडता कामा नये. "

" कर्तव्य आहे नि धर्म नाही का ? "

" मी धर्माचं ढोंग मानीत नाही. धर्म केवळ परधनाचा अपहार करणाऱ्याना शांतपणानं परधनाच्या उपभोगाची संधि देण्यासाठी असतो. धर्माला कधी दीन-दुबळयांची आठवण झाली का ? धर्माला न मानणारी विश्वात एकहि जाति नसेल, पण त्यानीं दास ही देखील माणसंच असतात याची दखल घेतली का कधी ? दासांचं सोडून देऊं, पण अदास अशा स्त्रियांना देखील कधी धर्मानं न्याय दिला का ? पैसा मात्र हवा; म्हणजे तुम्ही दोन, चार, दहा, शंभर, वाटेल तेवढ्या स्त्रियांशीं लग्नं करूं शकेतां. पण तिची योग्यता दासीपेक्षां मात्र अधिक नसते. आणि धर्माला तें मजूर आहे. मी उचित म्हणतो तें धर्माच्या बाबतीत नव्हे, तर निरोगी मानवाचं मन ज्याला उचित मानील ते ! "

" तर मग मी सांगतो, जें आवश्यक असेल ते उचित. "

" तर मग उचितानुचितामधला भेदच राहणार नाही. "

" भेद राहील मित्रा! आवश्यक याचा अर्थ फक्त एका व्यक्तीला आवश्यक असा घेत नाहीं मी ! "

" जरा फोड करून सांग ना, विष्णुगुप्त ! "

" या आपल्या तक्षशिला-गंधारचंच उदाहरण घेऊं. आम्हांला आमचं स्वातंत्र्य किती प्रिय आणि उचित आहे ! पण आमचा देश चिमुकला असल्यामुळं आम्ही मोठ्या शत्रूंना युद्धांत तोंड देऊं शकत नाही. जोपर्यंत मद्र, पश्चिम गंधार, यांच्या-सारखे लहानलहान गण आमच्या शेजारांत होते, तोपर्यंत आपण चैनीत होतों. कधीं कधीं लढाई होतहि असे पण तिचा परिणाम कांही प्राणांचे बळि जाण्यांतच

काय तो होई. आमच्या स्वातंत्र्याचं अपहरण होत नसे; कारण तक्षशिलेचा काटेरी आहार पचविणं कुणाला देखील सोपं नव्हतं. पण पार्शव (इराणी) पश्चिमे-कडून शेजारी बनल्या पासून आतां आमचं स्वातंत्र्य त्यांच्या कृपेवर अवलंबून राहूं लागलं. आमच्या स्वातंत्र्यासाठीं कसली आवश्यकता भासते? आम्ही पार्शवां-इतकं मजबूत बनलं पाहिजे."

"पण मजबूत बनण्यासाठी आम्ही काय करायला हवं?"

"या लहान लहान गणानी आतां निभायचं नाही; आम्हाला या लहानग्या जनपदाच्या जागी एक विशाल राज्य स्थापन करावं लागेल!"

"पण त्या विशाल राज्यात या लहानग्या जनपदाचं कोणतं स्थान राहील?"

"आपुलकीची भावना!"

"हे शब्दजाल आहे, विष्णुगुप्त! दास कधी स्वामीबद्दल आपुलकीची भावना ठेवूं शकतो?"

"मित्रा नागदत्ता! एखादं स्थान मिळवणं हे इच्छा किंवा भावना यांच्यावर अवलंबून नसतं. ते स्वतःच्या योग्यतेवर निर्भर असतं. तक्षशिला, गंधार, याच्या मध्ये योग्यता असली तर त्याना त्या विशाल राज्यांतलं उच्च स्थान मिळेल, नाहीतर सामान्य मिळेल!"

"म्हणजे गुलामाचं स्थान!"

"परंतु हे गुलामाचं स्थान दारयोशच्या राज्यात पश्चिम गंधारला जे स्थान मिळालं त्या पेक्षा अधिक चागलं असेल. माझी उपाययोजना राहूं दे. पण तूंच साग, आम्ही आपलं स्वातंत्र्य टिकविण्यासाठी काय करावं? कारण आम्ही एका क्षुद्र जनपदाच्या स्वरूपांत आपलं अस्तित्त्व टिकवूं शकत नाही हेहि तितकंच खरं आहे."

"मी सागतो विष्णुगुप्त! आम्ही आपलं गणस्वातंत्र्य कायम राखलं पाहिजे आणि कोणाहि राजाच्या आधीन आम्हीं होतां कामा नये. एका क्षुद्र जनपदाच्या स्वरूपांत आपलं अस्तित्त्व टिकवून धरणं आम्हांला शक्य नाही हे मला मान्य आहे. या साठींच आम्हीं उत्तरापथा (पंजाब) मधील साऱ्या गणांचा एक संघ अस्तित्वांत आणला पाहिजे."

"त्या संघांतला प्रत्येक गण स्वतंत्र राहील की संघ सर्वोपरि असेल?"

"माझ्या मतें ज्याप्रमाणं आम्हां सगळ्या व्यक्तींवर गणाचा अधिकार आहे त्याच प्रमाणं गंधार, मद्र, मल्ल, शिबि आदि सर्व गणावर संघाचा अधिकार चालावा."

"पण हे कसं जमेल? नाही तरी बाहेरच्या शत्रूपासून रक्षण करण्यासाठी आम्हांला सैन्य ठेवावं लागेलच. बलि (कर) घ्यावा लागेल."

" जसं आम्ही गणामधल्या लोकांकडून करवून घेतों तसंच संघ गणांकडून करवून घेईल सारं कांही ! "

" गण म्हणजे प्राचीन काळापासून चालत आलेला एक जन – एका रक्ताचा परिवार, अनादि कालापासून या परिवाराला गण-नियमांचें पालन करण्याची संवय झालेली; परंतु गणांचा संघ ही एक नवीनच वस्तु होईल. इथं रक्ताचा एकसंबंध नाहीं; उलट रक्तांरक्तांतले भांडणतंटे अनादि कालापासून चालत आलेले. मग आम्ही संघाचे नियम कसे अंमलांत आणूं शकूं ? मित्रा, तूं जर व्यवहाराची बाजू लक्षांत आणून या बाबीचा विचार केला असतास, तर तूं असं बोललाच नसतास. संघाचा आदेश गण ऐकतील पण तसं करायला त्याना भाग पाडावं लागेल. ती भाग पाडूं शकणारी शक्ति कुठून येणार ? "

" मला वाटतं, ती आपल्यातूनच निर्माण केली पाहिजे. "

" मी म्हणतो ती जर आपल्यातूनच निर्माण झाली तर फारच बरं, पण पार्शवांचे प्रहार अनेकवार साहून आम्हाला असं दिसून आलं की ती शक्ति आपल्यातूनच निर्माण होऊं शकणार नाही; म्हणूनच आम्हाला वाटेल त्या उपायानं ती निर्माण करावी लागेल. "

" राजाला मान्यता देऊन देखील ? "

" फक्त तक्षशिलेचा नव्हे, तर तक्षशिला गंधार याच्या प्रमाणं अनेक जनपदांचा एकच राजा–चक्रवर्ती–मान्य केला तर काय हरकत आहे ? "

" तर मग पार्शव दारयोश यालाच राजा कां मानूं नये ? "

" नाही, पार्शव दारयोश हा आमच्यांतला नव्हे; हे तुला देखील माहित आहे. आपण जम्बुद्वीपांतले ! "

" बरं, मग नंदाला तरी ? "

" जर आपण उत्तरापथांतले सारे गण स्वतःचा संघ बनवूं शकलो नाही तर मग नंदाला देखील राजा म्हणून मान्यता द्यायला हरकत नसावी. पश्चिम गंधाराप्रमाणं दारयोशचे दास बनणं योग्य, की आपल्या एका जंबूद्वीपस्थ चक्रवर्तीच्या आधीन राहणं योग्य ? "

" मित्रा विष्णुगुप्ता, तूं अजून एखाद्या राजाचं राज्य पाहिलेलं नाहींस, नाहीं तर समजलं असतं कीं तिथं सामान्य जनाला दासापेक्षां जास्त दर्जा नसतो. "

" हे मी कबूल करतो कीं मी पश्चिम गंधार सोडून कोणत्याही राज्यांत पाऊल घातलं नाही. पण मला देशाटनाची इच्छा आहे. मला तुझ्याप्रमाणं मधून मधून फेरफटके मारायचे नाहींत. अध्ययन संपल्यावर एकदमच मी प्रवासाला

निघणार आहे. परंतु त्यामुळं माझ्या मूळ विचारांत कांहीं बदल घडणार नाहीं. आम्हांला जर विदेशीयांच्या घृणास्पद दास्यापासून वांचायचं असेल तर या लहान लहान सरहद्दी नाहीशा केल्याच पाहिजेत. कोरोश आणि दारयोश् यांच्या यशाची गुरुकिल्ली यांतच आहे."

"त्यांना किती यश मिळालं, हे मी जवळून बघेन म्हणतों—"

"जवळून?"

"होय. मी पूर्वेकडे मगधापर्यंत सर्वत्र हिंडून आलों. पाहिलं की नंदाचं राज्य आमच्या पूर्व गंधारच्या (तक्षशिला) तुलनेत नर्क आहे. ते सामर्थ्यवान आहे हें खरं, पण ते केवळ गरीबाना चेचण्याच्या बाबतीत. मेहनत करणारे कृषक, शिल्पी, दास याना किती दुःखं सोसावी लागताहेत ती सांगता पुरवत नाहीत."

"याचं कारण येवढंच की अजून नंदाच्या राज्यात तक्षशिलेप्रमाणं एखादा स्वाभिमानी स्वातंत्र्यप्रेमी गण सम्मिलित झालेला नाही."

"का नाही? विष्णुगुप्त, लिच्छवींचा गण आमच्या गंधारच्या गणापेक्षा देखील सामर्थ्यवान् होता, पण आज वैशाली मगधाच्या पायाची दासी बनली. आणि लिच्छवी हे मगध-शिकाऱ्याचे दांडगे कुत्रे मात्र झाले; झालं—यापुढं संपलं सगळं कांही! वैशालीला जाऊन बघ; उजाड होत चालली आहे ती. गेल्या दीडशे वर्षात तेथली लोकसंख्या एकतृतीयांश देखील उरली नाही. शेकडो वर्षे जतन केलेली स्वातंत्र्याची, स्वाभिमानाची भावना, आतां मगधराजाचे लढाऊ सैनिक बनण्यात कामी पडूं लागली. एकवार एखाद्या मोठ्या राज्याच्या हाती आपला गळा दिला की मग सुटकेची आशाच नको."

"मित्रा नागदत्ता, मी देखील एके काळी तुझ्याप्रमाणंच विचार करीत असे. पण आतां मला कळून चुकलं की यापुढं लहान लहान गणाचं युग संपलं; आणि मोठा गण वा संघ स्थापन करणं स्वप्नमात्र आहे. यासाठीच मी कालानुसार निर्माण होणाऱ्या आवश्यकतेला उचित मानतो. पण आधी सांग, आता काय पश्चिमेकडे निघणार आहेस?"

"होय. पहिल्यानं पार्शवांचा देश बघून मग जमल्यास यवनाचा (ग्रीकाचा) देखील बघेन म्हणतो. आमच्या प्रमाणंच त्याचे देखील गण आहेत, परंतु त्यांनीं महान् दारयोश् व त्याचे वंशज यांचे मनसुबे आपल्या गणांत कसे सफल होऊं दिले नाहीत याचं रहस्य मला बघून घ्यायचं आहे."

"मी पण निघालो मित्रा, पूर्वेकडे! बघूं या तरी मगधांत साऱ्या जंबुद्वीपाला एकत्र आणण्याची शक्ति आहे की नाही ते! चला आपण विद्यार्जन संपल्यावर धनार्जन, परिवारपोषण वगैरे करण्याऐवजी हेच कार्य करूं. पण मित्रा, तूं वैद्यक विद्या

देखील त्यांतल्यात्यात अवगत करून घेतलीस, हे फार बरं झालं. मला आतां पस्तावा वाटतो. प्रवासांत मोठी लाभदायक आहे ती!"

"परंतु तूं तर त्याच्याहूनहि अधिक लाभदायक अशी ज्योतिषविद्या आणि सामुद्रिक तंत्र मंत्र अवगत करून घेतलेस."

"तुला माहितच आहे मित्रा, या विद्या म्हणजे निव्वळ थोतांड होत."

"पण विष्णुगुप्त चाणक्याला खऱ्याखोट्या विद्येची काय चाड? त्याला जे आवश्यक दिसतं ते उचित वाटतं."

बालपणापासून बरोबर खेळणारे, बरोबरच शिकणारे नागदत्त काप्य आणि विष्णुगुप्त चाणक्य यांची विद्यार्थी-जीवनांतली ही शेवटची भेट होती. अनेकवार पार्शवांच्या हातात पडलेल्या तक्षशिलेचं स्वातंत्र्य वाचवण्यासाठी ते दोघेहि आपापल्या विचारानुसार मार्ग धुंडाळीत होते.

— २ —

चहूं बाजूला लहान लहान वैराण टेकड्या होत्या. कुठे देखील वृक्ष किंवा वनस्पती औषधाला देखील दिसत नव्हती. हिरवळीचे नाव नाहीं. टेकड्यांच्यामध्ये विस्तृत खोरे होते. पण तेथे देखील पाणी आणि वनस्पति यांचे चिन्ह क्वचितच आढळून येई. याच खोऱ्याच्या काठाकाठाने असलेल्या मार्गावरून कारवान (प्रवाशांची दळे) येत जात. कारवान् (प्रवासी) आणि त्यांच्या बरोबरचे पशु यांच्या विश्रांतीसाठी पांथशाला बांधलेल्या होत्या. आसपासचा प्रदेश पाहिल्यावर ज्याची कल्पना करता येणार नाहीं असा हरतऱ्हेचा आराम त्या पांथशालातून मिळत असे. कुठून त्या साऱ्या वस्तू या मरू भूमीत प्रगट होत असत, कोण जाणे!

पडावाच्या जागी या पांथशाला एकाहून अधिक असत. त्यापैकी कांहीं राजाचे सामान्य चाकर आणि सैनिक यांच्यासाठी राखून ठेवलेल्या होत्या, तर कांहीं व्यापाऱ्यांसाठीं. कमीत कमी एक राजाचा पांथप्रासाद असायचाच. या प्रासादांत शाह आणि त्याचे क्षत्रप मुक्काम करीत असत. आज या पडावांतल्या या पांथप्रासादांत कोणी तरी मुक्कामाला होते; तबेल्यांत घोडे बांधलेले; अंगणांत दास-कर्मकर उभे असलेले, परंतु सर्वांच्या चर्येवर उदासीनता पसरलेली. इतक्या माणसांची वर्दळ असून देखील पांथ-प्रासादांत कमालीची नीरवता पसरलेली. याच वेळी फाटका मधून उद्विग्नमुख असे तीन राजकर्मचारी बाहेर पडले आणि ते सामान्य पांथशाळेंत घुसले. त्यांचीं बहुमूल्य वस्त्रें, रुबाबदार चर्या पाहूनच लोक भयानें आणि आदरानें बाजूला सरून उभे रहात. तेथें कोणी वैद्य उतरला आहे का याची त्यांनी विचारपूस चालवलेली होती. शेवटीं सामान्यजनांच्या पांथशाळेंत तेथे एक हिंदु वैद्य उतरल्याचा पत्ता लागला. त्या भूमींत पाऊस कमी पडतो आणि पावसाळा देखील केव्हांच येऊन

गेलेला. सेव, द्राक्षें, खर्बुजें अशीं फळें स्वस्त असल्यामुळें पांथशाळेत विकलीं जात. राजकर्मचारी हिंदु वैद्यापुढें जाऊन उभा राहिला तेव्हां तो वैद्य एक मोठें खर्बुज कापून खात होता. त्याच्या आवतीं भोंवती किती तरी इराणी त्याच्याच सारख्या भिकारी पोशाखांत बसलेले होते आणि त्यांच्याहि पुढ्यांत तशीच खर्बुजें पडलेलीं होती.

राजकर्मचाऱ्याला बघून भिकारी भ्याले व उठून इकडे तिकडे पांगले. एका इसमाने तेथें उभ्या असलेल्या एका व्यक्तीकडे इशारा करून म्हटलें, "स्वामी, हाच तो हिंदु वैद्य!"

वैद्याचे मळलेले कपडे पाहून राजकर्मचाऱ्यानें तोंड वेडेंवांकडें केलें; मग त्यानें त्याच्या चेहऱ्यावर नजर वळवली. कपड्याला साजेशी चर्या नव्हती; ना भयभीत, ना दीनवाणी! त्याच्या निळ्या डोळ्यांमधून बाहेर पडणाऱ्या तेजाचा राजकर्मचाऱ्यावर परिणाम झाला; त्याच्या कपाळावरच्या आंठ्या पळाल्या, आणि तो जरासा मृदु स्वरांत म्हणाला,

"तुम्ही वैद्य आहांत?"

"होय!"

"कुठले?"

"तक्षशिलेचा."

तक्षशिलेचे नांव ऐकतांच राजकर्मचारी आणखीच विनम्र झाला आणि म्हणाला--

"आमचे क्षत्रप-वक्षु सोग्दाचे क्षत्रप-यांची स्त्री आणि शाहंशाहाची बहीण आजारी आहे; तुम्हीं त्यांची चिकित्सा करूं शकाल का?"

"न करायला काय झालं? मग मी वैद्य कसला?"

"पण हे तुमचे कपडे?"

"पण कपडे थोडेच चिकित्सा करणार आहेत? मी करणार आहे!"

"पण हे जास्तीच मळलेले नाहींत का?"

"आज बदलणारच होतों. क्षणभर थांबा हं!"—

वैद्यानें एक धुतलेला लोंकरीचा लांब आंगरखा घातला. तो आधींच्या पेक्षा जरासा स्वच्छ दिसत होता. आपल्या हातीं औषधांच्या पोटोळ्या भरलेली एक चामड्याची पिशवी घेऊन तो राजकर्मचाऱ्याबरोबर निघाला.

नुसती म्हणायची मात्र पांथशाला; परंतु येथें अंगणांत ना गाढवाची लीद सांडलेली, ना भिकाऱ्यांच्या गोधडींत सांपडणारे लिचोड! येथें सर्वत्र स्वच्छता होती. पायऱ्यांवर रंगी बेरंगी नक्षीवाले गालिचे अंथरलेले होते. जिन्याच्या कठड्याचें कोरींव काम सुंदर होतें. आंत घरांत देखील त्याच प्रकारचे महाग गालिचे अंथरलेले; दारांवर

विरल वस्त्राचे पडदे लोंबत सोडलेले; त्यांच्या बाजूला संगमर्मर पाषाणाच्या मूर्ती-प्रमाणें उभ्या असलेल्या नीरव सुंदरी; एका दाराजवळ पोंचतांच कर्मचाऱ्यानें वैद्याला थांबण्याबद्दल खुणावलें आणि एका सुंदरीच्या कानांत तो कांहीसे कुजबुजला. तिनें फारच हळुवारपणानें दार उघडलें; आंतल्या पडद्यामुळे तेथून कांहीच दिसूं शकत नव्हतें. कांहीं क्षणांनंतर सुंदरी परत आली आणि तिनें वैद्याला आपल्या पाठोपाठ यायला सांगितलें.

आंत शिरताच वैद्याला सगळ्या खोलीभर सुगंध दरवळलेला आहे असें कळून आलें. त्याने चटदिशी भोवतालीं एकवार नजर वळवली. ती खोली सजवण्यात अगदी कमाल करून सोडलेली होती. गालिचे, पडदे, तक्के, लोड, दीपदान, चित्रे, मूर्ती, या साऱ्या वस्तू वैद्यानें अजून पर्यंत पाहिलेल्या नव्हत्या. पुढे एक मऊ गादी होती, आणि भिंतीच्या आसऱ्याने दोनतीन लोड ठेवलेले होते. एक मध्यमवयस्क स्थूल-काय पुरुष एका लोडाला टेंकून बसलेला होता. त्याच्या कानापर्यंत पसरलेल्या लांब लांब आणि कुठें कुठें भुऱ्या रंगात पांढुरकी झांक दाखविणाऱ्या मिशा, मोठे पिवळे डोळे अति जागरण आणि तीव्र चिंता यामुळे भारावलेले; त्याच्याच बाजूला एक अनुपम सुंदरी बसलेली होती. तिचा वर्ण म्हणजे पांढरे लोणी, आणि कोमलता म्हणाल तर त्याच्याहूनहि अधिक; तिच्या श्वेत कपोलावरली फिकट लाली आता धूमिल झालेली होती; तिच्या ओठांचा तेजस्वी लालिमा–पोपटाच्या चोंचीची उपमा फिक्की पडेल त्याला; तिच्या धनुष्याकृति बारीक भिवयातले मृदु पिवळे रोम; खाली कानापर्यंत जाऊन पोंचलेले मोठ्या पापण्या असलेले निळे डोळे आतां सुजून लाल झालेले दिसत होते. तिचा माथा जणुं काय सुवर्णाचे सूक्ष्म तंतु काढून त्यानी सजवलेला होता. तिच्या अंगांत पुऱ्या बाह्या असलेली एक हिरवी कांचोळी होती आणि खाली लाल सुतना. त्या सौंदर्यमय कोमल शरीरावर रत्नामोत्यांचे अलंकार केवळ भार-मात्र वाटत होते. त्या दोघांच्या व्यतिरिक्त खोलींत आणिक दुसऱ्या सुंदरी उभ्या होत्या. त्यांच्या विनीत चर्यावरून व रीतीभातींवरून त्या क्षत्रपाच्या अंतःपुरांतल्या परिचारिका असाव्यात असे चटदिशी वैद्याच्या ध्यानांत आलें.

त्या पुरुषानें–क्षत्रपानें–वैद्याला एकवार पायांपासून मस्तकापर्यंत न्याहाळलें; त्याची दृष्टि वैद्याच्या नीलनेत्रांवर खिळून बसली. एका क्षणांत त्याच्या लक्षांत आलें की आपला पोशाख जर या तरुणाला घालायला दिला तर त्याची गणना पर्शुपुरी (पर्सेपोलीस) मधील सुंदरतम तरुणांत होऊं शकेल.

क्षत्रप विनीत स्वरांत म्हणाला, "आपण तक्षशिलेचे वैद्य आहांत?"

"होय, महाक्षत्रप!"

" माझी पत्नी फार आजारी आहे. कालपासून तिची प्रकृति फारच ढांसळली. माझ्या दोन वैद्यांचीं औषधं निकामी ठरली. "

" आधीं मी महाक्षत्रपांच्या पत्नीची परीक्षा करीन आणि मग वैद्यांशीं बोलेन. "

" त्यांना इथंच बोलावतो. चलावं तर मग आंत आधीं. "

पांढऱ्या भिंतीसारखा वाटणारा पडदा बाजूला करण्यांत आला; तेथून आंत जाण्याचे दार होते. क्षत्रप आणि षोडशी पुढे आणि त्यांच्या मागे वैद्य असे आंत गेले. एक हस्तीदंताच्या पायांचा पलंग आंत टाकलेला होता. त्याच्यावर फेनसदृश पांढऱ्या मऊ बिछान्यावर रोगिणी पहुडलेली होती. पांढरें शुभ्र कदलीमृगाच्या चर्माचे आवरण हनुवटीपर्यंत तिच्या अंगावर पांघरलेले होते. क्षत्रपाला येतांना बघून परिचारिका अदबीने बाजूला झाल्या. वैद्यानें जवळ जाऊन पाहिले; क्षत्रपानीच्या चेहऱ्याचे षोडशी बरोबर विलक्षण साम्य दिसले. मात्र त्या तरुण सौंदर्याच्या जागी येथे प्रौढावस्थेचा प्रभाव आणि दीर्घकालीन रोगाच्या झंझावाताचा परिणाम. लाल ओठ आता पिवळे झाले होते, मांसल कपोल चिमून आतां त्यांचे कोनाडे झाले होते. डोळे मिटलेले आणि खोल गेलेले. पिवळ्या भिवयांच्या धनुकल्या मात्र अजूनही ताणलेल्याच होत्या.

क्षत्रपानें जवळ तोंड नेऊन म्हटले, " अफ्शा ! " रोगिणीने डोळे जरासे उघडून पुन्हां मिटून घेतले.

वैद्य म्हणाला, " मूर्च्छा, आंशिक मूर्च्छा आहे ही ! "

त्याने तिचा हात काढून नाडी पाहिली; सांपडतच नव्हती; शरीर गार होत चाललें. क्षत्रप वैद्याच्या गंभीर होत चाललेल्या चेहेऱ्याकडे बघत होता. जरा विचार करून वैद्याने सांगितले, " थोडीशी द्राक्षीसुरा आणवा, जितकी जुनी तितकी अधिक चांगली. "

प्रवासांत देखील क्षत्रपाकडे तिची कमतरता नव्हती. रक्तावाणी लाल द्राक्षी सुरा पांढऱ्या शुभ्र कांचेच्या सुरईत भरलेली; सोबत एक रत्नजडित सुवर्ण चषक आणण्यांत आला. वैद्याने एक पोटोळी सोडली, उजव्या करांगळीच्या वाढवलेल्या नखाने एक रत्तीभर कसलेसे औषध काढले आणि रोगिणीला तोंड उघडायला सांगितलें. तोंड उघडायला कष्ट पडले नाहीत; त्याने औषध तोडांत टाकून वरून एक घोट सुरेचा पाजला. रोगिणीने घोट गिळलेला पाहून वैद्याला संतोष झाला. तो क्षत्रपाला म्हणाला, " आतां मी आपल्या वैद्यांना भेटायला बाहेर जातों. जरा वेळानं महाक्षत्रपानी डोळे उघडतील, त्यावेळी मला यावं लागेल. "

दुसऱ्या खोलींत जाऊन त्यानें पार्शव वैद्यांबरोबर गोष्टी केल्या. त्यांनीं सोग्दाहून निघतांना आलेल्या साध्या तापापासून आतांपर्यंत घडलेल्या अवस्थांची माहिती दिली. याच वेळी परिचारिकेनें बाहेर येऊन सूचना दिली, " स्वामिनीनी महाक्षत्रपांना भेटायला बोलावलंय. "

महाक्षत्रपाच्या चर्येवर नवा प्रकाश झळकूं लागला. वैद्याला घेऊन तो पुन्हां आंत गेला. क्षत्रपानीनें आतां पूर्णपणे डोळे उघडले होते. तिच्या चर्येवर जिवंतपणाचीं लक्षणे दिसूं लागलीं होतीं. तिनें हळूंच परंतु संयत स्वरांत म्हटलें, " तुह्मांला झालेलं दुःख मला समजतं. पण आतां मी लवकरच बरी होणार, मला शक्ति आल्यासारखी वाटूं लागली. हेंच सांगायला बोलावलं होतं मी ! "

क्षत्रप म्हणाला, " असंच आतां हे हिंदु वैद्य मला सांगत होते. "

चर्येवर आणखी तेज आणून तिनें म्हटले, " हिंदु वैद्यानं माझा आजार ओळखला. माझा रोग गेला हें खरं ना वैद्य ? "

" होय; रोग गेला; पण महाक्षत्रपानीला कांहींसा विसांवा हवा. किती दिवसांमध्ये आपल्याला पर्शुपुरीला जाण्या योग्य करतां येईल याचाच मी विचार करीत आहे. माझ्या जवळ अद्भुत रसायन आहे; हिंदूंचं रसायन देत आहे मी; थोडा थोडा द्राक्षाचा नि डाळिंबाचा रस प्यावा लागेल. "

" वैद्य, तुह्मी रोगाचं निदान केलं; दुसरे गद्धे निघाले. तुह्मी जसं सांगाल तशी वागेन. रोशना– "

षोडशी पुढें येऊन म्हणाली, " काय आई ? "

" बेटा, आतां डोळे पूस; ते वैद्य नव्हते, मारेकरी होते; पण आतां काळजी सोड; अहूर मज्दानं हिंदु वैद्याला पाठवून दिलं; यांना त्रास होतां कामा नये. वैद्यांनीं मला जें पथ्यपाणी सांगितलेलं आहे, तें तूं आपल्या हातांनी दे. "

वैद्यानें रोशनेला कांही माहिती सांगितली व तो बाहेर आला. क्षत्रपाचा चेहेरा प्रफुल्लित झाला होता. वैद्याने कांही औषधें भोजपत्राच्या तुकड्यांत बांधून क्षत्रपांच्या स्वाधीन केलीं व तो आपल्या पांथशाळेकडे यायला निघणार तोंच क्षत्रप त्याला म्हणाला, " तुम्हीं आमच्या इथंच रहा. "–

" परंतु मला दरबारच्या रीतीभाती माहित नाहींत. "

" तरी देखील मनुष्याला जगवण्याची रीत तुम्हांला चांगली अवगत आहे. जातिजातीच्या रीतिभाती वेगवेगळया असतात. "

" माझ्या राहणीच्या तऱ्हेमुळं तुमच्या नौकराचाकरांना कष्ट पडतील. "

" मी जवळचीच एक अगदीं वेगळी खोली देतों ना. तुम्हीं जवळ असलांत म्हणजे आम्हांला समाधान वाटेल. "

" महाक्षत्रपानीची आतां काळजी करायचं कारण नाहीं. वैद्यांनीं आजाराचं निदान बरोबर केलेलं नव्हतं. मी आणखी दोन तास आलो नसतों तर मात्र आशा सोडावी लागली असती. पण आतां त्यांचा आजार गेलाच म्हणून समजा. "

क्षत्रपाच्या आग्रहावरून वैद्यानें तेथेंच एका खोलींत राहण्याचें कबूल केलें.

चवथ्या दिवसापासून क्षत्रपानी उठून बसूं लागली. तिच्या चेहे-यावरच्या सुरकुत्या मोठ्या झपाट्यानें नाहींशा होऊं लागल्या. सगळ्यांत अधिक आनंद वाटत होता रोशनेला. दुसऱ्याच दिवशी तिनें क्षत्रपानें दिलेल्या मौल्यवान् दुशाल्याचा आंगरखा आणवून तो आपल्या हातून वैद्यांना अर्पण केला. तो अंगरखा, तो सोनेरी कमरबंद, ते सुवर्णखचित जोडे, यांनीं नटलेला तो वैद्य आतां भिकाऱ्यांच्या मेळाव्यांत बसून खर्बुजे खाणारा सामान्य इसम राहिला नव्हता.

क्षत्रपानी आतां हलका आहार घेऊं लागली. सहाव्या दिवशीं संध्याकाळीं तिनें वैद्याला बोलावणें पाठवलें. तसें म्हटलें तर हा वैद्य म्हणजे तिला अगदींच नवखा पुरुष. पण त्याला पाहून हा आपल्या भाच्यांपैकींच एखादा तर आला नाहीं ना, असाहि तिला भास झाला. तो जवळ आल्यावर त्याला तिनें बसायला सांगितलें. तो बसल्यावर ती म्हणाली, " वैद्य, मी तुमची अतिशय कृतज्ञ आहे. या निर्जन वैराणांत तुम्हाला मज्दानं माझा जीव वांचवण्यासाठी पाठवलं. तुमचं जन्मनगर कोणतं ? "

" तक्षशिला ! "

" तक्षशिला ? खूप प्रसिद्ध आहे तें नगर; विद्येची ख्याति आहे त्याच्या; आणि तुम्हीं तिथलं रत्न आहांत. "

" नाहीं, मी तिथला एक अति सामान्य नवा वैद्य आहे. "

" तुम्हीं निस्संदेह तरुण आहांत, पण तारुण्य व गुण हे परस्परांचे वैरी थोडेच आहेत ? तुमचं नांव काय वैद्यराज ? "

" नागदत्त काप्य ! "

" पूर्ण नांव उच्चारणं मला जड जाईल; नाग म्हटलं नुसतं, तर चालेल ना ? "

" चालेल, महाक्षत्रपानी ! "

" तुम्हीं कुठं निघालांत ? "

" सध्यां तरी पर्शुपुरीला (पर्सेपोलीस) ! "

" नंतर ? "

" कुठंही ! प्रवास करण्याच्या इच्छेनंच मी घरून निघालोंय. "

" आम्ही पण पर्शुपुरीलाच जात आहोंत. तुम्हीं चला आमच्याच बरोबर. आम्हीं तुमची सगळी काळजी घेऊं. रोशना, तूं वैद्यराजांच्या सुखसोईंची जातीनं काळजी घे. दास चुकारपणा करतील ! "

" नाही आई, मी स्वतःच बघत असत्यें ना. सोफियाला दिलं आहे मी यांच्या दिमतीला. "

" सोफिया यवनी (युनानी) ? माझ्या भावानं माझ्यासाठी पाठविलेली दासी ?"

" होय, आई ! तुझं कसलं देखील काम नव्हतं, आणि मुलगी मोठी हुषार दिसली, तेव्हां दिली यांच्या दिमतीला ! "

" ठरलं मग वैद्यराज. आतां आमच्या बरोबर पर्शुपुरीला यायचं. मी तुमच्या मनाविरुद्ध कांहीं देखील करणार नाही. पण मला आपलं वाटतं की तुम्हीं आमच्या परिवाराचे वैद्य व्हावं ! "

नागदत्त जरा वेळ बसून आपल्या खोलींत निघून आला.

– ३ –

जगांतल्या येवढ्या विशाल राज्याची राजधानी या उघड्या बोडक्या वृक्ष-वनस्पतिविहीन पहाडांमध्यें, इतक्या वैराण व कंगाल वातावरणांत असेल असें नागदत्ताला वाटले देखील नव्हतें. पर्शुपुरी महानगरी होती. राजप्रासादांचे विशाल, चमकणारे पाषाणस्तंभ; त्यांचीं गगनचुंबी शिखरें बाहेरून बघितलीं तरी तेथील शाहंशाही वैभवाचा पत्ता लागायचा; त्याला अनुरूप अशीच नगरांतली समृद्धि होती. पण तें सारें मनुष्यानें निर्माण केलेलें; निसर्गानें आपल्याकडून तिला अत्यंत दरिद्रीच ठेवलें होतें हें मात्र अगदीं खरें.

पर्शुपुरी आणि तेथले शाहंशाहचें वैभव बघायला शाहंशाहाचीं बहीण अफ्शा हिच्या आश्रयापेक्षां अधिक चांगली संधि मिळणें शक्य नव्हते. पर्शुपुरीला पोंचल्यावर क्षत्रपानीने नागदत्ताच्या सुखसोईकडे लक्ष दिलें, आणि जेव्हां ती दक्षिणा घेण्याबद्दल आग्रह करूं लागली तेव्हां वैद्यानें सोफियेला मागून घेतले. जेव्हां सोफियेची मोडकी फारसी भाषा त्याला समजणे कठीण जात होतें तेव्हांच नागदत्ताला तिच्या तेजस्वी डोळ्यांत दडलेली तीक्ष्ण प्रतिभा कळून आली होती. ती दासी म्हणून जरी त्याची झाली असली तरी त्याने तिला कधींहि दासी मानली नाही. आतां त्याचें भाषेचें ज्ञानहि हळूं हळूं वाढूं लागलें. नागदत्तानें स्वतः यवनानी (यूनानी-ग्रीक) लिपी शिकून घेतली आणि सोफिया त्याला मोठ्या परिश्रमानें अथेन्सची भाषा शिकवूं लागली. एका वर्षाच्या आंतच तो त्या भाषेत निपुण झाला. एके दिवशीं सोफियानें आपल्या तरुण वैद्यापुढें कृतज्ञ भाव प्रगट करून म्हटलें, " योगायोग हा

असा असतो. तुमच्या सारख्या कोमल स्वभावाच्या स्वामीची दासी मी बनेन अशी मला कधींच आशा वाटली नव्हती. ”

“ नाहीं सोफिया ! तूं क्षत्रपानीबरोबर राहतीस तर तुला अधिक आराम मिळाला असता. आणि हें बघ, मला स्वामी म्हणायचं नाहीं. दासप्रथेचं नांव ऐकलं कीं मला संताप येतो. ”

“ पण मी तुमची दासीच आहे ! ”

“ तूं दासी नाहींस, मी तुला दास्यांतून मुक्त केलंय असं मी क्षत्रप-दांपत्याला सागून सुद्धां टाकलंय ! ”

“ मग मी आतां दासी नाहीं तर ! ”

“ नाही, आतां तूं माझ्या सारखीच स्वतंत्र आहेस; अन् तुला जिथं जायची इच्छा असेल तिथं तुला पोंचवून देण्याचा प्रयत्न करीन मी ! ”

“ पण मला तुमच्या जवळच रहायचं असेल, तर दूर लोटणार नाही ना ? ”

“ मी सारं कांहीं तुझ्याच इच्छेवर ठेवलेलं आहे. ”

“ दासता माणसाला किती दाबून टाकते ! पित्याच्या घरीं मी आपले दास बघायची; कसे हंसत; आमोद-प्रमोद करीत; त्यांच्या हास्याच्या आड किती व्यथा दडलेल्या होत्या याची मला कधीं कल्पना देखील आली नाहीं. पण जेव्हां मी स्वतःच दासी झाल्ये तेव्हां दासता हा केवढा भयंकर नर्क आहे याचा मला अनुभव आला. ”

“ सोफी, तूं दासी कशी बनलीस ? त्रास वाटत नसेल तर सांग ना ! ”

“ माझे वडील अथेन्स नगरांतले एक प्रमुख नागरिक होते. मकदूनियाचा (मासिदोनियाचा) राजा फिलिप यानं जेव्हां आमच्या नगरावर विजय मिळवला तेव्हां माझे बाबा आपल्या परिवारांतील व्यक्तींना घेऊन नावेनं आशियांत पळून आले. आम्हांला वाटलं होतं कीं इथं आम्हांला आश्रय मिळेल; पण ज्या नगरींत आम्हीं राहिलों होतों तिच्यावर कांहीं महिन्यांनींच पार्शवांनीं आक्रमण केलं. नगर पडलं, आणि त्या पळापळीत कोण कुठं गेलं याचा पत्ता लागला नाहीं. किती तरी नागरिकांना पार्शवांनीं कैद केलं, मला देखील कैद केलं व माझं सुरेख रूप आणि लावण्य बघून मला सेनापतीकडे पाठवण्यांत आलं. सेनापतीनं पाठवलं शाहाकडे. शाहाजवळ माझ्यासारख्या शेकडों यवन तरुणी होत्या. त्यानं आपली बहीण येत्ये असं ऐकून, तिच्याजवळ दिलं मला पाठवून ! जरी मी दासी होत्यें तरी पण रूपामुळं माझी खास बरदास्त ठेवीत. त्यामुळं माझा अनुभव सामान्य दासींपेक्षां निराळा असला तरी देखील त्या यातनांची मला चांगली कल्पना आहे. मी मानवी नसल्याची जाणीव मला पदोपदी व्हायची. ”

"सोफी, तुझी तुझ्या पित्याबरोबर पुन्हां भेट नाहीं होऊं शकली ?"

"ते जिवंत राहिले असतीलसं मला नाही वाटत ! आतां तर आम्ही वाऱ्यावर उडणारा पाचोळा आहो. प्रियकर अथेन्सची राखरांगोळी झाली, आतां जिवंत असले तरी भेटायला ठावठिकाणा राहिलाय कुठं ?"

"अथेन्स महानगरी आहे सोफी ?"

"एके काळी होती, स्वामी !"

"स्वामी नाही, नाग म्हण सोफी !"

"होती केव्हां तरी, नाग ! पण आतां ती उजाड बनलेली आहे. महान दारयोश्चे दांत आंबट करणारा आमचा गण सामान्य फिलिप्नं शरण आगला."

"असं कसं झालं सोफी ?"

"पार्शवांच्या अनेक आक्रमणांचा प्रतिकार करून देखील अथेन्स मधल्या कित्येक विचारवंतांच्या मनांत अशा विचाराचं ठाणं बसलं कीं पार्शवांच्या तोडीस तोड म्हणून आम्हीं देखील आमचं एक मोठं राज्य कायम करीपर्यंत आपला निभाव लागणं शक्य नाहीं. अथेन्सनं फिलिपला मदत केली नसती तर तो कधींहि बलवान झाला नसता."

"हाय तक्षशिले, तूं देखील विष्णुगुप्ताला जन्म दिलास !"

"तक्षशिला ? विष्णुगुप्त ? हें काय नाग ?"

"अभिमानिनी तक्षशिला, माझी जन्मभूमी, पूर्वेकडची अथेन्स नगरी. आमच्या गणानं देखील दारयोश् आणि त्याचे उत्तराधिकारी यांना कित्येकदा मार देऊन पळवलं. परंतु माझा सहपाठी विष्णुगुप्त, फिलिपला मदत देणारे अथेन्सचे नागरिक जें म्हणत होते, तेंच म्हणत असतो."

"तक्षशिला देखील आमच्या अथेन्स प्रमाणंच गण आहे ?"

"होय, आणिक आमच्या तक्षशिलेत कोणीच दास नाहीं, त्या भूमीवर पाय ठेवतांक्षणींच दास अदास बनतात."

"धन्य ती करुणामयी तक्षशिला ! तरीच नाग, मी अगदीं पहिल्या दिवसापासून पाहत आल्यें, तुझ्यांत दासांबरोबर वागण्याचे ते रंगढंग नाहींत."

"आणि ते यापुढं देखील यायचे नाहींत. मी विष्णुगुप्ताला असं म्हणालों होतों कीं मागधांना तक्षशिलेत आणलंस म्हणजे मग त्या पवित्र भूमीला दासतेचा कलंक लागल्या विना रहाणार नाहीं."

"नाग, हे मागध कोण ?"

"हिन्दामधले फिलिप् तक्षशिलेच्या पूर्वेला एक विशाल हिंदु राज्य आहे. पार्शवांच्या आक्रमणांमुळं आम्ही जेरीस आलों. जिंकून देखील आम्हीं निर्बल आणि पराजिता प्रमाणं झालेलों आहोत. वास्तविक एकटी तक्षशिला पार्शव शाहंशाहाला

तोंड देऊं शकत नाहीं, परंतु यावर उपाय म्हणून मी आमच्यांतल्या अनेक गणांचा एक संघ करावा असं सुचविलं आहे."

"पण, नाग, आमच्या देशांत याचा देखील प्रयोग झाला. आमच्या हेल्ला जातीच्या किती तरी गणांनी संघ निर्माण करून पार्शवांना तोंड दिलं, पण हा संघ स्थायी होऊं शकला नाहीं. गणांना आपापल्या स्वातंत्र्याचा इतका पान्हा फुटतो कीं ते संघाला आपलं स्वातंत्र्य बहाल करायला तयार होत नाहींत."

"तर काय माझंच निदान चुकीचं ठरेल आणि विष्णुगुप्ताचं बरोबर?"

"विष्णुगुप्ताला संघाच्या यशाची आशा वाटत नाहीं काय?"

"तो म्हणतो—आमचा शत्रू इतका बलवान आहे कीं त्याच्या पुढं गणांचा संघ टिकाव धरूं शकणार नाहीं. अनेक गणांच्या सीमा मिटवून जर एक महान् गण बनवला तर मात्र यशाची आशा आहे. परंतु गण याला कबुल व्हायचे नाहींत."

"नाग, तुझ्या मित्राचं म्हणणं बरंचसं खरं आहे. पण आम्हीं शेवट पर्यंत अथेन्सचं स्वातंत्र्य राजीखुषीनं देऊन टाकण्याचा विचार मनांत आणला नाहीं."

"तर मग सोफी, गण असून देखील या दासप्रथेचा स्वीकार अथेन्सने कां केला?"

"आपल्या पतनाची घाई सुटली होती म्हणून! धनिकांच्या लोभामुळं दास-प्रथा अंमलांत आली, आणि मग हळू हळू दासांची संख्या स्वामीपेक्षां देखील अधिक वाढूं लागली."

"तुला इथं पार्शवांत कोणत्या अधम गोष्टी आढळून आल्या?"

"दासता! पण ती आमच्यांत देखील होती. आणि शाहंशाहा व धनी लोक यांचे जनानखाने."

"तुमच्याकडे नाही का असं?"

"आमच्याकडे खुद्द मकदूनियाचा (मसिडोनियाचा) राजा फिलिप् देखील एकी पेक्षां अधिक बायका करूं शकत नाहीं. इथं पहावं तर लहान लहान राजकर्म-चारी देखील अनेक लग्नं करतात."

"आमच्याकडे कधीं कधीं एका पेक्षां जास्ती लग्नं करतात, नाहीं असं नाहीं. पण तसं फार कमी प्रमाणांत होतं. तें कांहींहि असो पण ही रीति स्त्री-दास्याचं निशाण होय असं मला वाटतं. अथेन्सनं जशी दासता मान्य केली तशी तक्षशिलेनं देखील अनेक स्त्रियांबरोबर विवाह करणं– मग तें कोणत्या कां कारणांसाठीं होईना– मान्य करून, दासतेलाच मान्यता दिली.

"आणिक धनाचा संचय कांहीं थोड्या घरांतच होणं?"

" असंच मी विष्णुगुप्ताला देखील म्हणालों होतों. गणांत धनवृद्धि कुणाचीहि कितीहि होवो, पण तें राजांच्या प्रमाणं पाण्यासारखं खर्च करतां येत नाहीं. इथं तर तूं बघत्येसच, सोफी ! महार्घ मृगचर्म, दुकूल, मुक्ता, मणि आदि वस्तूंचा कसा उपयोग करण्यांत येतो. या गुलाबी गालांना आणि प्रवाळी ओठांना याची आठवण देखील नसते कीं या वस्तू निर्माण करण्यासाठीं कोट्यावधी माणसांना उपाशी मरावं लागतं."

" आमच्या घरांवर पडलेलं पाणी हिरावून घेऊनच समुद्राला महान जलराशि मिळालेली असते."

" मातींतून सोनं काढणारे उपाशी नागडे मरणाच्या दारीं पडतात आणि सोन्याची माती करणारे चैन उडवतात. मी तीनदा शाहंशाहापुढं गेलो आणि प्रत्येक वेळीं परत येते वेळी माझं माथं ठणकूं लागलं. मला त्याच्या साऱ्या वैभवांतून थंडींत कुडकुडून आणि उन्हाळ्यांत पोळून मरणाऱ्या कामगारांचे मूक निःश्वास ऐकायला आले जणुं. त्याच्या लाल मदिरेत मला सतावलेल्या प्रजेचं रक्त आढळलं. मला आतां पर्शुपुरी नकोशी वाटते. इथून लवकरच पळून जाईन म्हणतों मी ! "

" कुठं जायची इच्छा आहे, नाग ? "

" आधीं तुझं विचारून घेतों. "

" ओळखा मला कुठं जावंसं वाटतं ? "

" यवन लोक-यूनान (ग्रीस) ! "

" आवडेल तुम्हांला ? "

" तर मग तिकडंच जाऊं ! "

" पण वाटेंत मला पुन्हां कुणी हिरावून घेतलं तर मग त्या वेळीं मला नाग-सारखा त्राता मिळायचा नाहीं. " सोफियेचा स्वर असाधारण कोमल झाला, तिच्या विशाल नयनांत कातरता आली.

नागदत्तानें तिच्या कानावर लोळणाऱ्या सोनेरी केंसांच्या बटांना स्पर्शून म्हटलें, " मी एक उपाय योजून ठेवला आहे, पण त्या साठीं तुझी संमति हवी. "

" कोणता उपाय ? "

" क्षत्रप, क्षत्रपानी आणि शाहंशाहा यांच्या जवळून अशीं पत्रं घेईन कीं मी त्यांचा सन्मान्य हिंदू वैद्य आहे. "

" मग मात्र तुमच्या वाटेस कुणीहि जायचा नाहीं. "

" आणि जगाला वरवर दाखविण्यासाठीं जर तूं वैद्याची पत्नी बनूं शकशील तर पत्रांत तुझंहि नांव मी लिहवून घेईन. "

सोफियेच्या नेत्रांतून अश्रू ओघळले; तिनें नागदत्ताचा हात आपल्या हाती घेऊन म्हटलें--

" नाग, किती उदार आहांत ! आणि असं असूनहि आपल्या गुणाची तुम्हांला जाणीव देखील नाहीं. किती सुंदर दिसतां तुम्हीं, पण आपल्यावर खिळलेल्या पुष्पराग आणि नीलमणि-सदृश नयनांकडे तुमचं कधी देखील लक्ष्य गेलं नाहीं. नाग, रोशनेनं कितीदां तरी माझ्या जवळ तुमच्यावरलं आपलं प्रेम बोलून दाखवलं होतं. तिचा एक कुठलासा मरतुकडा भाऊ आहे; तिच्या आईबापांची इच्छा त्याच्या बरोबर तिचं लग्न लावून देण्याची आहे, पण ती तुमच्यावर आसक्त आहे. "

" बरं झालं मला समजलं नाहीं ते, उगीचच नकार द्यावा लागला असता. सोफिया, मी असल्या राजवाड्यांत जन्मलेल्या प्रासादपोषितांचा नव्हे; कदाचित् मी कुणाचाच नव्हे. माझ्यावर प्रेम करणारीला कधी देखील सुखाची झोंप यायची नाहीं. पण तूं म्हणशील तर शाहंशाहाच्या पत्रात-केवळ पत्रापुरतीच बरं का-माझी स्त्री म्हणून तुझा उल्लेख करायला लावतों. मग यवन देशांत तुला तुझा कुणी प्रियकर मिळाला म्हणजे तुला तुझी वाट मोकळी आहेच. "

– ४ –

वैद्य नागदत्ताचें प्रत्येक जागीं चांगलेच आदरातिथ्य व्हायचे. तो हिंदु वैद्य होता. कांहीं काळ पार्शव शाहंशाहा दारयोश्चा वैद्य म्हणून त्याची नेमणूक झालेली होती. शिवाय चिकित्सा करण्यांत त्याचा हात धरणारा दुसरा कुणी नव्हता. पर्शुपुरींत राहूं लागला तेव्हांच त्याने यवन भाषा शिकून घेतली, शिवाय सोफियेसारखी सहचरी त्याला लाभली. त्याने मसिडोनिया पाहिलें, फिलिपचा पुत्र अलिकसुंदर ( शिकंदर ) याच्या गुरूला-अरस्तूला ( ॲरिस्टॉटलला ) तो भेटला. नागदत्त स्वतः तत्त्ववेत्ता होता, पण भारतीय पद्धतीचा ! राजेपण अरस्तूला मान्य होतें; नागदत्ताचा त्याला विरोध होता. हे असले मतभेद असून देखील अरस्तूच्या थोरवीबद्दल मनांत आदरभाव घेऊन तो मसिडोनियावरून निघाला. अरस्तूचे सगळ्यांत महत्त्वाचे मत त्याला जें आवडले तें हे कीं बुद्धि ही सत्याची कसोटी नसून वास्तव सृष्टींतील पदार्थ व वस्तुस्थिति हेच सत्याचे निकष होत. प्रत्यक्ष प्रयोगाला अरस्तू फार महत्व देत असे. भारतीय तत्त्ववेत्ते सत्य मनांतून हुडकूं पाहत होते याचे नागदत्ताला वाईट वाटत होतें; नागदत्तानें अरस्तूच्या मुखांतून त्याच्या मनस्वी शिष्याची-शिकंदराची-प्रशंसा ऐकली होती; त्यानें स्वतः देखील कित्येकदां त्याच्याशीं गप्पागोष्टी केलेल्या होत्या. त्या तरुणाच्या अंगीं नुसतें असाधारण शौर्यच नव्हें तर असाधारण गुणग्राहकता देखील नागदत्ताला दिसून आली.

नागदत्तानें अथेन्सला जाऊन परत येण्याच्या अटीवर अरस्तू जवळून सुट्टी मिळवली होती. पण त्याला हे कुठें माहित होतें कीं ती त्याची या यवन तत्त्ववेत्याबरोबरची शेवटचीच भेट ठरणार म्हणून ?

वीरांची जननी, गणतंत्राची विजयध्वजाधारिणी अथेन्स नगरी. तींत त्यानें श्रद्धेनें आणि प्रेमाने प्रवेश केला. त्यांच्या अंतःकरणांत तक्षशिलेबद्दल जी भावना होती तीच या नगरी बद्दलहि जागृत झाली. नगर पुन्हां आबादीआबाद झालेले होतें तरी पण त्याला "त्या" अथेन्सची सर येत नव्हती असें सोफियाने मत दिलें. आतां देखील अमर कलावंतांच्या सुंदर कृतीनीं वेनस, ज्युपितर यांची मंदिरें अलंकृत होती. परंतु अथेन्स मधल्या नागरिकांत तो उत्साह नव्हता, ते संजीवन नव्हतें, कीं ज्यांचा अनुभव सोफियानें एके काळी घेतलेला होता.

सोफियाच्या पित्याचें घर ज्या जागेवर होते त्या जागीं आतां एक मसिडोनी व्यापाऱ्याचे घर बांधलेलें होते. ते घर बघून ती इतकी उद्विग्न झाली कीं एक दिवस नि रात्र तिच्या स्वाभाविक गंभीरपणाला सोडून ती वागत होती. बोलायची पण फारच कमी! कधीं तिच्या डोळ्यांतून अश्रुबिंदू झिरपत, तर कधीं ती संगमर्मराच्या मूर्तीप्रमाणें निश्चल व्हायची. आपल्या बाळपणांतल्या प्रियस्थानाची अशी अवस्था पाहून तिच्या मनावर हा परिणाम झाला, हें नागदत्ताला कळून चुकले. परंतु पंचाईत अशीं कीं तिची समजूत घालण्याची ती वेळ नव्हती, आणि शेवटीं तर तिच्या मर्मांतक शोकाचा परिणाम नागदत्ताला देखील जाणवला.

सोफियाचें मन पुन्हां ताळ्यावर आलें तेव्हां तिच्यांत खूपच बदल झालेला होता. तिला शृंगार करण्याची हौस कधींच नव्हती. पण आतां ती गणतांत्रिक अथेन्स मधल्या तरुणींप्रमाणें आपल्या मोकळया सोनेरी केंसांवर ताज्या फुलांचा गजरा माळायची. अंगात यवनसुंदरींचा अनेक चुण्या असलेला सुरेख पायघोळ झगा आणि पायांत अनेक पट्टया असलेल्या वहाणा. तिच्या सुंदर ललाटभागीं, गुलाबी कपोलांवर, खूप लाल असलेल्या ओठांत तारुण्य, लावण्य, आणि स्वास्थ्य यांचे अद्भुत संमिश्रण आढळून येई. प्रसन्नपणा आणि हास्य यांचें नर्तन तर तिच्या चर्येवर आणि ओठांवर सदा चाललेले असायचें.

नागदत्ताला हा बदल बघून नुसतें आश्चर्यच वाटलें नाहीं तर त्याला अपार हर्ष देखील झाला. त्यानें विचारल्यावरुन सोफिया सांगू लागली, "–प्रिय नाग! आजवर मी जीवन म्हणजे केवळ शोक आणि चिंता यांचा ठेवा मानीत आल्ये, पण आतां मला माझी चूक कळून आली. जीवनाकडे अशा प्रकारच्या एकांगी दृष्टीनं पाहणं म्हणजे त्याचं मोल कमी करण्यासारखं आहे व त्यामुळं कार्यक्षमता देखील दुबळी

बनत्ये. नाग, तूं देखील नाहीं का तक्षशिलेच्या भवितव्याची काळजी करीत? पण तूं आपलं चित्त शांत ठेवून उपाययोजनांच्या विचारांत आपलं सगळं सामर्थ्य कामीं आणतोस!"

"सोफी, तुला इतकी आनंदित बघून मला किती तरी प्रसन्नता वाटते!"

"मला कां बरं आनंद होणार नाहीं? अथेन्सला परत आल्यावर मला माझा प्रियकर गवसला."

नागदत्तानें हर्षोल्हासानें पुलकित होऊन म्हटलें, "खरंच? चला ठीक झालं. इतक्या दिवसांनंतर तुला तुझा प्रियकर गवसला ही आणखी आनंदाची गोष्ट!"

"नाग! मला दिसतंय; तूं मनुष्य नाहीस, देवापेक्षां देखील थोर आहेस; तुला मत्सराचा वारा देखील लागत नाही."

"मत्सर? मत्सर कशाचा? सोफी, मी तुला यवन देशांत आणून पोंचती करण्याची जबाबदारी घेतली नव्हती का? त्याच वेळीं मी तुला सांगितलं नव्हतं का, कीं तूं आपला प्रियकर शोधून घे म्हणून?"

"होय. सांगितलं होतं तसं!"

"आणि सांगू, तुझ्या या असाधारण हर्षावरून असं वाटतं की तुझा प्रियकर अगदीं असामान्य असावा."

"बरोबर आहे तुझा तर्क, नाग!"

"तर मग तुझ्या प्रियतमाला इथं निमंत्रित करण्याची मला परवानगी देशील का? यदा कदाचित् तो इथं येणार नसेल तर मला नुसतं पहायचं आहे त्याला!"

"पण येवढा उतावीळ कां झाला आहेस?"

"खरं आहे, मी खूपच उतावीळ झालों आहे." नागदत्तानें स्वतःचें मन आंवरण्याचा प्रयत्न केला.

सोफियेला स्वतःचे अश्रू दगा देतील अशी भीति वाटली. तिने दुसरीकडे तोंड वळवून म्हटले, "तुला बघायला मिळेल, पण अट अशी कीं तुला अथेन्सच्या तरुणां सारखा वेष घ्यावा लागेल. जरा या पोशाखापेक्षां चांगला!"

"तूं काल विकत आणलेला नवा तोगा (गाऊन) आणि नव्या वहाणा मी घालून येतों."

"जा, आधी घालून ये. तोंपर्यंत मी आपल्या प्रियतमासाठी माला घेऊन येत्यें; लिदिया गुंफत बसली आहे."

"बरं तर," म्हणून नागदत्त दुसऱ्या खोलींत गेला. सोफिया बैठकीच्या जागेमधल्या मोठ्या आरशापुढें उभी राहिली. आपल्या वस्त्रांवरून आणि फुलांच्या आभूषणांवरून तिनें एक वेळ हात गोंजारला. आणि एक माला आरशाच्या पाठीमागें ठेवून

ती हळूंच खोलीच्या दाराशी गेली व म्हणाली–" नाग, उशीर होतो गडे, नाहीं तर माझा प्रियकर कुठल्या तरी प्रमोद–शाळेत निघूनही जाईल ! "

" आटोपलंच बघ. हा तोगा बघ तूं कसा आणलास. याच्या चुण्या नीट बसत नाहींत. "

" मी येऊं का मदतीला ? "

" मोठे उपकार होतील ! "

उलट्या सुलट्या चुण्या तिनें सहज नीट केल्या. मग नागदत्ताने नव्या वहाणा घातल्या त्याच्या प्रफुल्लित मुखाकडे बघण्याचा धीर सोफियेला झाला नाही. तिनें त्याचा हात धरून म्हटले, " आर्धा चल, आरशात आपला नवा पोशाख तरी बघून घे. "

" तूं बघितलास, हेच पुष्कळ झालं. नेहमी साधा पोशाख असावा. "

" मला तरी वाटतो हा साधा, पण एकदां आरशात बघून घेतलं तर कांहीं पाप लागायचं नाहीं. "

सोफीने नागदत्ताला आरशापुढे आणून उभे केले, तो आपला पोशाख बघूं लागला, तेव्हां तिनें माला दाखवून म्हटले, " ही माला मी माझ्या प्रियकरासाठी तयार केली. "

" फार सुरेख आहे हं माला, सोफी ! "

" पण त्याला आवडेल कीं नाही, हे सागता येत नाही. "

" कां बरं आवडणार नाहीं ? खूप आवडेल ! "

" त्याचे केश पिंगट आहेत, आणि मालेंतले गुलाब ताबडे लाल ! "

" शोभून दिसेल ! "

" जरा तुझ्या डोक्यांत घालून बघितली तर ? "

" घाल बापडी; माझेहि केंस पिंगट आहेत. "

" म्हणूनच तर खात्री करून घेईन म्हणत्ये. " माला त्याच्या मस्तकावर ठेवून तिनें पुढून न्याहाळलें आणि आरशाकडचें तोंड दुसरीकडे फिरवायला सांगून ती विचारूं लागली–" तुला माझ्या प्रियकराला आज बघायचंच आहे काय ? तर मग घे बघ ! "

नाग वळून पाहूं लागला. सोफीची अंगुली त्याचें आरशांतलें प्रतिबिंब दाखवीत होती. तिच्या डोळ्यांत आनंदाश्रू होते. ती म्हणाली, " हा बघ माझा प्रियकर. " दुसऱ्याच क्षणीं तिने त्याला आपल्या भुजापाशांत आलिंगनबद्ध केलें, त्याच्या अधराशीं आपले अधर जुळवले. नागदत्त कितीतरी वेळ स्तब्ध राहिला, मग सोफीनें ओठांचें कुलूप काढून घेतलें; आपला कपोल त्याच्या कपोलाशीं भिडवून ती म्हणाली –

" माझा प्रियकर किती सुंदर आहे रे नाग ? "

" सोफी, मी स्वतःला तुझ्या योग्यतेचा मानीत नव्हतों."

"पण मी स्वत:ला मानत्ये ना! माझा नाग तो! आतां आपण आमरण एकसाथ राहूं!"

नागदत्ताच्या अश्रूंचा बांध आतां फुटला; तोहि म्हणाला–" होय, आमरण!"

– ५ –

नागदत्ताची एक मोठी इच्छा होती. ज्या सलामीच्या खाडींत यवन नौसेनेनें पार्शवाचा दणदणीत पराभव केला, ती बघायची होती त्याला. दोघेहि जमिनीवरच्या वाटेनें जात होतीं. नागदत्ताला स्वतःच्या अंगात नवा उल्हास खेळतो असे वाटत होते. राहून राहून त्याला तक्षशिलेची आठवण येत होती. वाटेत दोघे एका वृक्षाखाली विसाव्याला बसली तेव्हा सोफिया म्हणाली—

" ऐकलंस ना नाग! फिलिप मेला नि अलिकसुंदर मसिदोनियाचा राजा झाला, तो आता खूप लष्करी तयारी करीत आहे."

"होय, तो साऱ्या यवन (भूमध्य) सागराच्या किनाऱ्यावर आपली सत्ता प्रस्थापूं पाहतो. परंतु त्याचे पूर्व व दक्षिण (इजिप्तचा) किनारे तर पार्शवांच्या ताब्यात आहेत."

" याचा अर्थ, त्याला पार्शवांशी लढायचं आहे."

" आणि अशा रीतीनं गणतंत्री यवनांचं सहाय्य तो स्वतःच्या राज्य-स्थापनेसाठीं घेऊं पाहत आहे. तो एका दगडानं दोन पक्षी मारूं पाहतो सोफी! शाहंशाहाला यवनसागरा पासून निदान मागं हटवायचं–पुढं शिरकाव झाला तर आणखी बरं!–आणि दुसरं ह्मणजे अभिमानी यवनगणांची राजभक्ति मिळवायची!"

" अरस्तूनं त्याला शिक्षण दिलं, त्याचं साहस वाढवलं!"

"तत्त्ववेत्त्या अरस्तूनं?"

" होय; आणि अरस्तूचा गुरू अफलातूं (प्लेटो) यानं तर एका आदर्श गणाचं कल्पनाचित्र रेखाटलं होतं. पण त्यानं देखील त्यांत सामान्य जनतेला गोंडांगवळ्यांपेक्षां अधिक हक्क दिले नाहीत. अरस्तून आदर्शगणाच्या जागी आदर्श चक्रवर्ती राजाची कल्पना केली. कुणी सांगावं, हा यवन चक्रवर्ती पार्शवांना हारवून किती दूरचा पल्ला गांठतो ते!"

" एक वेळ पाऊल पुढं टाकलं की ते मागं ओढणं आपल्या हाती नसतं, सोफी! तिकडे माझा सहपाठी विष्णुगुप्त चाणक्य देखील मगधामध्ये चक्रवर्तीच्या शोधासाठी गेला होता."

" हिंदु आणि यवन चक्रवर्तींचं सिंधुतटीं मीलन तर होणार नाहीं ना?"

“या पिढींत नाहीं तरी पुढच्या पिढींत होईलच सोफी! पण तेव्हां हें जग किती संकुचित होईल, कोतें होईल!”

*　　　*　　　*　　　*

समुद्राच्या किनाऱ्यावर येतांच तीं नावेनें सलामीला रवाना झालीं. समुद्र शांत होता. वारा अगदीं पडलेला. सोफी आणि नागदत्त समुद्राकडे मोठ्या कृतज्ञ भावानें बघत होते. दोनशें वर्षांपूर्वी याच समुद्रानें पार्शवांचें आरमार नष्ट करण्यांत मदत दिलेली होती.

समुद्रांत बरेंच आंत गेल्यावर एक मोठें वादळ आलें. दोघांना भास होत होता दोनशे वर्षां पूर्वींच्या त्या वादळाचा! एकाएकीं दोघे भानावर आलीं; नौकेंत बसले-ल्यांच्या चेहेऱ्यावर भीति दिसत होती. वळून पाहिले तो शीड तुटलें, फाटलें, नाव डगमगूं लागली. वस्तुस्थिति स्पष्ट झाली. सोफीने नागदत्ताला स्वतःच्या वक्षभागीं आपल्या बाहुपाशानें बांधलें. तिच्या मुखावर स्मित विलसत होतें. ती पुटपुटली—
“आमरण—!”

“होय, आमरण.”—नागदत्ताने तिच्या ओठांवर आपले ओठ रोंवले. दोघेंही चार भुजांपाशानीं संबद्ध झाली.

दुसऱ्या क्षणीं नाव उलटली. दोघेहि खरोखरच आमरण एकमेकांचे साथी राहिलीं.

———

# ११—प्रभा

( काल–इ. स. ५० ).

– १ –

साकेत ( अयोध्या ) कधी देखील कुणा राजाचें राजधानीचें मुख्य शहर बनलें नाही. बुद्धाचा समकालीन कोसलराज प्रसेनजित् याचा इथें एक राजमहाल होता खरा, पण त्याची राजधानी मात्र इथून सहा योजनावर असलेल्या श्रावस्तीला होती. प्रसेनजित्‌चा जामात अजातशत्रु याने कोसलचें स्वातंत्र्य हिरावून घेतलें, तेव्हा श्रावस्तीचेंहि भाग्य विलयाला गेलें. शरयूतटीं वसलेलें साकेत आधीं देखील केवळ नौकांनीं चाललेल्या व्यापाराचें केंद्र होतें इतकेंच नव्हे तर पूर्व आणि उत्तरापथ (पंजाब) यांना साधणाऱ्या सार्थ पथांवर असल्यामुळें तें खुष्कीच्या मार्गानें चालणाऱ्या व्यापाराचें देखील मोठें केंद्र बनलें होतें. त्याचें हें महत्त्व बऱ्याच कालापर्यंत टिकलें. विष्णुगुप्त चाणक्याचा शिष्य चंद्रगुप्त मौर्य याने मगधाच्या राज्याचा विस्तार प्रथम तक्षशिलेपर्यंत आणि नंतर यवनराज शैलाक्ष ( सेल्युकस ) याचा पराभव केल्यावर हिंदूकुश पर्वतमालेच्या (अफगाणिस्तानच्या) पश्चिमेकडे खूप दूर हिरात आणि अमूदर्या नदीपर्यंत पसरवला. चंद्रगुप्त आणि त्याचा मौर्यवंश यांच्या अमदानीत साकेत हें व्यापारी केंद्रापेक्षां अधिक महत्त्व पावलें नाही. मौर्य वंशाचा निःपात करणारा सेनापति पुष्यमित्र यानें पहिल्यांदां साकेत ही आपली राजधानी केली, पण त्याचा उद्देश पाटलिपुत्राचें महत्त्व नष्ट करण्याचा मात्र नव्हता. वाल्मीकीनें पुष्यमित्राच्या काळांत किंवा त्याच्या शुंग वंशाची सत्ता असतांना आपलें रामायण लिहिलें तेव्हां त्यानें अयोध्या या नांवाचा प्रचार केला. अश्वघोषानें वाल्मीकीच्या मधुर काव्याचा रस चाखला हें संशयातीत आहे. जसा कालिदास चंद्रगुप्त विक्रमादित्याचा आश्रित होता तसाच वाल्मीकि देखील शुंगवंशाचा आश्रित कवि असल्यास आश्चर्य वाटायला नको. त्यामुळेंच शुंग वंशाच्या राजधानीचा महिमा वाढवण्यासाठी त्यानें जातकांतल्या दशरथाची राजधानी वाराणसी होती ती बदलून अयोध्या केली आणि रामाच्या रूपानें शुंगसम्राट पुष्यमित्र किंवा अग्निमित्र यांची प्रशंसा केली. अशाच प्रकारें पुढें कालिदासानें "रघुवंशा" मधला रघु आणि "कुमार संभव" मधला कुमार या दोघांच्या नांवांनीं चंद्रगुप्त विक्रमादित्य आणि कुमारगुप्त या पितापुत्रांची प्रशंसा केली.

सेनापति पुष्यमित्र यानें आपल्या स्वामीचा वध केला तरी तो सारें मौर्य-साम्राज्य हाताखालीं आणूं शकला नाहीं. संपूर्ण पंजाब यवन राजा मिनांदर याने बळकावला आणि पुष्यमित्राचा पुरोहित ब्राह्मण पतंजलि म्हणतो कीं मिनांदर याने एकवेळ साकेतला देखील वेढा दिलेला होता. यावरून दोन गोष्टींची माहिती मिळते : एक म्हणजे साकेतला पुष्यमित्राच्या सत्तेच्या प्रारंभीं देखील खास महत्त्व प्राप्त झालें होतें आणि दुसरें म्हणजे पतंजलि व पुष्यमित्र याच्या काळांत या नगराचें नांव साकेतच होते, अयोध्या नव्हे.

पुष्यमित्र, पतंजलि आणि मिनादर यांच्या काळापासून आपण दोनशें वर्षे मागे येऊं. या काळी देखील साकेतांत मोठमोठे श्रेष्ठी रहात असत. लक्ष्मीचा निवास असल्यामुळे सरस्वतर्चाि थोडीफार कदर होणें जरूर होते. त्यामुळेंच धर्म व ब्राह्मण यांचे गुळावरच्या डोंगळ्याप्रमाणे तेथे बुजबुजाटणे साहजिकच होते त्याच ब्राह्मणांत एक धनविद्यासंपन्न असे घराणे होतें, या घराण्याच्या स्वामीचे नांव आतां कालोदरात गडप झाले असले तरी स्वामिनीचे नांव मात्र तिच्या पुत्राने अमर केले. ब्राह्मणीचे नाव सुवर्णाक्षी होते. तिचे नेत्र सुवर्णासारखे पिवळे होते. त्या काळी पिवळे-निळे डोळे सर्वसाधारणतः ब्राह्मणांक्षत्रियांमध्ये आढळत असत. आणि पिवळे डोळे असणे देखील व्यंग समजत नसत. ब्राह्मणी सुवर्णाक्षी हिचा एक पुत्र तिच्याच प्रमाणे सुवर्णाक्ष, तिच्याच सारखा पिंगल केशांचा, व तिच्याच सारखा सुगौर वर्णाचा होता.

– २ –

वसंत ऋतु; आम्रमंजऱ्याचा सुगंध चारी दिशांत दरवळत होता. वृक्षांनीं जीर्णपल्लवांचा त्याग करून नवी पालवी परिधान केलेली होती. आज तिथी चैत्र शुद्ध नवमी होती. साकेत मधले नरनारी शरयु तटावर पोहायला गोळा होत होते. साकेतवासी मंडळी वसंतोत्सव पोहून साजरा करीत असत. तरुण तरुणी एकाच घाटावर उघड्या अंगानें पोहायला जमत. तरुणींत कितीतरी कर्पूरगौर यवनी होत्या. त्यांची सुंदर शरीरे यवन चित्रकारांनी घडवलेल्या अनुपम मर्मर मूर्तींप्रमाणें दिसायचीं. त्यांचे पिंगट नाहींतर पाढुरके केश मोठे सुंदर दिसायचे. सौंदर्यांत यवनींच्या मागें न राहणाऱ्या कितीतरी निळ्या पिवळ्या केसांच्या सुवर्णाक्षी ब्राह्मण कुमारिका होत्या; कितीतरी गोधूम वर्णाच्या व काळ्याभोर केसांच्या वैश्य तरुणी होत्या; त्यांचे अचिरस्थायी मादक लावण्य कांही कमी आकर्षक नव्हतें. आज शरयूच्या कांठावर साकेत मधल्या घराघरामधून कौमार्यातली रूपराशि गोळा झालेली होती. तरुणींच्या प्रमाणेंच नाना कुळांतल्या तरुणांनी अंगावरचीं वस्त्रें काढून ठेवलीं व ते नदींत उड्या घेण्यासाठी वाट बघूं लागले. त्यांची सुंदर शरीरें व्यायामपुष्ट असून प्रमाणबद्ध

होती; वर्ण कांहींचा कर्पूरगौर तर कांहींचा गोधूम! त्यांच्या केशांवर, नाकांवर, तोंडावळ्यांवर विशिष्ट कुलांची छाप दिसून येई. सौंदर्याची पारख करण्यासाठीं कोणत्याही तरुणतरुणीला आजच्या पोहण्याच्या महोत्सवापेक्षां अधिक चांगली संधि गवसायची नाहीं. दरवर्षी या प्रसंगी कितीतरी स्वयंवरें होऊन जायचीं. आईबाप तरुणांना या बाबतींत उत्तेजन देत. त्या काळीं हा मुळी शिष्टाचारच होता.

नावांतून शरयूपार जाऊन, पोहणाऱ्या तरुणतरुणींनी पाण्यात उड्या घेतल्या. शरयूच्या निळया पाण्यात कोणी आपले सोनेरी, पाडुर, भुरके किंवा लालवट लांबसडक केस प्रदर्शित करीत किंवा कोणी आपले निळे काळे केस निळ्या पाण्याशी मिळवून दोन्हीं हातांनी पाणी तोडीत पुढे सरकत होते त्यांच्या जवळून लहान लहान होडगी सरकत होती, होडग्यांमधले तरुण पोहणाऱ्यांना प्रोत्साहन देत आणि थकलेल्याना उचलून वर घेत. हजारो स्पर्धालूंमध्ये काही जण थकवा आल्यामुळे मागें राहणे साहजिक होते सगळेच पोहणारे वेगाने पुढे जाण्याचा प्रयत्न करीत होते. जेव्हा काठ तिसऱ्या हिश्शा इतका राहिला तेव्हां मात्र बरेचसे पोहणारे दमछाट होऊं लागले. त्याचवेळीं सुळकन पाठीमागून सुरकांडी मारून दोघेजण पुढें गेले; एकाचे केस पिंगट होते तर दुसऱ्याचे पाढुरके. कांठ जवळ दिसताच त्याचा वेग अधिक जलद झाला. नावांतून चालणारे लोक श्वास रोखून शर्यत बघत होते. दोघेहि तरुण एकाच रेषेंत सर्वांच्या पुढे गेलेले त्याना दिसून आले. कांठ आणिकच जवळ आला. लोकांना वाटत होते, दोघांपैकी एक कुणी तरी आघाडी मारील. पण दोघेहि सारखे एका रेषेत पुढें जात होते. नौकांतल्या लोकांनी त्यांना एकमेकांच्या पुढे जाण्याविषयी प्रोत्साहन दिलेले त्यांच्या कानी देखील पडले.

दोघेहि एकदमच कांठावर पोचले. त्यांपैकीं एक होता तरुण आणि दुसरी तरुणी! लोक आनंदाने ओरडले. दोघानीहि कपडे घातले. उघड्या पालखी मधून त्यांना मिरवण्यांत आले. तेव्हां प्रेक्षकांनी त्यांच्यावर फुले उधळलीं. तरुणतरुणी एकमेकाना अगदीं जवळून न्याहाळीत होते. लोक त्याच्या पोहण्याच्या कलेचीच नुसती वाखाणणी करीत नव्हते तर त्यांच्या सौदर्याची देखील प्रशंसा करीत होते. एकानें जवळच्याला विचारले, "सौम्य, कुमारिका आहे माझ्या माहितींतली; पण हा तरुण कोण आहे?"

"सुवर्णाक्षी-पुत्र अश्वघोष याचं नांव ऐकलं नाहीस?"

"नाहीं, मला केवळ माझ्या कुलाच्या पुरोहिताचंच नाव माहित आहे. आम्हां व्यापाऱ्यांना हें सगळं समजून घेण्या इतकी फुरसद तरी कुठं असते?"

तिसऱ्या एकानें म्हटलें— "अरे, अश्वघोषाच्या विद्येची ख्याति साकेतपार दूरवर पोंचलेली आहे. हा साऱ्या वेदांत आणि विद्येंत पारंगत आहे."

पहिला–" पण याचं वय तर चोविसाच्या वर नसावं ! "

तिसरा–" येवढ्या वयांत ! याच्या कविता तर लोक हालत डोलत गातात नि वाचतात. "

दुसरा–"अरेच्चा, आमच्या तरुण-तरुणींच्या जिव्हांवर ज्याची प्रेमगीतं नाचत असतात तो अश्वघोष कवि हाच का ? "

तिसरा–" होय, हाच तो अश्वघोष ! सौम्य, या कुमारिकेचं नांव काय ? "

पहिला–" प्रभा, साकेत मधल्या आमच्या यवन–कुलांतले प्रमुख आणि कोसला-मधले प्रख्यात सार्थवाह दत्तमित्र यांची मुलगी ! "

दुसरा–" तरीच, असं सौंदर्य अवांतर फार थोड्यांत आढळतं ! दिसायला किती नाजुक बांधा, पण पोहण्यात किती कणखर ! "

पहिला–" हिचे आईबाप दोघेहि धडधाकट आणि बलवान आहेत. "

नगरोद्यानांत गेल्यानंतर लोकांनी विशेष सन्मान दाखविल्यावर त्या दोघां पोह-णाऱ्यांचा परिचय करून देण्यात आला, आणि त्या दोघांनीं खालच्या मानेने लाजत लाजत एकमेकांची ओळख करून घेतली.

– ३ –

साकेत मधलें पुष्योद्यान सेनापति पुष्यमित्राच्या सत्तेचे स्मारक होतें. हे बांधून काढण्यासाठी सेनापतीने पुष्कळ पैसा आणि श्रम खर्ची घातले. आतां जरी पुष्य-मित्राच्या वंशाचे राज्य तेथे नव्हते, आणि साकेत शहर हें दुसऱ्या दर्जाचे देखील राजधानीचे शहर जरी राहिले नव्हते, तरी तेथील नैगमानें ( नगर सभेनें ) तें उद्यान साकेतचा गौरव म्हणून कायम राखले व दोनशे वर्षांपूर्वी पुष्यमित्राच्या काळीं असलेली त्याची शोभा तशीच निगा राखून अखंड ठेवली. बागेच्या मध्यें एक सुंदर सरोवर होते. त्याच्या निळ्या स्वच्छ पाण्यांत पद्म, सरोज, पुंडरीक इत्यादि नाना रंगाचीं कमळे प्रफुल्लित झालेली होती आणि हंसयुगुले त्यांत पोहत होती. चहूं बाजूंला पांढऱ्या पाषाणाचे घाट असून त्यांच्या पायऱ्या स्फटिकाप्रमाणें चमकत होत्या. सरोवराच्या कांठाकाठांनीं हिरव्या दूर्वांकुरांचे बरेचसे रुंद गोठ लावलेले होते. मग कुठें कुठें गुलाब, जुई, चमेली यांच्या फुलांचे ताटवे, तर कुठें कुठें तमाल, बकुल, अशोक याच्या रांगाच्या सांवल्या. कुठे कुठे पाषाणाचे कट्टे असलेले लहान मोठे लतामंडप, तर कुठें कुठें कुमार-कुमारिकांचीं कंदुक-क्षेत्रें. उद्यानांत कुठें कुठे पाषाण, मृत्तिका आणि हरितवनस्पति यांनी आच्छादिलेले रम्य क्रीडा-पर्वत देखील होते. तर कुठें कुठे जलयंत्रे (कारंजी) पाण्याचे तुषार उडवून पावसाचें सोंग आणीत होती.

तिसऱ्या प्रहरी बहुधा एका लतागृहाच्या जवळ साकेतनिवासी तरुणतरुणींची गर्दी जमलेली असायची. ज्यांचा आंत शिरकाव होऊं शकत नसे त्यांची ही गर्दी.

आज देखील तेथें गर्दी होती तरी चहूंकडे निःशब्द होते. सगळयांचेच कान लतागृहाकडे लागलेले. आणि आंत ?–एक महिन्यापूर्वी ज्यानें पोहण्यांत विजय मिळवण्याचे टाळलें तो तरुण शिलाच्छादित चौथऱ्यावर बसलेला. त्याच्या अंगात तलम विरळ अशा कापडाचा अंगरखा; लांब पिंगट केश डोक्यावर जुड्याप्रमाणे बांधलेले, हातांत मुखर वीणा! तारांवर तरुणाची बोटे सहजपणे स्पर्शून जातांक्षणींच त्यांतून मनाजोगते स्वर निघत होते. तरुण अर्धमिटल्या नयनी लयलीन होऊन गीत गात होता; दुसऱ्यांनी रचलेंले नव्हे, स्वकृत! त्यानें आतां "वसंत कोकिला" चे संस्कृत गीत संपवले होते. संस्कृत नंतर प्राकृत गीत गाणें आवश्यक होते. आपल्या श्रोतृवृंदांत प्राकृताची आवड असणारे अधिक आहेत याची जाणीव त्या कविगायकाला होती. कवीनें आपली नवनिर्मित रचना "उर्वशीवियोग" गाऊन दाखविली. उर्वशी लुप्त झाली आणि पुरूरवा तिला अप्सरा (पाण्यात चालणारी) या नांवानें संबोधून उर्वशीला हांका मारीत पर्वत, सरिता, सरोवर, वन, कुंज इत्यादि जागी धुंडाळीत आहे. त्याला अप्सरेचे दर्शन होत नाही पण तिचे शब्द वाऱ्यावर ऐकायला येतात. पुरूरव्याच्या अश्रूं बद्दल गाताना गायकाच्या डोळयातून आसवें गळूं लागली आणि साऱ्या श्रोतृवृंदाने देखील आपले डोळे पुसले.

संगीत समाप्त झाल्यावर लोक एकामागून एक जायला निघाले. अश्वघोष बाहेर निघाला, तेव्हा काही तरुणतरुणी त्याच्या भोवतीं जमा झाल्या. त्यांतच प्रभा देखील होती; तिचे डोळे सुजलेले व आरक्त झालेले होते. एका तरुणाने पुढे होऊन म्हटलें–

"महाकवि."

"महाकवि? सौम्य, मी कवि देखील नाही."

"मला माझ्या श्रद्धेप्रमाणं बोलूं द्या कवि! साकेत मध्ये आम्हां यवनांची एक लहानशी नाट्यशाला आहे."

"नृत्यासाठी? मला देखील नृत्याची आवड आहे."

"नृत्यासाठीच नव्हे केवळ, तिथं आम्ही अभिनय देखील करतों."

"अभिनय?"

"होय, यवनपद्धतीचा अभिनय हा एक अभिनव प्रकारचा असतो. भिन्न भिन्न काल आणि स्थान यांचा परिचय करून देणाऱ्या मोठमोठ्या चित्रमालिका अभिनया द्वारें आम्ही दाखवतों; आणि साऱ्या घटना वास्तविक स्वरूपांत दाखवण्याचा प्रयत्न करतों."

"मला किती वाईट वाटतं म्हणून सांगू! सौम्य, साकेतमध्यें जन्माला येऊन देखील मी असा अभिनय आजवर पाहूं शकलों नाही."

“ आमच्या अभिनयाचे प्रेक्षक इथले यवनपरिवार आणि त्यांचे कांहीं इष्टमित्र यांच्या पुरतेच सीमित आहेत. म्हणूनच पुष्कळशा साकेतवासीयांना यवनअभिनय–”

“ नाटक म्हटलं तर बरं, सौम्य ! ”

“ बरं तर ! बऱ्याच जणांना यवननाटक ठाऊक देखील नाहीं. आज आम्ही एक नाटक करणार आहोंत, ते बघायला तुम्हीं यावं अशी आम्हां सर्वांची इच्छा आहे. ”

“ आनंदानं येईन. तुम्हां मित्रांची ही माझ्यावर कृपाच म्हणायची ”

अश्वघोष त्यांच्या बरोबर निघाला. नाट्यशालेत त्याला रंगमंचाजवळ बसवण्यांत आले. कुठल्या तरी यवन ( यूनानी ) दु:खान्त नाटकाचा अभिनय प्राकृत भाषेत करून दाखविण्यांत आला होता. यवनांतील कुलीन कुमार–कुमारिकानीच प्रत्येक भूमिका घेतलेली होती. अभिनेते आणि अभिनेत्री यांचे पोशाख यवनदेशीय होते. भिन्न भिन्न दृश्याचे चित्रपट ( पडदे ) देखील यवनी पद्धतीने रंगवलेले होते अश्वघोषाच्या ओळखीची प्रभा नायिका झाली. तिचे अभिनयकौशल्य पाहून तर तो मुग्धच झाला. नाटकाच्या मध्यंतरांत एक उचित प्रसंग पाहून त्याला पूर्वपरिचित यवनतरुणानें “ उर्वशी-वियोग ” गाऊन दाखविण्याची विनंति केली. अश्वघोषानें आढेवेढे घेतले नाहीत; तो वीणा घेऊन रंगमंचकी चढला, आणि मग आपल्या गाण्याने स्वतः प्रमाणेच त्याने दुसऱ्याना देखील गहिवरून सोडले. त्याची नजर एक वेळ प्रभेच्या कातर नजरेशीं देखील भिडली होती.

नाटक समाप्त झाल्यावर पडद्याआड साऱ्या नटनटी कुमार-कुमारिकांचा कवीबरोबर परिचय करून देण्यांत आला. अश्वघोष म्हणाला,“साकेतांत राहून देखील मी या अनुपम कलेच्या बाबतीत आजवर बिलकुल अनभिज्ञ होतो. या अज्ञात प्रभालोकाचं मला दर्शन घडवलंत या बद्दल मी आपणा सर्व मित्रांचा अत्यंत आभारी आहे. ”

“ प्रभालोक ” असे म्हणताच काही तरुणी प्रभेकडे पाहून खट्याळपणाने हांसल्या. अश्वघोष पुढे म्हणाला– “ माझ्या मनात एक विचार आला. आता तुम्हीं यवननाटकाचं प्राकृत रूपांतर अभिनय करून दाखवलंत; अगदी त्याच धर्तीवर आपल्याला आपल्या देशांतल्या कथावर चांगली नाटकं तयार करता येतील. ”

“ तुम्ही मनांत आणलंत कवि, तर मूळ यवननाटकापेक्षां देखील चांगलीं नाटकं रचूं शकाल याची आम्हाला खात्री वाटते. ”

“ असं मात्र कांही बोलूं नका, सौम्य ! त्या यवन–नाटककारांचा शिष्य होण्याचीच काय ती माझी लायकी आहे. बरं, बोला मी जर पुरूरवा-उर्वशीवर नाटक लिहिलं तर ? ”

“ आम्हीं त्याचा अभिनय करूं; मात्र पुरूरव्याची भूमिका तुम्हांला करावी लागेल ! ”

" माझी हरकत नाहीं. शिवाय जराशा अभ्यासानंतर ती मी वाईट करणार नाहीं असं पण मला वाटत ! "

" आम्हीं पडदे पण रंगवून घेऊं. "

"पडद्यांवर आपल्याला पुरूरव्याच्या देशांतलीं दृश्यें अंकित करावीं लागतील. थोड्या फार रेघोट्या मी देखील ओढतो. वेळ मिळाल्यास मी करीन तेवढी मदत. "

" आपल्याच आदेशाप्रमाणं दृश्यं अंकित करणं योग्य होईल. पात्रांची वेश-भूषा देखील तुमच्याच निर्देशा प्रमाणं करूं सौम्य ! आता पात्रं सांगा ! "

" सौम्य, पात्रांबद्दल आताच सांगतां येत नाही, मात्र त्यांची संख्या कमी ठेवण्यांत यावी. किती ठेवूं ? "

" सोळा ते वीस पर्यंत आम्हांला सहज मिळूं शकतील ! "

" मी सोळाच्या वर जाऊं न देण्याचा प्रयत्न करीन. "

" मात्र सौम्य, पुरूरवा तुम्हीच झालं पाहिजे, आणिक ही प्रभा उर्वशी म्हणून शोभेल ना ? आजचा तिचा अभिनय बघितलाच आहांत तुम्ही ! कसा झाला ? "

" माझ्या अनभ्यस्त दृष्टीला तर तो सर्वस्वी निर्दोष वाटला. "

" तर मग प्रभेलाच उर्वशी बनवायचं ! ठरलं, आमच्या मंडळींत ज्याला जें काम देण्यांत येतं ते त्याला नाकारतां येत नाही."

प्रभेचे नयन जरा संकोचानें खाली वळले, परंतु प्रमुख तरुणानें– " काय प्रभा, होय ना ?" असे विचारतां क्षणींच तिने चटकन होकार दिला.

– ४ –

अश्वघोषानें प्रमुख यवन तरुण बुद्धिप्रिय याच्या जोडीनें कांहीं यवन नाटकांची प्राकृत भाषांतरे वाचून काढली. नाटकांच्या चित्रपटाचें ( पडद्याचे ) नामकरण त्यानें यवन ( ग्रीक ) कलेच्या स्मरणार्थ ' यवनिका ' असें केलें, नाटक संस्कृत प्राकृत मध्ये गद्यपद्यात्मक असें लिहिलें. त्या वेळच्या प्राकृताचा तोंडवळा जवळ जवळ संस्कृत सारखाच होता, त्यामुळे संभ्रांत परिवारांत देखील प्राकृत परकी भाषा वाटत नसे. " उर्वशीवियोग " हेच पहिले भारतीय नाटक, आणि पहिला भारतीय नाटक-कार अश्वघोष ! कवीचा हा पहिला प्रयत्न होता तरी तो " राष्ट्रपाल " " सारि-पुत्र " इत्यादि त्याच्या पुढील नाटकांपेक्षां सौंदर्यांत खास कमी भरणारा नव्हता.

रंगाची तयारी आणि अभिनयाचा अभ्यास यामुळे तरुण कवीला खाण्यापिण्याची शुद्ध उरत नसे. तो हा काळ म्हणजे आपल्या आयुष्यांतले सुंदरतम क्षण मानीत होता. रोज तो तासन्तास प्रभेबरोबर नाटकाची तालीम करायचा. पोहण्याच्या वेळी त्यांच्या हृदयांत प्रीतीचें बीज अंकुरित झाले होते. यवन तरुणतरुणी त्याच्याकडे आत्मीयतेनें बघत असत, त्यामुळें त्याला कसलीहि मदत करूं लागणे हे ते भाग्याचें

मानीत. एके दिवशी बऱ्याच घटिका कुंचल्याने चित्र रंगवल्यावर अश्वघोष विसांव्या-साठीं बाहेरच्या क्षुद्रोद्यानांत ठेवलेल्या आसान्दिकेवर जाऊन बसला. त्याचवेळी प्रभा पण तेथे आली. प्रभेने आपल्या स्वाभाविक मधुर स्वरांत म्हटले, "कवि, उर्वशी-वियोग गीत रचतांना तुमच्या डोळ्यांपुढं कोण दिसत होतं?"

"उर्वशी नि पुरूरवा यांचं कथानक!"

"कथानक तर मला देखील माहिती आहे. उर्वशीला संबोधित करतांना तुम्ही वारंवार अप्सरा म्हटलं होतं!"

"मग उर्वशी अप्सरा नव्हती का?"

"तुम्ही गीतांत पुरूरव्याचं वर्णन करतांना त्याला उर्वशीच्या वियोगानं विव्हल करून सरिता, सरोवर, पर्वत, वन या सर्वांतून तिचा शोध करायला लावलंत?"

"पुरूरव्याच्या तशा अवस्थेंत ते स्वाभाविकच होतं!"

"परंतु उर्वशी-वियोगाच्या गायकानं लताकुंजांत अश्रुधारांनी वीणेप्रमाणंच गीतस्वरांची साथ केली होती."

"गायक आणि अभिनेता यांनीं इतकं तन्मय झालंच पाहिजे, प्रभा!"

"ऊं हूं! तुम्हांला माझ्याजवळ स्पष्ट सागायचं नाहीं असं दिसतं."

"तुला काय वाटलं प्रभा?"

"मला वाटतं, तुम्हीं कुठल्या जुन्या पुराण्या उर्वशीच्या वियोगाचं गाणं नव्हतं म्हटलं ते!"

"तर मग कुणाचं?"

"तुमची उर्वशी–उर-वशी (हृदयांत बसलेली)–होती; ती अप्सरा–अप् म्हणजे पाणी, सरा म्हणजे पोहणारी–शरयूच्या पाण्यात पोहणारी होती तुमची अप्सरा."

"आणिक पुढं!"

"या उर्वशीचा पुरूरवा कुठल्या तरी हिमालयासारख्या पर्वतावर, वनामधून, नद्यांसरोवरांमधून आणि झाडीमधून भटकत नव्हता, तर तो याच साकेतच्या शर-यूंतून, पुष्पोद्यानांतल्या सरोवरांतून, आणि क्रीडापर्वतामधून किंवा वनाझाडीतून तिला धुंडाळीत होता."

"बरं पुढं?"

"त्याचे डोळे कुणा जुन्यापान्या पुरूरव्याच्या सहानुभूतीनं भरून येत नव्हते; ते अश्रू आपला स्वतःचाच दाह विझविण्यासाठीं बाहेर पडत होते."

"आतां आणखी एक सांगूं का प्रभा?"

"सांगा ना; आतांपर्यंत मीच बोलत होत्यें."

" त्या दिवशी लताकुंजांतून बाहेर पडलों तेव्हां मला तुझे हे मनोहर निळे डोळे आरक्त आणि सुजलेले दिसत होते."

" तुम्ही आपल्या गाण्यांनी रडवलंत ! "

" तूं आपल्या वियोगामुळं हें गीत मला लिहायला लावलंस ! "

" पण कवि, तुमच्या गीतांतली उर्वशी पाषाणी होती, कमींत कमी तुम्हीं तरी तिला तसं चित्रित केलंत. '

" याचं कारण मी व्याकुळलों, निराश झालो."

" काय वाटलं तुम्हांला ? "

" वाटलं, मला त्या अचिरप्रभेच्या ( विजेच्या ) दर्शनाचं भाग्य पुन्हां मिळणं कठीण. वाटलं, ती मला केव्हाच विसरून गेली. "

" तुम्ही इतके हताश झालां होतां, कवि ? "

" जों पर्यंत आत्मविश्वास दृढ व्हायला कोणतें देखील सबळ कारण दिसत नाहीं, तों पर्यंत हताश बनण्या व्यतिरिक्त दुसरं काय शक्य आहे ? "

" तुम्हीं केवळ साकेतचेच नव्हे, तर या विस्तृत भूमिखंडाचे महिमा-प्राप्त कवि आहांत. तुम्हीं साकेत मधल्या पोहणाऱ्यांत विजेते आहांत. तुमच्या विद्येची प्रशंसा प्रत्येक साकेतवासीयाच्या जिव्हेवर खेळते. आणि बायकांच्या दृष्टींतून पाहिलं तर साकेत मधली प्रत्येक सुंदर तरुणी तुम्हांला आपल्या डोळयांची बाहुली बनवायला तयार आहे. "

" पण मला काय त्याचं ? मला तर माझी उर्वशीच सर्वस्व वाटत होती. दोन आठवडे ती दृष्टीस पडली नाही तेव्हां जीवन निस्सार वाटूं लागलं. खरं सांगतो प्रभा, माझं चित्त इतकं दुबळं कधीहि झालं नव्हतं. आणखी एक आठवडा तू दृष्टीस पडली नसतीस तर काय केलं असतं मी हे माझं मलाच सांगवत नाहीं. "

" कवि, तुम्ही इतके स्वार्थी होऊं नका. तुम्हीं आपल्या देशाचे शाश्वत कीर्ति-गायक आहांत. तुमच्या पासून देशाच्या किती तरी अपेक्षा आहेत. तुमच्या या उर्वशी-वियोग नाटकाची किती वाखाणणी चाललेली आहे, हें आहे ना माहिती ? "

" कुठं ? माझ्या कानी कशी आली नाहीं ती ? "

" मागच्या आठवड्यात माझे आप्त असलेले एक यवन व्यापारी भरुकच्छाहून ( भडोचहून ) आले होते. तिथं यवन नागरिकांची संख्या पुष्कळ आहे. आमचे साकेत मधले यवन तर हिंदूच बनले. परंतु भरुकच्छा मधले अजून आपली भाषा विसरले नाहींत. तिथं यवन देशाहून व्यापारी आणि साहित्यिक येत असतात. माझे हे आप्त यवन साहित्याचे मोठे मर्मज्ञ आहेत. त्यांनी श्रेष्ठ यवन नाटककार एम्पी-दोकल आणि युरोपिद् याच्या कृतींच्या तोडीचं तुमचं नाटक ठरवलं. त्यांनीं या नाटकाची

एक नक्कल बरोबर नेली. म्हणत होते, मिसर देशाचा राजा तुरमाय ( टॉलेमी ) मोटा नाट्यप्रेमी आहे, त्याच्याकडे याचं यवन भाषांतर पाठवूं. भरुकच्छाहून मिसर देशाला नियमितपणे जहाजं येत जात असतात. मी हें त्याचं बोलणं ऐकलं नि त्या-वेळीं माझं हृदय अभिमानानं फुलून उठलं."

"प्रभा, तुझ्या हृदयांतला अभिमान हेंच माझं सार सर्वस्व!"

"कवि, तुम्हांला स्वत:चं मोल कळत नाहीं."

"माझ्या मोलाची कसोटी तूं होतीस, प्रभा! आतां ती मला कळून चुकली."

"असं करून चालायचं नाहीं तुमचं! तुम्हांला प्रभेचा प्रेमिक अश्वघोष आणि युगांतला महाकवि अश्वघोष या दोघांत फरक हा ठेवावा लागेलच. प्रभेचा प्रियकर अश्वघोष यानं वाटेल ते बोलावं नि करावं. पण महाकवि मात्र त्या पातळीच्या वर गेलेला असून साऱ्या वसुंधरेच्या मालकीचा असावा."

"तूं म्हणशील तसं. या बाबतीत तुझं ऐकेन मी!"

"मला इतकं सौभाग्य लाभेल अशी आशा नव्हती वाटली मला!"

"कां बरं?"

"वाटत होतं, तुम्हीं मला विसरलांत!"

"तूं इतकी कां सामान्य होतीस विसरायला?"

"तुमच्यापुढं होत्यें नि आहें ही!"

"तुझ्या मुळं मला कवितेचं नवं वरदान मिळालं. मला माझ्या कवनांत आतां नवं चैतन्य आढळतं, नवी प्रेरणा दिसल्ये. उर्वशी-वियोग गीत तुझ्याच प्रेरणेनं लिहिलं नि आतां हे नाटक देखील तुझ्याच मुळं लिहिलं. नाटक आतां आपल्या देशांतली एक स्वकीय वस्तु बनवणार आहे मी! पण प्रभा, एक सांगशील, मी तुला विसरून जाईन असं तुला कां वाटलं?"

"कुठल्याहि बाबतींत तुमच्या जवळ येण्याइतकी योग्यता माझ्यांत नव्हती असं मला वाटे. जेव्हां मला तुमच्या एकेका गुणाचा परिचय होत गेला तेव्हां मी अत्यंत निराश झाल्यें. साकेतांतल्या एकापेक्षां एक सुंदर तरुणी तुमच्या नांवाचं वेड घेऊन बसलेल्या पाहिल्या त्यामुळं तर मी आशाच सोडली. मग ऐकलं, तुम्हीं उच्च कुळांतले ब्राम्हण. ब्राम्हणांच्या खालोखाल उच्चस्थान असलेल्या राजपुत्र यवनाची मी कन्या असल्ये तरी मातृपितृ कुलांच्या मागील सात पिढ्यांची शहानिशा करून मग विवाह करणाऱ्या कुलीन ब्राम्हणापैकीं एक माझ्या प्रेमाचा स्वीकार कसा बरं करूं शकेल?"

"वाईट वाटतं मला प्रभा, तुझ्या मनाला मी खूप यातना दिल्या."

"तर मग तुम्हीं माझा --" प्रभा बोलता बोलतां अडखळली.

अश्वघोषानें प्रभेचे सजल लोचन आपल्या ओठांनीं पुसून तिच्या गळ्यांत गळा घातला, आणि म्हटले, " प्रभा, हा अश्वघोष नेहमीं तुझाच राहील. काळ देखील तुला माझ्यापासून दूर करूं शकणार नाहीं."

प्रभेच्या नेत्रांतून खळखळ अश्रुधारा वाहूं लागल्या आणि अश्वघोष तिला कंठालिंगन देऊन ते अश्रू पुसूं लागला.

" उर्वशी-वियोग " उत्कृष्ट वठलें व त्याचे अनेक प्रयोग झाले. ते साकेत मधल्या सगळ्या सभ्य नागरिकांनी पाहिले. अभिनयकला इतकी उच्च कोटीची असून पूर्णत्वाला जाऊन पोंचली असेल याची त्यांना कल्पना देखील नव्हती. शेवटच्या पडदा पडायच्या वेळीं अश्वघोषानें वारंवार सांगितले कीं आपण साऱ्या कल्पना यवन रंगभूमीवरून घेतलेल्या आहेत परंतु त्याची नाटकें इतकी स्वदेशी होती की त्यांच्यावर कुठल्याहि प्रकारच्या विदेशी प्रभावाची बिंदुमात्र छटा दिसत नव्हती.

जशी अश्वघोषाची संस्कृत-प्राकृत गीते व कविता साकेत आणि कोसल यांच्या बाहेर देखील पसरली, तशीच त्याची नाटकें देखील त्याच्याहि पलीकडे दूरवर पसरत गेलीं. उज्जयिनी, दशपुर, सुप्पारक, भरुकच्छ, शाकल (सियालकोट), तक्षशिला, पाटलिपुत्र यांच्या सारख्या महानगरांत-म्हणजे ज्या ज्या ठिकाणीं यवनांची पुरेशी वस्ती होती व त्यांचीं नाटकगृहेहि होती त्या त्या ठिकाणीं अश्वघोषाची नाटकें रंगभूमीवर लवकरच आलीं. आणि मग ती साऱ्या सामंतांना आणि व्यापाऱ्यांना अतिशय आवडली.

प्रभेच्या आईवडिलांना अश्वघोष हा अति योग्य असा जांवई मिळाला असे वाटत होते.

— ५ —

अश्वघोषाचा रंगभूमीवरील अभिनय व यवनकन्येबरोबरचा प्रणय त्याच्या आईबापापासून लपून राहूं शकला नाही. हे ऐकून पित्याला विशेषच चिंता लागली. त्या ब्राह्मणाने आधी सुवर्णाक्षीला आपल्या मुलाची समजूत घालायला सांगितले. ' अशा प्रकारचे संबंध अधर्म्य आहेत," असे आईने मुलाला सांगितलें मात्र, ब्राह्मणांच्या साऱ्या वेदशास्त्रांचा ज्ञाता असलेल्या त्या अश्वघोषानें आईजवळ प्राचीन ऋषींच्या आचरणासंबंधीचे शेकडो दाखले सांगितले. (त्या दाखल्यांपैकी कांही त्यानें मागून आपल्या "वज्रच्छेदिका" मध्ये संग्रहित केले. आज देखील उपनिषदांमध्यें वज्रच्छेदिकोपनिषद् या नांवानें त्याचा समावेश केलेला आढळतो). आईनें मुलाचे दाखले ऐकून घेतले आणि ती म्हणाली, "बाळ, हे सारं खरं रे! पण आजकालचे ब्राह्मण जुन्या काळचं आचरण मानीत नाहीत."

" तर मग ब्राह्मणांच्या साठी मी एक नवा सदाचार स्थापन करीन."

आईला अश्वघोषाचे युक्तिवाद मान्य नव्हते, परंतु त्यानें–"प्रभा आणि मी वेगळे राहून जगूं शकणार नाही," असे सांगतांच तिनें पुत्राचा पक्ष घेतला, आणि ती म्हणाली, " बाळा, तूंच माझं सारसर्वस्व आहेस."

अश्वघोषाने एके दिवशी प्रभेला आईजवळ नेले. रूपगुणांत आणि स्वभावांत आगळी असलेल्या त्या कुमारिकेला आईनें आशीर्वाद दिला.

पण हे सगळे त्या ब्राम्हणाला पटत नव्हतें. त्याने एके दिवशी अश्वघोषाला सरळ सांगून टाकलें, " पुत्र, आम्हां श्रोत्रियांचं श्रेष्ठ ब्राह्मणकुळ आहे. आमच्या पन्नास पिढ्यांत फक्त कुलीन ब्राह्मणाच्या मुलीच आमच्या घरी आल्या. आज तूं जर ही नवी सोयरीक करशील तर, आम्ही व आमच्या पुढील पिढ्या नित्यकाळ जाति-भ्रष्ट होतील आमची मान-मर्यादा सगळी नष्ट होईल."

प्रभेचा त्याग करण्याची कल्पना देखील अश्वघोषाच्या मनांत येणे शक्य नव्हती.

ब्राह्मणानें मग प्रभेच्या आईबापां जवळ अनुनय-विनय करून पाहिला पण त्यांच्या हाती कांहीहि नव्हते. शेवटी तो प्रभेला शरण गेला.

" मी अश्वघोषाला आपलं म्हणणं सांगेन," येवढेच आश्वासन प्रभेने त्याला दिले.

– ६ –

प्रभा आणि अश्वघोष अभिन्न सहचर होते. शरयूतीर असो की पुष्पोद्यान, यात्रोत्सव, नृत्यशाळा, नाट्यशाळा वा कुठलेंहि इतर स्थान असो, त्या जागीं दोघेंहि एकत्र असायचींच. प्रभा सूर्यप्रभेप्रमाणें अश्वघोषाच्या हृदयपद्माला विकसित ठेवत असे. दुधासारख्या शुभ्र चांदण्यांत दोघेहि शरयूच्या वाळवंटांत फिरायला जात. त्या जागीं ती आपला काळ केवळ प्रणयचेष्टितांमध्येच व्यतीत करीत नसत, तर कित्येक वेळां जीवनांतल्या दुसऱ्या गंभीर प्रश्नांवर देखील चर्चा करीत असत. एका चांदण्या रात्रीं शरयूच्या काळ्या जलधारेजवळील शुभ्र रेतीवर बसलेल्या प्रभेचे रूप आपल्या मनांत अंकित करीत असलेल्या अश्वघोषाच्या मुखांतून सहजोद्गार निघाले, " प्रभे, तूं माझी कविता आहेस. तुझ्याच प्रेरणेवरून मी 'उर्वशी-वियोग' लिहिलं. तुझी ही रूपराशि माझ्या कितीतरी सुंदर काव्यरचनेची प्रेरक होऊं शकेल. काव्य म्हणजे अंतरीच्या अभिव्यक्तीचा आविष्कार नसून उलट ते बाह्य अभिव्यक्तीचा आंतरिक साक्षात्कार होय, हे तत्त्व तूंच मला शिकवलंस, प्रिये."

थंडगार वाळूंत पडल्या पडल्या प्रभा अश्वघोषाचें बोलणे ऐकत होती. तिचे लांब स्वच्छ केश वाळूवर फैलावलेले पाहून त्यानें तिचे डोके आपल्या मांडीवर घेतले. आपली नजर त्याच्याकडे वर वळवून प्रभा त्याचे रूप आपल्या डोळ्यांत सांठवत होती. अश्वघोषाचे बोलणे संपले तेव्हां ती म्हणाली, " मला तुझ्या साऱ्या

गोष्टी कबूल आहेत. वस्तुतः साकार सौंदर्या पासून प्रेरित झाल्याविना काव्याला पूर्णत्व येत नसतं. मी देखील तुझं काव्यात चित्रण केलं असतं पण कविता ही माझ्या आधीनची गोष्ट नाही. तुझं मूक चित्रण मात्र मी करत्येच. त्या दिवशी तुला म्हटलं होतं मी–'तूं आपल्यांतले दोन अश्वघोष वेगवेगळे केले पाहिजेस. युगाचा महाकवि शाश्वत अश्वघोष याचीच मुख्यतः आपण काळजी घेतली पाहिजे. कारण तो एका व्यक्तीचा नाही तर साऱ्या विश्वाचा महानिधि आहे. कालकारामचा तो विद्वान भिक्षु आठवतो ना ? परवां आपण ज्याला भेटायला गेलो तो ?"

"मला तो विलक्षण बुद्धिमान वाटला."

"होय. किती दूरदूर पर्यंत प्रवास केलाय त्यानं ! जन्मला मिसर देशातील अलसंदा ( अलेक्झाड्रिया ) नगरीत."

"ऐकलंय खरं मी देखील. प्रिये, एक गोष्ट मला समजत नाही. साऱ्याच यवनांना बौद्ध धर्म का आवडतो ?"

"तो त्यांची मनोवृत्ति आणि स्वातंत्र्याची आवड याला अनुकूल आहे म्हणून !"

"पण बौद्ध तर साऱ्यानाच तपस्वी, विरागी आणि भिक्षु बनवूं पाहतात ?"

"बौद्धात देखील भिक्षुंच्या पेक्षा गृहस्थ खूप अधिक असतात आणि बौद्ध गृहस्थ-जीवनाचा रस चाखण्यांत कोणाच्याही मागं रहात नाहीत."

"या देशात आणखी किती तरी धर्म आहेत. मग यवनांची बौद्ध धर्माकडेच ओढ कां ? –समजत नाही हे !"

"इथं बौद्ध धर्मच सर्वात अधिक उदार वाटतो. जेव्हा आमचे पूर्वज भारतात आले, तेव्हां सर्वांनी म्लेच्छ म्हणून त्यांची हेटाळणी केली. आक्रमणकारी यवनांबद्दल नाही मी सांगत, तर इथं वसतीला राहिलेल्या किंवा व्यापारादिकांच्या निमित्तानं येणाऱ्या यवनां बरोबर देखील ही अशी वागणूक होती. याच्या उलट बौद्ध त्यांचा तिटकारा करीत नाहीत. यवनांना खरं म्हटलं तर त्यांच्या देशांतच बौद्ध धर्माची ओळख झाली."

"त्यांच्या देशांतच ?"

"होय. चंद्रगुप्त मौर्याचा नातू अशोक याच्या काळीच कितीतरी बुद्धभिक्षु यूनानला गेले होते. आमचे धर्मरक्षित या देशांत येऊन भिक्षु बनले नाहींत. मिसर देशांतल्या अलसंदानगरीमधील विहारात त्यांनीं दीक्षा घेतली होती."

"प्रभा, मला पुन्हां त्यांची भेट घ्यावयाची आहे."

"जरूर भेटलं पाहिजे. ते तुला कितीतरी गंभीर प्रश्न सांगतील. केवळ बुद्ध धर्माचेच नव्हेत, तर यवनदर्शनाच्या बाबतींत देखील !"

"यवनांत देखील दार्शनिक होऊन गेले ?"

" कितीतरी थोर थोर दार्शनिक झालेत, त्यांच्याविषयीं तुला भदंत धर्मरक्षित सांगतील. पण प्रिया, बौद्ध दर्शन ऐकून प्रभेबद्दल वैराग्य मात्र आणूं नकोस ! "असे म्हणून प्रभेने आपल्या बहुपाशांत त्याला बांधून घेतले. जणुंकाय तिचा अश्वघोष आतांच कोणी हिरावून नेणार होता.

" कालकाराममधल्या कांहीं कांही गोष्टी मला फार आकर्षक वाटल्या. वाटत होतं, आमचा सारा देश कालकाराम प्रमाणंच झाला तर ? "

प्रभा उठून बसली,–म्हणाली–" ते नाही चालायचं ! नाही तर जाशील मला सोडून कालकाराममध्ये ! "

" तुला जिवात असे तो सोडून जाणं अशक्य आहे, लाडके ! मी सांगत होतो तिथल्या भेदभावाच्या अभावाबद्दल ! बघितलंस ? तिथं यवन धर्मरक्षित, पार्शव ( पर्शियन ) सुमन यांच्यासारखे देशदेशांतरींचे विद्वान भिक्षु राहतात, आणि त्यांच्याचबरोबर आमच्या देशातले ब्राम्हणापासून तो चाडाळापर्यंत साऱ्या कुळांतले भिक्षु एकत्र राहत असतात. जेवणखाण एकत्र, विद्यार्जन एकत्र ! कालकाराममधल्या त्या म्हाताऱ्या काळ्या काळ्या भिक्षूचं काय बरं नाव ? "

" तो ना ? – महास्थविर धर्मसेन ! ते साकेत मधल्या सगळ्या विहारांतील भिक्षूंचे प्रमुख आहेत. "

" ऐकलंय कीं त्यांचा जन्म चांडाळ कुळात झाला. आणि त्याच्या पुढं माझे काका भिक्षु शुभगुप्त उकिडवे बसून त्याना प्रणाम करतात. लक्षांत आण–कुठं एका समृद्ध श्रोत्रिय ब्राम्हण घराण्यांतला विद्वान शुभगुप्त आणि कुठं चाडाळपुत्र धर्मसेन!"

" पण महास्थविर धर्मसेन देखील भारी विद्वान आहेत. "

" मी ब्राम्हणांच्या धार्मिक दृष्टिकोनांतून सांगतों, प्रभे ! त्यांच्या हाती असतं, तर धर्मसेन मनुष्य देखील बनूं शकला नसता, मग देवता बनून पूजास्थान व्हायची गोष्टच सोड ! "

" बुद्धानं आपल्या भिक्षु-संघाला समुद्र म्हटलेलं आहे. त्या संघांत जो कोणी जातो, तो नदीप्रमाणं नामरूप सोडून समुद्र बनतो. "

" प्रिये, बौद्ध गृहस्थ देखील तसाच कां बरं होऊं नये ? "

" बौद्ध गृहस्थ देशातील दुसऱ्या गृहस्थापेक्षा वेगळा राहूं शकत नाही. त्याच्यावर देखील परिवाराचा भार असतो ना ? "

" कालकाराम मधल्या भिक्षूंप्रमाणं सारी नगरं आणि जनपदं ( खेडीं ) यां-मधले लोक भेदभावशून्य झाले तर किती छान होईल ? ना कोणता जातिभेद, ना वर्णभेद ! "

“ एक गोष्ट सांगितलीच नाहीं मी तुला, प्रिय! तुझ्या वडिलांनीं एके दिवशीं माझ्या पुढं आपली पगडी काढून ठेवली नी सांगितलं. ‘प्रभा, तूं अश्वघोषाला सोडून दे.’ ”

“ अस्सं, जसं कांहीं तूं सोडलंस, म्हणजे त्याना त्यांचा पुत्र लाभणारच आहे! तूं काय सांगितलंस, प्रभा?”

“ सांगितलं, ‘तुमचं म्हणणं अश्वघोषाला सांगेन!’ ”

“ आणि आज सांगितलंस!– मला ब्राह्मणांच्या पाखंडाचा अतिशय तिटकारा वाटतो. सर्वांगाची लाही होते माझ्या. एकीकडे म्हणतात–“आम्ही वेदशास्त्रांना मान देतों!” मी खूप परिश्रम घेऊन श्रद्धापूर्वक त्याच्या साऱ्या विद्या शिकलों. पण त्यांना काय मान्य आहे हे अजूनही मला समजलं नाही. मला वाटतं त्याना फक्त स्वार्थ कळतो. जेव्हा केव्हा एखाद्या गोष्टीला प्राचीन ऋषिवचनांचा आधार दाखवावा तेव्हां म्हणतात–हे रूढीच्या विरुद्ध आहे. एक रूढी तरी माना नाही तर ऋषींची वचनं तरी! जुन्या वेदमर्यादा उल्लंघन केल्या कुणी तरी, म्हणूनच ना नव्या रूढी पडल्या? लबाड, भीरु, स्वार्थी असंच म्हणावं लागेल याना! याना केवळ गुबगुबीत वांसरांचं मास आणि भूयसी दक्षिणा हवी असते. आपले आश्रयदाते राजे व सामंत यांना प्रसन्न करण्यासाठी मात्र ते वाटेल तें कर्म करतील.”

“ गरीबाना यांच्या धर्मात स्थान नाही ज्यांना हे नीच जातीचे मानतात ते सारेच गरीब आहेत.”

“ तर काय? यवन, शक, आभीर इत्यादि परदेशांतून आलेल्या जातींना यांनी क्षत्रिय मानलं, राजपुत्र ठरवलं, कारण त्याच्या जवळ प्रभुत्व होतं, पैसा होता; त्यांच्याजवळून यांना मोठमोठ्या दक्षिणा मिळूं शकत होत्या. परंतु आपल्या देशांतील शूद्र, चांडाळ, दास यांना मात्र नित्यकालपर्यंत त्यानी समाजाच्या तळाशींच स्थानबद्ध करून ठेवलं. ज्या धर्मामुळं मानवाचं हृदय विकास पावत नाही, ज्या धर्मात मानवाचं स्थान त्याची थैली किंवा दंडा याच्यावर अवलंबून असतं, तो धर्म मनुष्यजातीला कलंक लावणारा समजतो मी. जग बदलत असतं. ब्राह्मणाच्या प्राचीन अर्वाचीन साऱ्या ग्रंथांमध्ये आचार व्यवहाराचं परिवर्तन झालेलं मी वाचलेलं आहे. परंतु आज त्यांच्याशी बोलायला जाव, तर ते साऱ्या गोष्टी जणुं स्थिर व सनातन आहेत असं धरून चालतात. ही केवळ जडता आहे प्रिये!”

“ माझ्या मुळंच तूं असे उद्गार काढतोस ना? माझा घोष तो, आहे का रे मी कारण?”

“ कारण झालीस तरी त्यामुळं स्तुति होईल तुझी! माझी प्रभा ती, तुझ्यामुळंच माझ्या कवितेत नवी प्रेरणा आली, नवा प्राण आला. माझ्या अंतर्दृष्टीत तूं नवा

प्राण, नवी प्रेरणा आणून माझं भारी हित करत्ये आहेस, प्रभा! एके काळी समजत होतों कीं मी ज्ञानाच्या क्षितिजावर जाऊन पोचलों. ब्राह्मण या खोट्या अभिमानाला सहज बळी पडतात. पण आतां माहित झालं कीं ज्ञानाच्या मर्यादा ब्राह्मणांच्या स्मृति, त्यांच्या तालपत्राच्या आणि भूर्जपत्रांच्या पोथ्या, यांच्या पुरत्याच सीमित नाहीत. त्यांच्याहिपेक्षां विशाल आहेत ज्ञानाचीं क्षितिजं.

"मी काय? केवळ एक स्त्री-मात्र!"

"आणि जो कुणाला स्त्री-मात्र असल्यामुळेच नीच मानतो, त्याचा मला तिटकारा वाटतो."

"यवनांत स्त्रियांचा सन्मान अजूनहि इतरांच्यापेक्षा अधिक आहे. त्यांच्यात आज देखील एखादा पुरुष निस्संतान मरणं पत्करील पण एक स्त्री असताना दुसरं लग्न करणार नाहीं."

"आणि इथ तर एकेक ब्राह्मण शंभर शंभर लग्नं करीत फिरत असतो. मला आनंद होतो की कोणीच यवन ब्राह्मणाचा धर्म मानीत नाहीं."

"बौद्ध असून देखील आमच्या घरी पूजापाठ करायला ब्राह्मण येतातच."

"येत असतील तर! स्वार्थासाठी जिथं त्यानी यवनाना क्षत्रिय मानलं ते काय करणार नाहींत?–दक्षिणेचा प्रश्न असतो त्यांच्या."

"म्हणजे एकूण मी तुझा ब्राह्मणत्वाचा अभिमान दूर करायला कारण झाल्ये तर!"

"वाईट नाहीं झालं तें! ब्राह्मणत्वाचा अभिमान तुझ्या माझ्यांत भेदभाव निर्माण करूं इच्छितो. म्हणूनच मी त्याला तुच्छ मानतों, घृणास्पद मानतो."

"किती बरं वाटलं मला, घोष! तुझं माझ्यावर प्रेम आहे!"

"अंतःकरणापासून प्रिये! तुझ्या प्रीतीपासून वंचित झालेला अश्वघोष निष्प्राण–जड होऊन जाईल."

"तर मग माझ्या प्रेमाचं बक्षीस–वरदान देशील मला?"

"ते एक प्रेम सोडून वाटेल ते!"

"माझं प्रेम जर माझ्या शाश्वत अश्वघोषाला–युगाच्या महाकवि अश्वघोषाला हानी पोचवणारं असेल, तर धिःकार असो त्याला."

"असं कसं म्हणत्येस प्रिये?"

"तुझ्या प्रेमाआड यायचं नाही मला. पण ते तुझ्या शाश्वत निर्माणकार्याला पूरक झालं पाहिजे. जर मी नसल्यें तर—!"

विक्षिप्ताप्रमाणे उभा राहून अश्वघोषानें प्रभेला उचललें आणि दृढतापूर्वक तिला आपल्या हृदयाशीं आणि कंठाशीं बिलगून कवळून धरलें. प्रभेनें पाहिले, त्याचे गाल

भिजलेले होते. अश्वघोषाचीं तिनें चुंबनांवर चुंबनें घेतली, आणि म्हटले, "माझा अश्वघोष, माझा अश्वघोष." थोड्या वेळाने शांत झाल्यावर ती म्हणाली, "माझ्या लाडक्या अश्वघोषा, ऐकशील माझं ? –माझी प्रीति तुझ्या जवळून एक मोठी वस्तु मागायची म्हणत्ये नि ती तूं द्यायलाच हवीस!"

"तुझ्यासाठीं माझ्याजवळ कांहीहि अदेय नाहीं, प्रिये."

"पण मला तूं सांगूंही देत नाहीस पुरतं!"

"कारण तूं आपल्या वाणीतून एक वज्रवाक्य उच्चारणार आहेस."

"परंतु ते वज्रवाक्य शाश्वत अश्वघोषाच्या हितासाठीं आवश्यक आहे. माझं प्रेम म्हणतंय, महाकवि अश्वघोषानं आपल्या शाश्वत कविरूपाप्रमाणं प्रभेचं प्रेम देखील शाश्वत समजावं. त्याचं मापन त्याच्या पुढं बसलेल्या प्रभेच्या शरीरावरून करूं नये. शाश्वत अश्वघोषाची प्रभा शाश्वत तरुणी आहे, शाश्वत सुंदरी आहे. येवढंच, केवळ येवढंच मला तुझ्या मनावर ठसवायचं आहे."

"अस्सं, तर मग वास्तविक प्रभेच्या ऐवजी तूं एक काल्पनिक प्रभा माझ्या पुढं उभी करूं पाहत्येस ?"

"मी दोघींनाहि वास्तविकच मानल्ये; माझ्या घोषा! दोघींत फरक येवढाच, की एक पन्नास वर्षं जगणारी आहे आणि दुसरी शाश्वत. तुझी प्रभा तुझ्या 'उर्वशी-वियोगा'नं अमर राहील. माझ्या प्रेमाला अमर ठेवण्यासाठी तुला अमर अश्वघोषाकडे अधिक लक्ष्य पुरवलं पाहिजे. आता रात्र कितीतरी सरत आलेली आहे. शरयूचं तीर झोपीं गेलेलं वाटतं. घरी जायचं ना आतां ?"

"आणि मी माझ्या अमर प्रभेचं चित्र आपल्या मनावर अंकित केलेलं आहे."

"हेच हवंय मला! प्रियतम, केवळ हेच!" असे म्हणून प्रभेने आपल्या रेशमासारख्या मृदु कुंतलाचा स्पर्श अश्वघोषाच्या कपोलाला केला आणि ती नीरव निःशब्द बघत उभी राहिली.

– ७ –

एक मोठें आंगण, त्याच्या चहूं बाजूला ओसरी आणि मागें तीन मजली कोठड्या. ओसरीच्या कठड्यांवर पिवळी वस्त्रे वाळत घातलेली. आंगणात एका कोपऱ्यांत एक विहीर असून जवळच एक स्नानकोष्ठक होते. आंगणांत जागोजागीं किती तरी वृक्ष होते, त्यांतच एक पिंपळ. पिंपळाच्या जवळच वेदी असून त्याच्या जरा बाजूला दगडी दीपमाळ; तिच्यावर हजारो दीपक ठेवतां येण्यासाठी कोनाडे केलेले. प्रभेने गुडघे टेकून त्या सुंदर वृक्षाला वंदन केले आणि म्हटले, "प्रिया, या अशाच प्रकारच्या वृक्षाखाली बसून सिद्धार्थ गौतमानं आपल्या प्रयत्नानं आणि चिंतनानं मनातली भ्रांति दूर सारली व स्वतःला बोध प्राप्त करून घेतला. तेव्हां पासूनच त्यांना

बुद्ध हें नांव मिळालं. केवळ याच गोड स्मृतीमुळं आम्हीं या जातीच्या वृक्षाला वंदन करीत असतो."

"आपले प्रयत्न आणि चिंतन यांच्या योगानं मनांतली भ्रांति घालवून बोध मिळविण्याचं प्रतीक आहे हे! या असल्या प्रतीकांची पूजा ही झालीच पाहिजे प्रिये! अशा प्रतीकांची पूजा ही आपल्या प्रयत्नाची–आत्मविजयाची–पूजा असते."

मग ती दोघेहि भदन्त धर्मरक्षित यांच्या जवळ गेलीं. नुकत्याच उमललेल्या फुलांचा मधुर सुगंध जेथें दरवळत होता अशा एका बकुळीच्या झाडाखालीं भदन्त बसले होते. प्रभेनें बौद्ध–उपासिकेप्रमाणे दोन्ही पावले व गुडघे, दोन्ही तळहात आणि कपाळ जमिनीवर टेकून पंच-प्रतिष्टित वंदन केले, अश्वघोषाने उभ्यानेच प्रणाम केला आणि मग दोघेहि तेथेच जमिनीवर पडलेले चर्मखंड घेऊन त्यांच्यावर बसली. अश्वघोष भदन्ता बरोबर गोष्टी करायला आलेला पाहून त्याचे शिष्य तेथून निघून गेले. प्रथम शिष्टाचाराच्या गप्पा सप्पा झाल्यावर अश्वघोषाने दर्शनशास्त्राबद्दल बोलायला सुरवात केली. धर्मरक्षित म्हणाले, "ब्राह्मणकुमार, ज्ञानी बुद्धांच्या धर्मात दर्शनाला बंधन–भारी बंधन (दृष्टि संयोजन) म्हटलेले आहे."

"तर मग बुद्धाच्या धर्मात दर्शनशास्त्राला स्थान नाही?"

"आहे तर! बुद्धाचा धर्म दर्शनमय आहे. परंतु बुद्ध त्याचा उपयोग सांगडी सारखा, पलीकडच्या कांठावर पोचण्यासाठी करतात; डोक्यावर ओझ्याची मोळी म्हणून नव्हे."

"काय म्हटलंत? सांगडी प्रमाणं?"

"होय, नौका नसलेल्या नदींत लोक मोळीची सांगड बांधून नदीपार जातात, परंतु काठावर पोचलं म्हणजे सांगडीतली लांकडं थोर उपकारी म्हणून तीं आपल्या डोक्यावर नाही मिरवीत!"

"आपल्या धर्मा बद्दल इतकं बोलण्याची जो पुरुष हिंमत दाखवतो त्यानं खात्रीनं सत्य आणि त्याचं सामर्थ्य पारखलं असावं. भदन्त, आपण बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचं असं एखादं सूत्र सांगावं की ज्याच्या योगानं मी आपल्या मनानंच बरंचसं सहज समजूं शकेन!"

"अनात्मवाद आहे ना, कुमार! ब्राह्मण आत्मा हें नित्य, ध्रुव, शाश्वत तत्त्व आहे असं मानतात. बुद्ध जगांत किंवा त्याच्या बाहेर कोणतंहि नित्य, ध्रुव शाश्वत तत्त्व आहे असं मानीत नाहींत. म्हणूनच त्यांच्या तत्त्वज्ञानाला अनात्मवाद, अनित्यता, क्षणक्षण उत्पत्तिविनाश यांचं दर्शन मानतात."

"माझ्यासाठीं येवढंच बस्स झालं, भदन्त! सांगडी प्रमाणं धर्म मानून अनात्मवादाची घोषणा करणाऱ्या बुद्धाला अश्वघोषाचे शतशः प्रणाम असोत. अश्वघोषाला

ज्याचा शोध लागत नव्हता, त्याचा ठावठिकाणा आतां सापडला. माझ्या अंतर्यामांत अशाच कांहीं विलक्षण ऊर्मी उठलेल्या आहेत असं मला वाटत होतं पण त्याना कोणतं नांव द्यावं हें कळत नव्हतं. आज बुद्धाच्या शिकवणुकीचा खरा अर्थ जनतेला समजला असता तर जग कांही वेगळंच बनलं असतं."

"बरोबर आहे तुझं बोलणं, कुमार! आमच्या यवन देशात देखील महान् तत्त्ववेत्ते होऊन गेले. पिथागोरस, हेराक्लिटस हे तर भगवान बुद्धाचे समकालीन. सार्क्रेटीस, डेमोक्रिटस, प्लेटो, ॲरिस्टॉटल हे त्याच्या जरा नंतर होऊन गेले. या यवन तत्त्ववेत्त्यानी गंभीर चिंतन केलं परंतु एक हेराक्लिटस वगळला तर सारे शाश्वतवाद, नित्यवाद, यांच्या कांही पुढं जाऊं शकले नाहीत. वर्तमानाचा त्याना वाजवीपेक्षा फाजील मोह होता आणि म्हणूनच ते भविष्यकाळाला वर्तमानाबरोबर बांधूं पहात होते. हेराक्लिटस हा मात्र बुद्धाप्रमाणंच दोन क्षण देखील जगाची तशी किंमत करायला तयार नव्हता, पण त्यात त्याचा एक वैयक्तिक स्वार्थ होता."

"दार्शनिक विचारात देखील वैयक्तिक स्वार्थ?"

"साऱ्यांनाच पोट लागलेलं आहे कुमार! त्यावेळी आमच्या अथेन्समध्ये गण-राज्य होतं. प्रथम हेराक्लिटसच्या परिवारातल्या प्रमाणंच जे मोठमोठे सामंत होते त्यांच्या हातीं गणराज्याची सूत्रं होतीं; मग त्याना मागं सारून व्यापारी शेट साव-कार यानीं आपल्या हातीं सत्ता घेतली. या मुळं हेराक्लिटस असंतुष्ट होता. त्याला परिवर्तन हवं होतं, पण ते प्रगतीसाठी नव्हे, परागतीसाठी!"

"आम्हाला परिवर्तन हवंय तें पुढं जायला, मागं परतायला नव्हे. भदन्त, माझ्या मतें अतीत प्रेतवत असत."

"खरं आहे ते कुमार! बुद्धाला परिवर्तन हवं होतं, आणि जगाला सुस्थिति आणण्यासाठी त्यानी भिक्षुसंघ हा भविष्यकालातल्या स्थितीचा एक आदर्श म्हणून पुढं मांडला होता."

"जिथं जातिभेद नाही, जिथं उच्च नीच भाव नाहींत–"

"जिथं सर्वांच्या साठी समान भोग आहेत, जिथं सर्वांच्या साठीं समान सेवा आहेत. तुम्ही आतां आमच्या महास्थविर धर्मसेनाना बाहेर केर काढतांना बघितलं असेलच?"

"ते काळे काळे होते ते ना?"

"होय, तेच! ते आम्हां सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहेत. आम्ही दररोज त्याना पंच-प्रतिष्ठितांनी वंदन करीत असतो. ते साऱ्या कोसल देशांतल्या भिक्षु संघाचे नायक आहेत."

"मी ऐकलंय की ते चांडाल कुळांतले आहेत?"

" पण भिक्षुसंघ कुळ बघत नाही, कुमार, तो गुण बघत असतो. ते आपली विद्या आणि गुण यांच्या मुळं आमचे नायक झाले, आम्हांला पितृतुल्य झाले. त्यांच्या भिक्षापात्रांत पात्र चोपडण्या इतकी जरी एखादी वस्तु पडली तरी देखील आपल्या सोबत्याना दिल्या शिवाय घांस घेत नाहीत ते! बुद्धांची शिकवणूक आहे ही! नेसा पांघरायच्या तीन छाट्या, हे मातीचं भिक्षापात्र, हें पाणी गाळणं, हा वस्तरा आणि कमरपट्टा, याच्या शिवाय आमच्या साऱ्या जिनसा संघाच्या मालकीच्या आहेत. हे घर, बगीचा, मंच, तक्तपोशी इत्यादि साऱ्या वस्तु संघाच्या आहेत. आमच्या काहीं विहारांतून जी शेतं आहेत ती ही सारी संघाचींच आहेत. संघ ऐकून-पारखून एखाद्या इसमाला भिक्षु बनवतो, परंतु एकदां का तो संघांत प्रविष्ट झाला आणि भिक्षु बनला की मग तो सर्वांच्या बरोबरीचा होतो."

" अशा तऱ्हेचाच संघ सार्‍या देशाचा बनला तर?"

" ते कसं व्हायचं कुमार? राजे आणि धनी हे का दुसऱ्यांना आपल्या बरोबरीचे होऊं देणार? भिक्षूंनी एका दासाला संघांत सामील करून घेतलं होतं. संघांत सामील होतां क्षणीच तो अदास झाला– सर्वांच्या बरोबरीचा झाला. त्यामुळं तो ज्याचा दास होता त्यानं गवगवा करायला सुरवात केली. दुसरे दास-स्वामी देखील त्याला साथ देऊं लागले. राजा देखील स्वतः हजारों दासाचा स्वामी असतो. तो बरा असा या आपल्या संपत्तीवर आघात होऊं देईल? बुद्ध तरी काय करूं शकत होते? –दिलं त्यानीं वचन कीं यापुढं दासांना संघांत घेण्यांत येणार नाही. विषमतेच्या समुद्रांतलं एक लहानसं बेट म्हणजे हा आमचा संघ; पण त्या मुळंच तो असुरक्षित आहे. आणि जोंपर्यंत जगात या तऱ्हेची गरिबी आणि दासता आहे तोपर्यंत तो असुरक्षित रहाणारच!"

– ८ –

शरदाची पुनव होती, संध्याकाळ पासूनच पूर्व क्षितिजावर चांदोबाची ताटली ठेवून दिलेली होती. सूर्याची अंतिम लाल किरणें आकाशांतून जसजशी लुप्त होऊं लागलीं तसतशीं चंद्राची शीतल शुभ्र किरणे आकाशभर पसरूं लागली. अश्वघोष बहुधा प्रभेच्या घरींच पडलेला असायचा. दोघेहि गच्चीवर बसलेलीं होतीं. प्रभा म्हणाली, " प्रियतम, बघ तरी, शरयूच्या जललहरी मला बोलावताहेत! आठवतं तुला? याच लहरींनीं तुझा माझा पहिला स्पर्श घडवून आणला होता. याच लहरींनीं तुझ्या माझ्या प्रीतीची गांठ बांधली. आतां दोन वर्षं झालीं त्या गोष्टीला पण अगदीं कालच घडल्या सारखा वाटतो तो सुखकर प्रसंग! किती तरी चांदण्या रात्री आपण शरयूच्या वाळूंत सुखांत घालवल्या. किती गोड वाटायच्या त्या. आजही पुन्हां सुखद चांदणं पडलेलं आहे. चल, आपण शरयूच्या किनारीं जाऊं या!"

दोघेंहि निघालीं. प्रवाह नगरापासून बऱ्याच अंतरावर होता. चंद्रप्रकाशानें धवळून निघालेल्या चकाकणाऱ्या वाळूवरून तीं खूप लांबवर चालत गेलीं. प्रभेने आपल्या वहाणा हातांत घेतल्या. तिला पायांखालीं दबणाऱ्या वाळूचा स्पर्श किती तरी सुखकर वाटत होता. अश्वघोषाच्या कंबरेला आपल्या दोन्ही हातांची मिठी घालून ती म्हणाली, " प्रिया, शरयूच्या या सिकतेचा स्पर्श किती तरी आल्हादक वाटतो ! "

" पायाला गुदगुल्या होतात ! "

" हर्षाच्या अतिरेकानं रोमांच उभे राहतात, ही नदी म्हणूनच माझी लाडकी झालेली आहे. "

" कितीदां तरी मनांत येतं, इथून आपण दोघांनींही कुठं तरी लांब पळून जावं. जिथं आपल्या प्रीती बद्दल कुणाला ईर्ष्या वाटणार नाही, जिथं तुझ्या प्रेरणेनं स्फूर्ति मिळून मी गीतं लिहावीत नी तीं आपण दोघांनीं मिळून वीणेवर गावींत, अशा एखाद्या दूरच्या देशांत जाऊं या आपण ! या नदी किनारी मी रात्रीच्या वेळी आपली वीणा देखील आणूं शकत नाहीं. आणली नि वाजवली कीं लोक धांवत येतलि. त्यांच्यांतल्या कित्येकांच्या नजरा केवळ मत्सरानं जळूं लागतलि. "

" प्रिय, वाईट वाटून घेऊं नकोस, पण कधी कधीं वाटतं, मी नसल्यें तर– "

अश्वघोषानें प्रभेला आपल्या हृदयाजवळ घेऊन तिला गाढालिंगन देत म्हटलें, " नाही, असं मी नाहीं बोलूं देणार तुला ! आपण हे असंच रहायचं ! "

" माझ्या बोलण्याचा अर्थ वेगळाच होता, अश्वघोष ! समज, तूं गेलास नि मीच एकली राहिल्यें तर ? जगांत असं होतच नाही का ? "

" होतं ना ! "

" बघ घोष, आतां तुझ्या वेळीं नाहीं तळमळलास तो. तूं गेलास, म्हणजे मग शोकाचा डोंगर माझ्या एकलीवरच कोसळेल म्हणून वाटतं ? "

" प्रभा, किती निष्ठुर आहेस ग तूं ? "

प्रभेनें अश्वघोषाच्या ओठांचें चुंबन घेऊन त्याचा विषाद दूर केला आणि ती म्हणाली, " जीवनाची एकच दिशा असत नाहीं, अनेक असतात. नेहमीच पुनवेचं चांदणं नसतं, कधीं कधी अवसेचा काळोख पण असतो. म्हणूनच मला असं सांगायचं होतं कीं एकमेकांच्या बाबतीत एकाच्या अभावी आपण काय करायला हवं ? तूं नसलास तर मी काय करीन, आहे ठाऊक ?"

अश्वघोषाने येवढेंसे तोंड करून एक दीर्घ श्वास सोडला आणि विचारलें, "सांग, काय करशील ?"

" मी माझ्या आयुष्याचा शेवट करणार नाहीं. भगवान बुद्धांच्या मतें आत्म-हत्या ही मूर्खतापूर्ण आणि निंदनीय अशी आहे. आतां मी वीणा वादनांत अत्यंत निपुण झाल्ये आहे, हें तर तुला आहेच ठाऊक ? "

" आहे तर ! प्रभा, आतां कितीदां तरी तुझ्या हातीं वीणा देऊन मी निश्चिंत-पणें गात असतो तूं इतकी निपुण झालीस आता ! "

" होय ना ? मग ज्या वेळीं माझा अशाश्वत अश्वघोष माझ्या जवळून हिरावून घेण्यांत येईल तेव्हा मी युगायुगाचा कवि असलेल्या शाश्वत अश्वघोषाची आरा-धना करीन. तुझ्या वीणेवरच तुझीं गाणी गाईन साऱ्या जंबुद्वीपभर आणि त्याच्याही बाहेर गात हिंडेन. आमचे जीवनप्रवाह दुसऱ्या देशकालांत साकार होऊन पुन्हां एक होई तोवर मी अशी गात हिंडेन. प्रियतम, मी जर आधी गेल्यें तर तूं काय करशील ? "

हे शब्द कानी पडले मात्र–अश्वघोषाचे सारे शरीर, अगदीं अंतरंग देखील, कंपित झाले, प्रभाला देखील ते जाणवले. अश्वघोषानें बोलण्याचा प्रयत्न केला पण त्याचा गळा दाटून आला, डोळे भरून आले. कांही क्षणांनंतर प्रयत्न करून तो क्षीण-स्वरात म्हणाला," किती निष्ठुर घडी भासेल मला ती ! पण प्रभा, मी देखील आत्म-हत्त्या करणार नाहीं. तुझ्या प्रीतीच्या प्रेरणेनं जी जी गीतं माझ्या हृदयांतून स्फुरण पावतील ती तीं मी गात हिंडेन. अगदी जीवनाच्या अखेरच्या घडी पर्यंत ! मी तुझ्या शाश्वत अश्वघोषाचा–" फिरून त्याचा गळा दाटून आला.

प्रभा म्हणाली, " प्रिय, चल शरयूचा प्रवाह आता कसा झोपी गेलेला दिसतो. आपणहि जाऊं या आतां ! "

– ९ –

ग्रीष्म ऋतूचा काळ. माता सुवर्णाक्षी आजारी झाली. अश्वघोष दिवसरात्र आईच्या जवळ बसून रहायचा. प्रभा देखील दिवसभर तिच्या जवळ बसायची. चिकित्सेचा काडीमात्र देखील परिणाम झाला नाही आणि दिवसेंदिवस सुवर्णा-क्षीची प्रकृति खालावतच चालली. पुनवेला दुधासारखे चांदणे पडले. सुवर्णाक्षीनें चांदण्यांत वर गच्चीवर जाण्याची इच्छा प्रगट केली. तिची खाट वर गच्चीवर नेण्यांत आली. तिच्या देहाचा नुसता हाडांचा पिंजरा उरलेला होता. राहून राहून अश्वघो-षाच्या हृदयाला वेदना होत होत्या. आईनें क्षीण परंतु स्पष्ट शब्दांत विचारले, "पुत्र, चांदणं सुंदर पडलंय ना ? "

अश्वघोषाच्या कानांत त्यावेळी प्रभेचे शब्द निनादूं लागले, " बघ तरी, शर-यूच्या जललहरी मला बोलावताहेत ! " त्याच्या काळजांत धकधक होऊं लागलें. आईनें पुन्हां विचारलें, " पुत्र, प्रभा कुठाय ? "

" आपल्या पित्याच्या घरीं गेलीं. संध्याकाळ पर्यंत तर इथंच होती."

" प्रभा गोड मुलगी आहे, तिला कधीं देखील विसरूं नकोस–"

तिचें बोलणें अर्धेच राहिले. एक खोकल्याची ढांस आली, आणि दोनच उचक्या नंतर सुवर्णाक्षीचा देह निश्चल झाला.

सुवर्णाक्षी गेली. सुवर्णाक्षी-पुत्राचे हृदय विदीर्ण झाले. रात्रभर तो अश्रू गाळीत होता.

दुसऱ्या दिवशीं माध्यान्हापर्यंत तो मातेच्या दहनक्रियेमध्ये व्यग्र होता. मग त्याला प्रभेची आठवण झाली. तो तसाच दत्तमित्राच्या घरी गेला. प्रभेच्या आई–वडलांना वाटत होतें, " प्रभा अश्वघोषाच्या घरीं असेल." आधींच अश्वघोषाचें हृदय रात्रीच्या प्रहारानें जर्जर झालेले होतें, त्यांत आणखी हा घाव झाला. त्याच्या मनांत शंकेचें रान उठले तो तसाच प्रभेच्या शेजघरांत गेला. तेथें सगळ्या वस्तू नीट व्यवस्थित ठेवलेल्या होत्या. त्यानें पलंगावर आंथरलेली शुभ्र चादर ओढली. त्याला तेथें आपले चित्र दिसलें. एका फिरस्त्या यवन चित्रकाराकडून प्रभेने ते चित्र तयार करवले होतें. तें चित्र तयार करतांना अश्वघोषाला इच्छा नसून देखील चित्रकारापुढे कितीतरी तास ताटकळत बसावे लागले होतें. चित्रावर एक जुईची म्लान माळ लोळत होती. चित्राच्या खाली प्रभेच्या मुद्रेने अंकित एक बंद तालपत्र लेख होता. अश्वघोषानें तो उचलून घेतला. बांधलेल्या दोऱ्याच्या गाठीवरची मुद्रांकित काळी माती अजून सुकायची होती. अश्वघोषाने दोरा तोडला, मुद्रांकित माती तशीच ठेवली. तालपत्राची गुंडाळी उकलून पाहिली. त्याच्यावर प्रभेच्या सुंदर अक्षरात पांच ओळी लिहिलेल्या होत्या—

" प्रियतम, प्रभा निरोप घेत्ये आहे, मला शरयूच्या जललहरींनी हांक मारली, तिकडं जात्ये मी. तूं माझ्या प्रीतीसाठी कोणकोणती वचनं दिलीस तीं आठवतात ना? मी प्रभेचं चिरतारुण्य, नित्य एकसारखं रहाणारं लावण्य मागं सोडून जात आहे. आतां तुझ्या डोळ्यांना कधीं देखील पांढऱ्या केसांची, पडलेल्या दातांची आणि वांकलेल्या कंबरेची प्रभा दिसायची नाही. माझं प्रेम, माझं शाश्वत यौवन तुला प्रेरणा देईल. त्या प्रेरणेची अवहेलना करायची नाहीं. प्रियतम, असं वाटूं देऊं नकोस कीं मी तुझ्या कुटुंबांत कलह निर्माण होईल म्हणून आत्महत्या करत्यें आहे. नाहीं, माझ्या अक्षुण्ण यौवनाचं दान केवळ मी तुला काव्याची प्रेरणा मिळावी म्हणून करत्यें आहे. प्रियतम, प्रभा तुझं शेवटचं आलिंगन आणि चुंबन याचा मानसिक अनुभव घेत आहे."

पत्र वाचून होईतों अश्वघोषाने कितीतरी वेळां आपले डोळे पुसले. पत्र वाचून झालें, हातांतून गळून पडलें, तो देखील पलंगावर कोसळला. त्याचें हृदय सुन्न झालें,

काळजाचे ठोके पडायचे केव्हां थांबतील याची त्याच्या तन्मय चित्ताला चिंता वाटूं लागली. एखाद्या मातीच्या पुतळ्याप्रमाणें तो शून्य जड डोळ्यांनीं न्याहाळूं लागला. बराच वेळ वाट पाहिल्यावर प्रभेचे आईबाप आंत आले. त्याची ती अवस्था बघून त्यांच्या मनात कुशंका आल्या. जवळच पडलेले पत्र त्यांनीं देखील वाचलें. आईच्या कंठांतून एक चीत्कार बाहेर पडला आणि ती धरणीवर कोसळली. दत्तमित्र नीरव अश्रुमोचन करूं लागले, अश्वघोष तसाच एकटक बघत बसला. प्रभेच्या आई-वडलांनी त्याची ती अवस्था पाहिली आणि ती कांहींही न बोलतां तेथून निघून गेली. संध्याकाळ झाली, रात्र आली, परंतु तो तसाच बसून होता. आतां त्याचे अश्रू सुकून गेले होते पण हृदयावर झालेल्या आघाताची व्यथा तशीच राहिली. बरीच रात्र लोटल्यावर त्याचा बसल्याजागींच डोळा लागला.

सकाळी प्रभेची आई आली. तिने ताडले, अश्वघोष ताजातवाना दिसत असला तरी कसल्या तरी चिंतेनें व्याकुळ झालेला आहे,–विचारले,–

"आतां कसं वाटतं?"

"आता मी पूर्णपणे बरा झालोंय, आई! प्रभेनं माझ्यावर जे कार्य सोंपवलं तेंच मी आतां करीत रहाणार. मला कळत नव्हतं, पण प्रभेला सारं कांही ठाऊक होतं. तिनं मला माझ्या कर्तव्याची जाणीव करून दिली. प्रभेनं आत्महत्या नाही केलीं, आत्मदान केलं. त्या आत्मदानाचं स्वरूप आत्महत्येत पालटणं माझ्या हातीं आहे, पण तो कृतघ्नपणा मी दाखवणार नाहीं."

अश्वघोषाच्या बोलण्याचा आशय प्रभेच्या आईच्या ध्यानांत आला. तो उठला तेव्हां तिने विचारलें, "कुठं निघालास, पुत्र?"

"भदन्त धर्मरक्षितांच्या भेटीला आणि शरयू बघायला!"

"भदन्त धर्मरक्षित इथंच खाली बसले आहेत. आणि शरयू बघायला जायचं असेल तर मीहि येईन म्हणलें."

बोलतांना तिच्या कंठांत गहिंवर दाटून आला.

अश्वघोषानें खाली जाऊन भदन्त धर्मरक्षित यांना पंच प्रतिष्ठितांनी वंदन केलें आणि म्हटलें, "भन्ते, आतां मला संघांत समाविष्ट करून घ्यावं."

"वत्सा, तुला झालेला शोक दारुण दिसतो."

"होय, दारुण आहे खरा, पण त्याचं कारण मी आपल्या जवळ सांगत बसत नाहीं. प्रभेनं या प्रसंगाला तोंड देण्या इतकी माझ्या मनाची पूर्वतयारी करून ठेवली होती. मी कांहीं घाईनं हा निर्णय घेतला नाहीं."

"तरी पण तुला कांहीं दिवस वाट बघावी लागणारच. संघ इतकी घाई करूं शकत नाही."

" मी वाट पहायला तयार आहे, पण त्या साठीं देखील मी संघाचा शरणार्थी आहे. "

" आधीं तुला आपल्या पित्याची परवानगी मिळवावी लागेल. माता-पित्यांच्या परवानगीशिवाय संघ कुणालाहि भिक्षूची दीक्षा देत नाही.

" मग येतों मी त्यांची परवानगी घेऊन ! "

अश्वघोष घराबाहेर पडला. प्रभेच्या मातेनें त्याचें भाषण ऐकलें नि ठरवलें की त्याचे मन आतां पूर्ण ठिकाणावर आहे. तरी पण तिला अजूनही धाकधूक वाटत होती. तीही त्याच्या पाठोपाठ निघाली. शरयूंत नावे मधून ते खालच्या प्रवाहाकडे दूरवर गेले–दिवसभर धारेतून शोध केला परंतु कांहींच ठाव ठिकाणा लागला नाहीं. दुसऱ्या दिवशी आणखीहि लांब गेले पण व्यर्थ !

अश्वघोष घरी गेला, पित्याला भिक्षू बनण्याची परवानगी मागितली, पण बाप एकुलत्या एक मुलाला कसा आज्ञा देईल ? मग त्याने पित्याची विनवणी केली, "तात, मी आईच्या आणि प्रभेच्या शोकानं व्याकुळ होऊन असं करीत नाहीं. माझ्या जीवनाचं कार्य मी निश्चित केलेलं आहे आणि हा त्या कार्याचा नियुक्त पथ आहे. आपल्याला माझ्या बोलण्या वागण्यांत कसल्याहि प्रकारचा चित्तविकार दिसतो तरी का ? मला जिवंत ठेवायचं असेल तर आपण आज्ञा द्यावी. तात, बस्स येवढंच सांगायचं आहे मला ! "

" बरं, तर मग उद्यां संध्याकाळ पर्यंत मला विचार करायला वेळ दे. "

" मी एक आठवडाभर थांबायला तयार आहे. "

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी बापाने ओल्या डोळ्यांनीं भिक्षु बनण्याची आज्ञा दिली.

साकेतांतल्या आर्य सर्वास्तिवाद संघाने अश्वघोषाला भिक्षूची दीक्षा दिली. महास्थविर धर्मसेन त्याचे उपाध्याय झाले आणि आचार्य झाले भदन्त धर्मरक्षित. त्याचवेळी भदन्त धर्मरक्षित नौकेने पाटलिपुत्राला जाणार होते, त्यांच्या बरोबर अश्वघोषानें देखील साकेत सोडले.

–१०–

भिक्षु अश्वघोष याला पाटलिपुत्रांतल्या अशोकाराम मठांत राहून दहा वर्षे लोटलीं होतीं. त्याने बुद्ध धर्माबरोबरच बौद्ध आणि ग्रीक तत्त्वज्ञानांचा देखील खोल अभ्यास केला. मगधामधल्या महासंघांतील विद्वानांत अश्वघोषाचे उच्च स्थान होते. त्याच सुमारास शक सम्राट् कनिष्क पश्चिमेकडून दिग्विजय करीत पूर्वेकडे पाटलिपुत्राला येऊन ठेपला. पाटलिपुत्र आणि मगध त्यावेळी बौद्ध धर्माचें मुख्य केंद्र झालें होतें. कनिष्काची बौद्ध धर्मावर खूप श्रद्धा होती. त्याने भिक्षु संघांतून गन्धारमध्यें

घेऊन जाण्यासाठीं एका योग्य विद्वानाची मागणी केली. संघानें अश्वघोषाला प्रदान केलें.

राजधानी पुरुषपूर (पेशावर) येथें अश्वघोष गेला तेव्हां त्याला त्या जागीं शक, यवन, तरुष्क (तुर्क), पारसी आणि भारतीय या संस्कृतींचा संगम झालेला आढळून आला. अश्वघोषानें आधींच ग्रीक नाट्यकलेला भारतीय साहित्यामध्यें स्थान प्राप्त करून दिलें होतें. आतां ग्रीक तत्त्वज्ञानाचा खोल अभ्यास केल्यावर त्यानें त्यांतलीं अनेक वैशिष्टयें घेऊन, त्यांतल्या विश्लेषणाची शैली अंगिकारून आणि अनुकूल तत्त्वांचा स्वीकार करून भारतीय तत्त्वज्ञान--विशेषतः बौद्ध तत्त्वज्ञान ग्रीक तत्त्वज्ञानांतल्या लेण्यांनी समृद्ध केले. अश्वघोषाने बौद्धांना ग्रीक तत्त्वज्ञानामधून विचार घेण्याचा मार्ग दाखवून दिला. त्यामुळे दुसऱ्या भारतीय विचारवंतांना देखील ग्रीक तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणे भाग पडले आणि ते वैशेषिक व न्याय या शाखांत सर्वांच्या पुढें गेले. —परमाणु, सामान्य, द्रव्य, गुण, अवयवी इत्यादि तत्त्वें त्यानी ग्रीक तत्त्वज्ञानामधून घेतली.

प्रभेने आधीच भदन्त अश्वघोषाचें हृदय विशाल केलें होतें. त्यामुळे त्याच्यांत आतां आपपर भाव उरला नव्हता. प्रभेच्या प्रेरणेवरून त्याने अनेक काव्यें, आणि नाटकें लिहिलेली होती. त्यापैकी किती तरी लुप्त झालेली आहेत. परंतु निसर्ग त्याच्यावर विशेषे करून प्रसन्न होता असे दिसते. कारण मध्यआशियामधील महावालुकाराशि गोबीमध्ये सत्राशे वर्षानंतर त्याचे "सारिपुत्र प्रकरण" नाटक सांपडलें. "बुद्धचरित" आणि "सौन्दरानन्द" ही त्याचीं अमरकाव्ये होत. प्रभेला दिलेलें वचन त्यानें चांगल्या तऱ्हेने पाळलें आणि प्रभेच्या अम्लान सौंदर्यामुळे त्याचीं काव्यें सुंदरतम झालीं. जन्मभूमि साकेन आणि माता सुवर्णाक्षी यांचा त्यानें कधीहि विसर पडूं दिला नाहीं. त्याने आपल्या कृतीमध्यें नेहमी आपला उल्लेख "साकेतक आर्य सुवर्णाक्षीपुत्र अश्वघोष" असा केलेला आहे.

---

# १२—सुपर्ण यौधेय

( काल–इ. स. ४२० )

– १ –

कसे आहेत माझ्या भाग्यचक्राचे फेरे! –एका जागीं पाय टिकत नाहीत. जगांतल्या हेलकाव्यांनी मला नित्याचा चंचल आणि विव्हल केलं. आयुष्यांत कडुगोड दिवस आले नि गेले, मात्र गोडापेक्षा कडूच जास्त. आणि परिवर्तन तरी कसं व्हायचं. वर्षाऋतूच्या शेवटल्या दिवसाप्रमाणं–इथं ऊन तर जरा पुढं गेलं की पाऊस. हे परिवर्तनचक्र असं कसं फिरतं ते कळत नाही. पश्चिमउत्तरापथ गंधार–तिथं अजून देखील मधुपर्कातून वासराचं मास देण्यात येतं, परंतु मध्यदेशात (संयुक्तप्रांत-बिहार) मात्र गोमांसाचं नांव घेणं देखील पाप मानण्यात येतं; तिथं गोब्राह्मणसंरक्षक हाच सर्वश्रेष्ठ धर्म मानण्यात येतो. शेवटी ही अशी धर्मात ऊनसांवलीची पाठशिवणी का चालते, हे देखील कळत नाही मला. काय एका जागी अधर्म ठरलेली रूढी दुसऱ्या जागीं धर्म म्हणून नेहमीच कायम राहील ? कीं एका जागी आधी परिवर्तन झालं म्हणजे मग दुसऱ्या जागी त्याच अनुकरण करण्यात येईल ?

मी ( माळवा ) अवन्तीमधल्या क्षिप्रा कांठच्या एका गांवी जन्माला आलों. माझ्या कुळांतले स्वतःला प्रवासी मानीत असले तरी त्यांची शेतीवाडी, घरदार सारं कांही तिथं होतं; ते तर कांही खांद्यावर उचलून नेण्यासारखं नव्हतं. माझ्या कुळांतले आणि इतर गांवकरी याच्या रूपरंगात आणि आगाखांद्यात फरक दिसत होता. माझ्या कुळांतले लोक होते उंच नि भरदार, गोरेगोरेपान, आणि दुसऱ्यांचा तोरा न चालू देणारे. माझी आई गांवांतली अत्यंत देखणी स्त्री होती. तिच्या गोऱ्या मुखमंडळाला भुरके केस अतिशय शोभा आणत होते. आमचे कुटुंबीय स्वतःला ब्राह्मण म्हणवून घेत, पण गांवकरी आमच्या ब्राह्मणत्वाबद्दल शंका घेत, हें मला दिसायचं. शंका घ्यायला कारणहि पण होतं. तिथले ब्राह्मण सुरापान हें महापाप मानीत, तर आमच्या घरीं नेहमीं सुरा बनवून पिण्यांत येई. उच्च कुलांतले स्त्रीपुरुष सम्मिलित होऊन नाचण्याची गोष्ट देखील त्यांनीं स्वप्नांत आणली नसती परतु आमच्या कुळांतले एकत्र एकाच सारखे वाढलेले सातहि परिवार संध्याकाळपासूनच रंगणांत उतरत असत. अगदीं बाळपणीं मला वाटायचं–साऱ्यांच्या घरीं असंच होत

असेल. पण जेव्हां मी गांवांतल्या इतर मुलांच्या बरोबर खेळूं लागलों तेव्हां त्यांनीं दिलेल्या टोमण्यांवरून समजून आलं कीं गांवकरी आम्हांला अद्‌भुत तऱ्हेचीं माणसं मानतात. आमच्या कुलीनतेवर विश्वास ठेवून देखील ते आमचं ब्राह्मण्य मानायला तयार नाहीत, त्यांना संदेह वाटत होता आमच्या ब्राह्मण्याबद्दल. आमचा गांव खूप मोठा होता, तिथं वाण्यांची दुकानं व घरं देखील होतीं. तिथं कांहीं नागर कुटुंबं रहात असत, त्यांनाच लोक वाणी म्हणत. परंतु ते देखील स्वत:ला आमच्या प्रमाणंच ब्राह्मण म्हणवून घेत. अनेक नागरकन्या आमच्या कुळात आलेल्या होत्या. गांवकरी आम्हांला ब्राह्मण मानीत नव्हते याचं हे ही एक कारण होतं. त्याच्या मते आम्ही ब्राह्मणांच्या खाण्यापिण्याच्या, लग्न-विवाहाच्या नियमांची अवहेलना करीत होतो, मग कसं आह्मांला ब्राह्मण मानायचं? माझे सौगडी मुलंग जेव्हा कधी माझ्यावर राग धरीत तेव्हां मला "रांगड्या" म्हणून चिडवत असत. मी आईला विचारायचा, पण ती टाळत असे

आतां जरा मी शहाणा झालो होतो. मला दहावं वर्ष लागलं होतं. गांवांतल्याच एका ब्राह्मण गुरूच्या पाठशाळेत शिकायला जात असे. माझे सहपाठी सगळेच ब्राह्मण होते. लोक म्हणत– 'सगळेच पक्के ब्राह्मण आहेत;' पण मी आणि इतर दोन नागर विद्यार्थी यांना आमचे सौगडी कच्चे ब्राह्मण म्हणत असत. मी गुरुजींचा हुशार विद्यार्थी असल्यामुळं त्यांचा माझ्यावर विशेष लोभ जडला होता. माझ्या कुळस्वभावाप्रमाणं मी देखील कुणाचं अद्वातद्वा सहन करीत नसे आणि झुंझायला निघत असे. एके दिवशी माझ्या एका सौगड्यानं टोमणा दिला, "रांगड्या कुठला, चालला ब्राह्मण व्हायला." माझ्या चुलत मामेभावानं माझी बाजू घेतली तर त्याला देखील बोलून बसला– "यवन कुठला! नागर ब्राह्मण बनूं पाहतोस?" बाळपणी लहान मुलांचे टोमणे मी ऐकत असे पण ते तेव्हा लागत नसत किंवा ते ऐकून मनांत नानातऱ्हेचे विचार येत नसत. पाठशाळेत आम्ही तिघे आणि इतर तीस विद्यार्थी होते, त्यांत चार कन्या पण होत्या. त्या साऱ्यांचा रंग आमच्यासारखा गोरा नव्हता, त्यांची शरीरं आमच्या सारखीं लांबसडक नव्हतीं, तरी देखील त्यांच्या पुढं त्रैलोक्य नमत असे हें आम्हांला दिसायचं.

त्या दिवशी घरीं परतलो तेव्हां माझा चेहेरा उदास झालेला होता. आईनं माझे ओठ सुकून गेलेले पाहिले तेव्हा तिनं माझा मुका घेऊन म्हटलं–

"बाळ, आज काय घडलं उदास व्हायला?"

मी आधीं टाळाटाळ केली पण तिनं बराचसा आग्रह केला तेव्हा सांगितलं–

"आमच्या कुळाबद्दल बोलताहेत इतर–ते आम्हांला ब्राह्मण मानीत नाहींत."

"आपण परदेशी ब्राह्मण आहोत, बाळ! म्हणून वाटतं त्यांना तसं."

" केवळ ब्राह्मणच नाहीं कांहीं, अब्राह्मण देखील आमच्या ब्राह्मण्याबद्दल शंका घेतात."

" याच ब्राह्मणाच्या सांगण्यावरून ! "

" दुसरे ब्राह्मण पुरोहितपणा करतात, मग आपले का ग यजमान नाहीत कुणी ? दुसरे ब्राह्मण ब्राह्मणभोजनात जातात पण आपल्या कुळांतले कुणीच जात नाहीत ! इतर ब्राह्मण तर आम्हांला आपल्या पंक्तींत देखील घेत नाहीत ! कां ग असं ? माहित आहे तुला ? असेल तर सांग तरी ! "

आईनं पुष्कळ सांगून पाहिलं, पण माझं काही समाधान झालं नाही.

मी जेव्हा असा चंचलचित्त होत असे, तेव्हा साऱ्या नागर सहपाठ्यांची आणि सोबत्यांची सहानुभूति माझ्याकडे असायची. अशा वेळी आम्ही सारे एक-मेकांना सहानुभूति दाखवीत असू.

– २ –

आणखी काळ लोटला आणि मला तेरावं लागलं. आता पाठशाळेतलं शिक्षण संपणार होतं. मी आपले वेद, ऋग्वेद, ऐतरेय ब्राह्मण, व्याकरण, निरुक्त आणि कांही काव्यं शिकलो होतो. गुरुजीचा माझ्या वरील लोभ वाढतच गेला. त्यांची कन्या विद्या माझ्या पेक्षां चार वर्षानी धाकटी होती, तिलाहि मी तिचे पाठ शिक-ण्यांत मदत करीत असे गुरुजी आणि गुरुपत्नी या दोघाचं माझ्या बरोबरचं वागणं पाहून विद्या देखील मला मान देऊं लागली. मला सुपर्णदादा म्हणायची ती ! गुरु-पत्नीच्या माझ्यावरील मातृप्रेमामुळं गुरुपरिवारांतून माझ्याबद्दल कोणी कधीहि तक्रार केली नाही.

आतां देखील कुणा तरी सहपाठ्यानं मला "रांगड्या" म्हणून टोमणा मारला, आणि तो देखील अकारणच. तसा मी आतां कोणाच्याच अध्यामध्यांत रहात नसे. कारण म्हणाल तर येवढंच की लिहिण्या वाचण्यांतली माझी वरचढ हुषारी पाहून माझे इतर सहपाठी मत्सरानं जळत असत. आतां माझी वृत्ति अधिकाधिक गंभीर होत होती. मन संतापत नव्हतं, असं काही म्हणतां येत नाही परंतु मी हळू हळू स्वतःचं संयमन करायला शिकलो. माझ्या आजोबांची सत्तरी लोटली होती. त्यांच्या तोंडून अनेकदां देशांविदेशांतल्या युद्धांझगड्यांच्या कहाण्या ऐकल्या होत्या. या गावांत देखील तेच आपल्या भाईबंदांबरोबर पहिल्यादा आले होते हेहि मी ऐकिलं होतं. मी आज आजोबांच्याकडून आपल्या कुळाबद्दल खरी माहिती काढून घेण्याचा निश्चय केला. गांवाच्या पूर्वेकडे आमची आंबराई होती. आब्याचा बहार खूप आलेला होता; आंबे पाडाला आले तरी ते पिकायचे होते. तरी देखील आतांपासून सोना दासीनं तिथं आपली झोंपडी उभारली

होती. मी असं ऐकलंय कीं आजोबा जेव्हां पहिल्यांदां या गांवांत आले तेव्हां त्यांनीं तिला कोणत्याशा दक्षिणी व्यापाऱ्याजवळून चाळीस रौप्यमुद्रा देऊन खरीदलं होतं त्या वेळीं दक्षिणेतून दासदासी विकायला कितीतरी व्यापारी येत असत. सोना तेव्हां तरुण होती म्हणून, नाहीतर दासी कांहीं तेवढ्या महागऱ्या नसत. काळ्या कळकट्ट सोनाचं शरीर आतां सुरकुत्या पडून वाळलेलं होतं. तिच्या चेहऱ्यावर चंबळा बटवा नद्यांच्या वाकड्यातिकड्या फांट्याप्रमाणं सुरकुत्या ओढलेल्या दिसत होत्या, पण एके काळीं सोना खूपच सुंदर होती म्हणतात. सदानकदा आजोबाच्या तोंडाशीच लागलेली असायची. दोघेही एकटीच असली म्हणजे तर हमखास असं असायचंच. या सलगीचा कांही वेगळाच अर्थ लोक करीत असत. एका धट्टपुष्ट प्रौढ विधुराबद्दल तसा संशय घेणं होतंहि स्वाभाविकच!

संध्याकाळीं आजोबा आंबराईत जायचे, एके दिवशीं मीहि निघालों त्यांच्या-बरोबर. त्याचा आपल्या बुद्धिमान् नातवावर लोभहि पण होता. इकडच्या तिकडच्या गप्पा मारताना मी त्याना म्हटलं,—

"आजोबा, मला आपल्या कुळाबद्दल सारं काही खरं तुमच्याकडून ऐकायचं आहे. कां हो इतर लोक आम्हाला ब्राह्मण मानीत नाहीत आणि 'रागडे' म्हणून चिडवितात? आईला विचारलं तर ती किनई नीट आम्हाला सांगतच नाही."

"पण हे विचारायची गरज आहेच का, बाळ?"

"पुष्कळ गरज आहे. मला जर सारं काही खरं समजलं, तर मी आपल्या कुळावर उडविण्यात येणाऱ्या शितोड्याचा प्रतिकार करीन. मी आता ब्राह्मणाच्या संबंधीं खूपखूप शिकलोय, आजोबा. आता माझ्यात इतकं विद्याबळ आलेलं आहे की मी आपल्या कुळाचा गौरव कायम ठेवूं शकेन, वाढवूं शकेन."

"त्याबद्दल मला खात्री वाटते, बाळ! पण तुझ्या आईला देखील आमच्या कुळाबद्दल फारसं माहिती नाही. आपल्याला माहिती असून देखील ती लपवून ठेवत होती, असं समजूं नकोस हो! आमच्या कुळाच्या स्थितीबद्दल म्हणशील तर नागर-कुळाशी सोयरिकी करून आम्ही त्याचे आमचे संबध प्रस्थापित केलेले आहेत. अवन्ती आणि लाट (गुजरात) याच्यामधी त्याची संख्या देखील खूप आहे. त्यामुळे आपण त्याच्याच बरोबर जगूं मरूं. तुझी पिढी वस्तुतः यौधेयापेक्षां अधिक-तर नागर झालेली आहे."

"यौधेय? म्हणजे हो काय आजोबा?"

"आपल्या कुळाचं नांव आहे ते. यावरूनच तर आपल्याला रागड्या–लढवय्या असं म्हणून टोमणे देत असतात."

"यौधेय ब्राह्मण होते का हो आजोबा?"

"ब्राह्मणांपेक्षां देखील अधिक शुद्ध असे आर्य !"

"पण ब्राह्मण तर नाहीं ना?"

"याचं उत्तर 'होय' किंवा 'नाही' असं एका शब्दानं देण्याऐवजीं तुला यौधेयांचा इतिहासच सांगणं बरं! यौधेय हे शतद्रु (सतलज) आणि यमुना यांच्या मधल्या दुआबांतले रहिवासी, हिमालयाजवळच्या मरुभूमीपर्यंत पसरलेले. ते तिथले रहिवासी आणि स्वामी होते. सगळेच यौधेय स्वामी होते."

"सगळेच्या सगळेच?"

"होय. त्यांच्यात कुणीहि राजा असा नव्हता. त्यांच्या राज्याला गण-राज्य म्हणत असत. गण वा पंचायत सारा राज्यकारभार चालवीत असे ते एकहातीं एकपुरुषी राज्यकारभाराचे अत्यंत विरोधी होते."

"असं राज्य असलेलं तर मी कधीच ऐकलं नव्हतं, आजोबा!"

"पण तसं होतं बेटा. माझ्याजवळ यौधेय गणाचे तीन रुपये आहेत, माझ्या पित्यानं दिले होते ते मला. देशातून पळून येतांना त्याच्या जवळ जे रुपये होते त्यांच्यातलेच होते हे."

"तर मग आजोबा, तुम्ही देखील यौधेयांच्या देशात जन्मास आलां नाहींत?"

"मी दहा वर्षांचा होतो तेव्हा माझ्या आईबापाना देशत्याग करावा लागला. मला दोन थोरले भाऊ पण होते. त्याचे वंशज इथं तूं पाहतोसच!"

"त्यांना देशत्याग कां करावा लागला?"

"प्राचीन काळापासून यौधेयाची एक स्वतंत्र भूमि होती. मोठमोठे प्रतापी राजे चक्रवर्ती–मौर्य, यवन, शक–भारत भूमीमध्यें होऊन गेले पण कुणीही आमच्या गणाची खोडी काढली नव्हती. मात्र थोडीफार खंडणी ते घेत असत. परंतु गुप्त–होय, हाच चंद्रगुप्त–जो आपल्याला विक्रमादित्य म्हणवतो आणि कधीं कधी तो उज्जयिनीला देखील आपला दरबार भरवीत असतो–त्याचा वंशज चक्रवर्ती बनला आणि त्यानं यौधेयांचा उच्छेद केला. यौधेय सबल चक्रवर्तीनां करभार देत असत, परंतु गुप्त राजा येवढ्यावरच संतुष्ट व्हायला तयार नव्हता. त्याचं म्हणणं असं की, 'मी इथं आपला उपरिक (गव्हर्नर) नियुक्त करीत. इथं माझा कुमारामात्य (कमिशनर) राहील. जसा मी माझ्या राज्याचा कारभार करतो तसाच इथंहि करीन.' आमच्या गणनायकानं त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला–सांगितलं, 'यौधेय अनादि कालापासून गणव्यवस्था सोडून दुसरी राज्यव्यवस्था मानीत नाहीत.' परंतु राज्याची धुंद चढलेला मदमत्त राजा बरा ऐकील? शेवटीं यौधेयांना आपल्या इष्ट गणदेवीच्या पुढं शपथ घेऊन शस्त्र उचलावं लागलं. त्यांनीं अनेक वेळां गुप्तांच्या सेनेला पिटाळून लावलं. ती सेना जर केवळ यौधेयांच्या संस्थे-

पेक्षां चौपट पांचपटच अधिक असती तर तिचा त्यांनीं पार धुव्वा उडवला असता. परंतु (ब्रह्मपुत्रा) लौहित्यापासून मरुभूमीपर्यंत विस्तारलेल्या त्या महान् राज्यांतल्या साऱ्या सैन्यापुढं यौधेय कुठवर टिकाव धरूं शकणार ? यौधेय जिकत असून देखील पराभूत होत होते–कारण त्याची माणसं कामाला येत होती. खूप अधिकानं त्याची जनहानि झाली. गुप्तांनी आमची नगरं गावं सारी बेचिराख केली, नरनारींची कत्तल उडवली. तरी देखील आमचे लोक सतत तीस वर्षं लढले. ते अधिक खंडणी देण्याला देखील तयार होते पण त्यांना आपल्या देशांत प्रचलित असलेली गणराज्यव्यवस्था तशीच कायम राखायची इच्छा होती. ''

" ही गणराज्यव्यवस्था होती तरी कशी हो आजोबा ? ''

'' त्या राज्यव्यवस्थेत प्रत्येक यौधेय सन्मानानं आपलं मस्तक उन्नत करून हिंडू शकत होता; कुणाच्याहि पुढं तो दीनता दाखवणं जाणत नव्हता. युद्ध हा तर त्यांचा नित्याचा खेळ, म्हणूनच त्याच्या वंशजांना यौधेय असं नांव पडलं. ''

" मग आजोबा, आपल्याप्रमाणंच आणखी देखील यौधेय असतील ? ''

'' आहेत ना ? पण वाऱ्यावर विखरून इतस्ततः पडलेल्या पाचोळ्या प्रमाणं आहेत जागोजाग. ''

''आणि आमच्या प्रमाणंच कोणत्या तरी नागरवंशांत मिळून स्वत:ला विसरून जातील ते ! मग आम्ही स्वत:ला ब्राह्मण कां म्हणवून घेतो हो आजोबा ? ''

'' त्याचा एक वेगळाच जुना इतिहास आहे बाळ ! पूर्वी सगळ्या जगभर राजांचीं राज्यं नव्हती, गणराज्यं होती. त्यावेळी ब्राह्मण-क्षत्रिय असे वर्णभेद नव्हते. ''

" ब्राह्मण-क्षत्रिय एकच वर्ण होते ? ''

'' तर काय ! ज्यावेळीं गरज वाटे तेव्हां पुरुष पूजा-अर्चा करायचा, आवश्यकता असली कीं लागलीच तोच शस्त्र हाती घ्यायचा. पण मागाहून विश्वामित्र आणि वशिष्ट यांनी वर्णांचं वाटप मांडलं ! ''

" म्हणूनच मग एका बापाचे दोन मुलगे एक रन्तिदेवा प्रमाणं क्षत्रिय झाला तर दुसरा गौरिवीती प्रमाणं ब्राह्मण ऋषि बनला. ''

'' होय ? अस्सं लिहिलंय बाळ ? ''

'' होय ना ! आजोबा, वेदामध्ये आणि इतिहासांत दाखला सांपडतो याचा. सक्रृति ऋषींचे हे दोन पुत्र ! हीच काय पण याहून देखील नवलाच्या गोष्टी प्राचीन ग्रंथांमध्यें आढळतात. आज त्यांच्यावर लोकांचा विश्वास देखील बसायचा नाही. ( चंबळा ) चर्मण्वतीच्या कांठचं दशपूर पाहिलंत तुम्हीं आजोबा ? ''

"पाहिलं ना! कितीतरी वेळां. आपल्या अवंतीमध्येच तर आहे. कितीदां तरी लग्नांच्या वऱ्हाडांत गेलों होतो. तिथं नागरांचीं घरं कितीतरी आहेत; त्यांपैकी पुष्कळसे मोठमोठे व्यापारी नि सार्थवाह आहेत."

"हेंच दशपूर रन्तिदेवाची राजधानी होतं. आणिक चर्मण्वती नाव कां पडलं ते ऐकाल तर आश्चर्यचकित व्हाल!"

"अस्सं? काय बरं कारण?"

"ब्राह्मण संस्कृतीचा पुत्र असून देखील स्वत. क्षत्रिय राजा असलेला रन्तिदेव आपल्या अतिथीधर्मासाठी खूप प्रसिद्धी पावला. तो सत्य युगातल्या सोळा श्रेष्ठ राजांपैकी एक होता. रन्तिदेवाच्या पाकशाळेत दररोज दोन हजार गाईंचा वध होत असे. त्यांचीं ओलीं चामडी पाकशाळेत ठेवलेली असत, त्यातून झिरपणाऱ्या पाण्याचा एक प्रवाह बनून मग त्याची नदी बनली. चर्मा मधून उगम पावणारी नदी म्हणून तिला चर्मण्वती नाव पडलं!"

"खरं सांगतोस तूं हें? बाळ, प्राचीन ग्रंथातून असं लिहिलेलं आहे?"

"होय तर! महाभारतात* स्पष्ट लिहिलेलं आहे असं!"

"महाभारतांत? पाचव्या वेदात आणि गोभक्षण?"

"अतिथींना भोजन घालण्यासाठी गोमास शिजवणारे दोन हजार आचारी होते, आजोबा! त्यात देखील ब्राह्मण अतिथींची संख्या इतकी वाढत असे की त्यामुळं वाढपे मांस कमी असल्या कारणानं सूप जास्ती घ्यावं अशी प्रार्थना ब्राह्मणाना करीत."

"ब्राह्मण गोमांस खात होते? सागतोस तरी काय तूं?"

"महाभारत+, ब्राह्मणाचा पांचवा वेद, खोटं का सागत असेल?"

* "राज्ञो महानसे पूर्वं रन्तिदेवस्य वै द्विज।
अहन्यहनि वध्येते द्वौ सहस्रौ गवां तथा।"
"समांसं ददतो ह्यन्नं रन्तिदेवस्य नित्यशः।
अतुला कीर्तिरभवन्नृपस्य द्विजसत्तम।"–वनपर्व (२०८।८–१०)
"महानदी चर्मराशेरुत्क्लेदात् संसृजे यतः।
ततश्चर्मण्वतीत्येवं विख्याता सा महानदी।"–शान्तिपर्व २९–२३.

+ सांकृति रन्तिदेवं च मृतं सञ्जय शुश्रुम।
द्विशतसाहस्रा तस्य आसन् सूदा महात्मनः॥
गृहानभ्यागतान् विप्रान् अतिथीन् परिवेषकाः।–द्रोणपर्व–६७।१–२
तत्र स्म सूदाः क्रोशन्ति सुमृष्ट मणिकुण्डलाः॥
सूपं भूयिष्टमश्नीध्वं नाद्य मांसं यथा पुरा। –द्रोणपर्व ६७।१७–१८
–शान्तिपर्व २७–२८

"काय जग इतकं उलटंपालटं झालं आतां?"

"होय, जग उलटपुलट होत असतं आजोबा. तरी देखील स्वतःला पक्के ब्राह्मण म्हणवून घेणारे हे दिवान्ध सगळ्यांच्याच डोळ्यावर कांतडं ओढूं पाहतात. मला खात्री आहे कीं या ब्राह्मणांच्या ढोंगाधतुऱ्यांचा आणि दंभाचाराचा फैलाव होण्याच्या आधींच्या रीतिरिवाजाप्रमाणं आपले यौधेय पूर्वज धर्मकर्म आचरीत होते."

"खरं आहे तें. ते स्वतःपेक्षां ब्राह्मणांना अधिक श्रेष्ठ पण मानीत नव्हते."

"इथं आल्यावर तुम्ही आपल्या मुलांमुलींच्या सोयरिकी आवन्तक ( मालवी ) ब्राह्मणांबरोबर न करतां नागरांच्या बरोबर कां केल्यांत हो?"

"त्याचीं दोन कारणं होतीं बाळ! एक तर इथले ब्राह्मण आमच्या कुळाबद्दल संशय घेत होते. परंतु त्यांच्यांनीं कांहीहि होऊं शकलं नसतं. मनांत आणलं असतं तर खास ब्राह्मण कन्यकांबरोबर आम्ही आपलीं लग्नं केलीं असतीं, पण आम्ही नागरांच्या बरोबरच लग्नसंबंध जोडणं शहाणपणाचं ठरवलं. कारण ते आमच्यासारखेच गौरवर्ण आहेत आणि ते देखील ब्राह्मणांच्या मान्यतेची पर्वा न करतां स्वत.ला ब्राह्मण म्हणवून घेत असत"

"आजोबा, हे नागर कोण आहेत हो?"

"केवळ ब्राह्मण म्हणवून घेतल्यानं चालत नाही, कारण ब्राह्मण पुढं विचारतात, 'कुठले ब्राह्मण, गोत्र कोणतं?' आमचे नातलग नागराच्या शेजारात राहूं लागले, तेव्हां त्यांनीं देखील स्वत.ला नागर-ब्राह्मण म्हणवून घ्यायला सुरवात केली; आम्हीं स्वतःला यौधेय-ब्राह्मण म्हणवून घेतों ना, अगदीं तस्संच!"

"पण मूळचे ते कोण आहेत हो आजोबा?"

"समुद्रकांठचे यवन आहेत ते. त्यांतले बरेचसे ब्राह्मणधर्मापेक्षां बौद्ध धर्मालाच मानतात. तूं उज्जयिनीला गेलास कधीं, म्हणजे समजेल हे तुला. अजून देखील असे कित्येकजण आढळतील की जे स्वतःला यवनच म्हणवून घेतात. ब्राह्मण त्यांना क्षत्रिय मानायला तयार आहेत."

"अस्सं, या जाति आणि वर्ण मानणं व मानून घेणं याच्यावरच अवलंबून आहेत म्हणायचे."

"मला तरी असंच दिसतंय, बाळ!"

– ३ –

"मला आतां विसावं लागलेलं होतं. बलिष्ठ आणि सुंदर तरुण दिसत होतों मी! आता आपल्या गांवांतलं शिक्षण संपवून मी उज्जयिनीमधल्या मोठमोठ्या विद्वानांचा विद्यार्थी बनलो होतो. उज्जयिनीच्या धनाढ्य नागरांमध्यें माझ्या आजोळांतील व्यक्तींची गणना होत असे आणि त्यांनींच आग्रह केल्यावरून मी

त्यांच्या जवळ राहूं लागलों. माझ्यासारख्या खेडवळ विद्यार्थ्याला विशाल जगावर नजर फेंकायला उज्जयिनी म्हणजे एक उघडी खिडकीच वाटली. कालिदासाचं नांव मी आधींच ऐकलं होतं, त्याच्या कांही कविता देखील वाचून काढल्या होत्या मी; परंतु इथं आल्यावर त्या महाकवीजवळ कांही दिवस अध्ययन करण्याचं देखील भाग्य लाभलं मला. चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या दरबारी कविराजाना अत्यंत मान मिळायचा, त्यामुळें बहुधा ते उज्जयिनीबाहेर जात असत. मला माझ्या कविगुरूंबद्दल अत्यंत अभिमान वाटत असला तरी पण कालिदासाची राजापुढं दिसून येणारी दासवृत्ति मला बिलकुल आवडत नव्हती. त्यावेळी कवि ' कुमार-सम्भव " लिहीत होते. मला त्यांनीं सांगितलं, " या निमित्तानं मी विक्रमादित्याचा पुत्र कुमारगुप्त यालाच शंकरपुत्र कुमार कार्तिकेय याच्या नावानं अमरपण प्रदान करणार आहे. " माझ्या निर्भीड बोलण्यांत कटुता असली तरी त्यामुळे कवि नाराज होत नसत. एकदां मी म्हणालों–

" आचार्य, आपल्या काव्याच्या प्रतिभेचं राज्य अनन्त कालपर्यंत चालणारं असून, चंद्रगुप्त कुमारगुप्त याची सत्ता केवळ त्यांच्या आयुष्यभरच काय ती चालेल. मग आपण या राजाच्या पुढं येवढी लाचारी का दाखवता बरं ? "

" सुपर्णा, वस्तुतः विक्रमादित्य हा धर्मसंस्थापक आहे. त्यानं हूणांच्यापासून भरतभूमि मुक्त केली, हे आहेच तुला ठाऊक ! "

" परंतु आज देखील उत्तरापथ आणि काश्मीर इथं हूण आहेतच ना ? "

" बऱ्याचशा भागातून तरी त्याना पिटाळलं ना ? "

" अशा रीतीनं राजे एकमेकाना पिटाळून लावण्याचा प्रयत्न करीत असतातच; त्यांना आपलं राज्य स्थापन करायचं असतं ना ! "

" परंतु गुप्तवंश हा गो-ब्राह्मण संरक्षक आहे. "

" आचार्य, मूर्खांना चकवणाऱ्या या अशा गोष्टी आपल्या तोंडून ऐकायला येतील असं वाटलं नव्हतं मला. आमचे पूर्वज ऋषि गोरक्षण करीत होते पण गोभक्षणासाठी ! तुम्हाला तर आहे हें ठाऊक. मेघदूतामध्ये * आपणच तर गाईचा वध करून चर्मण्वती निर्माण करणाऱ्या रन्तिदेवाचं कीर्तिगायन केलंत. "

" सुपर्णा, तूं माझा लाडका शिष्य असून देखील फारच उद्धट आहेस. "

---

* " व्यालम्बेथाः सुरभितनयालम्भजां मानयिष्यन्, स्रोतोमूर्त्या भुवि परिणतां रन्तिदेवस्य कीर्तिम् ।–मेघदूत १।४५

" हेंहि मी कबूल करायला तयार आहे, परंतु माझा अनन्तकाळचा प्रतिभा-सम्राट या धर्मध्वंसक गुप्त राजांच्या पुढं गुढगे टेंकून बसलेला मला नाहीं सहन होत."

" सुपर्णा, तूं गुप्ताना धर्मध्वंसक म्हणतोस ?"

" अवश्य म्हणेन ! नन्द, मौर्य, यवन, शक आणि हूण यांनी जें पाप केलं नव्हत ते या गुप्तांनीं केलं. भारतभूमीनून यानीं गण-राज्याचं उच्चाटण केलं."

" या युगाला अनुकूल नव्हती गणराज्याची पद्धति. पहिला चंद्रगुप्त किंवा समुद्र-गुप्त यांनीं जर गण-राज्यपद्धति कायम ठेवणार गण तसेच राहूं दिले असते तर त्यांना हूणादि प्रबल शत्रूंना पिटाळून लावण्यांत यश मिळालं नसतं."

" यश मिळवलं आपलं राज्य स्थापन करण्यांत आणि प्रति चंद्रगुप्त मौर्य होण्यांत. परंतु चाणक्यासारख्याच्या लोकोत्तर बुद्धीच्या सहाय्यावर स्थापन झालेलं आणि सुव्यवस्थितपणे चालवलेलं मौर्य साम्राज्य देखील फार दिवस टिकूं शकलं नाही. विक्रमादित्य आणि कुमारगुप्त याचे वंशज कांही यावच्चंद्रदिवाकरौ सत्ता चालवूं शकत नाहीत. मग त्यांनी प्रजासत्तेचं नांव निशाण देखील जे राहूं दिलं नाही. ते कोणत्या धर्मकार्यासाठी ? अनादि कालापासून चालत आलेल्या गणामधील प्रजासत्तेचा उच्छेद करून टाकणं हा महान अधर्म नव्हे काय ?"

" पण राजा विष्णूचा अंश असतो."

" कुमारगुप्त देखील आपल्या बरोबर एखाद्या मोराचं चित्र काढवून घेईल आणि मग कोणी कवि त्याला कुमार कार्तिकेयाचा अवतार म्हणूं लागेल. ही फसवेगिरी, हें पाखंड कशासाठी ? गंधशालीचा भात आणि मासाचें मधुर सूप मिळावें म्हणून !-राष्ट्रांतल्या सान्या सुंदर सुंदर स्त्रिया आपल्या राणीवशांत नेतां याव्यात म्हणून ! –कृषि आणि शिल्प या कामांत मरेपर्यंत राबणाऱ्या प्रजेची कमाई हिरावून घेऊन ती ख्यालीखुशालींत पाण्यासारखी खर्च करतां यावी म्हणून !—यासाठीच आपण गुप्ताना धर्मसंस्थापक राजे म्हणता ना ? विष्णु ? हूं , गुप्त आधीच वैष्णव म्हणवून घेण्याचं मोठं ढोंग करताहेत; ब्राह्मण त्यांना विष्णूचा अंश बनवूं पाहताहेत, त्यांच्या नाण्यांवर लक्ष्मीची मूर्ति अंकित करण्यांत येत आहे. विष्णूचीं देवालयें आणि मूर्ती बनविण्या-साठीं प्रजेची उपासमार करून व तिचा पैसा लुटण्यांत येऊन खूप खर्च करण्यांत येत आहे. केवळ याच आशेवर कीं गुप्तांचं राज्य प्रळयकाळापर्यंत टिकून राहील."

" हें तूं काय बोलतोस सुपर्णा ?–तूं राजाच्या विरुद्ध इतकं कठोर बोलायला नको होतंस !"

" आचार्य, आता केवळ आपल्याच समक्ष बोललो पण कधीं वेळ आली तर हेच परमभट्टारक महाराजाधिराज कुमारगुप्त यांच्या तोंडावर देखील सांगेन. मला हें

ढोंग सहन करीत जगणं अशक्यप्राय झालेलं आहे. मी बघून घेईन याबद्दल पुढं मागं. पण आचार्य, आपण स्वतः जर अश्वघोषाच्या पावलांवर पाऊल ठेऊन चाललां असतां तर किती तरी बरं वाटलं असतं मला. "

" परंतु प्रिय, मी केवळ कवि आहे. अश्वघोष दोन्ही-महापुरुषहि आणि कवि पण होते. त्यांना जगांतले भोगविलास क.पदार्थ वाटत असत, पण मला विक्रमादित्याच्या राणीवशांतल्या प्रमाणं सुंदर स्त्रिया हव्या, उदुम्बरवर्णा (लाल) द्राक्षी सुरा हवी, महाल हवेत, परिचारक हवेत. मला कसं बरं अश्वघोष होतां येईल ? मी 'रघुवंशा'च्या निमित्तानं गुप्तांच्या रघुवंशित्वाची प्रशंसा केली. त्यामुळं प्रसन्न होऊन विक्रमादित्यानं मला हा प्रासाद दिला. कांचनमालेसारखी यवनसुंदरी दिली. आज पंधरा वर्षं झाली, ती मला आपल्या पिंगल केशांत बांधून ठेवीत आहे. आतां मी 'कुमारसंभवा'ला प्रारंभ केलेला आहे. बघूं या त्यामुळं मला आणखी कोणता ठेवा मिळतो तो ! "

" आचार्य, आपण जर ' बुद्धचरित ' आणि ' सौदरानन्द ' अशी काव्यं लिहिलीं असतीं तर आपली उपासमार झाली असती, असं मला वाटत नाहीं. मला नाहीं वाटत आपल्याला भोगविलासापासून वंचित रहावं लागलं असतं म्हणून ! राजाची हांजी हांजी केली नाही तर आपलं जीवन बिल्कुल नीरस होईल असा आपल्याला नुसता भ्रम आहे. आपण आगामी कवींना हा वाईट आदर्श दाखवून दिलांत. सगळेच कालिदासाच्या अनुकरणाच्या नांवावर आपले दोष दडवून ठेवतील. "

" पण मी तशाही प्रकारचीं काव्यं लिहीन कीं ! "

" पण ज्यांच्यामुळं गुप्ताची पापं उघडकीला येतील अशीं काव्यं नाही तुम्हीं लिहिणार ! "

" तें नाही व्हायचं माझ्यानं ! सुपर्णा, मी फार हळवा आहे त्या बाबतीत. "

" राजांच्या प्रत्येक पापावर धर्माच्या नावानं पांघरूण घालाल ना पण ? "

" त्याची गरजच असते, सुपर्णा. त्याच्याशिवाय राजसत्तेला बळकटी नसते. वशिष्ट आणि विश्वामित्र यांना देखील असं करणं आवश्यक भासलं. "

" वशिष्ट आणि विश्वामित्र देखील कवि कालिदासाच्याप्रमाणं महाल आणि सुंदर स्त्रिया यांच्या प्राप्तीसाठीं ही सगळी पापं करायला तयार होते. "

" सुपर्णा, मी असं ऐकलंय की पुस्तकी विद्येच्या जोडीला तूं युद्धविद्या देखील शिकतोस. तुझी संमति असेल तर मी परमभट्टारकांना सांगेन व तुला कुमारामात्य नाहीं तर सेनानायकाचं पद देववीन. तुला एखाद्या अधिकाराच्या जागी असलेला पाहून मला अत्यंत आनंद वाटेल. महाराजांना देखील आवडेल ते "

" माझं शरीर मी कुणालाहि विकणार नाही, आचार्य ! "

"बरं तर मग राजपुरोहिताचं स्थान आवडेल का ?"

"ब्राह्मणांच्या स्वार्थीपणाची मला भारीच चीड येत्ये"

"मग करायचंय तरी काय तुला ?"

"अजून किती तरी विद्या शिकायच्या आहेत मला !"

– ४ –

उज्जयिनीत राहून देखील मला आपल्या विद्येची तहान पूर्णपणे भागविण्याची संधि मिळाली नाहीं. पण मी आधी सांगितल्याप्रमाणं विशाल जगाची ओळख होण्याची संधि मात्र मिळाली. ब्राह्मण कशा प्रकारें आपल्याला राजाच्या हातांतली कळसुत्री बाहुली बनवून विकून घेतात, हें मला अगदी जवळून बघायला मिळालं. एक काळ असा होता कीं त्यावेळी दुसरे मला ब्राह्मण मानीत नसत तरी देखील मला स्वतःला ब्राह्मण म्हणवून घेण्याचा अभिमान वाटत असे गांव सोडायच्या आधीच हा अभिमान गळूं लागला होता. गांवांतून नगरांत आलों तेव्हा मी अस्सल यवन पाहिले. ते अनेकदां ( भडोच ) भरुकच्छावरून उज्जयिनीला येत तिथ त्यांची मोठ-मोठीं पण्यागारं होतीं. मी कितीतरी शक-आभीर परिवारांत मिसळलो. त्यांचे पूर्वज एकाच शताब्दीच्या आधीं उज्जयिनी, लाट ( गुजरात ) आणि सौराष्ट्र या देशांचे शासक महाक्षत्रप होते. पिकलेल्या नारिंगाशी स्पर्धा करणारे गाल, गोल गोल डोळे आणि मुखावर केंसाचा जरा देखील मागमूस नसणारे हूण पण मी पाहिले. युद्धकलेंत ते निपुण असतील पण त्यांच्यांत मला प्रतिभा फारशी आढळून आली नाहीं. या तऱ्हेतऱ्हेच्या पुरुषांना एकत्र बघायला सर्वोत्तम स्थान म्हणजे बौद्धांचा विहार (मठ) ते तर उज्जयिनीत किती तरी होते. माझ्या मामेकुळांतले लोक बौद्ध होते आणि कितीतरी नागर भिक्षु या मठातून रहात होते. त्यामुळं मी तिथं वारंवार जायचा. मी एकदां भरुकच्छाला देखील गेलों होतों.

पुस्तकी विद्या संपवून आतां मी देशाटनानं स्वतःच्या ज्ञानांत भर घालायचं ठरविलं. त्याच वेळी मला समजलं की विदर्भामधी अचिन्त्य ( अजंठा ) नांवाचा एक फार प्रसिद्ध विहार असून तिथं जगांतल्या साऱ्या देशांतले बौद्ध भिक्षु रहात असतात. मी तिथं जायला निघालों.

आजवर ज्या ज्या वेळीं मी प्रवास केला, त्या त्या वेळीं बरोबर पुरेसा लवाजमा आणि साथी सोबती घेऊन जात असे. पण या वेळीं मात्र निघालों सडा फटिंग. वाटेंत चोराचिलटांची धास्ती नव्हती. या बंदोबस्ताबद्दल मात्र गुप्तांची प्रशंसा करावी लागेल. परंतु गुप्तांच्या सत्तेखाली देशांतला प्रत्येक परिवार समृद्ध झाला म्हणून ही वाटमारी थांबली असं का वाटतं तुम्हांला ? नाहीं. प्रजेजवळून कर उकळण्यांत गुप्तांनीं आधींच्या साऱ्या सत्ताधाऱ्यांवर मात केली होती. राजमहाल

बनविण्यांत आधीं कधींहि येवढाला पैसा उधळण्यांत आलेला नव्हता. आणि ते महाल सजविण्यांत तर खर्चिकपणाची हद्दच झालेली होती. पहाड, नद्या, पुष्करिणी, समुद्र यांना सशरीर जसेच्या तसे उचलून गुप्तांनीं आपल्या रम्य राजमहालांजवळ आणण्याचे प्रयत्न केले. त्यांचीं क्रीडावनं वस्तुतः वनाप्रमाणंच भासत होतीं; फरक येवढाच कीं या वनांत हिंस्र पशु पिंजऱ्यांत ठेवलेले असत आणि बाहेर मृग, गवे फिरत. क्रीडापर्वतांमध्यें देखील स्वाभाविक जलप्रपात, शिखरावरलं पर्वतवन वगैरे बनविलेले असत. सरोवरांना अरुंद कालव्यांनीं जोडून सेतुबंधन आणि नौकाविहाराची सोय केलेली असे. राजवाडे आंतून सजविण्यांत देखील हस्तीदंत, सोनं, रुपं, अनेक प्रकारची रत्नं, चीनांशुक ( रेशमी वस्त्रं ), मूल्यवान् गालिचे, इत्यादि वस्तू खूप मोठ्या प्रमाणावर वापरलेल्या असत. राजवाड्याला सौंदर्य आणता यावं म्हणून चित्रकार आपल्या कुंचल्यानं चमत्कार घडवून आणीत. मूर्तिकार पाषाण किंवा धातु याच्या प्रतिमा योग्य स्थानीं खोदीत व बसवीत. विदेशी प्रवासी आणि राजदूत यांच्या मुखातून या चित्रांची आणि मूर्तींची तोंड भरून केलेली स्तुति मी ऐकत असे तेव्हां माझं मस्तक अभिमानामुळं ताठून जात असे. पण ज्या ज्या वेळीं मी लहानसहान गांवांतल्या कंगालांच्या घरांची अवस्था बघतो तेव्हां मला उज्जयिनींतल्या राजवाड्यांबद्दल मनस्वी चीड वाटूं लागते. गांवामधून बांधलेल्या गढीमुळं आणि घरांच्या भिंतींमुळं जसे आसपास खोल खळगे पडतात, (तेथील माती खणूनच या भिंती व गढी उभ्या होतात,) तसेच देशभर पसरलेल्या दारिद्र्याचं कारण हेच राजवाडे होत. केवळ नगरांनिगमां(कसब्यां)मधूनच नव्हे तर गांवांमधून देखील चतुर शिल्पी नानाप्रकारच्या वस्तु बनवत, तंतुवाय (कोष्टी) सूक्ष्म तंतु कांतून त्यांचीं तलम वस्त्रं विणीत; स्वर्णकार, लोहकार, चर्मकार, आपापल्या वस्तु बनवण्यांत कौशल्य दाखवीत; राजप्रासादांमधील कलापूर्ण वस्तु तयार करणारे हात याच हातांचे सगेसोयरे होते. पण जेव्हां मी त्यांचे देह बघतो, त्यांचीं घरं बघतों, तेव्हां समजून येतं की त्यांनीं बनवलेल्या वस्तु त्यांच्या स्वत.साठीं केवळ स्वप्नजाल आहेत. त्या वस्तु एकेक गोळा होऊन निगमां नगरांतील महालांत, नाहीं तर तेथल्या पण्यागारांत जातात. मग तेथून देखील त्यांचा बराचसा हिस्सा पश्चिम समुद्राच्या भरुकच्छ आदि तीर्थांहून (बंदरांमधून) पारस्य (इराण) किंवा मिश्र (इजिप्त) इथं रवाना व्हायचा; नाहीं तर पूर्वसमुद्रांतल्या ताम्रलिप्त (तमलुक) वरून यवद्वीप (जावा) आणि सुवर्णद्वीप (सुमात्रा) इथं जायचा. भारताचा परदेशांबरोबर होणारा सागर व्यापार इतका प्रबळ आधीं कधींहि झालेला नव्हता. आणि समुद्रापलीकडची लक्ष्मी भारतामधल्या पण्यवस्तूंच्या मोबदल्यांत इतक्या अवाढव्य प्रमाणांत कधीहि आली नसेल; पण या सर्वांमुळं गब्बर बनलं कोण ? सर्वांत अधिक गब्बर झाले गुप्त राजे.

कारण ते प्रत्येक पण्यावर जबर कर आकारीत असत. मोठमोठ्या संस्थानांचे आणि मुलुखांचे स्वामी असलेले सामंत तर कारागीर आणि व्यापारी या दोहोंपासून कर उकळीत. सार्थवाह आणि व्यापारी हे देखील या लुटीचे सर्वांत मोठे भागीदार होते. हें सगळं पाहून घेतल्यावर माझ्या लक्षांत गांवांतल्या शेतकऱ्यांच्या व कारागीरांच्या गरीबीचं कारण आलं; आणि गुप्त राजे रस्ते आणि राजपथ सुरक्षित ठेवण्यासाठी कां झटत हेंहि समजलं.

गांवात दारिद्र्य होतं तरी हृदयात संताप निर्माण करणारं एक दृश्य तिथं क्वचितच दिसायचं. तिथं पशूप्रमाणं विकाऊ दासदासींची दावण बाजारात उभी केलेली नसे, त्यांच्या उघड्या नागड्या शरीरांवर चाबकाचा मार पडत असल्याचा देखावा तिथं बघायला मिळत नसे. माझे गुरु कालिदास यांनी एका प्रसंगी म्हटलं होतं की दासदासी या पूर्वजन्मीच्या कर्मानं होत असतात. ज्या दिवशी मी हे त्यांच्या मुखांतून ऐकलं त्या दिवशी माझा पूर्वजन्मावरचा विश्वास साफ उडाला. गुप्तांनी आपली सत्ता दृढ करण्यासाठी धर्माचा शेकडो वाटांनी उपयोग करण्याचा उतावळेपणा केलेला होता, त्यामुळं प्रत्येक समजूतदार व्यक्तीला असं वाटणं स्वाभाविक होतं परंतु साधारण प्रजा बघावी तर या बाबतींत अगदींच उदासीन वाटते. का बरं असं?–कदाचित ती स्वत:ला अगतिक समजत असेल. ग्रामवासी केवळ आपल्या गांवातल्या जगाचीच वास्तपुस्त करीत असतात. आपल्या गांवांतल्या एका बोटभर जमिनीचं संरक्षण करण्यासाठी ते अशा तऱ्हेनं आपले प्राण पणास लावून लढतील की तितक्या निकरानं कुमारगुप्त देखील आपल्या कोणत्या भुक्ति ( प्रांता ) साठी लढू शकला नसता पण गांवाच्या सीमेबाहेर कांहीहि होवो, त्याची ते पर्वा करीत नाहीत. मला एका गांवातली घटना आठवते त्या गावांत असतील चाळीस एक घरं; सगळी गवतानं शाकारलेली; उन्हाळ्यांत चुलीतल्या जाळामुळं घेतला एका घरानं पेट. गांवांतले सारेजण पाण्याचे घडे घेऊन त्या घराकडे धांवत गेले. पण एका घरांतलं जोडपं आपल्याच घराजवळ पाणी घेऊन बसलं. बरं झालं हे असं एकच जोडपं त्या गांवांत होतं भाग्य त्या गांवाचं नाहीतर एकही घर वांचलं नसतं त्या गांवातलं. त्यावेळी मला यौधेयांच्या गणाची आठवण झाली तिथं राष्ट्रातली सारी घरं आपल्या राष्ट्रासाठी जगा-मरायला सिद्ध होत असत. समुद्रगुप्त, चंद्रगुप्त, कुमारगुप्त यांच्या दिग्विजयासाठी देखील लक्षावधि प्राण बळी गेले पण दासांच्या प्रमाणं दुसऱ्याच्या हितासाठी ! स्वतंत्र मानवांच्या प्रमाणं आपल्या स्वत:च्या व आत्मीयाच्या हितासाठी कांही त्यांचे प्राण खर्ची पडले नव्हते. केवळ एका शतकाच्या गुप्त राजवटीमुळं प्रजेवर झालेला हा परिणाम पाहिला म्हणजे माझ्या अंगावर शहारे उठतात. वाटतं, अशी सत्ता जर शतकानुशतकं चालत राहिली तर मग हा देश केवळ

गुलामांचा देश होईल, आणि ते गुलाम असे की ज्यांना आपल्या राजासाठीच केवळ जगणं मरणं असतं असं वाटेल आणि मानवांना देखील कांही अधिकार असू शकतात याची जाणीव सुद्धां त्यांच्या मनांत कधी येणार नाही.

अचिन्त्यविहार अतिशय रमणीय होता. एका हिरव्यागार पहाडाला एक अर्धचंद्राकृति नदी भेदून जात होती. या लहानशाच परंतु सदा जिवंत पाणी असलेल्या नदीच्या डाव्या हाताचा पहाड कोरून शिल्पकारांनीं किती तरी गुहामय सुंदर प्रतिमागृहं, निवासस्थानं आणि सभाभवनं बनविली. या गुहा देखील राजवाड्यां प्रमाणं चित्रं आणि मूर्ती यानीं सजवलेल्या होत्या. अचिन्त्यविहारांतली भितीवरली चित्रं कित्येक पिढ्या–नव्हे शेकडो पिढ्या–तशींच सुंदर राहतील; पाषाणशिल्प देखील तितकंच सुंदर आहे, तरी पण गुप्तप्रासादा मधल्या सुंदर सजावटीची सर त्यांना येणं शक्य नसल्यामुळं मला ती तितकी आकर्षक वाटली नाहींत तिथं मला आकर्षण वाटलं ते भिक्षु मंडळीच. तिथं देशदेशांतराहून आलेल्या व्यक्ती मोठ्या ममतेनं एकत्र एका परिवारातल्या माणसा प्रमाणं राहत होत्या. सुदूर चीन, पारसीक, आणि यवन भिक्षूंना मी तिथं पाहिलं. सिहल, यव, नि सुवर्णद्वीप या मधून आलेले भिक्षूही पण तिथं होते. चम्पा आणि काबोजद्वीप याची नावं व तिथल्या सजीव प्रतिमा मला पहिल्यांदाच ऐका-पहायला मिळाल्या. कपिशा, उद्यान, तुषार, कूचामय सर्वपिगल पुरुष भिक्षूंची कषाय वस्त्रं नेसलेले मी तिथंच पाहिले.

मला बाहेरच्या देशांबद्दल माहिती मिळवण्याची खूपच इच्छा होती. आणि जर हे विदेशी भिक्षु एकेकटे भेटले असते तर मी त्यांच्या सहवासांत एकेक वर्ष सहज घालवलं असतं. परंतु सारेच एकत्र भेटले ते इतक्या बहुसंख्येत की त्यामुळं मी दरिद्र्याच्या निधी प्रमाणं स्वतःला सांभाळू शकायला असमर्थ ठरलो.

दिङ्नागाचं नांव मी आपल्या गुरुमुखातून ऐकलेलं होतं. गुप्तराज, त्याचं राजतंत्र, आणि त्याचा परम सहाय्यक ब्राह्मणधर्म याचं समर्थन कालिदास करीत असत. ते असं कोणत्या हेतूनं करीत हे मी आधी सांगितलेलंच आहे.

या हेतुपूर्तीच्या आड येणारा एक जबरदस्त अडथळा म्हणजे दिङ्नाग असं ते मानीत होते. ते म्हणत–" या द्राविड नास्तिकापुढं विष्णूच काय पण तेहतीस कोटि देवाची सिंहासनं डगमगूं लागतात धर्माच्या नावावर आम्हीं राजे आणि ब्राह्मण यांच्या स्वार्थासाठी जें कांहीं गौडबंगाल करतो ते याच्या पासून दडवतां आलं नाही आम्हांला." आणिक एक अडचण अशीं होती की दिङ्नागाला वृद्ध वसुबंधूसारखा गुरु लाभलेला होता. कालिदास वसुबंधूंना 'ज्ञानवारिधी' म्हणत. भदन्त वसुबंधु चंद्रगुप्त विक्रमादित्याची दुसरी राजधानी अयोध्या इथं कित्येक वर्ष राहिलेले होते. त्यांचा तिथला दर्जा दरबारांतल्या एखाद्या मानकऱ्याप्रमाणं नव्हता, तर स्वतंत्र व

सन्मान्य अशा गुरूचा होता. पुढं ते गुप्तांच्या नीच वृत्तीमुळं निराश होऊन आपली जन्मभूमी (पेशावर) पुरुषपूर इथं निघून आले होते. दिङ्नागानं लोखंडी बाण आणि खड्ग यांच्या पेक्षां देखील तीक्ष्ण असं ज्ञान व तर्क यांचं शस्त्र वापरण्याचं व्रत घेतलं होतं. त्याच्याबरोबर अर्धा तास बोलत रहावं कीं लागलीच ब्राह्मणांचं सारं मायाजाळ नष्ट होऊन जातं. मी सहा महिने अचिन्त्यविहारांत होतों आणि दररोज दिङ्नागाचा सर्वस्पर्शी प्रकाश देणारा उपदेश श्रवण करीत होतों. त्यांच्यासारखा गुरु मला मिळाला, याचा मला अभिमान वाटतो. त्यांचं ज्ञान गंभीर आहे, त्यांचीं वचनं धगधगीत निखाऱ्याप्रमाणं प्रखर असतात. माझ्या प्रमाणंच ते देखील जगांतलं पाखंड आणि मायाजाळ पाहून क्रोधाविष्ट होत असतात. एके दिवशी ते म्हणाले—

"सुपर्णा, प्रजेच्या बळावरच आम्ही कांही करूं शकलों असतो पण ती आतां दूर वहावत गेली. तथागत बुद्धानं जाति आणि वर्णभेद नष्ट करण्याचे खूप प्रयत्न केले. थोड्या बहुत प्रमाणांत त्यांना यश देखील मिळालं. बाहेरून देशांत आलेले यवन, शक, आभीर, गुर्जर यांना ब्राह्मण घृणापूर्वक म्लेंच्छ म्हणत. परंतु तथागताच्या संघानं त्यांना मानवतेचे समान हक्क प्रदान केले. कांहीं पिढ्या तर असं वाटूं लागलं कीं आतां भारता मधले भेदभाव मिटणार. परंतु देशाच्या दुर्दैवान याच वेळी ब्राह्मणांच्या हाती गुप्ताची राजसत्ता आली. गुप्त स्वतः जेव्हा पहिल्यांदा आले तेव्हां त्यांचीहि संभावना ब्राह्मणांनीं म्लेच्छ म्हणूनच केली होती, परंतु त्यांचा गौरव वाढविण्यासाठीं कालिदासानं 'रघुवंश' आणि 'कुमारसंभव' लिहिला. गुप्त आपला राजवंश आप्रळय कसा टिकूं शकेल या विचारानं चिंतित आहेत, ब्राह्मण त्यांना तशी खात्री देत आहेत. आपले भदन्त वसुबंधु अशी ग्वाही देऊं शकत नव्हते. ते स्वतः लिच्छवियांच्या गणतंत्राच्या आधारावर निर्माण केलेल्या भिक्षुसंघाचे खरे अनुयायी होते. बौद्धांना ब्राह्मण आपले जबरदस्त प्रतिस्पर्धी मानीत असतात. त्यांना माहित आहे की बौद्ध गोमासभक्षक आहेत, व ते त्याचा त्याग करायला तयारहि नाहींत. झालं, यामुळं ब्राह्मणांनी गोमांसवर्जन आणि गोब्राह्मणसंरक्षण यांचा प्रचार सुरूं केला. बौद्ध जाति व वर्णभेद नष्ट करूं पाहतात; झालं, ब्राह्मणांनीं आतांपर्यंत वर्णबहिष्कृत असलेल्या यवन, शकादिकांना उच्च उच्च वर्ण द्यायला सुरुवात केली. हा मोठा खुबीदार फांसा आहे, त्यांत किती तरी बौद्ध गृहस्थ देखील सांपडले. या दुहीनं प्रजेची शक्ति खर्ची करून राजशक्ति आणि ब्राह्मणशक्ति दृढ करण्याचा ब्राह्मणांचा डाव आहे; पण सुपर्णा, याचा परिणाम देशापुरता अत्यंत घातक झाल्याशिवाय रहाणार नाहीं. कारण गुलामांच्या शक्तिसामर्थ्यावर कोणतंहि राष्ट्र बलवान होऊं शकत नाहीं."

मी यौधेयांच्या बलिदानाची कथा आचार्यांना सांगितली तेव्हां तर त्यांचं हृदय गहिंवरून आलं. तेव्हां मी त्यांना माझी यौधेयगणाचं पुनरुज्जीवन करण्याची मनीषा निवेदन केली तेव्हां ते म्हणाले, ''माझी सदिच्छा आणि आशीर्वाद तुझ्या पाठीशीं आहे. उद्योगी पुरुषसिंह विघ्नबाधेला भीत नसतात.''

,त्यांचाच आशीर्वाद मिळवून मी यौधेयांच्या भूमीकडे जात आहे. त्या मृत भूमीचं एक पुनरुत्थान तरी करीन, नाही तर वाळूंतल्या पावला प्रमाणं नष्ट तरी होऊन जाईन.

---

# १३—दुर्मुख

( काल–इ. स. ६३० )

– १ –

माझं नाव हर्षवर्धन. 'शीलादित्य'–सदाचाराचा सूर्य–ही माझी पदवी. दुसऱ्या चंद्रगुप्तानं आपल्याला 'विक्रमादित्य'–पराक्रमाचा सूर्य–अशी पदवी घेतली होती आणि मी ही कोमल पदवी स्वीकारली. दुसऱ्यांना दाबणं–त्रास देणं–छळणं या भावना 'विक्रम' शब्दांतून व्यक्त होतात, परंतु 'शील' शब्दात कुणाला छळण्याची भावना सांपडायची नाही. गुप्त आपल्याला परम वैष्णव म्हणवून घेत. गौड शशांकानं कपट करून ज्यांचा ऐन तारुण्यांत खून केला ते माझे थोरले बंधु राज्यवर्धन हे परम सौगत (परमबौद्ध) होते. सुगता (बुद्धा) प्रमाणं ते क्षमामूर्ति होते; मात्र त्यांच्या खुनाच्या स्मरणानं आज देखील माझं हृदय जळूं लागतं. मी स्वतःला त्याच्या चरणाची धूळ मानीत असलो तरी मला स्वतःला परम माहेश्वर (शैव) होणं अधिक पसंत पडलं. परंतु मी शैव असलो तरी माझ्या अंतःकरणांत बुद्धा बद्दल किती भक्तिभाव आहे, हे अखिल भारतच नव्हे तर बाहेरचं सारं जग देखील जाणतं. मी माझ्या राज्यांतील साऱ्या धर्मांचा मान राखीत आलों, तो प्रजारंजनासाठीं म्हणूनच नव्हे, तर स्वतःच्या शीलाचं संरक्षण करण्यासाठीं देखील. दर पांचव्या वर्षी राजकोषांतलं उरलेलं धन मी प्रयाग क्षेत्रीं त्रिवेणी संगमावर ब्राह्मण आणि श्रमण (बुद्धभिक्षू) यांच्यामध्यें वांटत असतो. मला साऱ्या धर्मांची समान अभिवृद्धि व्हावी असं वाटत आहे, हेंच यावरून सिद्ध होत नाही काय? आतां मी समुद्रगुप्ताप्रमाणं दिग्विजयासाठी मोहिमा केल्या, नाही असं नाही, पण त्या शीलादित्य पदवी घेण्यापूर्वी. दक्षिणापथाचा राजा पुलकेशी याच्या पुढं पराभूत व्हावं लागलं नसतं तर मी देखील विक्रमादित्यासारखी एखादी पदवी लावून घेतली असती, असं मुळींच वाटूं देऊं नका. मी साऱ्या भारताचा चक्रवर्ती झालों असतो तरी चंद्रगुप्ताप्रमाणं वागलों नसतो. उलट अशोकानं कलिंगविजयानंतर पश्चाताप पावून केवळ शीलाच्या योगानं माणसांवर विजय मिळवला, तसाच मीहि मिळवला असता; स्वभावतःच कोमल आहे मी.

राज्याचाच मुळीं स्वीकार करायला मी प्रथम तयार नव्हतो. स्थाण्वीश्वरपति महाराज प्रभाकरवर्धन यांचा पुत्र आणि कान्यकुब्जाधिपति परमभट्टारक महाराजाधि-

राज राज्यवर्धन याचा अनुज असून देखील, मी राज्यभोग पाहून आणि भोगून देखील असार मानीत आलों होतों. वडील बंधूंचा खून झाल्यावर बराच काळ मी राज्यसिंहासनाचा अंगिकार करण्याला नकार देत होतों. भावाच्या मारेकऱ्याच्या सूडाची क्षत्रियोचित इच्छा मनात प्रबळ झाली नसती तर मी कदाचित कान्य-कुब्जाच्या सिंहासनाला पाय देखील लावला नसता. आणि मग माझी बहीण राज्यश्री हिच्या पतिकुलाकडे–मौखरि वंशाकडे–राज्यसत्ता गेली असती याच वंशाकडे, गुप्त गेल्यानंतर आणि माझ्या भावाच्या आधीं राज्यसत्ता होती कान्यकुब्जाची! हे सारं मी इथं सागतो याचं कारण येवढंच की पुढं मागं कुणी असं मानू नये कीं हर्षानं स्वार्थावर नजर ठेवून आपल्या मस्तकीं राजमुकुट चढविला. माझ्या दरबारांतल्या तोंडपुज्यांनीं मला समुद्रगुप्त आणि चंद्रगुप्त विक्रमादित्य याच्या मालिकेत बसवलं याचं मला वाईट वाटतं. या तोंडपुज्याची पीडा कोणत्याच राजाला टाळतां येत नाही, मोठं कठीण असतं ते. पण त्यानी हा माझ्यावर अन्याय केला–जाणून बुजून केलेला नसला तरी तसं करणं न्यायाचं नव्हतं.

मी राज्याचा स्वीकार केला केवळ शील, सदाचार आणि धर्म याचं पालन करण्यासाठी, सर्व प्राणीमात्रांच्या कल्याणासाठी. मला विद्यादान श्रेष्ठतम दान वाटतं म्हणूनच मी गुप्तांच्या वेळेपासून वाढीस लागलेल्या नालन्दा विद्यापीठाची समृद्धि आणखी अधिक होईल असं केलं. त्यामुळं तिथं दहा हजार देशी विदेशी विद्वानांना आणि विद्यार्थ्यांना सुखासमाधानानं विद्याध्ययन करण्याची सोय होऊं शकली. विद्वानांचा सत्कार-सन्मान करणं हे मला अतिशय आवडायचं. चीनमधला विद्वान भिक्षु वेन्-चिङ याचा मी मनःपूर्वक सन्मान केला होता. बाणाची अद्भुत काव्यप्रतिभा बघून मी त्याला त्याच्या भुजंगते (लंपटते) पासून सोडवून नीट सरळ मार्गावर आणण्याचा प्रयत्न केला–तरी देखील ता फार वरच्या पातळीवर येऊं शकला नाहीं–आणि कालिदासासारखा केवळ खुशामत्या कवीच राहिला. मग मगधां-तल्या एका लहानशा गांवांतून त्याला काढून विश्वाच्या विशालतेपुढं ठेवायला मी जे प्रयास केले ते माझ्या विद्याप्रेमाचे द्योतकच होत.

सर्वांनीं आपापल्या धर्माचं पालन कराव असं मला वाटे. आपल्या धर्माला अनुसरणंच बरं असतं. त्यामुळं जगात शांतता आणि समृद्धि नांदते आणि परलोकीं सुख मिळतं. सगळ्या वर्णांच्या लोकांनीं आपापल्या वर्णधर्माचं पालन करावं, सर्व आश्रमांतल्या लोकांनीं आपापला आश्रमधर्म पाळावा, सर्व धर्मातल्या लोकांनीं आपापल्या श्रद्धेनुसार पूजाअर्चा करावी, यासाठीं मी नेहमींच प्रयत्न करीत आलो.

कामरूप (आसाम) ते सौराष्ट्र (काठेवाड), आणि विंध्यापासून हिमालयापर्यंत पसरलेल्या आपल्या विस्तृत राज्यांत मी न्यायाचं राज्य स्थापन केलं. माझ्या अधि-

अधिकाऱ्यांनीं जुलुम करूं नये म्हणून मी वेळोंवेळीं स्वतः दौरे काढीत असे. असाच एकदां मी दौऱ्यावर असतांना ब्राह्मण बाण माझ्या निमंत्रणावरून मला भेटला. आपणहून त्यानं माझी कीर्ति वाढविण्याचं ठरवलं असलं तरी, त्यानं असल्या दौऱ्यांच्या वेळचं माझ्या राजेशाही थाटामाटाचं जे वर्णन केलेलं आहे, ते माझं नाहीं, एखाद्या विक्रमादित्याच्या दरबाराचं होऊं शकेल. माझं चरित्र (हर्षचरित) तो गुपचूप लिहीत होता. एके दिवशी माझ्या कानी आलं तेव्हां विचारलं मी. त्यानं लिहिलेला भाग मला दाखविला. मला ते मुळींच आवडलं नाहीं; रागावलों देखील मी त्याच्यावर; परिणाम असा झाला कीं पुढं तो तेवढ्या उत्साहानं लिहूं शकला नाहीं. मला त्याची "कादम्बरी" खूप आवडली,– मात्र तीत राजदरबार, राणीवशा, परिचारक-परिचारिका, प्रासाद, आराम इत्यादिकांचं असं काहीं वर्णन केलेलं आहे कीं लोकांना साहजिक असं वाटावं की हे सारं वर्णन माझ्याच राजदरबाराचं आहे. मला माझ्या पारसीक राणीबद्दल अत्यंत प्रीति वाटत होती. ती केवळ नौशेरवॉंची नात म्हणूनच नव्हें तर ती आपल्या गुणांनीं आणि रूपानं कोणत्याही पुरुषाला मोह पाडूं शकत होती म्हणून! बाणानं तिचंच वर्णन "महाश्वेता" म्हणून केलेलं आहे. माझी सौराष्ट्री राणी जरा उतार वयात केली मी; तिच्या मनाला प्रसन्नता आणावी म्हणून मी तिचा महाल सजविण्यासाठी विशेष खबरदारी घेतली होती. बाणानं तिलाच कादम्बरी व तिच्या महालाला कादम्बरीचं निवासस्थान समजून वर्णन केलेलं आहे. बाणाच्या कृतीमधल्या या दोन गोष्टी सोडल्या तर कोणतंहि वर्णन मला लागूं होत नाहीं व तीं वर्णनं अतिशयोक्तिपूर्ण आहेत असं खुशाल समजावं.

माझ्या अखेरच्या दिवसांत मला असं वाटूं लागलंय की बाण हा माझा हितैषी नव्हता. बाणाच्या 'हर्षचरितां'तच नव्हे, तर कादम्बरीमध्यें देखील जें कांही राजा आणि त्याचं ऐश्वर्य यांचं वर्णन केलेलं आहे तें माझंच असावं असं लोकांना वाटेल. आणि 'नागानन्द', 'रत्नावलि' आणि 'प्रियदर्शिका' ही नाटकं माझ्या नांवावर लिहून तर त्यानं आणखीनच अनर्थ केला. लोक म्हणतील,–कीर्तीचा भुकेला हर्ष दुसऱ्यांना पैसे देऊन त्यांचे ग्रंथ आपल्या नांवावर विकतो. खरं सांगायचं म्हणजे मला या अनर्थाचा पत्ता देखील नव्हता. मला हें कळलं तेव्हां हजारों विद्यार्थ्यांनीं हीं नाटकं माझी म्हणून वाचून काढलेलीं होती आणि कितीदां तरी त्यांचे प्रयोगहि पण झालेले होते.

आपली प्रजा सुखी असलेली पाहणं मला आवडत होतं. ती सुखी झालेली पाहिली मी. आपल्या राज्यांत शांतता नांदावी, संकटांचं नांव निशाण देखील त्यांत असूं नये असहि मला वाटत होतं. शेवटीं शेवटीं तीहि माझी इच्छा पूर्ण झाली. लोक काठीला सोनं बांधून खुशाल प्रवास करूं शकत होते.

माझ्या कुळाबद्दल बोलतांना अजूनहि कांही निंदक लोक सांगत असतात कीं मी वैश्यवाणी कुळांतला आहे. पण तें सपशेल चूक आहे. आम्हीं वैश्य क्षत्रिय आहोत, वैश्यवाणी नव्हे. एके काळी आमचा शातवाहनवंश साऱ्या भारतावर राज्य करीत होता. शातवाहन राज्याचा बींमोड झाल्यावर आमचे पूर्वज गोदावरी तीरावरलं प्रतिष्ठानपूर (पैठण) सोडून स्थाण्वीश्वर (ठाणेश्वर) इथं रहायला आले. शातवाहन (शालिवाहन) वंश केव्हांहि वाण्यांचा नव्हता, हे साऱ्या जगाला ठाऊक आहे. त्यांचे शक-क्षत्रियाबरोबर लग्नविवाह होत असत पण ते राजांना उचित असंच होतं. माझी स्वत:ची राणी महाश्वेता ही पारसीक राजवंशामधली होती.

– २ –

माझं नांव बाण. मी किती तरी काव्यं–नाटकं लिहिलेली आहेत. त्यांच्या निकषावरच लोक माझी पारख करतील म्हणूनच मला हा लेख लिहावा लागत आहे. मला खात्री आहे की चालू राजवंशाच्या अमदानीत हा लेख उघडकीस येणार नाही. मी हा लेख जपून ठेवण्यांत येईल अशी व्यवस्था पण केलेली आहे. माझीं प्रसिद्ध पुस्तकं वाचण्याच्या आधीं जर पुढील पिढ्यामधल्या लोकानी हा लेख वाचला तर त्यांचा माझ्याविषयी व्हायचा तो गैरसमज होणार नाही.

राजा हर्षानं भर सभेत मला भुजंग (लंपट) म्हटलेलं होतं, त्यामुळं लोकांचा गैरसमज होणं साहजिक आहे. मी धनिक पित्याचा लाडका पुत्र, भास–कालिदासांच्या कृती वाचून वाचून माझ्या मधली रसिकता उतास जाऊं पाहत होती यांत मुळीच संदेह नाही. माझ्यापाशीं रूप होतं नि यौवन देखील. मला देशाटनाची आवड होती; मला यौवनाचा आनंद लुटण्याची इच्छा होती; मनांत आलं असतं तर मी तो आनंद आपल्या पित्याप्रमाणं घरीं राहूनच लुटूं शकलों असतों. परंतु मला तसं पाखंड्या सारखं वागणं आवडत नव्हतं. अंतर्यामी स्वेच्छाचारी कामी असून देखील बाह्यात्कारीं स्वतःला जितेन्द्रिय, संयमी, पुजारी, महात्मा म्हणून मिरवणं मला कसंसंच वाटत होतं. मला असं वागणं जन्मभर आवडलं नाहीं. जें कांहीं करावंसं वाटलं, ते उघड उघड केलं. माझ्या पित्यानं आपल्या असवर्ण पुत्राचा स्वीकार करून आयुष्यांत फक्त एकदांच काय ती हिंमत दाखवली होती, परंतु ते एक तरुणपणांतलं पाप गणलं जाऊं शकत होतं. यौवनांतल्या ज्या आनंदाचा आस्वाद घ्यायचं मी ठरविलं होतं, तो मला माझ्या जन्मभूमींत घेतां येणं शक्य नाही, तिथं जातींतले आणि कुळांतले सारे लोक चिडून जातील, धनवित्त देखील गमवावं लागेल, असं मला दिसून आलं. मला एक अभिनव युक्ति सुचली. मी एक आपली नाटक मंडळी स्थापन केली. मात्र मगधा बाहेर जाऊन. माझे सहकारी देखील तरुण असून कलाकुशल आणि गुणवंत असे होते. धूर्त, तोंडपुजे, आणि बनवाबनवी करूं पाहणारे मित्र मला आवडत नसत. माझ्या नाटक

मंडळींत मी कितीतरी सुंदर तरुणी देखील सामील करून घेतलेल्या होत्या, त्यांत सगळ्याच कांहीं वारवनिता (वेश्या) नव्हत्या. याच प्रवासांत रंगभूमीवर प्रयोग करण्यासाठीं 'रत्नावलि', 'प्रियदर्शिका' इत्यादि नाटक नाटिका लिहिल्या मी. यौवनाचा आनंद कलात्मकतेनं उपभोगण्याचा मी प्रयत्न केला. कलेची ही जी सेवा मी केली, तीबद्दल सहृदय पुरुष माझी प्रशंसा करतील यात संशय नाहीं वाटत मला. मी जीवनांतला आनंद लुटला आणि तुम्हांला 'रत्नावलि', 'प्रियदर्शिका' अशीं नाटकं पण प्रदान केलीं. कित्येक भोगी असे असतात कीं ते केवळ आपल्या स्वतःच्या आनंदालाच सर्वस्व मानतात. आतां लोक म्हणतील, मी राजा हर्षाला प्रसन्न करण्यासाठी आपलीं नाटकं त्याच्या नांवावर पुढं आणली. पण त्याना हे माहित नाहीं कीं ज्यावेळी प्रवासात मीं ही नाटकं लिहिलीं तेव्हां मला फक्त हर्षाचं नांव तेवढं माहित होतं. मला त्यावेळी कल्पना देखील नव्हती की पुढं हर्ष मला आपला दरबारी कवि करील. स्वतःचं नाव दडविण्यासाठीच केवळ मी हर्षाच्या नांवाचा संबंध आपल्या नाट्यकृतींशी जोडला. ही नाटकं वाचणारांना त्यांचं खरं मोल समजत होतं, त्यांत संपूर्ण नाविन्य होतं. माझ्या प्रेक्षकामध्ये गुणीजनाची संख्या अधिक होती. पंडित, राजे, कलाविद मुद्दाम ही नाटकं बघायला येत असत. त्याना जर खऱ्या गोष्टीचा सुगावा लागला असता तर मग मला नाटकमंडळीचा सूत्रधार रहाता आलं नसतं, ते सारे महाकवि बाणापुढं रुंजी घालं लागले असते. हर्षाला सोडून मी कामरूपपासून सिन्धुपर्यंत, आणि हिमालयापासून सिंहलांतल्या अनुराधापुरापर्यंत साऱ्या राजदरबारात आपली नाटक दाखवली. कल्पना करा की कामरूपेश्वर, सिंहलेश्वर किंवा कुंतलेश्वर यांना जर या नाटकाचा कर्ता महाकवि हाच बाणभट्ट आहे असं समजलं असतं तर मग मला पर्यटन करता आलं असतं का?–माझ्या आनंदानुभवाचं काय झालं असतं? मला दरबारी कवि व्हायचं नव्हतं. मला जर हर्षाच्या राज्यात घरदार करायचं नसतं, तर मी त्याचा देखील दरबारी कवि झालो नसतों. माझ्या पित्याजवळ गडगंज संपत्ति होती.

आपल्याला असं वाटण्याचा संभव आहे की हर्ष म्हणतो त्याप्रमाणं मी केवळ भुजंग–वेश्यालपटच होतो. पण माझ्या मंडळींत वारवनिता फार थोड्या आल्या. ज्या कांहीं आल्या त्याना मी नृत्य-संगीत-अभिनय या कलांकडे दृष्टि ठेवूनच आश्रय दिला. माझ्या नाट्यगगनांत चमकणाऱ्या तारका दुसऱ्याच दिशेतून उगवत. पुढं काय होईल ते आज सांगतां येत नाही, तरीपण आज तरी देशातल्या साऱ्या तरुणी–मग त्या ब्राह्मणकन्या असोत कीं क्षत्रियकन्या असोत–राजे व त्यांचे सामन्त याच्या मालकीचं धन समजल्या जातात. माझ्या आतेला मगधामधल्या एका मौखरि सामन्तानं जबरानं ठेवून घेतलं होतं. तो मेला तेव्हां ती वय ढळलेली निराधार स्त्री आमच्या घरीं राहू

लागली. माझ्यावर तिचा फारच लोभ. मी पण तिच्या नि सामन्ताच्या सहवासाची वाच्यता देखील केली नाहीं कधीं. तसं म्हटलं तर त्या बिचाऱ्या अबलेचा कोणता दोष होता ? सुंदर तरुणी कमी असल्या तरी पण त्यांच्यावर पहिला अधिकार गाजवूं पाहणारे कांही थोडेसेच सामन्त असणार. एकेका सामंताच्या वांटणीला किती तरुणी येतील याचा अंदाज तुम्ही स्वतःच करूं शकतां. सामन्त आणि राजे यानी या तरुणीच्या स्वीकाराचे निरनिराळे मार्ग शोधून काढलेले होते. कोणी कोणी पतिसहवासाच्या आधी एक रात्र तरुणीनं आपल्याकडे यावं असा नियम घालून देत. यालाच लोक धर्ममर्यादा समजूं लागले होते. आणि ते आपल्या लेकी-सुनांना आणि बहिणींना पालखी-मेण्यांमधून अंतःपुरात एका रात्रीसाठीं पोंचत्या करीत. परंतु मेणा-पालखी न पाठविणं याचा अर्थ—सर्वनाश ! आवडलेली तरुणी तशीच अंतःपुरात ठेवून घेण्यात येत असे—राणी म्हणून नव्हे, परिचारिका म्हणून ! राणी बनण्याचं सौभाग्य फक्त राजकन्या व सामन्तकन्या यानाच लाभत असे. अंतःपुरांतल्या या तरुणींपैकी हजारों अशा होत्या कीं त्यांना केवळ एकच दिवस राजा किंवा सामंत याच्या समागमाचा लाभ झाला. सांगा, त्याचं यौवन त्याच्याजवळ कोणती मागणी करीत असेल बरं ? माझ्या अभिनेत्री अधिकतर याच अंतःपुरातून येत असत, मात्र पळून नव्हे हो ! सांगतो हे चांगलं असो की वाईट, पण राजे आणि सामन्त याना लाब लाब गोष्टी सांगून त्याच्यावर स्वतःची छाप पाडण्यांत मी निपुण होतो. मात्र राजकारणाच्या बाबतींत नव्हे; त्या बाबीचा मी कधीच विचार केला नाही. राजांनी आणि राजसामंतानीं मला शेकडों प्रशस्तिपत्रकं दिलेली आहेत, यावरून माझ्या त्यांच्यावरच्या वजनाची साक्ष पटेल. ज्या ज्या वेळीं ते कलेची प्रशंसा करीत, त्या त्या वेळीं मी कलावंताचं रडगाणं गाऊं लागे—" देव, काय बोलावं, कलावंत तरुणी असून देखील मिळत नाहीत. "

" अस्सं ? असून मिळत नाहींत ? "

" होय देव ! जिथं एक दिवसाच्या चुंबनालिंगनानंतर किंवा सहशय्येनंतर लक्षावधि तरुणी अंतःपुरांत बंदिस्त केलेल्या असतात, तिथं कलावंत स्त्रिया मिळाव्यात तरी कशा ? "

"आपलं म्हणणं खरं आहे आचार्य ! मला जाणीव आहे त्याची. पण एकवेळ अंतःपुरांत ठेवून घेतलेल्या स्त्रियाना आम्हीं काढून तरी कसं लावावं ?"

मग मी त्यांना उपाय सुचवीत असे. आज आमच्या राजकन्या, सामन्तकन्या आणि राजान्तःपुरिका याना नृत्यगायन शिकणं तर अनिवार्य होऊन बसलेलं आहे. जणुं काय तें त्याना अन्नपाण्याप्रमाणं आवश्यक वाटूं लागलंय. मी आपल्या जवळच्या चतुर नारी अंतःपुरांत पाठवायचा आणि राजा आपल्या अंतःपुरिका त्यांच्याजवळ

कला-शिक्षणासाठीं पाठवीत असे. ज्यांना ज्यांना आम्हीं आमच्या मंडळींत घेण्यासाठीं निवडत असूं, त्यांना त्याना अंतःपुरातले कष्ट आणि कलावंनाच्या जीवनातला आनंद यांची जाणीव करून देत असूं. त्यांना हेहि सागण्यात येई की "इथल्या राजानं आमच्या मंडळीतल्या एका निपुण नटीला आपल्या अंत पुरात जसं गौरवाचं स्थान दिलं, तसंच पुढं मागं तुम्हाला देखील मिळविण्याची संधि आहे."-इतकं सागितल्यावर अनेक तरुणी यावयास तयार होत, अर्थात आम्ही मात्र त्यांतल्या योग्यतम असतील त्यांनाच निवडत असूं. राजांनीं आपल्या आयुष्यांतल्या केवळ एकेका समागमासाठी जिथं हजारों तरुणी कोंडून ठेवलेल्या आहेत, तिथं अंतःपुरांत पुरुषाचा प्रवेश न होऊं देण्याच्या कडक बंदोबस्ताचा फारसा उपयोग होत नसे वृद्ध कंचुकी ब्राह्मण त्या तरुणीना यौवनाचा आनंद लुटण्याच्या बाबत अटकाव करायला असमर्थ होते.

विधवाच्या सती जाण्याला मी विरोध करूं लागलो तेव्हा पाखंड्यानी खूपच गवगवा केला हे पाखंडी म्हणजे ब्राह्मण आणि राजे—याच्याहून अधिक पाखंडी असूं तरी शकतात का कुणी ? ते म्हणूं लागले-" हा गर्भहत्या आणि विधवा विवाह याचा प्रसार करूं पाहत आहे."- मला गर्भहत्या मुळींच आवडत नाही परंतु विधवा-विवाह मात्र व्हावेत असं मला वाटतं—अगदी निस्संकोचपणानं सांगतो हें मी. गुप्तांच्या शासनकालापासून आपला जुना धर्म कुठच्याकुठं वाहवत गेला! जिथं आमचे श्रोत्रिय वासराच्या मासाशिवाय कुणाचं कसलंहि आतिथ्य स्वीकारायला तयार होत नसत, तिथंच आतां गोमांस भक्षण धर्मविरुद्ध मानण्यात येऊं लागलेलं आहे. जिथं आमचे ऋषि विधवांच्यासाठी देवर—दुसरा वर बिलकुल उचित समजत असत आणि कोणतीहि तरुण विधवा— मग ती ब्राह्मणी असो वा क्षत्रिया,— वर्षा सहामहिन्यापेक्षा अधिक काळ पतिशिवाय राहूं शकत नव्हती, तिथं तें आतां धर्मविघातक समजण्यात येऊं लागलं. या नव्या हिंदु धर्माच्या अवडंबराचं मूळ असलेल्या गुप्त राजवंशांतच रामगुप्ताची—विधवा नव्हे तर सधवा—स्त्री चंद्रगुप्त विक्रमादित्यानं आपली पट्टराणी केली होती. तरुण स्त्रीला विधवा ठेवण्यास ब्रह्मा, विष्णु, महेश्वर देखील समर्थ नाहीत. तसं ते सांगूं शकणार नाहींत तिला; आणि सागतील तरी कसे ? ते स्वतःच आपापल्या स्त्रिया असून देखील परक्या स्त्रियांच्या मागं लागायला लाजले नव्हते. तरुण स्त्रीला विधवा ठेवण्याचा आवश्यक परिणाम आहे गर्भपात, कारण मुलगा जन्माला आणून त्याचं पालनपोषण करणं म्हणजेच विधवाविवाहाला संमति देणं होय. आणि नेमकं हेंच नको असल्यामुळं त्याच्यापासून बचावण्यासाठी ब्राह्मणानी आणि सामन्तानी कुलीनता सिद्ध करण्यासाठी एक नवंच ढोंग काढलं. तें म्हणजे विधवेला जिवंत जाळणं. स्त्रीला अशा तऱ्हेने जिवंत जाळणं

ते महापाप समजत नसत, उलट महापुण्य वाटायचं त्यांना ते. दरवर्षी अशा प्रकारें लक्षावधि तरुणींचं बलात्कारानं अग्नींत हवन होत असलेलं पाहून ज्या देवतांच्या हृदयाला कणव येत नाहीं त्या वस्तुत. दगडाच्याच अगाव्यात, किंवा मुळी देवतांना अस्तित्वच नसावं. सांगण्यांत येत–' स्त्री आपखुषीनं सती जात्ये !' धूर्त ! पाखंडी ! नराधम ! इतकं खोटं बोलूं शकतात हे ! या राजाच्या अंतःपुरांत केवळ एकदांच स्पर्शाचा अनुभव मिळालेल्या किती तरी स्त्रिया आहेत.–त्यांना तुम्हीं सती बनवून अग्नींत जाळून मारणार काय ?--आणि कुणासाठी ? ज्या नरपशूनं त्यांना जन्माच्या बंदिवासांत ठेवलं त्याच्यावर त्याचं प्रेम असणं शक्य तरी आहे का ? वियोगाच्या वेड्या आवेशात चितेत उडी घेतल्याचीं उदाहरणं क्वचित आढळतात देखील, नाही असं नाहीं, पण ही वेडाची लहर चारदोन दिवसानंतर ओसरण्याजोगी असते. आत्महत्येचा धर्म ! सत्यानाश होवो तुम्हा पाखंडी पुरोहिताचा आणि राजांचा ! प्रयागांतल्या त्या अक्षयवटावरून यमुनेत उडी घेऊन मरणं यानी धर्ममार्ग ठरविला. यामुळं हजारो वेडे दरवर्षी मरून 'स्वर्ग' मिळवूं पाहतात. केदारखंडांतल्या सत्पथांत जाऊन बर्फात मरणं यानी धर्म ठरविला, त्यामुळं दरवर्षी शेंकडों प्राणी सत्पथाच्या मार्गानं स्वर्गात जाऊन पोचतात ! मी या सगळयाच आत्महत्त्याच्या विरुद्ध आरोळी ठोकूं शकत नव्हतो, कारण मला राजाचा आश्रित म्हणून या ब्राह्मणातच रहायचं होतं.

राजाचा आश्रित म्हणून रहातो खरा, पण हा आश्रय जाणून बुजून घेतलेला नव्हता. माझी स्वत.चीच इतकी संपत्ति होती की मी एक संयत भोगपूर्ण आयुष्य जगूं शकलो असतो. आपल्या काळच्या धर्मध्वजी राजा-ब्राह्मणापेक्षा मी अधिक संयम पाळलेला होता. हर्ष आणि इतर राजर्षी यांच्याप्रमाणं मी लक्षचुंबी ( लक्ष सुंदरीचा उपभोग घेणारा ) होण्याची पैज मारलेली नव्हती. फार तर शंभर तरुणींच्या बरोबर माझा या नाही त्या काळीं प्रेमसंबंध आलेला असेल. परंतु माझं घर, माझी धन-संपत्ति–सगळ काही हर्षाच्या राज्यांत होतं. त्यामुळं जेव्हा त्याचे दूतापाठी दूत येऊं लागले तेव्हां मला त्याच्या दरबारांत जाण्याबद्दल नकार देता तरी आला असता का ? मात्र, मी अश्वघोष असतो तर घरादाराची फिकीर केली नसती, ना हर्षाची पर्वा !

हर्षाच्या बाबतींत आपण माझं मत विचारलं तर मी सांगेन कीं तो कांही आपल्या काळांतला वाईट मनुष्य किंवा वाईट राजा नव्हता. त्याचं आपला भाऊ राज्यवर्धन याच्यावर खूप प्रेम होतं, आमच्या धर्मनायकांनी जर भावाकरतां सती जाण्याचं विधान सांगितलं असतं, नव्हे नुसता तसा संकेत जरी केला असता, तर त्यानं तसं करायला मागं पुढं पाहिलं नसतं. असं असलं तरी त्याच्यांत दोषहि पण होते.

सर्वांत मोठा दोष असा कीं आपली प्रशंसा आवडत असून देखील तिच्या बाबतींत अगदीं नि:स्पृह असल्याचा आव आणायचा तो. सुंदर स्त्रियांबद्दल मनांत कामना असून देखील स्वतः कामनारहित असल्याचा देखावा करायचा. कीर्तीची इच्छा असून कीर्तीपासून आपण लाब पळून जात आहोंत असं भासवायचा. हर्षाला विचारल्याशिवायच आपली नाटकं मी 'हर्ष निपुण कवि' या नावानं कां प्रसिद्ध केली हें सांगितलंच आहे. परंतु पुढं परिचय झाल्यावर आणि रात्रंदिवस एकत्र बैठकीत आल्यावर देखील त्यानं असं कधीहि म्हटलं नाहीं कीं "बाणा, आतां हीं नाटकं तूं आपल्या नावानं प्रसिद्ध कर." किती सहज होतं हें! फक्त एकदांच आपल्या आधीन असलेल्या सामन्त दरबारांत "श्री हर्षो निपुणः कविः"च्या ऐवजी "श्री बाणो निपुणः कविः" असे शब्द घालून त्या नाटकांचे प्रयोग केले असते कीं झालं!

जग जसं आहे तसंच चित्रित करण्याची मला मोठी लालसा होती. माझ्या आयुष्याचीं बारा वर्षं जर मी देशपर्यटनांत घालवलीं नसतीं तर कदाचित अशी इच्छा नसती झाली मला; आणि झालीहि असती तर ती पार पाडतां आली नसती. मी अच्छोद सरोवराचं वर्णन केलं ना, तेव्हां हिमालयाच्या तराई मधली एक सुंदर भूमि माझ्या नजरेपुढं होती. कादम्बरी भवनाचं वर्णन करतांना माझ्यापुढं हिमालयांतलं एक दृश्य होतं. विंध्याटवी मध्ये आपल्या एका पाहिलेल्या जागी मी जरद् द्रविड धार्मिकाला बसवलं. पण अशा चित्रणावरच मी माझ्या लेखणीला विराम द्यायला तयार नव्हतो. मी हर्ष किंवा दुसरे परिचित राजे यांच्या राजप्रासादाचं, अंतःपुराचं, त्यांच्या लक्ष्मीचं वर्णन माझ्या ग्रंथामधून केलेलं आहे; तरी पण त्याच राजवाड्यामुळं आणि अंतःपुरांमुळं ज्याना केवळ वेदनापूर्ण व्यथित अवस्थेंत जीवन घालवावं लागतं त्या गरीबाच्या झोपड्याचं वर्णन मी करूं शकलो नाही. जर त्या झोपड्यांचं चित्रण मी करूं शकलो असतो तर या साऱ्या राजप्रासादांवर आणि राजविलासांवर येवढा काळाकुट्ट कलंक मी फांसला असता कीं मग दर पांचव्या वर्षी प्रयागांत आपला राजकोष–नव्हे, आपला अतिरिक्त कोष–वाटणारा हर्ष मला केवळ भुजंगाचीच पदवी देऊन संतुष्ट झाला नसता.

– ३ –

कटु सत्य बोलण्याची संवय जडलेली आहे मला, म्हणूनच लोक मला दुर्मुख म्हणतात. आमच्या काळात आणखीहि लोक कटु सत्य सागणारे जेव्हां तेव्हा आढळतात, पण ते वेड्याचं सोंग आणतात आणि त्यामुळं लोक त्यांना खरंच वेडे मानतात. अशा कित्येकांना श्री-पर्वताहून आलेले अद्‌भुत सिद्ध देखील मानण्यांत येतं. मी देखील श्रीपर्वताहून आलेला खास सिद्ध बनूं शकत होतो; मग मला कुणी दुर्मुख

म्हटलंही नसतं. पण ही लोकवंचना मला मान्य नाहीं. लोकवंचनेच्या भीती-मुळंच मी नालंदा सोडून निघालों, नाहीं तर मी देखील तिथल्या पंडित–महापंडितां-पैकीं एक झालो असतो. तिथं राहून मी एका व्यक्तीला अंध.काराच्या राशीवर विस्तव फेकतांना पाहिलं, आणि त्या व्यक्तीचा त्याच्या आप्तपरकीयानी कसा पिच्छा पुरवला हेहि मी पाहेल त्या व्यक्ती बद्दल तुमची जिज्ञासा जागृत होणं साहजिक आहे. हजारों पुरुषरूपी मेंढयांच्या कळपांत एकटा एकच पुरुषसिंह असलेला श्रेष्ठ तार्किक धर्मकीर्ति होता तो. नालन्दा मध्येंच त्यानं डंक्यावर टिपरी मारुन ललकारलं होतं–" बुद्धीपेक्षा वेदांना श्रेष्ठ मानणं, जगताचा कर्ता धर्ता परमेश्वर आहे असं मानणं, स्नान केल्यानं धर्म घडतो अशी इच्छा असणं, जातिवंशाचा अभिमान धरणं, आणि पापनाशनार्थ शरीरक्लेश देणं, ही पाच लक्षणं अक्कल गहाण टाकलेल्या जडांचीं आहेत. "*

मी धर्मकीर्तींना म्हणालो, " आचार्य, आपलं शस्त्र तिखट असलं तरी इतकं सूक्ष्म आहे कीं तें मुळीं लोकाच्या नजरेलाच पडायचं नाहीं. "

धर्मकीर्ति म्हणाले, " मला माझ्या या शस्त्राची कमजोरी कळत नाही असं नाही. मला ज्याचा विध्वंस करायचा आहे त्याच्यासाठी मला स्वतःला कवच न घालतां सर्वांना दिसूं शकणारी प्रचंड आयुधं वापरावी लागतील. नालंदा मधले स्थविर-महास्थविर (संतमहंत) तर आता पासूनच माझ्यावर नाराज होऊं लागले आहेत. नालंदा हे एक थोतांड आहे, असं जर मी सांगूं लागलों तर मला एक तरी विद्यार्थी मिळणं शक्य आहे का ? नालंदांत येणारे विद्यार्थी केव्हाहि विशाल जगाचं आलोचन करूं शकत नाहीत, आणि ते आपल्याला मिळेल तेवढया ज्ञानतेजानं अल्पज्ञ आणि अज्ञ असलेल्यांचे डोळे दिपवून टाकतात. ज्यांना शीलादित्यानं बहाल केलेल्या गांवांतून सुगंधित तांदूळ, तूप, खजूर इत्यादि खायला मिळतं ते शीलादित्याच्या विलास भोगासाठी स्वतः पिळून निघणाऱ्या प्रजेला बंड उभारण्याचा संदेश देऊं शकतील का ? "

" मग या आंधळया अंधःकारांतून बाहेर पडण्याचा एखादा मार्ग आपल्याला तरी सुचतो का आचार्य ? "

" मार्ग ? प्रत्येक रोगावर औषध असतं, प्रत्येक संकटांतून सुटका होऊं शकते. परंतु या अंधाऱ्या रात्रीतून बाहेर पडायला मार्ग–या वैतरणीपार व्हायचा सेतु–

---

* वेदप्रामाण्यं कस्यचित् कर्तृवादः स्नाने धर्मेच्छा जातिवादावलेपः ।
सन्तापारम्भः पापहानाय चेति ध्वस्तप्रज्ञानां पंचलिंगानि जाड्ये ॥–प्रमाणवार्तिक

एका पिढींत तयार होऊं शकत नाहीं. कारण तो सेतु बांधणाऱ्यांचे हात मोजकेच आहेत आणि तिकडं तर अंधाराचं बळ फारच भारी पडतं."

"तर मग हताश होऊन स्वस्थ बसावं म्हणतां?"

"होय, स्वस्थ बसणं हे लोकांची वंचना करण्यापेक्षां किती तरी चांगलं! तूं बघतोस ना, ज्यांनीं मार्गदर्शक व्हायचं वास्तविक, तेच किती लोकवंचना करतात ते! आणि ही अवस्था काय केवळ एकाच देशाची आहे? सारं जग या भोंवऱ्यांत सांपडलेलं दिसतं. सिंहल, सुवर्णद्वीप, यवद्वीप, कंबोजद्वीप, चंपाद्वीप, चीन, तुषार, पारस्य या साऱ्या देशांतले विद्वान विद्यार्थी आमच्या नालंदांत आहेत. आहेत ना? पण त्यांच्याशीं बोलावं म्हणजे वाटतं, लोक किती आंधळे झाले आहेत! -- धिग व्यापकं तम." !

धर्मकीर्तीनं सहस्रावधि वर्षे पेटत रहाणारे शब्दांचे निखारे फेकून हा निशान्धःकार दूर करण्याचा प्रयत्न केला परंतु त्याचा तात्काळ कोणताहि परिणाम झालेला मला दिसून आलेला नाही. मी जळत्या मशाली (दीपयष्टि) फेकण्याचा निश्चय केला. परिणाम झाला मला दुर्मुख बनविण्यांत. इथं मी आणखी एक सांगून ठेवतों. मी राजसत्तेवर प्रहार करताना माझी जीभ चांगलीच सांभाळून ठेवली होती, नाहींतर दहा दिवसांच्या आतच या दुर्मुखाच्या मुसक्या बांधण्यांत आल्या असत्या. कधीं कधी मी सत्ताधाऱ्यांना चकवून मी कुठल्या कुठं भटकून येत असतों.

तुम्ही मरणोत्तर मुक्ति आणि निर्वाण देण्याचं आमिष दाखवितां आणि प्रत्यक्ष लक्षावधि दास पशुप्रमाणं दावणीत बांधून विकण्यांत येतात, त्यांना मात्र मुक्त करण्याचे प्रयत्न होत नाहीत. का होत नाहीत? याचा अर्थ तरी काय समजायचा मग? एके वेळी प्रयागच्या मेळ्याच्या वेळी मी राजा शीलादित्याला विचारला हा प्रश्न— "महाराज, तुम्ही मोठमोठ्या विहारांना आणि ब्राह्मणांना दर पांचव्या वर्षी इतकं धन वांटतां, त्याचा विनियोग दासदासींना मुक्त करण्यांत केलांत, तर काय आपल्याला कमी पुण्य लाभेल?"

शीलादित्यानं तेव्हां वेळ मारून नेतांना सांगितलं, "याचं उत्तर देईन मग दुसऱ्या वेळीं." पण ती दुसरी वेळ मी आणलीच त्याच्यावर. राजाची बहीण भिक्षुणी राज्यश्री हिनंच जबरीनं ती वेळ आणली म्हणानात – मी राज्यश्री पुढं दासदासींना भोगाव्या लागणाऱ्या नरकयातनांचं शब्दचित्र काढतांच, तिच्या अंतःकरणाला पाझर फुटला. पिढ्यानुपिढ्या नित्यकाल दास्यांत असलेल्या या बंदी मानवांना मुक्तिप्रदान करण्यासाठी धन देणं हे सर्वश्रेष्ठ पुण्य आहे असं मी सांगतांच तिला तें पटलं. त्या बिचाऱ्या सरळ अंतःकरणाच्या स्त्रीला दासतेच्या पाठीमागं दडलेल्या मोठमोठ्या स्वार्थांची कल्पना ती कशी येणार? ज्या दिवशीं या धरणीचा

स्वर्ग होईल त्या दिवशींच आकाशांतला स्वर्ग कोसळून पडेल याची जाणीव तिला कुठं होती ? आकाश-पाताळ, स्वर्ग-नरक, या कल्पनांचा पगडा कायम ठेवण्यासाठी, त्यांच्या नांवावर स्वार्थाचा व्यापार करण्यासाठी, या पृथ्वीवरील स्वर्ग-नरक, राव-रंक, स्वामी-दास यांचं अस्तित्व टिकवणं आवश्यक होतं.

राजा माझ्याशी एकांतांत बोलला. त्यानं पहिल्यानं सांगितलं तें असं--" एक वेळ वाटल्यास मी खूपसं धन खर्च करून या दासांना मुक्त करूं शकेन, पण पुन्हां ते आपल्या गरीबीमुळं विकल्या जातील, त्याचं काय ? "

" यापुढं माणसाचा क्रयविक्रय दंडनीय ठरविला कीं झालं ! "

यावर राजा कांहींच बोलला नाहीं. तो स्वत:शीच विचार करूं लागला. मी त्याला " नागानन्दां "तल्या नागाचा दृष्टांत दिला; त्यानं इतरांचे प्राण वांचविण्यासाठी स्वत:च्या प्राणांचा बळि देऊं केला होता. " नागानन्द " नाटक हर्षानंच लिहिलेलं आहे असा प्रवाद आहे, मग तो कसलं यावर उत्तर देणार ? शेवटी असं समजलं की दासदासीना मुक्त करण्यांत त्याला काहीं फारशी कीर्ति मिळण्याची आशा नव्हती; याच्या उलट ब्राह्मणा-श्रमणांच्या झोळ्या भरून आणि मोठमोठालीं मठ-मंदिरं बांधून त्याला कीर्ति मिळत होती. त्या दिवशी मला समजलं कीं हा राजा ' शीलादित्य ' नसून ' शीलान्धकार ' आहे.

पण मी बिचाऱ्या शीलादित्यालाच काय म्हणून दोष देऊं ? एकमेकांची वंचना करणं हेच मुळी आजकाल कुलीन नागरिक होण्याचं लक्षण आहे. जुन्या बौद्ध ग्रथांतील बुद्धकालीन रीतिरिवाज वाचून मला कळलं की पूर्वी मद्य पिणं हें पाणी पिण्याइतकंच विहित मानीत, एखाद्या उपवासाच्या व्रताच्या वेळीं मात्र पीत नसत. आजकाल ब्राह्मण मद्यपानाचा निषेध करतात आणि उघड उघड मद्य पिणं म्हणजे एक आपत्तीच ओढवून घेणं होय स्वत:वर: पण याचा परिणाम काय झाला ? देवतांच्या आणि सिद्धिसाधनेच्या नांवावर चोरून लपून भैरवीचक्रं सुरू आहेत. ब्रह्मचर्याचं खूप स्तोम माजवण्यात येत आहे पण परिणाम म्हणाल तर त्या भैरवी चक्रांत सर्वच स्त्रिया—स्वत:च्या असोत की परक्या असोत—उपभोग्य आहेत; इतकंच नव्हे तर तिथं देवतेच्या वरदानाच्या नांवावर आई, बहीण, मुलगी या देखाल उपभोग्य ठरलेल्या आहेत. आणि इकडे पारिव्राजकांचे व भिक्षूंचे मठ अनैसर्गिक व्यभिचाराचे अड्डे बनलेले आहेत. खरोखरच या जगांत कुणी ऐकून घेणारा आणि प्रत्यक्ष बघणारा असता तर त्यानं ही वंचना, हें अंधारगाडगं एक क्षणभर देखील सहन करून घेतलं नसतं.

एकदां मी कामरूपला गेलों. तिथला राजा नालन्दाबद्दल आस्था बाळगणारा असून त्याची महायानावर असीम श्रद्धा होती. मी म्हटलं, " महायानी बोधिसत्त्वाचं

व्रत मानतात ना? मग त्या व्रतांत तर असं सांगितलेलं आहे कीं जोंवर एखादा देखील प्राणी बंधनांत अडकलेला असेल तोंपर्यंत व्रती निर्वाण धिःकारील. महाराज, आपल्या राज्यात इतके चांडाळ आहेत. आपल्या स्पर्शाचा लोकांना विटाळ होऊं नये यासाठी त्यांना सावध करायला हे चांडाळ नगरांत आले कीं हातांतला आपला सोटा आपटत चालतात. आपली अपवित्र थुंकी नगरांतल्या पावन भूमीवर पडूं नये म्हणून ते थुंकायला हातांत एक भांड वागवतात. कुत्र्याच्या शिवण्यानं माणूस विटाळत नाही, त्याच्या विष्ठेनं नगर चिरदूषित होत नाहीं, याचा अर्थ चांडाळ कुत्र्याहूनही निपटारा आहे असा समजायचा का?"

'नाहीं, कुत्र्याहून निपटारा नाहीं तो. त्याच्यांत देखील असे अंकुर आहेत, असा जीवनप्रवाह आहे की पुढं मागं विकासाच्या योगानं त्याचा साक्षात् बुद्ध होऊं शकेल."

"मग आपण असं कां करीत नाहीं? राज्यांत दवंडी देऊन हुकूम सोडा कीं आजपासून नगरात येतांना कुणाही चांडाळाला सोटा किंवा थुंकण्याचं भांडं आणण्याची आवश्यकता नाहीं."

"नाहीं: तसं करणं माझ्या आवांक्याबाहेरचं आहे."

"आवांक्याबाहेरचं? कां बरं?"

"चाललंय ते धर्मव्यवस्थेचं एक रूढ अंग आहे."

"बोधिसत्त्वांच्या धर्माची–महायानाची–ही धर्मव्यवस्था?"

"नाहीं; पण इथली प्रजा काहीं महायानाला मानीत नाही."

"मी तर गांवात, पुरात, सर्वत्र त्रिरत्नाचा जयघोष ऐकत असतों."

"केवळ शाब्दिक घोष आहेत हे. उद्यां मी चांडाळावरचे निर्बंध उठविण्याची घोषणा केली कीं माझे प्रतिस्पर्धी याच लोकाना बहकावून माझ्या विरुद्ध वादळ उठवतील. म्हणतील–हा सनातन काळांपासून चालत आलेला धर्माचा सेतु तोडूं पाहतो."

"तर काय बोधिसत्त्वाच्या जिवनाचं महात्म्य सांगतांना जो उपदेश रात्रंदिवस करण्यांत येतो, त्याचा प्रभाव कुणावरच पडत नाही? मला असं वाटतं, महाराज, कीं या उपदेशाचा थोडा फार परिणाम झालेला असेलच. आपण जर बोधिसत्त्वाप्रमाणं आपलं सर्वस्व त्यागायला सिद्ध झालांत तर आपल्या पाठीमागं येणारे होतीलच कांहींजण तयार!"

"राज्यांतल्या लोकांचा प्रश्न नाहीं हा! आपले परम भट्टारक देव यामुळं नाराज होतील."

" शीलादित्य हर्ष होय? त्यांनींच 'नागानन्द' नाटकांत बोधिसत्त्वाच्या जीवनाचं भव्य चरित्र चित्रण केलेलं आहे."

" म्हणून काय झालं? चालत आलेली रूढी तोडणं हे कुणाच्याही हातीं नाहीं."

" असंच तथागतांना वाटलं असतं तर? आर्य अश्वघोषाना असंच वाटलं होतं का? आर्य नागार्जुनानी याचा विचारच केला नव्हता?"

" पण रूढीची बंधनं ते किती तोडूं शकले? त्याच्यांत साहस होतं, तरी ते किती पुढं जाऊं शकले?"

" नका जाऊं फार पुढं, पण जरासे तर पुढं सराल! महाराज, तुम्ही जरासे पुढं गेलांत की पुढचीं पिढी आणखी पुढं सरकेल!"

" तर काय तुम्हाला माझ्या भेकडपणाचा कबुली जबाब माझ्या तोंडून वदवून घ्यायचा आहे वाटतं?"

" भेकडपणाचा नव्हे पण हा धर्म म्हणजे एक मोठं अवडंबर आणि ढोंग आहे याचा! आहे ना असं?"

" माझ्या अंत.करणाला विचाराल तर उत्तर मिळेल, "होय". पण जर माझ्या जिभेला विचारलंत तर ती साफ "नाहीं" असं सांगेल. नाहीतर उत्तर न देतां मुकी होईल ती!'

ब्राह्मणाच्या धर्माचा मला अतीव तिटकारा वाटतो. वस्तुतः कामरूपच्या राजाप्रमाणं किती तरी हाडाच्या सज्जनांना या ब्राह्मणधर्मानं भेकड बनवलेलं आहे. ज्या दिवशीं हा धर्म या देशांतून नष्ट होईल त्या दिवशी पृथ्वीवरचा एक भारी कलंक नाहींसा होईल. नालंदाला आलेल्या विदेशी भिक्षूंकडून ऐकलं की त्यांच्या देशांत आमच्या ब्राह्मणाप्रमाणं कोणतीहि सर्वशक्तिमान धर्मनायक जाति नाहीं. त्यांच्या देशांत सोटे आणि थुंकीपात्र घेऊन चालणारे चांडाल कां नाहीत याचा उलगडाहि मला या सांगण्यावरूनच झाला. आमच्या देशांमधील माणसांची विभागणी ब्राह्मणानीं अशा रीतीनं लहानमोठ्या जातीमध्यें केली कीं कोणी देखील आपल्या पेक्षां हीन जातीला आपल्यांत मिसळून घ्यावयाला तयार नाहीं. यांचा धर्म आणि याचं ज्ञान म्हणजे जणुं काय राहूकेतूंच्या छायाच!

नालन्दामध्ये देशदेशांतरींच्या नानाप्रकारच्या बातम्या ऐकायला मिळत असत म्हणून मी वर्षा दोन वर्षाच्या पर्यटनानंतर सहा महिन्यासाठीं नालंदाला परत येत असतों. एकदां एका पारसीक भिक्षूनं सांगितलं, की त्यांच्या देशांत मज्दक नांवाचा एक विद्वान थोड्याच काळापूर्वी होऊन गेला. त्यानं एक प्रकारच्या संघवादाचा प्रचार केला होता. बुद्धानं देखील भिक्षु-भिक्षुणींच्यासाठी एकातऱ्हेच्या संघवादाचा–संपत्तीपुरत्याच मर्यादित संघवादाचा–आदेश दिलेला होता.

पण आज तो संघवाद फक्त विनयपिटकमध्येंच काय तो वाचायला म्हणून शिल्लक उरलेला आहे. आज तर अवाढव्य वैयाक्तिक (पौद्गलिक) संपत्ति बाळगणारे भिक्षु-देखील आहेत. आचार्य मज्दक ब्रह्मचर्य आणि भिक्षुवाद यांना मानीत नव्हता. प्रेमी प्रेमिका आणि पुत्रपौत्र यांनीं संपन्न असलेल्या मानवांच्या प्राकृत जीवनाला त्याची मान्यता होती. त्याच्यामतें साऱ्या वाईटपणांचं मूळ "मी" आणि "माझं" यांतच आहे. त्यानं सांगितलेलं आहे, "संपत्तीची वांटणी होतां कामा नये. सर्वांनीं मिळून धन मिळवावं, सर्वांनी मिळून त्याचा उपभोग घ्यावा. पति-पत्नी ही जोडीजोडीनें वेगवेगळी राहतां कामा नयेत. प्रेम स्वेच्छेवर अवलंबून असलं पाहिजे संतानं सर्वांची सामायिक मानलीं जावीत." तो स्वतः भूतदया आणि संयम याचा उपदेश देत असे. त्याचे विचार आवडले मला—सुंदर होते ते. पण मग मला समजलं की एक पारसीक राजा नौशेरवाँ यानं मज्दक व त्याचे लक्षावधि अनुयायी यांना ठार मारून स्वतःला न्यायमूर्ति ही पदवी लावून घेतली. हे असं ऐकलं आणि मग मला कळून चुकलं की जोपर्यंत राजा आहे, आणि जोपर्यंत धर्म व त्याचं दानपुण्य याच्या-वर जगणारे श्रमण नि ब्राह्मण आहेत, तोपर्यंत या पृथ्वीचा स्वर्ग बनणं अशक्य आहे, अशक्य आहे.

---

# १४ — चक्रपाणि

( काळ-इ स. १२०० )

कनोज हें त्यावेळीं भारतांतले सर्वांत मोठें आणि समृद्ध नगर होतें. त्यांतले बाजारहाट नि चौरस्ते अतिशय शोभिवंत दिसत. इथली मिठाई, सुगंधी तेलें, पान, आभूषणें आणिक अशाच कित्येक वस्तूंबद्दल या शहराची ख्याति साऱ्या भारतांत पसरलेली होती. सहाशें वर्षांपासून मोखरि, बैस, प्रतिहार, गहरवार याच्यासारख्या आपापल्या काळातल्या सर्वश्रेष्ठ राजवंशाची राजधानी होण्याचें भाग्य याच शहराला लाभल्यामुळे लोकांच्या मनांत त्याच्या विषयीं एक प्रकारचा श्रद्धाभाव निर्माण झालेला होता. इतकेच नव्हे तर या शहराचें नांव काही जातींनी आपल्या नांवाशी निगडित केलेले होते. म्हणूनच आज ब्राह्मण, अहीर, कांदू इत्यादि जातींमध्यें कान्यकुब्ज ब्राह्मण, कान्यकुब्ज अहीर असे पोटभेद आढळतात. हिंदुधर्माच्या नावामुळे लोकाच्या मनांत जसा एक प्रकारचा आदरभाव निर्माण व्हावा तसाच त्या वेळीं कान्यकुब्ज ( कनोज ) या नांवामुळे होत असे. हर्षवर्धनाच्या काळापासून आतांपर्यंत जगात इतरत्र कितीतरी परिवर्तन घडून आले होते; पण तेव्हांपासून आतांपर्यंत भारतीयांच्या वृत्तीत कूपमंडूकता मात्र भारीच येऊन राहिलेली होती.

हर्षवर्धनाच्या काळीच अरबस्तानांत एका नव्या धर्माची-इस्लामची-स्थापना झाली होती. त्यावेळी कुणाला असे वाटले तरी होते का कीं तो आपल्या संस्थापकाच्या मृत्यूनंतर ( इ. स. ६२२ ) शंभर वर्षांच्या आंतच सिंधापासून स्पेन पर्यंत फैलावेल म्हणून ! जातींच्या आणि राजांच्या नांवावर दिग्विजय करण्याच्या गोष्टी आतांपर्यंत कानी येत होत्या; आतां धर्माच्या नांवावर विजययात्रा करण्यांत आल्याचें मात्र अगदीं पहिल्यांदाच ऐकू आलें. त्याने आपल्या मावजांना मावध होऊं दिलेंच नाही; लागलींच नरडे धरलें आणि दाबलें. ससानि ( इराणी ) लोकांचें बलाढ्य साम्राज्य पाहतां पाहता अरबाच्या स्पर्शासरशीं कागदाच्या नावेप्रमाणे पालथें झालें, बुडाले; आणि इस्लामसंस्थापकाच्या मृत्यूनंतर दोन शतके होतात न होतात तोच इस्लामी राज्याची ध्वजा पामीरच्या पठारावर फडकूं लागली.

आधी इस्लामने साऱ्या जगाला आपल्या अरबी कबिल्याचें विस्तृत स्वरूप देण्याचा विचार केला आणि त्याचबरोबर कबिल्याला (टोळीला) आवश्यक असें

स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव हे आपल्या अनुयायांच्या अंगीं रुजवण्याचा संकल्प त्यानें केला. अशा अवस्थेमधून वैदिक आर्यांचे पूर्वज तीन हजार वर्षे आधीं गेलेलेच होते. गेलेले युग पुन्हां परत येणे असंभव असतें. इस्लामचा संबंध टोळ्यां-टोळ्यांनीं रहाणाऱ्यांच्या पुढच्या अवस्थेत असणाऱ्या सामंतशाही मुलुखांबरोबर आला. त्याच्या तरवारीपुढे जरी त्या मुलुखाचे राजकीय स्वातंत्र्य नामशेष झालें तरी पण त्याच्या संपर्कामुळे इस्लामी समाजाचें देखील कबिलेपणाचे स्वरूप नष्ट झाले. इस्लामच्या मुख्य शासकाला किती तरी काळ केवळ पैगंबराचा खलीफा–उत्तराधिकारी–म्हणत असत, पण वस्तुतः तो सुलतान–निरंकुश राजा–होता. परंतु आतां तर सुलतान म्हणवून घेणारेच अनेकजण पुढे आले होते; त्यांच्या लेखीं इस्लामचे पवित्र कबिले, त्याचे स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव यांना कांहीच किंमत राहिलेली नव्हती. तरी पण त्यांना गरज होती नवे मुलूख जिंकण्यासाठीं तलवार चालवणाऱ्या सैनिकांची. ही तरवार देखील आतां आरबी नव्हती; दुसरीच होती ती. या सैनिकांना सुलतानांच्या नावावर लढण्यासाठी तितकेसे उत्साहित करतां येत नव्हते म्हणून स्वर्गातल्या सुखाच्या प्रलोभनाबरोबरच त्याना पृथ्वीवरील सुखांत देखील हिस्सा देऊं करण्यांत आला. लुटीचा माल आणि तातार कैदी यांच्यावर त्याची मालकी राही; जिंकून घेतलेल्या नव्या भूमीवर वसण्यांत त्यांचें स्वत्व असे; आपल्यावर जुलूम करणाऱ्या जुन्या जुन्या सत्ताधाऱ्यांच्या व स्वामींच्या तावडीतून मुक्त होण्याचा, तसेच या स्वामींना कायमचे नेस्तनाबूद करण्याचा देखील त्यांना हक्क होता. विजेत्याच्या निशाणांबद्दल आपलेपणा दाखवून त्यांच्यासाठी लढायला पुढे सरसावणारे इतके सैनिक पराजितांतून याच्यापूर्वी कधींही कुणालाहि मिळाले नव्हते. अशी ही सेना की जी आमच्यांतूनच स्वतःसाठीं लढणारी सेना तयार करूं शकत होती–अशा सेनेशी झुंज देणें तितकेसें सोपें नव्हतें.

हर्षाच्या मृत्यूनंतर शंभर वर्षे देखील लोटलीं नव्हतीं तोच सिंध इस्लामच्या सत्तेखाली गेला. बनारस आणि सोमनाथ पर्यंत भारतामध्ये इस्लामी तरवारीने आपला प्रभाव दाखविलेला होता या नव्या संकटाचा प्रतिकार करण्यासाठीं कांहीं तरी नवा उपाय शोधून काढणें आवश्यक होतें, परंतु हिंदु आपल्या जुन्या चाकोरी बाहेर यायला कबूल नव्हते. जिथें साऱ्या देशाने लढाईत भाग घ्यायला हवा होता, तिथें मूठभर रजपूत (जुने क्षत्रिय आणि सोयरिकीने त्यांच्यांत सामील झालेले शक, यवन, गुर्जर इत्यादि) हेच केवळ भारताचे लढवय्ये सैनिक होते. त्यांना देखील बाहेरच्या शत्रूशीं लढण्याला फुरसत नव्हतीच, आणि राजवंशातल्या जुन्या नव्या वैरांमुळें शेवटपर्यंत देखील ते आपसांत एकजूट करायला तयार झाले नाहींत.

" महाराज, आपण चिंता करूं नये. सिद्ध गुरूंनीं अशी कांहीं साधना सुरू केलेली आहे कीं बघतां बघतां तुर्कांची सेना पाचोळया प्रमाणं उडून जाईल कुठच्या कुठं ! "

" गुरु मित्रपाद (जगन्मित्रानन्द) यांची माझ्यावर केवढी ही कृपा ! जेव्हां जेव्हां माझ्यावर, माझ्या परिवारावर एखादं संकट येई तेव्हा तेव्हा गुरु महाराज आपल्या दिव्य बळाच्या योगानं आमचं संरक्षण करायचे. "

" महाराज, या वेळी देखील सिद्ध गुरूंनी हिमालयाच्या पलीकडे असलेल्या भोट देशामधून कान्यकुब्जावर आलेलं संकट पाहिलं नि म्हणून पाठवलं मला आपल्याकडे ! "

" केवढी ही त्याची माझ्यावर कृपा ! "

" त्यानी सांगितलंय 'तारिणी (तारादेवी) महाराजाचं संरक्षण करील, तुर्कांची धास्ती बाळगण्याचं कारण नाही.' "

" होय ना ! ताराम‍ाईवर माझा पूर्ण भरवसा आहे. तारिणी ! आपच्छरण्ये ! माते ! म्लेच्छापासून संरक्षण कर आमचं ! "

वृद्ध महाराज जयचंद्र आपल्या इंद्रभुवनसमान राजमहालात एका कर्पूर-धवल मऊमऊ मसनदीवर बसलेले होते. त्याच्या दोन्ही बाजूला त्याना भिडूनच चार अतिशय सुंदर आणि तरुण अशा राण्या बसलेल्या होत्या. त्याच्या गौर मुखावर भ्रमराप्रमाणे शोभणारे काळे केस. त्याचे पाठमोरे बांधलेले बुचडे डोक्या एवढाले होते. त्यांच्या आंगावर असलेली आभूषणे-चूडामणि, कर्णफूल, अंगद, कंकण, हार, चंद्रहार, मुक्ताहार, कटिकिंकिणी, नूपुर इत्यादि अनेक प्रकारचीं सुवर्ण आणि रत्नमय आभूषणे, वजनात त्याच्या देहापेक्षा देखील अधिक जड भरतील इतकी होतीं. त्यानीं परिधान केलेल्या विरविरीत साड्या, आणि काचोळया–याचा हेतू शरीराचे गोपन करण्याचा नसून सुप्रकाशन करण्याचाच असावा असे वाटत होतें. काचोळींतून स्तनाचा उभार आणि अरुणिमा सुंदर तऱ्हेने प्रगट होत होता. त्याच्याखालीं नाभीपर्यंत सारें उदर अनाच्छादितच होतें. साड्या आणि पोटऱ्या यांचा आकार आणि रंग साडींतून झळकत होता. केसाला लावलेलीं सुगंधि तेले आणि वेणीतले जुईच्या उमलत्या कलिकाचे गजरे यांच्या सुवासाचा घमघमाट सगळ्या महालांत भरून राहिलेला होता. या राण्याच्या शिवाय आणिक पन्नासाच्या वर तरुण परिचारिका होत्या. कुणी चवऱ्या मोर्चेले, तर कुणी पंखे झाळत होत्या; कुणी तबकें घेऊन तर कुणी आरसे कंगवे घेऊन उभ्या होत्या; कुणाच्या हातीं सुगंधी पाण्याच्या झाऱ्या होत्या तर कुणाच्या हातीं कांचेचीं मदिराभाडीं आणि सोन्याचे पेले. कांही जणी

हातांत सर्पाच्या कांतिप्रमाणे शुभ्र निर्मळ "आंगपुसणीं" घेऊन तिष्ठत होत्या. कितीक मृदंग, मुरज, वीणा, वेणु इत्यादि अनेक प्रकारचीं वाद्यें घेऊन बसलेल्या होत्या तर कांहीं जणी हातीं सुवर्णमंडित दंड घेऊन उभी ताजीम देत एकाच जागीं नाहीं तर यत्रतत्र हिंडत होत्या. मित्रपादाचा शिष्य शुभाकर भिक्षु आणि राजा जयचंद्र यांच्या शिवाय त्या जागीं सर्वच नारीराज्य होतें, आणि ते देखील तारुण्यानें मुसमुसलेल्या सुंदरींचे !

भिक्षूनें महाराजांचा निरोप घेतला. राजा आणि त्याच्या राण्या यांनीं उभें होऊन अभिवादन केलें. तो गेल्यावर मग तेथें स्त्रीमय जग झालें. जयचंद्र वृद्ध होता. त्याचे अर्धे पांढुरके लांबसडक केंस मध्यभागीं भांग पाडून पाठीमागे द्विफाल-बद्ध केलेले होते. त्या केंसांची आणि त्याच्या लांब लांब मिशांची रचना अशा कांहीं पद्धतीनें केलेली होती, व त्याच्या अंगावरची वस्त्रें आभूषणे अशा विशिष्ट तऱ्हेनें घातलेलीं होतीं, कीं त्यावरून जयचंद्र यौवन हें अनसित-अविनाशी आहे असेंच समजत असावा असें कुणालाहि वाटावें. त्याच्या संकेतावरून एका परिचारिकेनें मद्याचा चषक भरला आणि अति नम्रतेनें लवून त्याच्यापुढें केला. राणीनें तो भरलेला पेला घेऊन महाराजांच्या हातीं दिला त्यांनीं तो राणीच्या ओठांना लावून म्हटलें, "राजल्ल (राजलक्ष्मी), माझ्या तारके, तूं उष्टावल्याशिवाय मला हें पिता येणं शक्य तरी आहे का?"

राणीनें पेल्यातल्या मद्यानें आपले ओठ आणि जिभेचा शेंडा ओला केला. राजानें तिचा उष्टा प्रसाद ग्रहण केला. मग त्याच्या एका एका तारकेनें येऊन त्यांना तसला प्रसाद द्यायला प्रारंभ केला; डोळ्यांवर लाली चढूं लागली, तुरस्काची (तुर्क) चिंता चेहऱ्यावरून पार नाहीशी झाली व त्याची जागा हास्यानें घेतली. राजाचें स्थूल शरीर मसनदीवर ओठंगूं लागलें. त्यानें एका राणीला या हातानें विळखा घातला तर दुसऱ्या राणीला त्या हातानें. एकीच्या ओटीवर डोकें टेंकलें तर दुसरीच्या वक्षावर हात. मद्याचे चषक मधून मधून फेसाळत होतेच. राण्यांच्या बरोबर कामोत्तेजक परिहास चाललेला होता. राजानें याच वेळीं नृत्य करण्याची आज्ञा दिली. घेऱ्यांचे परकर नेसलेल्या आणि पायांत घागऱ्या बांधलेल्या, कृश-कटी आणि पुष्ट भरीव नितंब असणाऱ्या बिल्वस्तनी सुंदर तरुणी नाचायला उभ्या झाल्या. वीणा आणि मृदंग यांचे ध्वनि साथ देऊं लागले. काकली गायनाबरोबर नृत्य सुरू झालें. पण एकाच गाण्यानंतर तें राजाला फिक्के नीरस वाटूं लागलें. त्यानें त्या सुंदरींना नग्न होऊन नाचण्याची आज्ञा दिली. नर्तकींनीं सारीं वस्त्रें आणि आभूषणें उतरून ठेवलीं, फक्त 'पाद किंकिणी' (पायातले चाळ) काय त्या ठेवल्या. पाठीमागें बसलेल्या राण्या आणि परिचारिका यांच्याबरोबर आलिंगन, चुंबन आणि परिहास चाललेला होताच. मधून मधून नग्ननृत्य होत होतें. जिचें शरीर महाराजाला आकर्षक वाटत असे ती त्याच्या-

जवळ येई. तिची जागा दुसरी स्त्री नग्न होऊन घेई. महाराजांचे डोळे अधिकच तांबडे लाल झालेले होते. त्यांचा कंठ आणि स्वर याच्यावर मद्याचा प्रभाव पडलेला होता–
‘ घ्–घत्–तु–तुझ्या तु–तु–कोंची ऐ–ऐ–ऐसी तैसी. मा–माझ्या इंद्रपु–पुरीत ये–ये–येण्याची का–का–काय बि–बि–शाद् सा–सा–साल्यांची ! च–च–चला. स–स–स–सगळयाच ना–ना–नागव्या व्हा नि ना–ना–नाचा !”

रंगशालेतल्या साऱ्याच राण्यांनी आपापलीं वस्त्रें आभूषणे उतरून ठेवली. त्यांच्या तरुण, सुंदर आणि गोऱ्यापान शरीरावर घनस्थूल अंबाड्यांमुळे जड झालेलें मस्तक राजाला आवडलें नाहीं. त्याने अंबाडे सोडण्याची आज्ञा दिली. क्षण दोन क्षणांत सगळ्यांच्या माथ्यांवरून काळया नागिणाप्रमाणे शोभणाऱ्या लांबलांब वेण्या नितंबावर लोळूं लागल्या. महाराज स्वतःचा आंगरखा काढू लागले, लागलीच तरुणींनी पुढे होऊन त्याच्या आंगावरची वस्त्रे आणि आभूषणे काढली. त्यांची लोंबणारी मासल हनुवटी, अति फुगलेले गाल, गंगाजमनी मिशा, बाळंतिणीच्या प्रमाणे लोंबणारे स्तन, पोटाचा तो डेरा, पृथुलकोमल मांसमेदपूर्ण मांड्या आणि पिंढऱ्या, केसाळ स्थूल बाहू पाहून सामान्य तरुणी देखील त्याला नाक मुरडल्या-शिवाय राहिली नसती, पण या जागी सगळ्याजणींचे देह नि प्राण या म्हाताऱ्याच्या मुठींत होते. कुणी त्याच्या ओठाच्या बोळक्यांशी आपले ओंठ भिडवीत होत्या, तर कुणी त्याच्या पाठीने आपले स्तन रगडीत होत्या; कुणी कुणी त्याच्या केसाळ भुजा आपल्या खांद्यावर ठेवून त्याच्यावर आपले कपोल टेकीत होत्या. कामोत्तेजक गीता-च्या बरोबरच नृत्य सुरू झाले. राण्या आणि परिचारिका यांच्या मध्ये आपले थल-थलणारें तोंद सांभाळीत महाराज देखील नाचूं लागले.

– २ –

“ यावं, कवि चक्रवर्ती ! ” असें म्हणून राजाने एका अर्धवयस्क पुरुषाला संकेताने आसनस्थ होण्यास सुचवले, आणि तो बसल्यावर त्याला सन्मानपूर्वक पानाचे दोन विडे दिले. कवि चक्रवर्तीचे वय पन्नासाच्यावर होते. त्याच्या गौर भव्य मुद्रेवर ओसरून गेलेल्या वसंताच्या खुणा अजूनहि दिसत होत्या. त्याच्या मिशा अजूनहि काळया दिसत. त्याच्या आंगावर एक शुभ्र चादर पांघरलेली आणि एक शुभ्र नेसतें धोतर होते. या शिवाय गळयांत एक रुद्राक्षाची सुंदर माळ आणि कपाळी भस्माचा चंद्राकार त्रिपुंड !

कवीनें सुवासित सोन्याच्या वर्खाने गुंडाळलेला विडा तोंडात कोंबून म्हटलें–

“ देव, यात्रा क्षेमपूर्वक पार पडली ना ? प्रकृति स्वस्थ होती ना ? रात्रीं सुख-निद्रा येत असते ना ? ”

“ आतां पौरुष थकत चाललंय, कविपुंगव ! ”

" महाराज, आपण आपल्या कवि श्रीहर्षाचा खूप उपहास करतां ! "

" 'पुंगव' हा उपहासाचा शब्द नाहीं; प्रशंसेचा आहे तो ! "

" देव, पुंगव म्हणजे बैल ! "

" आहे मला माहित तें, पण श्रेष्ठांना देखील पुंगव म्हणतात. "

" मी बैल या अर्थानं तो शब्द घेतला. "

" आणि मी श्रेष्ठ या अर्थानं वापरला. तरी देखील कवि मित्रा, तुझ्या सारख्या नर्म सचिवा (लंगोटी-मित्रा) बरोबर जर थट्टा मस्करी करायची नाहीं तर मग करायची तरी कुणा बरोबर ?"

" पण दरबारात तरी नको, महाराज. " श्रीहर्षानें हळूंच सांगितले.

कवीच्या हातात हात घालून जयचंद्र आस्थान-शाळे (दरबारगृहा) बाहेर पडला आणि ते दोघे क्रीडोद्यानाकडे निघाले. ग्रीष्माचा प्रारंभ असल्यामुळे हिरव्या हिरव्या वृक्षांना हळू हळू डोलविणारा वारा मोठा सुखकारक वाटत होता. दीर्घिकेच्या (पुष्करिणीच्या) चबुतऱ्यावर ठेवलेल्या पांढऱ्या शुभ्र संगमर्मराच्या आसनावर बसून राजानें कवीला शेजारचे आसन ग्रहण करायला सांगितले व पुढे बोलायला सुरवात केली – " रात्रीची कर्मकथा काय विचारतोस, कवि ? खरोखरंच मला आतां म्हातारा झालो असं वाटूं लागलं ! "

" कां बरं ? "

" नग्न सुंदरी देखील माझ्यातली कामेच्छा जागवूं शकत नाहींत आतांशा ! "

" तर मग आपण आता पूर्ण योगी झालात, महाराज ! "

" पण या योग्याच्या जवळ असलेल्या या सोळा सहस्र सुंदरी काय करतील ? "

" त्या वाटून टाकाव्यात महाराजानीं; घेणारे पुष्कळच सापडतील. नाहीतर गंगाकाठीं हातीं जलकुश घेऊन दान करा ब्राह्मणाना; ' सर्वेषामेव दानस्तां भाग्योदानं विशिष्यते । ' "

" तेच करावं लागेल आतां. वैद्यराज चक्रपाणि यांचा वाजीकरण रस आता निकामी झाला आहे. आता फक्त तुझ्या काव्यरसाचीच काय ती एकमात्र आशा आहे मला. "

" नग्न सौंदर्यरस जिथं कुंठित झाला तिथं काव्यरस काय करणार ? आणि महाराज आतां आपलं वय देखील साठाच्या वर झालं ! "

" वा, साठा तो पाठा ! "

" सोळा हजार कालवडींत सदा हुंदडणारा खोंड असंच ना ? "

" कवि, तूं कुठं काशींत दिसला नाहींस. मला कनोजवरून आल्याला दोन महिने झाले आतां ! "

" मी चैत्र नवरात्रांत भगवती विंध्यवासिनीच्या चरणदर्शनासाठीं गेलों होतों, महाराज. "

" माझी नौका विंध्यवासिनीच्या धामाजवळून पुढं गेली. माहित असतं तर बोलावून घेतलं असतं ! "

" नाहीं तर तिथंच उतरून कुमारीपूजेंत व्यग्र झालां असतां ! "

" मग कवि, तिथं तूं कुमारीपूजेसाठीच तर गेला नव्हतास ना ? "

" महाराज, आम्ही भगवतीचे उपासक शाक्त आहोंत "

" पण तूं जेव्हां सीतारामांना वंदन करतोस तेव्हां तर पक्का वैष्णव वाटतोस ! "

" अन्त शाक्ता बहिश्शैवाः सभामध्ये च वैष्णवाः ! "

" सभेमध्यें वैष्णव होतोस तर ? "

" व्हावंच लागतं, महाराज. आम्हांला आपल्या सारखा दुसऱ्याची जीभ हांसडण्याचा अधिकार थोडाच आहे ? "

" कमाल आहे तुझ्या नाना सोंगांची ! "

" इतकंच नव्हे तर महाराज, मी आपल्या आराधनेमध्ये सुगत बुद्ध यांची देखील स्थापना केली. "

" सुगत, भगवान तथागतांची देखील ? "

" होय, भगवान् ! "

" छेः, नाव घेतांना या वेळीं देखील माझी मलाच लाज वाटते."

" पण महाराज, आम्हा शाक्तांच्या साठीं वज्रयानात सुगताची पूजा अगदीं सरळ आणि सहज रीतीने सांगितलेली आहे. "

" योग्य बोललास मित्रा, म्हणूनच तर त्याला ' सहज-यान ' म्हणत असतात."

" या सहजयानी सिद्धाच्या दोह्यांत आणि गीतांत मला कोणतंच कवित्व आढळत नाहीं. परंतु मद्य, मांस, मीन, मुद्रा आणि मैथुन या पांच मकारांचा प्रचार करून त्यानीं जे लोककल्याण साधलं त्याबद्दल मी त्यांचा कृतज्ञ आहे."

" पण मला मात्र आतां स्वतः या पाच मकाराची अखंड उपासना करणं दुष्कर होईल असं वाटतं."

" वज्रयानाबरोबरच नागार्जुनाचं माध्यमिक दर्शन म्हणजे जणूं काय दुधांत साखरच !"

" तुझ्या काव्यरसाचा आस्वाद तर मी चाखतोच, त्या वेळीं देखील कधीं कधीं डोकं गरगरूं लागतं; परंतु हें दर्शन म्हणजे डोक्यावर दगडाचं ओझं वाटूं लागतं. "

" तरी देखील नागार्जुनाचं दर्शन मोठं उपयुक्त आहे. बऱ्याचशा खोट्या कल्पना त्याच्यामुळं दूर होतात, महाराज ! "

" पण तूं तर प्रसिद्ध वेदांती आहेस कवि ! "

" होय तर ! मी माझे ग्रंथ वेदांताच्या नावावरच खपवितों महाराज. पण ' जन खंडन खंड खाद्य ' याच्यांत मात्र मी नागार्जुनाचीच चरणधूलि सर्वत्र वितरण केलेली आहे. "

" आठवण रहायची नाहीं मला, तरी पण नागार्जुन काय म्हणतो हे सांग मला एकदां ! "

" सिद्धराज मित्रपाद हे नागार्जुनाचंच दर्शन मान्य करतात. "

" माझे दीक्षागुरु ? "

" होय ! नागार्जुन म्हणतात—पाप-पुण्य, आचार-दुराचार, या सर्वच केवळ कल्पना आहेत. जगतात सत्ता आणि असत्ता कांहीहि सिद्ध करता येत नाही. स्वर्ग-नरक आणि बंधन-मोक्ष हे बालकाचे भ्रम आहेत. पूजा-उपासना या पामरांच्या वंचनेसाठी आहेत. देवदेवींच्या लोकोत्तर कल्पना या मिथ्या आहेत. "

" मी देखील अशाच तत्त्वज्ञानाच्या आचरणात आपलं सारं आयुष्य घालवलं, कवि ! "

" सगळेच असं करतात, महाराज. रोख सोडून उधाराच्या मागं केवळ मूर्खच धावत असतात. "

" पण पुढं रोकड पडलेली असून देखील मला ' टुकटुक माकड ' सहन करीत बसावं लागत आहे, मित्रा ! तूं तर अजूनहि उतरलेला दिसत नाहीस ? "

" कसा दिसेन ? आठ वर्षांनी लहान पण आहे आपल्यापेक्षा ? आणि शिवाय मी एकच लग्न केलं महाराज ! "

" लग्न केलं नाहीं म्हणून काय झालं ? बायकोगणिक लग्न करतो म्हटलं तर केवळ सप्तपदीची पावलं टाकता टाकतां पुरुष थकून जाईल. "

" माझ्या घरात एकच ब्राह्मणी आहे, महाराज. "

"जग ठेवीलहि विश्वास कीं कवि श्रीहर्ष एका दांत पडलेल्या म्हातारीशी एकनिष्ठ होता म्हणून ! "

" आता विश्वास ठेवीत आहे नि उद्या ठेवीलही. महाराज, माझ्या ग्रंथांतून समाधि लावून स्वतःला झालेल्या ब्रह्मसाक्षात्काराची गोष्ट देखील लिहिलेली आहे मी ! "

" कवि, तुझ्या माध्यमिक दर्शनशास्त्रात ब्रह्म आणि त्याचा साक्षात्कार यांचाहि उपयोग आहे ? "

" तिथं काय काय उपयोगाचं नाहीं, हें विचारा महाराज ! "

" प्रजेचें आंधळेंपण तसंच कायम राखायचं आहे. त्यांना हे सगळे साक्षात्कार दाखवलेच पाहिजेत."

" म्हणजे महाराज ? आपला धर्मावरचा विश्वास जात चालला !"

" सांगतां येत नाही कवि, केव्हा विश्वास जडतो नि केव्हां उडतो ते ! तुझ्या त्या धर्मात्मा ब्राह्मणाचे उपदेश आणि आचार बघून ऐकून माझा कांहींहि एक निश्चय होऊं शकत नाहीं. मोठंच बिकट आहे तें ! मला येवढंच माहित आहे की दान पुण्य करणं, देवालयं सुगतालयं बांधणं, काय तुम्ही म्हणाल तो धर्म करायला सांगा, करतों, पण रोख आयुष्य हातातून असं वांया घालवूं नका "

प्रेम आणि धर्म यांच्या गोष्टी संपल्या आणि मग राजकारणाच्या सुरू झाल्या. श्रीहर्ष म्हणाला, " महाराज, आपण खरोखरीच पृथ्वीराजाला मदत करण्याला नकार दिला का ?"

" मला काय गरज त्याला मदत करण्याची ? त्यानं स्वतःहून बाबटळीशीं भांडण उकरून काढलं, भोगील त्याचा तो !"

" माझंहि असंच मत आहे, महाराज. पण तो चक्रपाणि आहे ना, उगीच कटकट करीत असतो."

" त्याचं काम आहे चिकित्सा करण्याचं. तें मात्र धड होत नाही त्याच्यानं. तीनदा वाजीकरण-चिकित्सा केली पण व्यर्थ. आणि आतां चाललाय राजकारणात सल्ला द्यायला "

" नाही तरी, महाराज, तो मूर्खच आहे. उगीचच त्याला युवराजानी डोक्यावर चढवून ठेवलेला आहे."

– ३ –

" खरं आहे आपलं म्हणणं, वैद्यराज ! श्रीहर्ष म्हणजे गहरवाराच्या मुळाला लागलेली उधईच आहे जणुं त्यानं बाबाना कामांध बनवून ठेवलं."

" कुमार, आज वीस वर्षं मी कान्यकुब्जेश्वराचा राजवैद्य आहे. माझ्या औषधी कांहीं तरी गुणकारी ठरतात ना !"

" साऱ्या जगाला माहित आहेत त्यांचे गुण !"

" पण महाराज मात्र वाजीकरणाच्या बाबतीत नाराज झालेले आहेत. अति-कामुक पुरुषांचं तारुण्य असं किनीसं वाढवता येणं शक्य आहे बरं कुमार ? त्यासाठीं आहार विहारात संयम करण्यासंबंधीं उल्लेख आहेत. मी तर सांगत असतो, कीं मला मल्लग्रामीं ( मल्लाव ) जाऊं द्या, तर तें देखील त्यांना मान्य होत नाहीं."

" पण वैद्यराज, पित्याच्या दोषामुळं मला सोडून जाऊं नका. गहरवारांच्या आशेचा आसरा आतां केवळ आपणच आहांत."

"मी नव्हें, आपण–कुमार हरिश्चंद्र! गहरवार कुलांत जयचंद्राच्या जागीं हरिश्चंद्र असते तर किती छान झालं असतं बरं! चंद्रदेवाच्या सिंहासनाला हरिश्चंद्राची आवश्यकता होती."

"किंवा श्रीहर्षाच्या जागीं जर वैद्यराज चक्रपाणि हेच जयचंद्राचे नर्मसचिव झाले असते तर! कांहीहि असो वैद्यराज, आपण गहरवाराचा राज्यसूर्य अस्तंगत होईतो पर्यंत आमच्या बरोबर राहिलं पाहिजे."

"अस्तंगत होईतो पर्यंतच नव्हे, तर बरोबरच अस्तंगत व्हायला देखील तयार आहे मी कुमार! पण केवळ गहरवारांचाच सूर्य अस्तंगत पावणार नसून साऱ्या हिंदूंचा सूर्य अस्तंगत व्हायचा आहे आम्हीं मल्लग्रामी ब्राह्मण केवळ स्रुवा आणि प्रोक्षणी यांचेच धनी नसून तरवार देखील हातात बाळगून असतो. म्हणूनच आमची देखील तुर्कांबरोबर दोन हात करण्याची इच्छा आहे"

"आणि माझे बाबा मात्र खुद्द आपल्या जामाताला देखील मदत देऊं इच्छीत नाहींत. पृथ्वीराज माझा बहीणजावई आहे, संयुक्ताचं त्याच्यावर प्रेम होतं, ती त्याच्या बरोबर स्वखुशीनं गेली, बाबांना याचा राग कां यावा बरं वैद्यराज?"

"कुमार, पृथ्वीराज वीर पुरुष आहे."

"यात काय संशय? त्याच्या शौर्यामुळेंच तो तुर्की सुलतानाला आपल्या तरवारीचं पाणी पाजून जेरीस आणीत आहे. तसं म्हटलं तर आमच्या कान्यकुब्ज राज्याच्या मानानं त्याचं राज्य अगदीं टीचभर! सुलतानाला वाट दिली असती तर त्यानं त्याचा फायदा करून दिला असता. सुलतानाचा डोळा दिल्लीवर नाहीं, कान्यकुब्जावर आहे. सहाशें वर्षांपासून कनोज भारतांतल्या सर्वांत मोठ्या राज्यांवर अधिकार गाजवीत आहे. पण हें सर्व बाबांना सांगायचं कुणी? आपली सारी बुद्धि गमावून बसले आहेत ते!"

"यावेळी त्यांनी निदान आपले अधिकार युवराजांनाच दिले असते तरीहि बरं झालं असतं."

"वैद्यराज, एकदां मला असं देखील वाटलं कीं बाबांना सिंहासनावरून काढून टाकावं. पण मग आपला उपदेश आठवला. या वीस वर्षांत आपला उपदेश प्रत्येकदां माझ्या उपयोगी पडला, त्यामुळें त्याच्या विरुद्ध वर्तन मी कधीहि करूं शकणार नाहीं."

"कान्यकुब्जाचं सिंहासन जर्जर झालेलं आहे, कुमार! जरा देखील पाऊल चुकलं की सारा डोलारा ढांसळून पडेल. ही वेळ बापलेकांच्या भांडणाची नाहीं."

"काय करावं वैद्यराज! आमचे सारेच सेनापति आणि सेनानायक भेकड व नालायक आहेत. तरुण सेनानायकांत कांहीं सुयोग्य व शूरवीर आहेत; पण त्यांचा

मार्ग या म्हाताऱ्यांनीं रोखून धरलेला. हीच गत मंत्रिमंडळाची. त्यांना हांजी हांजी करणं हेंच काय तें आपलं कर्तव्यकर्म वाटतं."

"राणीवशांत आपल्या बहिणीं-मुलींना पाठवून अधिकाराच्या जागा पटकावणाऱ्यांची हीच स्थिती व्हायची परंतु आम्हांला गेल्या गोष्टींची चिंता करायची नाही; आगामी घटनांची काळजी वाहिली पाहिजे आपण!"

"आज माझ्या हातीं सत्ता असती तर साऱ्या हिंदू तरुणाच्या हातीं शस्त्रं दिलीं असतीं मी!"

"पण पिढ्यानुपिढ्या चालत आलेला आहे हा दोष! केवळ राजपुत्रांवरच युद्धाची जिम्मेदारी सोपवण्याची प्रथाच पडली आहे. महाभारतात कृप आणि द्रोण यांच्यासारखे ब्राह्मण लढल्याचं नमूद आहे पण आता मात्र केवळ एकच जात लढते."

"माझ्या मतें आमच्या वाटेत जातिभेदाचा मोठाच अडथळा आहे."

"आहे तर! पूर्वजाच्या सत्कृत्याबद्दल अभिमान बाळगणं वेगळं; परंतु हिंदू समाजाचे कायमचे हजारों लहान लहान तुकडे पाडणें हें महापाप आहे, कुमार!"

"याचंच फळ भोगावं लागत आहे आपल्याला आज! काबूल आतां हिंदूंच्या हातून गेलं, तुकतंच लाहोर गमावलं आणि आता दिल्लीची पाळी आली."

"आज देखील लढण्यांत आम्ही पृथ्वीराजाला साथ देऊं शकलो तर?"

"केवढं पाखंड आहे हें वैद्यराज?"

"हें एकच पाखंड आहे का? आमची नौका अनेक पाखंडांच्या भारानं बुडूं पहात आहे. पण मोहाला बळी पडलेले आम्ही एकही वस्तु बाहेर फेंकून तिचा भार हलका करूं इच्छीत नाही."

"धर्माला अजीर्ण झालेलं आहे, वैद्यराज!"

'नाही, धर्माला क्षय लागला आहे. किती अत्याचार केले आम्हीं? दर वर्षी कोटयावधि विधवा आगीत जाळल्या. पशूं प्रमाणं स्त्रीपुरुषांचा क्रय विक्रय केला. देवालयं आणि विहार यांच्यात सोन्या-रुप्याचे आणि हिऱ्या माणकांचे ढीग रचून म्लेच्छ लुटारूंना निमंत्रणें दिलीं. आणि शत्रूंना तोंड देण्यासाठी एकजूट करण्याच्या ऐवजीं आपसांत भांडणं करतों आतां आम्ही! आपल्या इंद्रियलंपटतेसाठीं प्रजेची निढळाच्या घामाची कमाई बर्बाद करून टाकतों."

"लंपटता नव्हे, वेड! वैद्यराज, प्रीतीनं वश झालेली एक सहृदया स्त्रीदेखील कामतृप्तीला पुरेशी होऊं शकते आणि इंद्रियसुखाच्या वेडाला पन्नास हजार देखील पुरेशा होत नाहींत. अशा प्रसंगीं प्रेम कसं राहूं शकेल? माझ्या पित्यानं गेल्या संक्रांतीच्या वेळीं आपल्या राणीवशांतल्या बऱ्याचशा स्त्रिया ब्राह्मणाना दान केल्या.

त्या रडत नव्हत्या, उलट मनांतल्या मनांत खुषींत होत्या. माझ्या भामेनं सांगितलं हें मला."

"दान घेणाऱ्या ब्राह्मणांच्या घरीं जास्तींत जास्ती एक किंवा दोन सवती असतील, कुमार. तिथं सोळा सहस्रांची गर्दी तरी नसेल! मी ही देखील एक गुलामगिरीच समजतो. दान करायला स्त्री संपत्ति का आहे?"

"आतां या वेळीं आपण सर्वांनी मिळून तुर्कांना तोंड देण्याचा प्रयत्न केला पाहिजे."

"तें मात्र महाराजांच्या हातीं आहे. पण पाखंडी श्रीहर्ष नेहमीं त्यांच्या कानाशीं लागलेला असतो. तेव्हां त्यांना सांगणार कोण?"

– ४ –

अष्टमीची रात्र, चंद्र आतां कुठे पूर्वक्षितिजावर उदय पावत होता. अजून सारी धरणी प्रकाशानें उजळायची होती. चहूंकडे अगदी सुनसान झालें असलें तरी दूरवर घुबडाचा भीतिप्रद आवाज ऐकायला येत होता अधून मधून! या नीरवतेमध्यें दोन इसम वरच्या कांठावरून यमुनेच्या पात्रातल्या वाळवंटात घाई घाईने उतरले. त्यांनीं तोंडांत बोटें घालून तीनदां शीळ घातली. पलीकडच्या कांठावरून एक नाव येतांना दिसूं लागली. नीरव नदीप्रवाहांत हळूहळू वल्ही मारून पुढे पुढे सरकणारी साधारण आकाराची नाव किनाऱ्याला येऊन लागली. दोघेहीजण हळूंच नावेंत उडी मारून आले. आंतून कोणीतरी विचारले, "सेनानायक माधव का?"

"होय, आचार्य! आल्हण देखील आहे माझ्या बरोबर. कुमारांचं कसं आहे आतां?"

"अजूनपर्यंत शुद्धीवर आले नाहीत, तरी पण याच्यासाठीं आणखी जरासं औषध दिलंय मी! बरं झालं एकापरी की कुठं कुमार रणक्षेत्राकडे गेले नाहींत!"

"आचार्य, ते आपल्या आज्ञेचं उल्लंघन कधीहि करायचे नाहीत."

"तसा मला विश्वास आहे त्यांचा, पण झालं हे बरंच म्हणायचं! आतां जखमेचं दुःख देखील कमी होत जाईल."

"तशी जखम घातकी तर नाहीं ना, आचार्य?"

"नाहीं, सेनानायक! जखम शिवून टाकली मी आणि रक्तस्राव देखील थांबला. दुबळेपणा आहे हें खरं, पण भिण्याचं कारण नाहीं कांहीहि! बरं, तूं काय केलंस? महाराजांचं शव पाठवलं ना राणीवशात?"

"होय!"

"मग आतां अंतःपुरांतील स्त्रिया महाराजांबरोबर सती जातील?"

"ज्यांना जायचं असेल त्या जातील!"

"आणि सेनापतीचं काय झालं?"

"म्हातारा सेनापति तर शेवटीं मरतांना जागा झाला. किती तरी सेनानायक डाव उलटला हें बघून पळून गेले, पण त्यांच्यात धड तेहि कौशल्य नव्हतं. त्यांच्यांतला कुणी जिवंत राहिला असेल असं मला नाही वाटत!"

"हेच तीन वर्षांपूर्वी घडलं असतं तर? हरिश्चंद्र महाराज झाले असते आणि माधव, तूं झाला असतास कान्यकुब्जाचा सेनापति!"

एक दीर्घ श्वास सोडून माधव म्हणाला, "आचार्य, आपली एक एक गोष्ट आरशाप्रमाणं स्पष्ट होती. पृथ्वीराजाबरोबर सहकार्य करून तुर्कांशी लढण्याबद्दल आपण कितीदातरी महाराजांना सांगून पाहिलं, पण तें सारं अरण्यरुदन ठरलं."

"पण आता शोक करून काय फायदा? सांग, आता पुढं कशी व्यवस्था करायची?"

"पन्नासा पन्नासांच्या टोळ्यांनी पाचशें नावा आतां सैनिकांना भरून घेऊन येत असतील. गागा, मोंगे, सलखू यांच्या नायकत्वाखालीं मी सारं सैन्य वांटलं नि आदेश दिला कीं चंदावराच्या (इटावा) पूर्वेकडे हटत जाऊन तुर्कांशीं लढायचें--समोरासमोर कमी, गनिमी धर्तीवर जास्ती--आणि परिस्थिति प्रतिकूल दिसली कीं पूर्वेकडे पिच्छेहाट घ्यायची!"

"कनोजच्या राजवाड्याचं काय?"

"तिथल्या ज्या ज्या वस्तु हालवतां येण्या जोग्या होत्या, त्या त्या हालवल्या मी तिथून. गंगेच्या वाटेनं बऱ्याच नावा दोन दिवसा पूर्वीच निघालेल्या आहेत."

"माधव, याच साठीं मी तुझ्यावर सेनापतीची सांवली देखील पडूं दिली नाहीं; नाहीं तर त्यानं आपल्या अगोदर तुला मरूं दिलं असतं. तुला आणि कुमाराला जिवंत पाहून संतोष वाटतोय मला! हिंदूंना अजून देखील आशा करायला जागा आहे. कांहीहि होवो, पण अगदीं शेवटच्या घडी पर्यंत आम्हांला आमच्या शक्तीचा कणन्‌कण विचारपूर्वक खर्ची घालावा लागेल."

"आचार्य, दुसऱ्या नावा येताहेत असं वाटतं."

"सेनानायक आल्हण, त्या आल्या कीं साऱ्या नावांना पुढं जाण्याचा आदेश द्या."

"बहुत अच्छा, आचार्य!" आल्हणानें नम्र स्वरांत उत्तर दिलें.

"बरं माधव, तळघरांत चल पाहूं. तिथं अंधार आहे. मीच जाणून बुजून तिथले दिवे मालवले होते." जरा पुढें गेल्यावर त्यांनीं हांक मारली-"थांब हं जरा, राधे ऽऽ!"

"काय बाबा!" एका तरुण स्त्रीचा आवाज ऐकायला आला.

" चकमकीनं दिवा उजळ बघू. लोखंड ठेवलंय ना जपून?"

" होय, लावत्यें हं."

माधवकडे वळून ते सांगूं लागले, " बघ, कुणी वैद्यराज म्हणतात, कुणी आचार्य म्हणतात, तर कुणी बाबाहि म्हणतात हीं सारीं नावं लक्षांत ठेवणं मला जड जाईल. त्यापेक्षां तुम्ही सारी जणं मला माझ्या बाळपणीच्या 'चक्कू' या नांवानंच हांक मारलीत तर?"

" नाही, बायकांची संवय बदलतां बदलत नाहीं म्हणून आम्हीं सगळे तुम्हांला बाबा चक्रपाणि पांडेय यांच्या ऐवजीं नुसतं बाबाच म्हणूं!"

" बरं, चला. दिवा उजळला!"

दोघेही पायऱ्या उतरून आंत आले. नौकेचा दोन तृतीयांश भाग फळ्यांनीं मढवून टाकलेला-तक्तपोशी केलेला–होता. तिच्या खाली एकापुढे एक अशा दोन छोट्या कोठड्या तयार केलेल्या होत्या. नौकेचा राहिलेला भाग तसाच मोकळा सोडलेला होता. दोघेहि एका कोठडीत शिरले. तेथे दिव्याच्या पिवळ्या उजेडात एक बाजलें दिसत होतें. त्याच्यावर गळ्यापर्यंत पांढरा दुशाला आंगावर ओढून घेऊन कोणीसे झोपलेले होतें. बाजल्याच्या जवळच असलेल्या एका तिवईवर बसलेली कुणीतरीं तरुणी उठून उभी राहिली. चक्रपाणीने विचारले, " भामा, कुमारांनी काहीं हालचाल केली का?"

" नाहीं बाबा, तेव्हांपासून तसाच श्वास चाललाय त्यांचा!"

" घाबरलीस तूं बेटा?"

" चक्रपाणीच्या छत्राची सावली असल्यावर घाबरायचं? गहरवार वंशानं आधींच आपल्या गुरु द्रोणाचार्याला ओळखलं असतं तर?"

" परम सहायक महाराजाधिराज हरिश्चंद्र यांचे हे सेनापति, आपले सेनापति माधव आले आहेत!"

" महादेवी भामा, आपला सेवक माधव सेवेसी उभा आहे," असें म्हणून माधवानें अभिवादन केलें.

" मी आपल्या माधवाला अनोळखी नाहीं काहीं. कुमारांच्या बरोबर धुळींत खेळणारे माखणारे मला कधीं विसरतील तरी का?"

" भामा, याच्या भुजा गहरवार वंशाची धुळीस मिळालेली लक्ष्मी पूर्ववत् प्रतिष्ठित करायला समर्थ आहेत"

" बाबा, आपल्या तोंडचा भामा शब्द कितीं आवडतो म्हणून सांगू!"

" पुत्री, वडलाची आठवण येत असेल तुला?"

" नाहीं बाबा, आम्हांला राजकुलांत दुसरंच वारं पालवावं लागतं. बाई ग, किती ढोंग, किती कृत्रिमता? आम्हां माणसांत साधीं सरळ नातीं निर्माण करायला हवींत; जुनं राजकुल पिता (श्वशुर) भट्टारक यांच्या बरोबर विसर्जन करायला हवं."

" ते केव्हाच गेलंय, बेटा! तूं कुमाराचं अंत पुर पाहिलं आहेस ना?"

आपल्या डोळ्यांतली आसवे टिपीत ती म्हणाली, " बाबा, आपण आम्हांला पुन्हां माणसात आणलंत!"

" नाही मुली! अग, हरिश्चंद्राच्या जागी दुसरा कुणी असता तर तो केवळ पाण्यावर रेघा ओढीत बसता. –हे सारं कुमार हरिश्चंद्रानं केलं."

" बाबा!"

सगळ्यानीच कुमाराच्या अर्धवट उघडलेल्या डोळ्याकडे नजरा वळवल्या. भामा तर लगबगीनें त्याच्याकडे धावली आणि म्हणाली, " माझा चंद्र, राहूच्या मुखातून निसटलेला माझा चंद्र!"

" माझी भामा! पण मी आतांच बाबांचा शब्द ऐकलासा वाटतो."

' बाबा?"

" ज्यानीं गहरवारांचा सूर्य बुडवला ते बाबा नव्हत, तर हे बाबा! यांना तूं बाबा म्हणत्येस आणि मीहि म्हणणार आतां!"

चक्रपाणींने दिवा घेऊन कुमाराच्या कपाळावरून हात फिरवीत विचारलें, " कुमार, कसं वाटतं आता?"

" असं वाटतं कीं मी रणांगणावरून घायाळ होऊन परत आलोच नाही."

" जबर घाव होता, कुमार!"

" असेल, पण माझा पियूषपाणि बाबा होता ना जवळ?"

" कुमार थोडं कमी बोल जरा!"

" बाबा चक्रपाणीच्या तोंडून पडलेलं एकेक अक्षर या हरिश्चंद्राला ब्रह्मवाक्या-समान आहे."

" पण असा हरिश्चंद्र चक्रपाणीच्या उपयोगी नाहीं वाटायचा कसल्याहि बाबतींत!"

" ही हरिश्चंद्राच्या श्रद्धेची गोष्ट झाली बाबा. जिथं बुद्धीचा प्रश्न येईल तिथं हरिश्चंद्र ब्रह्मवाक्याला सुद्धां कसोटी लावल्याविना मानणार नाहीं."

" कुमार, तुझ्यामुळं गहरवार वंशच नव्हे, तर सारा हिंदू देश धन्य झालेला आहे."

" पण बाबा चक्रपाणि गवसले म्हणून! –जरा पाणी– !"

भामानें लागलीच पाण्याचा पेला भरून हातीं दिला. बाबांनीं नाव चालू लागली हें पाहून म्हटलें—"कुमार, आपण आतां काशीला जात आहोंत,—आपल्या दुसऱ्या राजधानीला सेनापति माधवानं मेनेला आदेश दिलेला आहे. इकडचं सैन्य तुर्कांना थोपवून धरील, तिकडं आम्हीं काशीत गहरवार राज्यलक्ष्मीचे सैनिक तयार करू."

"नाहीं बाबा, आपण मागं म्हणत होतां, त्याप्रमाणं त्या हिंदू राज्यलक्ष्मीला परत आणायची तयारी करूं. आतां परतून येणारी राज्यलक्ष्मी हिंदूंची होईल. हिंदूंच्या बाहुबळावर तिला जिंकून आणावं लागेल आतां."

"ब्राह्मण आणि चांडाळ हे भेद मिटवून!"

"होय, माझे गुरु द्रोण!"

---

# १५–बाबा नूरदीन

( काळ—इ. स. १३०० )

– १ –

"आता तो काळ संपला. तेव्हां आम्हीं हिंदुस्थान म्हणजे केवळ एक दुभती गाय समजत होतों. किसान, कारागीर, बनिये आणि राजे यांच्या जवळून जास्तींत जास्ती धन उकळून आम्ही घोरला पाठवीत होतो आणि स्वतः चैन करीत होतों. पण आतां आम्हीं घोरचे गुलाम नसून हिंदुस्थानचे स्वतंत्र खल्जी शासक आहोत." –एका सडपातळ तरुणानें आपल्या काळ्या दाढीच्या वर असलेल्या मिशीच्या बारीक लवेवर ताव देत उद्गार काढले. त्याच्यापुढे एक शुभ्र लांब दाढी असलेली, बडा अमामा ( पगडी ) व पांढरी अचकन घातलेली कुणीतरी शांत संभ्रांत चेहेऱ्याची व्यक्ति गुढगे टेंकून बसलेली होती.

तो म्हातारा म्हणाला,–"पण जहापनाह, पाटील, मुखिये, इलाखेदार यांना जर डिवचलं तर ते विरुद्ध जातील आमच्या. आणि सल्तनतीतल्या गावागांवांतून कांही आम्हीं आमच्या पलटणी वायद्याच्या वसुलीसाठीं पाठवूं शकत नाही."

"मग आपल्याला आधीं एक गोष्ट निश्चित केली पाहिजे. आपल्याला कसं रहायचं आहे या देशात? हिंदी बनून हिंदुस्तानचे शासक या नात्यानं कीं उंटागाढवां-वरून हिऱ्यामोत्यांच्या गोण्या वाहून नेणारे गजनी घोरचे लुटारू म्हणून?"

"आतां आम्हाला या हिंदुस्थानांत रहायचं आहे जहापनाह!"

"होय ना, मग आमचं मूळ गुलामांच्या प्रमाणं घोर मध्यें नसून इथं दिल्लींत आहे जर कांही कुठं बंडाळी माजली किंवा पुंडावा झाला तर आमच्या मदतीला कांहीं अरबस्तान अफगाणिस्तानांतून सेना धावून येणार नाहींत, किंवा तिकडे पळून जातों म्हटलं तर तिथं आसऱ्याला ठिकाण देखील मिळायचं नाही."

"खरं आहे आपलं म्हणणं, जहांपनाह!"

"तर मग आम्हांला याच घरात रहायचं आहे; आणि म्हणूनच यालाच असं ठीकठाक करायला हवं की ज्यामुळं इथले लोक शांततेनं सुखांत नांदतील. इथल्या प्रजेपैकीं मुसलमान तरी किती आहेत? या शंभर वर्षांत आम्ही दिल्लीच्या आसपा-सच्या लोकांना देखील मुसलमान करूं शकलों नाही. काय मुल्ला अबूमहम्मद, किती

दिवसांत आपण दिल्ली आणि हा भोंवतालचा प्रदेश मुसलमानमय करून सोडूं शकाल? वाटते का कांहीं आशा ?"

पुढे बसलेल्या तिसऱ्या वृद्धानें तोंडाचें बोळकें झाल्यामुळें आंत शिरकलेल्या ओठां खालची पोटापर्यंत रुळणारी पांढरी दाढी कुरवाळीत म्हटले "मी निराश झालो नाही सुल्ताने जमाना! पण या ऐंशी वर्षांच्या म्हाताऱ्याचं म्हणणं ऐकाल तर तें असं--आहे आम्ही जर जबरदस्तीन मुसलमान बनवण्याची इच्छा धरली तर मला नाहीं आशा वाटत कीं आम्हांला त्यांत पूर्णपणे यश येईल म्हणून!"

"यासाठीच आम्ही या हिंदुस्थानांत रहाणारे मुसलमान सारा हिंदुस्थान मुसलमानमय होईतो वाट बघत बसूं शकत नाही. आम्ही एक शतक असंच गमावलं आणि प्रजेची जरा देखील पर्वा न करतां केवळ आपला भूमिकर, चुंगी, महसूल, जास्तीत जास्ती कसा वसूल होऊं शकेल याचीच काळजी वाहिली. परिणाम काय झाला? शाही खजिन्यांत येतो एक रुपया तर पांच जातात तहसील (वसूल) करणाऱ्यांच्या पोटांत. दुनियेंतल्या कुठल्यातरी मुल्खांत असं पाहिलंय का, की गांवचे मुखिये आणि पाटील यांच्या स्वारीला घोडे असतात, त्यांचा लिबास (पोशाख) रेशमी असतो, इराणमध्ये तयार झालेल्या तीरकमानी ते चालवतात. छे. छेः वजीरुल्मुल्क! माझ्या सल्तनती मधून आतां अशा तऱ्हेची लूट बंद झालीच पाहिजे."

"लेकिन हुजूरवाला, कितीतरी हिंदु याच लालचीनं मुसलमान होत असत. हाहि रस्ता बंद होईल अशानं!" मुल्ला म्हणाला.

"इस्लामला जर अशा प्रकारची लूट आणि लांचलुचपत कबूल असेल तर मग सरकारी खजिना आणि माल देखील सुरक्षित राहूं शकणार नाही. आणि ज्या हुकूमतीचे हे असले खिदमतगार आहेत तिच्या भवितव्याबद्दल कसली आशा धरतां येणार ?"

"अशांनी सल्तनतीचा पाया मजबूत होऊं शकणार नाही, जहापनाह, हे मात्र कबूल करावंच लागेल. मी फक्त यामुळं पसरूं पाहणाऱ्या असंतोषाचाच विचार करीत होतो."--वजीर म्हणाला.

"गावांतल्या अमल्यांचं चालूं शकलं तर ते वाटेल तें करूं शकतील. पण गांवांत अमले जास्त असतात कीं किसान ?"

"किसान! शंभर किसानावर एक अमला असं प्रमाण पडत असेल."

"त्याच शंभर किसानाचं रक्त शोषून त्याच्या जोरावर तो घोड्यावर स्वार होऊं शकतो, रेशमी लिबास पेहरूं शकतो, आणि इराणी तीरकमान चालवूं शकतो या अशा तऱ्हेचं रक्तशोषण थांबवून आपण किसानाची स्थिती सुधारूं. त्यांना हुकूमतीचे वफादार बनवूं. काय एकाला नाराज करून शंभरांना खूष करणं व त्यांना सुखी राखणं हें चागलं नाहीं ?"

"आहे तर हुजूरबाला. जरूर! आतां मला देखील तिळमात्र शंका उरलेली नाहीं. हिंदुस्तानच्या मुसलमान सुलतानामधून जरी आपण एक नवी रूढि पाडायला निघालेले आहांत, तरी पण आपल्याला अवश्य यश मिळेल. यामुळं गांवातल्या फक्त वरच्या दर्जाच्या कांही मूठभर लोकांनाच तेवढें आपण नाराज करूं."

"गावांतल्या आणि शहरांतल्या उच्च दर्जाच्या कांही लोकांच्या नाराजीची पर्वा नाहीं. आतां थोड्या दिवसांसाठी उभारलेल्या आमच्या या झोपडीच्या जागी आम्हांला आमच्या सत्तेची मजबूत इमारत उभारावी लागेल."

मुल्ला कसला तरी विचार करीत होता. त्यानें आपल्या दाढीवरून हात फिरवीत म्हटले, "हुजूरबाला, आता मला देखील वाटायला लागलं की गावातल्या अमल्याच्या ऐवजी गावकरी किसानांच्या भलाईची काळजी घेणं हुकूमतीच्या दृष्टीनं अधिक लाभदायक ठरेल. आम्ही गावाकसब्यामधील कापडाच्या कारागिराकडे जरासं लक्ष दिलं, त्यांच्या पंचायती मजबूत करण्यासाठी सहाय्य दिलं, त्यामुळं बनिये आणि महाजन याच्या लुटीपासून ते वाचले. प्रत्येक अमला त्याना बिगारीमध्ये धरून त्यांच्याकडून कापड बनवून घेत असे, रुई पिंजून धुनकून घेत असे. हे सारं थांबवलं आम्ही. आणि याचा परिणाम आज आपल्याला काय दिसतो म्हणाल तर आतां क्वचितच असा एखादा पिंजारी, विणकर, किंवा शिंपी असेल की जो इस्लामच्या आश्रयाला आलेला नसेल."

"आतां आपण बघितलंच मुल्लासाहेब, ज्या गोष्टीमुळं सल्तनतीचं भलं शाबीत होतं, तीच इस्लामच्या देखील कल्याणासाठी भली ठरलेली आहे."

"पण एक अर्ज आहे जहापनाह. आपण अमीरुल् मोमिनीन ( मुसलमानांचे नायक ) आहांत."

"पण तसाच मी हिंदूंचा देखील सुलतान आहे. हिंदुस्थानात मुसलमानांची संख्या अतिशयच कमी आहे, शायद हजारात एक."

"हिंदु इस्लामची तौहीन ( बदनामी ) करीत फिरतात. पुढं त्यांचा धीर आणखीच चेपेल, म्हणून ही तौहीन बंद झालीच पाहिजे."

"तौहीन? काय ते कुराण-पाक ( पवित्र कुराण ) पायांतळी तुडवतात?"

"येवढी कसली त्यांची हिमत होणार?"

"काय ते मशिदी भ्रष्ट करतात?"

"असं देखील होणं शक्य नाहीं."

"काय भर बाजारांत ते रसूल-खुदाला शिव्या देतात?"

" नाहीं जहांपनाह, उलट जे आमच्या सूफींच्या संसर्गात आले ते तर रसूल-खुदाला देखील ऋषि मानतात. पण ते आमच्या देखत कुफ्र ( पाखंड ) करतात. आपल्या पाखंडी रीतीभाती आचरणांत आणतात. "

" पण आपण त्यांना काफिर (पाखंडी) म्हणतोंच ना? मग त्यांच्या पाखंडी रीति-भातींबद्दल तक्रार करून काय फायदा ? माझे काका सुल्तान जलालुद्दीन यांचा तेव्हा माझ्याप्रमाणं निश्चय झालेला नव्हता आपल्याला हिंदुस्थानचे स्थायी हिंदी शासक समजायचं कीं जोंपर्यंत सारा हिंदुस्थान मुसलमान होणार नाहीं तोंपर्यंत स्वतःला इथं अस्थायी समजायचं हें त्यांना समजलेलं नव्हतं. पण त्यांनींच एकदां आपल्या-सारख्याच प्रश्नकर्त्याला काय उत्तर दिलं होतं, आहे ठाऊक ? "

" नाहीं, हुजूरबाला. "

"त्यांनीं म्हटलं होतं,–'बेवकूफ, दररोज हे हिंदू माझ्या महालापुढून शंख फुंकीत आणि ढोल वाजवीत यमुनातीरीं आपल्या देवतांची पूजा करायला जातांना तूं पाहतोसच ना ? ते माझ्या डोळयांदेखत आपल्या पाखंडी रीतीभाती पाळतात. माझ्या शाही रुबाबाला आणि स्वतः मला तुच्छ लेखतात. माझ्या धर्माचे दुष्मन आहेत हे हिंदु, कारण ते माझ्याच राजधानींत माझ्या डोळयांदेखत ऐष-आरामानं छानछोकीत जिंदगी गुजारतात. आपली दौलत आणि खुशाली (सुस्थिति) यांच्या आधारावर मुसलमानांची बरोबरी करून स्वत:ची शान आणि घमेंड दाखवतात. मी त्यांचा हा ऐष-आराम आणि घमेंड गरूरी त्यांच्या जवळ तशीच राहूं दिली आणि त्यांनी जणुं काय खैरातीदाखल दिलेल्या थोड्याशा गवतामोलाच्या धनावर मी संतोष मानून घेतला, याची मला लाज वाटते. '–मला वाटतं याच्या पेक्षां अधिक लाजिरवाणं उत्तर मला देखील देतां यायचं नाहीं. "

" परंतु सुल्ताने-जमाना, सुलतानाचं देखील इस्लाम संबंधीं कर्तव्य आहेच. "

" ज्या अपराधाला केवळ मृत्युदंडच देतां येईल अशा अपराधी गुन्हेगारांनीं इस्लामधर्म स्वीकारला कीं मग मी त्यांना प्राणदान देऊं शकतों. गुलाम असलेल्यानं इस्लाम स्वीकारला तर त्याला मी गुलामींतून मुक्त करण्याचा हुकूम देऊं शकतों. पण त्याच्या खरेदीची किंमत शाही खजिन्यांतून देण्यांत येईल. तसं म्हटलं तर या देशांत कोट्यावधि रुपये केवळ गुलमांवर गुंतलेले आहेत. आणि या सगळया गुलामांना आझाद करावं असं तुम्हीं पण म्हणूं शकणार नाहीं. "

" नाहीं जहॉपनाह, गुलाम ठेवणं हें अल्लाहतालानं देखील जायज ठरवलेलं आहे. "

" बघा, आपण म्हणतच असाल तर तख्ताला येणारा धोका पत्करून देखील मी मुस्लिम-गैरमुस्लिम या सगळया दासदासींना आझाद करण्याचं फर्मान काढतों. "

" नको, हें शरीअतच्या विरुद्ध होईल. "

" (धर्म कायदा) शरीअतच्या विरुद्ध होण्याची गोष्ट या सोडून मुल्लासाहेब. खरी गोष्ट अशी आहे कीं या वेळीं आपलं ध्यान असेल एखाद्या अमीना दासीकडे लागलेलं! सगळ्यांत जास्ती गुलाम तर मुसलमानांच्याच घरांत आहेत. "

" आणि अल्लातालानं मोमिनांच्यासाठीं गुलाम कायदेशीर ठरवलेले आहेत. "

" पण हे दास-दासी देखील मोमिनच असले तर? मग पुन्हा आलीच ती गोष्ट! –आपण त्यांना या दुनियेंतल्या आझाद हवेंत श्वासोच्छ्वास घेऊं द्यायला कबूल नाहीं; केवळ त्यांना बेहस्ताच्या आशेवर राखूं बघतां! "

" मला आणखी कांहींहि बोलायचं नाहीं. येवढंच सांगायचंय मला कीं इस्लामी सल्तनतीमध्यें इस्लामी शरीअतचं शासन असलंच पाहिजे. "

" पण ही मागणी कांही लहानसहान नाहीं. यासाठीं इस्लामी सल्तनतीमध्यें अधिकांश प्रजा मुसलमान असायला हवी. आपल्या सर्वांच्या पुढं मी माझे विचार स्पष्टपणें मांडूं इच्छितो. वजीर साहेब, आपण देखील लक्ष द्यावं. सुलतान महंमूदासारखा एक विदेशी सुलतान आपल्या बलाढ्य विदेशी सैन्याच्या बळावर शांततापूर्ण शहराची लूट करून, व लुटीचा माल उंटां खेचरांवर लादून घेऊन जाऊं शकत होता, पण माझ्यासारख्या बायकामुलांसह दिल्लींतच राहूं इच्छिणाऱ्याला ती गोष्ट करणं शक्य नाहीं. जमीनधारा देणाऱ्या हिंदू प्रजेवर, हिंदू शिपायांवर आणि हिंदू सेनानायकांवर माझ्या सत्तेची भिस्त आहे–माझा सेनापति मालिक हा हिंदु आहे. माझ्याकरतां चितोडचा राजा हा पाच हजार सैन्याचा सेनानायक आहे. "

" पण जहांपनाह, गुलाम सुलतान देखील दिल्लींतच रहात होते ना? "

" आपण बोलतांना गांगरण्याचं कारण नाहीं. मी चंचल नि रागीट आहे असा जरी प्रवाद असला तरी देखील मला विरोधी विचार ऐकून घ्यायला हरकत वाटत नाहीं. गुलाम घराण्याची सत्ता झाडावरच्या पांखरांप्रमाणं होती. मोंगलांच्या टोळधाडीपासून हिंदुस्थानांतली इस्लामी सल्तनत जशीच्या तशी सुरक्षित राहिली. मोंगलांसारखा जबरदस्त दुष्मन मुसलमानांना कधीं भेटलाच नव्हता याची खबर हिंदूंना नव्हती म्हणून बरं, नाहीं तर त्यांनीं जरा जरी मोंगलांचा शह दिला असता तरी हिंदुस्थानच्या जमिनींत नुकतंच लागलेलं इस्लामचं नवं रोपटं उपटल्या गेलं असतं. चंगीझखानाचे वंशज दुनियेतल्या सर्वांत मोठ्या सल्तनतीवर–चीनवर–आपली हुकमत गाजवीत आहेत, हें आहे ना ठाऊक? "

" आहे माहिती, हुजूरबाला! " मुल्ला म्हणाला.

" आणि तो वंश समनी (बौद्ध) धर्म पाळतो. "

" समनी ! –त्या धर्माचे पुष्कळसे मठ नि मंदिरं जाळलीं, नष्टभ्रष्ट केलीं तरी देखील कुफ्राचं साकार स्वरूप असलेला तो धर्म हिंदुस्थानच्या भूमींतून उखडूं शकला नाहीं. "

" कुफ्राचं साकार स्वरूप तोच धर्म कां म्हणून ? "

" जहांपनाह, हिंदु ब्राह्मणांचा धर्म निदान सृजनहार अल्लाची तरी आठवण ठेवतो, परंतु समनी धर्म तर देवाचं अस्तित्वच मान्य करायला तयार नाहींत. "

" चंगीझखानाचे वंशज, आजच नव्हे तर त्याचा नातु कुबलाखान याच्या काळापासून, स्वतःला समनी धर्माचे अनुयायी मानतात. इतकंच नव्हे तर खुद्द चंगेजच्या फौजेंत मोंगलांपैकीं बरेचसे सैनिक व अधिकारी समनी होते. बुखारा, समरकंद, बलख इत्यादि इस्लामी दुनियेंतल्या शहरांतलीं मुसलमानी संस्कृतीचीं सगळीं केंद्रे त्यांनीं निवडून निवडून धुळीस मिळवलीं. त्यांनीं आमच्या स्त्रियांना सरसकट दासी करतांना उच्चनीच घराण्यांचा जरा देखील विचार केला नाहीं. मुलांची निष्ठूरपणानं कत्तल उडवली. या साऱ्या अत्याचारांना प्रोत्साहन देणारे तेच समनी मोगल होते. ते म्हणत–'अरबांनीं आमचे विहार धुळीस मिळवले, आमची शहरं जाळलीं, आमचीं आमचीं बालकं मारलीं, आम्ही त्याचा सूड घेणार. आतां विचार करा, जर मोंगलांनीं हिंदी समनी ( बौद्धां ) बरोबर संगनमत करून हिंदूंना आपल्या बाजूला ओढून घेतलं असतं, तर मग इस्लामची कोणती गत झाली असती ? "

" बर्बादी झाली असती, जहांपनाह ! "

" म्हणूनच म्हणतों कीं आम्हांला वाळूच्या भुसभुशीत पायावर आपल्या राज्याची इमारत उभारायची नाहीं. आम्हांला गुलाम घराण्याची नक्कल करायची नाहीं. "

आतांपर्यंत वजीर गप्प बसलेला होता. त्यानें आतां तोंड उघडलें–"पण सर्कार –आली ! गांवांतल्या अमल्यांची ताकत आपण खच्ची केली तर मग तिथं सल्तनतीचा हुकूम कशाच्या जोरावर चालेल ? "

" जेव्हां हे रेशमी वस्त्रं घालणारे आणि घोडे उडविणारे अमले नव्हते तेव्हां कशाच्या जोरावर चालत असे, आहे ठाऊक ? "

" नाहीं, याची चौकशी केली नाहीं मी. "

" मी केली ना पण ! जेव्हां शासकांनीं स्वतः लुटारूची भूमिका घेतली तेव्हां लुटारू अमले नेमले; असंच होतं सगळ्या जागीं सर्व काळ! पण त्याच्या आधीं प्रत्येक गांवांत पंचायत असायची. गांवच्या पाण्याढाण्याचा, तंट्याभांडणाचा इतकंच काय पण सरकारला जमीनधारा देण्याचा देखील सारा बंदोबस्त ही पंचायत करायची. राजा गांवामधल्या कोणत्याहि एका व्यक्तीबरोबर संबंध ठेवीत नसे. त्याचा संबंध

केवळ पंचायतींबरोबर. जमीनधारा देणारे किसान आणि तो स्वतः यांची सांगड घालून देणारा दुवा म्हणजे या गांवपंचायती होत हें तो समजून असे. ”

“ तर मग जहांपनाह, शंभर वर्षांपासून नष्ट झालेल्या या गांवपंचायती आपणांला पुनः जिवंत कराव्या लागतील. ”

“ या शिवाय अन्य मार्ग नाहीं. जर इस्लामी सल्तनत या देशांत मजबूत करायची असेल तर प्रजेला संतुष्ट आणि सुखी ठेवण्याचे हर मार्गानं प्रयत्न केले पाहिजेत. यासाठीं आपल्याला हिंदू प्रजेचे रीतिरिवाज, कायदेकानू, यांच्याकडे दुर्लक्ष्य करून चालणार नाहीं. दिल्लीच्या सल्तनतीमध्यें इस्लामी शरीअत ( कायदा ) ऐवजीं सुलतानी शरीअत अंमलांत आणावी लागेल. इस्लामचा प्रचार करणं हें मुल्लांचं काम आहे. त्यासाठीं आम्ही वजफि देऊं शकतों. सूफी लोकांनीं आपलं काम करावं. आणि ते चांगल्या रीतीनं करतात देखील. त्यांच्या खानकाहांना ( मठांना ) आम्हीं रोख पैशाची मदत देऊं, किंवा त्यांना इनाम जमिनी देऊं. ”

– २ –

पावसाळा लोटलेला होता, तरी पण अजून देखील ताल-तलाव तुडुंब भरलेले होतेच. मोठमोठ्या बंधाऱ्यानीं वेढलेलीं भातखाचरें पाण्यानें भरलेलीं होतीं. त्यांतल्या उभ्या धानाचे हिरवे हिरवे पुंज वाऱ्यावर डुलत होते. चहूं बाजूंना पसरलेल्या मगधामधल्या हिरव्या हिरव्या ताटव्यांमध्यें हिल्सा (पाटणा) हे मोठें गांव वसलेलें होतें. गांवांत कांहीं व्यापाऱ्यांचीं घरें पक्क्या विटांचीं होतीं, बाकीचीं जीं किसानांचीं आणि कारागिरांचीं होतीं, तीं गवताचीं किंवा कवलारांचीं होतीं. या शिवाय जीं ब्राह्मणांचीं घरें होतीं त्यांतलीं कांहीं बऱ्या स्थितींत होतीं. शंभर वर्षां आधीं महंमद बिन बख्त्यार खिलजीच्या सैन्यानें हिल्साचीं मंदिरें उध्वस्त करून टाकलीं होतीं. तेव्हांपासून त्या देवळांच्या खंडाऱ्यांतूनच हिंदू आपली पूजाअर्चा करीत असत. गांवाच्या पश्चिम टोंकाशीं बौद्धांचे मठ होते. त्यांतल्या प्रतिमागृहांची पडझड झालेली असली तरी घरें अजूनहि शाबूद होतीं. मठांत शिरलें तर तेथील रहिवाशांना बघून असें कोणीहि म्हणूं शकत नव्हतें कीं तेथून बौद्ध भिक्षू निघून गेले असतील.

त्या दिवशीं संध्याकाळीं मठाबाहेरील दगडाच्या लहानशा चबुऱ्यावर एक मध्यम वयस्क पुरुष बसलेला होता. त्याच्या अंगावर पिवळें काषायवस्त्र होतें. त्याच्या डोक्याचें आणि भिवयांचें मुंडण केलेलें होतें. दाढी मिशी फारच लहान दिसत होती, असावी एखाद्या आठवड्याची वाढलेली. त्याच्या हातांत काष्ठांची माळ होती. तो आश्विनी पुनवेचा दिवस होता. गांवांतले स्त्रीपुरुष अन्नाचीं ताटें, कापडचोपड आणि इतर जिनसा त्या काषायधारी पुरुषापुढें ठेवून त्याला हात जोडीत, आणि तो वरदहस्त करून स्मितमुखानें त्यांना आशीर्वाद देत होता.

हें काय ? हिल्साचा जुना बौद्ध मठ तर नष्ट झालेला आहे ना ? होय, पण श्रद्धा ही मठाबाहेर भक्तांच्या अंतःकरणांत वसत असते. आज हिल्सांतल्या त्या काषायधारी बाबांना पाहिलें तर त्यांना बौद्ध भिक्षु शिवाय इतर कोणतें नांव देतां येईल ? ते अविवाहित आहेत, इतकेंच नव्हे तर त्यांच्या आधींचे चार गुरु देखील अविवाहित काषायधारी होते. हिंदु किंवा बौद्ध यांच्यांतून मुसलमान बनलेल्या दहापांच घरांतलीं माणसें त्याला ' खानकाह ' म्हणतात; ब्राह्मण आणि कांहीं बनियेहि याला मठ म्हणत नाहींत, पण बाकी साऱ्या गांवाचा अजूनहि तो विहार–मठ–आहे. त्यांतल्या बाबांची पूर्वी देखील कोणतीच जातपात नसायची, आतां या नव्या बाबांना देखील जात नाहींच. त्यांच्याप्रमाणेंच हे नवे बाबा काषाय वापरतात, अविवाहित आहेत, कोणी आजारी पडलें तर हेच लोकांची भूतें प्रेतें झाडतात, मरणाधरणाच्या वेळीं हेच अलख-निरंजन-निर्वाणाचा उपदेश देऊन लोकांचें सांत्वन करतात. म्हणूनच आज शरद् पौर्णिमेच्या प्रावारणाच्या दिवशीं लोक पूर्वीच्या रिवाजाप्रमाणे या मुस्लीम भिक्षूंचीहि पूजा करीत आहेत. आणि कारागीर मुसलमान जसे आधी बौद्ध भिक्षूंना आपले पूज्य गुरु मानीत तसेच आतां आपल्या बाबांना आणि त्यांच्या काषायधारी चेल्यांना मान देऊं लागले.

खानकाहमधल्या जुन्या महन्तांच्या ( पीरांच्या ) समाधीना ( कबरांना ) वंदन करून हळूहळूं गांवकरी परतूं लागले. रात्र होताच दुधासारखें चांदणें चहुंकडे पसरलें. अशा वेळीं कारागिरांच्या वस्तीकडून दोघां माणसांच्या बरोबर एक जण आंगणाकडे येतांना दिसला. जवळ आल्यावर बाबानें मौलवी अबुल अलाईला ओळखलें. त्याच्या डोक्यावर पांढरा शुभ्र अमाया, अंगांत लांब पायघोळ आंगरखा ( चोगा ) व पायजमा आणि पायांत जोडा होता. त्याची काळी दाढी हवेच्या इवल्याशा झोतानें हलत होती. बाबा उठून उभे झाले आणि दोन्ही हात पुढें करून मधुरपणानें म्हणाले– " आइये, मौलाना अबुल अलाई, अस्सलाम अलैक ! "

बाबानें मौलानाचे मागें सरणारे हात आपल्या हातांत घेऊन त्याला आपल्या जवळ ओढून घेतलें. मौलानानें देखील मनाविरुद्ध ' वालेकुमस्सलाम ' केला.

बाबानें उघड्या चबुतऱ्याजवळ त्याला नेऊन म्हटलें–" मौलाना साहेब, आमचं तख्त म्हणजे हा नंगा पथ्थर; तशरीफ रखिये."

मौलाना बसल्यावर बाबा देखील बसले. प्रथम बोलायला प्रारंभ केला मौलानानेंच.

" शाहसाहेब, इथं जेव्हां काफिरांची भीड जमलेली होती, तेव्हांच मी थांबून इथला तमाशा घेतला बघून ! "

" तमाशा म्हणा वाटल्यास, पण मौलानासाहेब, काफिर म्हणूं नका. नूरच्या काळजाला तीर लागतो त्यामुळं ! "

" हे हिंदू काफिर नव्हत तर कोण ? "

" सर्वांच्या ठायीं तोच नूर सामावलेला आहे. नूर आणि कुफ्र हे प्रकाश आणि अंधार यांच्या प्रमाणंच एकत्र नांदूं शकत नाहींत. "

" हा तुमचा सारा तसव्वुफ ( वेदांत ) इस्लाम नसून चकवेगिरी आहे. "

" मी आपल्या विचारांना चकवेगिरी म्हणत नाहीं. 'नदी एक पण घाट अनेक' असं मानतो मी. आपण सर्व माणसांना खुदाची लेकरं मानतां कीं नाहीं ? "

" होय, मानतों तर ! "

" आणि खुदा मालिक सर्वशक्तिमान आहे हेंहि मानतां ना ? "

" होय. "

" मौलाना, जिथं माझ्या त्या सर्व शक्तिमान मालकाच्या हुकमा शिवाय झाडाचं पान देखील हालूं शकत नाहीं, तिथं तुम्हीं आम्हीं अल्लाच्या या लेकरांना काफिर म्हणणारे कोण ? अल्लाच्या मनांत असतं तर तो सर्वांना एकाच मार्गानं जाऊं देता; तो तसं करीत नाहीं, याचा अर्थच हा कीं त्याला सगळेच मार्ग पसंत आहेत. "

" शाहसाहेब, मला हा खोटा वेदांत सांगूं नका. "

" पण मौलानासाहेब, हें जें मी सांगितलं तें इस्लामच्याच दृष्टिकोनांतून. आम्हीं सूफी तर भक्त आणि भगवंत यांत फरक समजत नाहीं. आमचा कल्मा ( महामंत्र ) असा आहे, 'अन-ल्-हक्' ( मी सत्यदेव आहे. ), 'हम-ओ-स्त' ( सगळं कांहीं तें ब्रह्मच आहे. ). "

" कुफ्र आहे हें ! "

" हें झालं तुमचं मत. आधीं देखील बऱ्याच जणांना असंच वाटत होतं, पण सूफींनीं आपल्या रक्तानं या सत्यावर शिक्का मोर्तब केलेलं आहे. आणि गरजच पडली तर आणखीहि करूं. "

" तुमच्या सारख्यांच्या मुळंच इथं इस्लाम पसरूं शकत नाहीं. "

" आम्हीं तुमच्या आगी आणि तलवारी यांचा मनापासून धिःकार केला असला तरी त्यांचा कांहीं या हातांनीं प्रतिकार केलेला नाहीं; मग सांगा किती यश मिळालं आपल्याला ? "

" तुम्हीं लोक त्यांचा धर्म सत्य आहे असं सांगतां. "

" होय, कारण महान् सत्याला बंधनांत बांधून ठेवण्याचं सामर्थ्य आमच्यांत नाहीं. इस्लाम जर आपल्या शहीदांमुळं सच्चा ठरला, तसव्वुफ (वेदान्त) जर आपल्या शम्समन्सूरांच्या शहादतीमुळं सच्चा ठरला, तर हिंदूंनीं देखील तुमच्या तलवारींखालीं हंसत हंसत माना वांकवून हिंदू मार्गाचा सच्चेपणा शाबीत केलेला आहे. "

" हिंदू मार्ग आणि सच्चा! हिंदूचा रस्ता पूर्वेकडला तर आमचा पश्चिमेकडला; बिलकुल उलटा!"

" इतका उलटा असता तर आज संध्याकाळीं गांवामधल्या या किसानांनीं मुसलमानी मठाची पूजा केली असती का? काय आपणाला मुसलमानांत जरा देखील हिंदूपण दिसावंसं वाटत नाहीं मौलाना साहेब?"

" होय, नाहीं वाटत."

" तर मग जा आणि आमच्या सधवा मुसलमानणींच्या भांगांतला शेंदूर धुवून काढा."

" अलबत धुवून काढीन."

बाबानें हंसून म्हटले– " या जन्मीं तरी शक्य नाहीं. जुम्मन, बेटा सांग यांना, तुझी सलीमा ऐकेल यांचं?"

जवळच उभ्या असलेल्या जुम्मनने उत्तर दिलें- " नाहीं बाबा. मौलवी साहेबांना कळत नाहीं. शेंदूर फक्त विधवांचा पुसण्यांत येतो."

बाबा आपलें बोलणें पुढें चालू करून म्हणाले, " क्षमा करा मौलवी अबुल-अलाई, आम्हीं सूफी इथं रहात असतों तें कुणा सुलतानानं फेंकलेल्या चतकोरावर किंवा कुणा अमीराच्या दानधर्मावर नव्हे. इथं आम्हीं कफनी लंगोटी लेवून आलों. कुणाहि हिंदूनं आमच्यावर तलवार उगारली नाहीं. हाच खानकाह पहा ना, आधीं इथं समनींचा विहार होता. माझ्या गुरुपरंपरेंतले माझ्या आधींचे पांचवे गुरु समनी (बौद्ध) फकीराचे चेले होते. देखादेखी नाहीं, तर ते बुखाऱ्याहून आल्यानंतर त्यांच्या (समनींच्या) तसव्वुफमुळं आकर्षित होऊन चेला झाले होते ते. तसव्वुफ (वेदान्त) सगळ्यांचा एकच आहे, मग बाहेरच्या स्वरूपाशीं त्याचं कसलंहि भांडण नाहीं. मग तें स्वरूप समनींचं असो, हिंदूंचं असो कीं मुसलमानाचं. आमच्या त्या गुरूनंतर हा खानकाह मुसलमानी नांव असलेल्या फकीरांचा झाला. आम्हीं स्वरूप बदलण्यावर भर न देतां प्रेमभाव शिकवला. त्याचं फळ बघतांच आपण; गांवागांवांतून आमचा तिटकारा करणारे क्वचितच सांपडतात. पंडितांनीं जडता शिकवली पण त्यांना प्रेमाचा पंथ ओळखतां आला नाहीं; आपणांलाहि ओळखतां आला नाहीं. म्हणूनच जुम्मनच्या बाप-दाद्यांनां हिंदू नांवांऐवजीं मुसलमान नांवं ठेवावीं लागलीं आणि आतां त्यांच्या घरीं तुमची देखील मान प्रतिष्ठा होऊं शकते."

– ३ –

चैत्राचा महिना संपून गेला. पल्लवित होणाऱ्या वृक्षांना नवी पालवी फुटलेली होती. यंदा आंब्यांना मोहर खूपच आलेला होता, त्यामुळें त्यांचीं जुनीं पानें गळायचीं थांबलेलीं होतीं. या झाडांखालीं खळीं लागलेलीं होतीं; इथें दुपारच्या उन्हाच्या

झळा लागत असून देखील किसान डवरणें वखरणें करीत होते. अशा वेळीं कोणी एक मुशाफर थकला भागला, उन्हामुळें घामाघूम होऊन त्या खळ्यांतल्या एका झाडाच्या सांवलींत येऊन बसला. मंगल चौधरांनें त्याचा चेहरा मोहरा पाहून ओळखलें कीं मुशाफर परदेशी असावा. जवळ येऊन त्याने म्हटलें–" रामराम भैय्या. या अशा उन्हांत चालणं म्हणजे मोठं हिमतीचं म्हटलं पाहिजे."

" रामराम भय्या. ज्याला चालायचं असतं त्यानं उन्हातान्हाकड बघून कसं निभेल ?"

" पाणी घ्या पिऊन, भय्या. तोंड कसं सुकून गेलं. घड्यांत गार पाणी आहे तिथं."

" जात कुठली तुमची ?"

" अहीर; मंगल चौधरी माझं नांव."

" चौधरी, लोटा-दोरी आहे माझ्यापाशीं, विहीर दाखवून द्या. ब्राह्मण आहे मी."

" म्हणाल तर आपल्या पोराहातून मागवून देतों, पंडतजी."

" थकलोंय मी. द्या मागवून चौधरी."

" बेटा घीसा, इकडे ये बरं जरा." मुलाला बोलावून मंगल चौधरीनें वखर थांबवला आणि त्याला विहिरीचे ताजें पाणीं व गुळाची एक वाटी आणायला सांगितलें.

" मुशाफरानें विचारपूस केल्यावर म्हटलें– " दिल्ली तर अजून वीस कोस दूर आहे, आज कांहीं पोंचणं शक्य दिसत नाहीं."

मंगल चौधरी गमत्या गडी होता. स्वतःहि हंसतमुख, दुसऱ्यालाहि तसाच हंसवायचा. आपल्या तोंडाला मुसक्या लावून बसणें त्याला कठिण वाटायचें.

चौधरी म्हणाला–" यंदा आमच्या इथं भगवानाच्या कृपेनं पीकपाणी ठीक झालं. वैशाखांत देखील खळ्याची वाही होणं कठीण दिसतं. पंडतजी, तुमच्याकडे कसा काय आहे हंगाम ?"

" हंगाम कांहीं वाईट नाहीं, चौधरी."

" राजा चांगला असला कीं देवता देखील प्रसन्न होतात पंडतजी. नवा सुलतान गादीवर आल्यापासून प्रजा अगदीं सुखांत आहे."

" अस्सं ? तुम्हांला असं वाटतं चौधरी ?"

" या खळ्यांतल्या राशी तर तुम्हीं पाहिल्याच पंडतजी. दोन वर्षांआधीं बघितल्या असत्या तर चौथाई देखलि आढळल्या नसत्या."

" आतां हंगाम चांगला सुधारला, चौधरी."

"सुधारला हें तर खरंच, पण सुलतानाच्या नियतीनं बरकत आली ही पंडतजी. आधीं आम्हीं किसान उघडे उपाशी वणवण करीत होतों आणि तूप रोट्या खाणारे हे अंमले रेशमी पोशाख घालून घोडे उडवीत. गहूं वीतभर देखील वाढत नसे तोंच यांचे घोडे आमच्या शेतांत गोळा होत. आम्हांला तोंड देखील उघडायची उजागरी नव्हती. आमच्या गांवगाड्यांतले सुलतान तर हेच लोक होते."

याच वेळीं मंगल चौधरी प्रमाणेच गुडघ्यापर्यंत धोतर, अंगांत मळकी चौबंदी, डोक्याला चिकटून बसलेली पांढरी टोपी या पोशाखांत दुसरा एक चौधरी तेथें आला आणि त्यानें मध्येच तोंड घातलें–"आणिक चौधरी, आतां पहा ना, कुठं गेला त्यांचा दिमाख ? आतां लेकाचे दाण्यादाण्याला मोहताज झालेले वणवण करून राहिले आहेत. मला म्हणत होता तो बामणाचा–काय नांव त्याचं चौधरी ?"

"सिब्बा."

"आतां सिब्बा म्हणतोस, पण तेव्हां पंडित शिवराम होता. म्हणत होता–'चौधरी छेदाराम, दोन मण गहूं द्या. पैसे हातीं येतांच देऊन टाकीन.' तोंडावर नाहीं म्हणणं बरं दिसलं नाही, पण आठवतं मला कीं हा बामण्या तेव्हां एका शब्दानं देखील सरळ बोलायचा नाहीं. 'अबे छिद्दे' शिवाय त्याच्या तोंडून कधीं मी शब्द ऐकला नव्हता."

"पण आतां तूं झालास चौधरी छेदाराम, आणि मी बनलों चौधरी मगलराम. मंग्याचा आणि छिद्याचा या अडीच वर्षांत कायापालट झाला."

"मी सांगतों चौधरी, ही सगळी त्या सुलतानाची दया बरं. नाहीं तर आपण सगळे छिद्या आणिक मंग्याच राहिलों असतों."

"हेंच मी या पंडितजींना सांगत होतों."

"आमची पंचायत पुन्हां चालू झाली नसती तर आम्हांला हे दिवस दिसलेच नसते."

"चौधरी मंगलराम, तूं हातांत लेखणी पण धरूं शकत नाहींस तरी पण गांवाचा सरपंच देखिल झालास. निभवतोस कीं नाहीं सारा कारभार! अमले ते तसले; इकडे बनिये येत, दोन रुपयांच्या मोलाचं धान्य एका रुपयांत उचलून नेत. जेठाचा महिना सरला नाहीं तोंच घरांत उंदीर खडबडूं लागत."

"तेंच तर सांगत होतों मीं. आमच्या सुलतानाला लाख वर्षांचं उदंड आयुष्य लाभो."

प्रवासी ब्राह्मण या गांवढ्या अहीराच्या स्तुतीच्या बोलण्यानें स्वतःशींच कुढत होता. बोलायला संधी मिळावी म्हणून टपला होता तो. गूळ खाऊन पाण्याचे दोन घोट घेतल्यावर तर तो अधिकच उतावीळ झालेला होता. त्या चौधऱ्यांच्या

बोलण्याचें चऱ्हाट थांबण्याचें चिन्ह न दिसल्यामुळें त्यानें मध्येंच हटकलें-" सुल्तान अल्लाउद्दीन यानं तुम्हां लोकांना पंचायत दिली- "

" होय पंडत. तुझ्या तोंडांत तूप साखर पडो. पण पंडत, ठाऊक नाहीं कुणी आमच्या सुलतानाचं नांव अलाभदीन ठेवलं तें. आम्हीं तर आमच्या गांवात त्याला लाभदीन म्हणतो. "

" चौधरी, तुम्हीं कोणतंहि नांव ठेवा. पण त्या सुलतानानं हिंदूंवर किती जुलूम केला, हें आहे का ठाऊक ? "

" आमच्या अहिराणी तर पदर न घेतांच छाती वर करून शेता रानांतून दिवसा रात्रीं केव्हांहि जातात, त्यांना तर कोणीच उचलून नेत नाहीं. "

" अब्रूदार घराण्यांतल्या बायकांची इज्जत घेतात. "

" अस्सं पंडत ! आम्हीं सारे जर बेइज्जतदार तर आणखी साले कोण इज्जतदार आहेत ? "

" चौधरी मंगलराम, तुम्ही तर शिव्याच द्यायला लागलांत. "

" ऐका पंडत; तुम्हांला सांगून ठेवतो. ज्या दिवशीं आमची पंचायत आम्हांला परत मिळाली, त्याच दिवशीं आमची इज्जत देखील परतून आली. आमिल अमले तेव्हां कसे इज्जतदार बनले होते हें आतां आम्हांला समजलं. हिंदू-हिंदू आणि मुसलमान-मुसलमान सांगतां तुम्हीं, पण जे कोणी आमिल-अंमले होते ते सगळे एकाच पाण्यानं धुतलेले होते. आणि सांगूं ? त्यांतले बहुतेक सारे हिंदूच होते. "

" चौधरी छेदारामनें एक मुद्दा गळलेला पाहून म्हटलें-" आणिक आम्हां लोकांना सांगत असतात, हिंदु-मुसलमान वेगवेगळे आहेत. पाहिलं नाहीं तुम्हीं चौधरी ! आपल्याला हिंदु ब्राह्मण म्हणवणारे हे आपल्या स्त्रियांना साता पडद्या-आडच्या बेगमा बनवूं पाहतात. "

" तर काय ! चौधरी, माझे आजोबा असं सांगत होते कीं त्यांनीं कनोज आणि दिल्लीच्या राण्या उघड्या माथ्यानं घोड्यावर मिरवतांना पाहिलेलं होतं. "

" ब्राह्मण म्हणाला-" पण चौधरी, त्यावेळीं कोणी मुसलमान आमची अब्रू घ्यायला नव्हते इथं. "

" आज देखील आमची अब्रू देखील मळ्यांखळ्यांतून उघड्या माथ्यानं हिंडू फिरूं शकते. कोणीहि हात लावूं शकत नाहीं. "

" नाहीं म्हणायला जेव्हां त्या ब्राह्मणाची-शिव्याची-चलती होती तेव्हां लागायचं हात-बोट, चौधरी मंगलराम. "

" हे फुकटखाऊ एकमेकांची आणि दुसऱ्याची इज्जत घेण्यापलीकडे दुसरं काय करूं शकतात ? हा हिंदु-मुसलमानांचा प्रश्न नाहीं पंडतजी, आयतोबांचा आहे.

हाडाचे पक्के हिंदु आम्हीं आहोंत, पंडितजी! आमच्या बायका कधींहि साता पड्यां-आड राहूं शकणार नाहींत."

ब्राह्मणानें पुन्हां एकदां तोंड उघडण्याचें साहस केलें–"अरे चौधरी, तुम्हां लोकांनीं ऐकलं नसेल. सुलतानाचा सेनापति मलिक काफूर यानं दख्खन मध्यें जाऊन आमची देवळं तोडलीं, देवमूर्ति पायाखालीं तुडवल्या."

"पुष्कळ ऐकलं आम्हीं पंडत! एकदां नाहीं हजारदां. मुसलमानी राज्यांत हिंदूंचा धर्म नाहीं. पण आम्हीं दिल्लीच्या पुष्कळच जवळ राहतों म्हटलं पंडत; नाहींतर आम्हींहि ठेवला असता तुमच्या सांगण्यावर विश्वास. आमच्या या वीस कोसांच्या शिवारांत तर कोणतं देऊळ पाडलं नाहीं, किंवा कोणतीहि मूर्ति पायदळीं तुडवलेली नाहीं."

"चौधरी मंगलराम, काय ऐकतोस यांचं. साफ खोटं आहे हे. तुझं तर माझ्या पेक्षांहि अधिकदां दिल्लीला जाणं येणं असतं. मी कितीदां तरी दिल्लीला दसरा पहायला गेलों होतों. केवढा भारी जमाव असतो–अर्ध्याहून अधिक तर स्त्रियाच असतात. हिंदूंची यात्रा–यात्रेकरू देखील अधिकतर हिंदूंच. देवतांना सजवून धजवून सुलता-नाच्या महालापुढून मिरवत नेतात. सगळे शंख, नगारे, पोंगाडे वाजवीत जातात. आणि सुलतान हें सारं झरोक्यांतून पहात असतो."

"तर काय. यांचं खोटंच आहे मुळी. आतांच पहा ना. सेठ निक्कामल महाला-पासून शंभर गजांच्या फासल्यावर एक मोठं देऊळ बांधून राहिले. किती लाख लागतील कोण जाणे. मागें गेलों होतो तेव्हां दगडांच्या राशी पाहिल्या, आतां गेलों होतों तेव्हां कंबरभर भिंत चढली होती. आतां सुलतानाला देवळं तोडायचीच असतीं तर त्यानं आपल्या डोळ्यांदेखत आधी हें देऊळ होऊं तरी दिलं असतं का?"

"खरं आहे चौधरी, राजाराजांत लढाई व्हायचीच. लढाईंत कोण कशाची पर्वा करतो. कांहीं झाली असेल पडझड, त्याचा हा येवढा बाऊ करतात झालं. शंभर वर्षां आधीं आमच्या आसपासच्या मुलखांत अशा गोष्टी घडल्या होत्या, पण आतां जरा देखील कानावर येतं का कांहीं?"

"आठवतं? आपण कितीक गांवांचे लोक मनसबदाराच्या पडावावर गेलों होतों तेव्हां त्यानं काय म्हटलं होतं? म्हणाला–आधींचे सुलतान रात्रीपुरती झाडावर वस्ती करणाऱ्या पांखराच्या जातीचे होते. पण आमचा सुलतान लाभदीन आमच्या घरांत राहणारा असून तो आमच्या सुखदुःखाचा वांटेकरी होईल. या साठींच तो प्रजेची लूट होऊं देत नाहीं, तिला सुखी ठेवूं इच्छितो."

"आतां इच्छेचा प्रश्नच नाहीं. चहूंकडे पहाल तिथं लोक सुखी असलेलेच आढळतील."

दिल्लीच्या बाहेर शांत नीरव कबरस्तान होतें, जवळच कांहीं निंबा-चिंचेचीं झाडें होतीं. रात्रींत माघाची कडक थंडी हुडहुडत होती. पेटवलेल्या लांकडाच्या धुनीपाशीं दोन फकीर बसलेले होते. त्यापैकीं एक आपल्या ओळखीचे बाबा नूरदीन होते. दुसऱ्या फकीरानें आपली पांढरी दाढी-मिशी दोन्ही हातांनीं गोंजारून म्हटलें–"बाबा, पांच वर्षात पुन्हां या हिरवळींत दुधाच्या नद्या वाहूं लागल्या."

"खरं बोललांत, बाबा ज्ञानदीन! आतां किसानांचे चेहेरे हंसीखुषीनं प्रफुल्लित दिसूं लागले."

"बाबा, जेव्हां शेतं हांसूं डोलूं लागतात तेव्हां चेहेरे देखील हांसतात-डुलतात."

"आमिल-अमले गेले, बरं झालं. तसेच या बनियांनीं आणि सावकारांनीं काळं केलं असतं तर इथं आनंदीआनंद नांदला असता."

"अगदीं लुटून नेतात हे. आणि त्यांचे हे मोठमोठे मठ, देवळं–सदावर्तं याच लुटीवर चाललेलीं असतात."

"म्हणतात ना, धनी उरले नाहींत म्हणजे धर्म नाहींसा होईल. मी म्हणतो, जोंपर्यंत धनी असतील तोंपर्यंत या जगांत अधर्माचंच पारडं जड राहील."

"ज्ञानी-ध्यानी, पीर-पैगंबर, ऋषि-मुनि यांच्याहून वरचढ धर्माला अनुसरणारे आहेत का कोणी? पण त्यांच्या जवळ एक कांबळं, आणि एक कफनी यांच्या शिवाय दुसरं काय असतं?"

"जोंपर्यंत गरीबांच्या कमाईच्या मलिद्यावर पुष्ट होणारे श्रीमंत आहेत तोंपर्यंत मानवांत बंधुत्वाची भावना निर्माण होऊं शकत नाहीं आणि सुलतान देखील माणसामाणसांत भेदभाव निर्माण करणारी एक एकवटलेली माया आहे. पण जर कामकऱ्यांच्या कमाईचे लचके त्यानं तोडले नाहींत तर त्याचा देखील डामडौल चालायचा नाहीं."

"मित्रा, एक दिवस असा उजाडेल कीं तेव्हां हे सगळे गोरख धंदे नाहींसे होतील आणि या पृथ्वीवर सर्वत्र ममतेचं व प्रेमाचं राज्य कायम होईल. त्या दिवसाच्या उगवण्याची आपण आशेनं प्रतीक्षा करूं या."

---

# १६–सुरैय्या

( काळ––इ. स. १६०० )

– १ –

पावसाळयांतल्या माताळ पाण्याचे लोट चहूंकडे पसरलेले दिसत होते. पाणी सपाट जमिनीवर हळूंहळूं फैलावत होतें तर उतारावरून वेगानें वाहात होतें. नदी-नाल्यांच्या आसपासच्या पहाडी दऱ्यांनीं विस्तृत नदी-प्रवाहाचें स्वरूप धारण केलेलें होतें. वृक्षांनीं जणूं अद्याप पाऊस रोखून धरलेला होता; त्यांच्यामधून मोठाले पाण्याचे थेंब अजूनहि टपकत होते. आतां पावसानें देखील रिचवण्याचें सोडून भुरभुरणाऱ्या तुषारांचें स्वरूप धारण केलेलें होतें.

एकाकी शमी वृक्षाच्या खालीं बुंध्यापासून जरा लांब एक श्वेतवसना तरुणी उभी होती. तिच्या माथ्यावरली शुभ्र ओढणी जरा मागें सरकली होती. डोक्यावरल्या भ्रमरासारख्या काळ्या केसांचे भांगामुळे दोन भाग पडलेले असून हिमालयाच्या वनश्रीमधून वाहणाऱ्या गंगेच्या रुपेरी प्रवाहाची आठवण भांग बघून होत होती. तिच्या कानांजवळ रुळणाऱ्या काळया कुरळया केसांच्या बटांमधून अजून देखील एखाद दुसरा थेंब निथळत होता. तिच्या बर्फासारख्या गौर गंभीर चेहऱ्यावर शोभून दिसणारे मोठाले काळेभोर डोळे दूरवर कसल्या तरी वस्तूचा शोध करीत भिरभिरत होते. गुढग्यापर्यंत लोंबणारा तिचा रेशमी सदरा भिजल्यामुळें वक्षःस्थलाला चिकटून गेलेला होता; आणि त्यांमुळें लाल आंगोशीनें बांधलेल्या तिच्या नारिंगायेवढाल्या स्तनांचा उभार फारच सुंदर भासत होता. सदऱ्याच्या वेटोळ्यामध्यें भुलून गेलेल्या कंबरे पासून खालवर एक पायजामा होता. खालच्या भागांत निमुळत्या आकारामुळें पातळ पायजामा पिंडऱ्यांना चिपकून त्यांच्या आकाराचे चढउतार दाखवीत होता. मातीनें भरलेल्या पांढऱ्या मोजांवर लाल जोडे होते. ते भिजल्यामुळें अधिक नरम झाले होते आणि बहुधा त्यामुळेच चालायला देखील अयोग्य झालेले होते.

तरुणीच्याकडे एक तरुण येतांना दिसला. त्याची लफ्फेदार पातळ पगडी, अचकन, पायजामा—सारें कांहीं पांढरें होतें आणि आतां भिजून चिंब झालेलें होतें. जवळ आल्यावर देखील ती तरुणी आपल्याकडे वळून पहात बघत नाहीं, असें त्याला आढळलें. पावलांचा चाहाळ होऊं न देतां तो त्या तरुणीच्या जवळच दोन हातावर

एका कडेला उभा राहिला. ती तरुणी जरा अंतरावरून वहाणाऱ्या ओहळांतल्या गढूळ पाण्याकडे एकटक बघत होती. तरुणाला वाटलें आतां तरी त्याची सहचरी त्याच्याकडे बघेल. पण युगाप्रमाणें भासणारें कितीतरी क्षण लोटले तरी तरुणीचे नेत्र निश्चलपणें तसेच रोंखलेले होते. रिमझिम पावसानें ओलावलेल्या भिवयांतून गळणारे पाण्याचे थेंब टिपण्याचें देखील तिला भान नव्हतें. तरुणाला आतां अधिक वेळ राहवेना, त्यानें तिच्या खांद्यावर हळूंच हात ठेवला; तरुणीनें वळून पाहिलें. दूर कुठें तरी रोंखलेली दृष्टि आतां परतली. आणि तिच्या काळ्या टपोर डोळ्यांत तेज चमकूं लागलें. तिच्या निसर्गतः लाल ओंठांवर हास्य झळकलें आणि आंतून प्रस्फुटित होणारी पोंवळ्यांसारखी लाल नाजुक दंतपक्ति चमकूं लागली. तिनें तरुणाचा हात आपल्या हातीं घेऊन विचारले,–

" कमल, बराच वेळ झाला तुला येऊन ? "

" वाटतं किती तरी युगं लोटली. ब्रह्मदेवानं नुकतीच कुठं पाण्यानं पृथ्वी घडवायला सुरवात केली होती. पृथ्वी देखील अजून ओलीच होती, पर्वत, वृक्ष आणि प्राणी यांचा भार सहन करण्याइतकी ती मजबूत बनलेली नव्हती. "

" जा गडे कमल, तूं सदान्‌कदा कवितेतच बोलतोस ! "

" सुरैय्या, तुझं बोलणं खरं ठरलं असतं तर किती तरी बरं झालं असतं. पण मला माहित आहे कीं कविता माझ्या भाग्यांत नाहीं. "

" ही सुरैय्या, आपल्या बरोबरीनं दुसरी कुणी नारी नाहीं राहूं द्यायची म्हटलं!"

" असंच हें माझं हृदय देखील सांगतंय पण अशी देहभान विसरुन तूं कुणाचं चिंतन करीत होतीस, माझ्या सुरैय्या ? "

" विचार करीत होत्यें, खूप दूरचा–अगदीं दूरचा–कमल, समुद्र किती दूर असेल रे ? "

" अगदीं जवळ म्हटजे सुरतेला, एका महिन्याच्या वाटेवर ! "

" आणि हें पाणी कुठं जातं ? "

" बंगालकडे, पण तिथं तो आणखीच दूर आहे, दोन महिन्यांच्या वाटेवर बहुधा."

" या बिचाऱ्या डहूळ पाण्याला किती लांबचा प्रवास करावा लागेल ! कमल, तूं समुद्र पाहिलास ? "

" होय, प्यारी, बाबांच्या बरोबर ओरिसामध्यें गेलों मागं, तेव्हां पाहिला होता."

" कसा दिसतो ? "

" पुढं आकाशाला टेंकलेली काळी तरंगमय जलराशि. "

" या पाण्याच्या भाग्यांत तोच समुद्र आहे. त्याचा हाच गढूळ रंग तेव्हां राहील का ? "

" नाहीं ग, तिथं फक्त एकच रंग असतो; घननीळ, नाहीं तर काळा."

" मी देखील कधींतरी समुद्र पाहीनच; मात्र तुझ्या मनांत दाखवायचा असेल तर!"

" आतां मात्र पाण्याबरोबर चलायला तयार आहे मी, लाडके सुरैय्या. तूं नुसता हुकूम सोड."

सुरैय्यानें कमलच्या कंठांत आपला करपाश घालून आपला भिजलेला गाल त्याच्या भिजलेल्या गालाशीं टेकला, आणि मग कमलच्या उत्फुल्ल नेत्रांकडे पाहून ती म्हणाली—

" आपल्याला समुद्रांत जायचं आहे, पण या पाण्याबरोबर नाहीं कांहीं!"

" या ढहूळ पाण्याबरोबर नाहीं ना जायचं, लाडके?"

" ढहूळ नको म्हणूंस! हें आतां ढहूळलं. आकाशांतून पडलं तेव्हां होतं का ढहूळ?"

" नाहीं, त्या वेळीं याचा निर्मळपणा सूर्या-चंद्रापेक्षां देखील अधिक होता. बघ, त्यानं तुझ्या सुंदर केशगुच्छांना किती शोभा आणली ती? तुझ्या चंद्रासारख्या श्वेत कपोलांना किती मनोरमपणा आणला? आकाशांतून सरळ जिथं जिथं पडलं तिथं तिथं या पाण्यानं तुझ्या सौंदर्यांत भर टाकली."

" होय ना? तर मग हा त्याचा माताळ ढहूळपणा त्याचा स्वतःचा नसून, त्याला ज्यानं ज्यानं सागरसंगमापासून रोखून धरण्यासाठीं अडथळे आणले त्यांच्याशी संघर्ष केल्यामुळं प्राप्त झालेला आहे. थेट सागरांत पडणारे पावसाचे थेंब काय असेच गढूळ असतात कमल?"

" नाहीं, लाडके."

" म्हणूनच मी हा गढूळपणा या पाण्याचं दूषण समजत नाहीं, उलट भूषणच समजते. तुला काय वाटतं, कमल?"

" सुरैय्या, तुझे ओंठ माझ्याच हृदयांतले शब्द बोलून दाखवीत आहेत."

– २ –

नभांतला नीलिमा अतल पुष्करिणीचें जल आणिक जास्त निळें बनवीत होता. जलाच्या त्या नीलिम्यामुळें शुभ्र निर्मळ संगमर्मराचे घाट अधिकच पांढरे वाटत. पुष्करिणीच्या आजूबाजूला हिरवळीच्या गालिच्यामध्यें शिखराप्रमाणें उंचच उंच गेलेले हिरवे सुरूचे वृक्ष खूप सुंदर दिसत होते; विशेषतः या वसंत ऋतूंत मध्यान्ह-समयीं आणखीच सुंदर भासत होते. दूरवर पसरलेले वृक्षपल्लव, लतामंडप आणि उडणारीं कारंजीं यांनीं उद्यानाला शोभा प्रदान केलेली होती. वसंतोत्सवाच्या

निमित्तानें तरुण तरुणींना आज या शाहीबागेंत मुक्तद्वार होतें. आणि ते सारे जगाचें भान विसरून या यक्षलोकांत विहार करीत होते.

बागेच्या एका टोंकाला पुष्करिणी पासून दूर एका लाल दगडांनीं बांधलेल्या बाराद्वारीच्या बाहेर चौघेजण उभे होते. सर्वांच्याच डोक्यावर एकसारख्या पुढें कोकी आलेल्या पांढऱ्या पगड्या होत्या; सर्वांच्याच आंगांत गुढगाघोळ चुणीदार घेरे असलेले बगलबंद आंगरखे, सर्वांचेच सारखे सफेत कमरबंद देखील होते. सर्वांच्या मिशांचीं ठेवण देखील सारखी, मिशांमध्यें आतां पांढरेच केस विपुल दिसत होते. ते जरा वेळ बागेकडे बघत राहिले आणि नंतर चहूं बाजूंनीं उघड्या असलेल्या बाराद्वारींत तेथें आधींच घालून ठेवलेल्या बिछायतीवर जाऊन बसले. चहुंकडे नीरवता नांदत होती. या वृद्धांशिवाय तेथें कोणी देखील नव्हतें. नीरवतेचा भंग करून एकजण म्हणाला–" बादशहा सलामत. "

" काय फजल ? आपण आतां देखील दरबारांत बसलों आहोंत का ? माणसाला काय कुठंहि केवळ माणूस म्हणून वागतां बोलतां येऊंच नये वाटतं ? "

" आठवणच राहत नाहीं मला याची ! "

" जलाल म्हण, नाहीं तर अकबर, अथवा दोस्त म्हण. "

" किती मुश्कील असतं, दोस्त जलाल, आपल्याला असं दुहेरी जीवन ठेवावं लागतं. "

" दुहेरी नाहीं, चव्हेरी ! भय्या फजल्‌ ! "

" भय्या बीरू ! शाबास आहे तुझी. असं दिसतं कीं केव्हांहि कोणत्याहि गोष्टीवर तुझं उत्तर ठेवलेलंच. आम्हीं तर एका दुनियेंतून दुसऱ्या दुनियेंत येतों तेव्हां किती तरी वेळ आपल्या आठवणी धड राखण्याचा प्रयत्न करतों. काय टोड्डू भय्या, मी म्हणतो हें खरं ना ? "

" नाहीं तर काय ! मला देखील मोठं नवल वाटतं या बीरूचं–हा काय करीत असेल रे फजल्‌. विलक्षण डोकं दिसतं याचं. "

" म्हणूनच बिरबलास सगळेजण हिंदुस्तानच्या प्रत्येक शेतावर गोंफण फेंकणारा मानतात. "

" पण बीरू भय्या, तोडरमलानं देखील प्रत्येक शेतांतून गोंफणमार केली नाहीं."

बीरबल–" असेल अगर नसेल, पण जगाला हेंच वाटतं. आणि या त्याच्या अकलेची ग्वाही आमचा जल्लू पण देईल. "

अकबर–" अलबत देईल. पण बादशहा जलालुद्दीन अकबर वेष बदलून गांवोंगांवीं हिंडण्याबद्दल प्रसिद्ध असल्याचं ज्या कहाण्यांतून सांगण्यांत येतं त्यांत हें नाहीं."

बीरबल–" चांगली आठवण दिलीस जलुआ भय्या! आणि माझं देखील तुझ्या बरोबर कर्म ओढवतं. बीरबल आणि अकबर यांच्या नांवावर कोणतीहि कथा रचून सांगत सुटणं ही आतां नित्याची गोष्ट झाली. मी अशा बऱ्याचशा कथा गोळा केलेल्या आहेत. एकेका कथेला एकेक अशर्फी देत असतों मी."

अकबर–" कुठं असं न होवो कीं अशर्फीच्या लोभानं कथा कल्पनेंतून निघाव्या आणि थेट तुझ्याकडे पोंचत्या व्हाव्यात."

बीरबल–" होतहि असेल. पण त्यामुळं काय फरक पडणार? आणिक आपल्या दोघांच्या नांवावर काय काय भाकड कथा रचल्या जातात, हेंहि कळून येईल ना त्याच्यामुळं!"

अबुल् फजल कांहीं तरी बोलणार होता, तोंच बीरबल त्याला टोंकून म्हणाला– " अबे फजला, बोलूं नकोस, मी कांहीं सेठ छदामीमल सारखा मख्खीचूस नाहीं."

अबुल् फजल–" नाहीं रे बीरू. उगाच नाराज होऊं नकोस. भय्या रे, खरं सांगायचं म्हणजे मी तुझ्या कथांना फारच भितों."

बीरबल– " खरं रे, आईने-अकबरी सारखा जाडा ग्रंथ मीच तर लिहिला असेल, नाहीं?"

अबुल् फजल–" आईनें-अकबरी लिहिणारे किती तरी होऊं शकतील, पण भय्या टोडू, तूंच सांग इमानानं, किती जणांना बिरबलाच्या कथांची नक्कल करतां येईल?"

टोडरमल– " हें बीरूला देखील ठाऊक आहे."

अबुल् फजल– बरं बीरू, तूं आपल्या अशर्फी मोलाच्या कथेंतली सांग तरी एखादी!"

बीरबल– " पण तुम्हां सर्वांनीं तर आधींच ठरवून टाकलं कीं ही कथा माझ्या अशर्फीची नसून माझ्या अकलेची आहे म्हणून!"

अकबर–" आधीं ऐकून घेऊं. पारखल्या शिवाय आम्हीं नाणं असली कीं नकली हें कसं सांगावं?"

बीरबल–" तसा तर माझ्या प्रत्येक कथेला बट्टा लावतात. बरं, करतो तुमची करमणूक. कथा सांगतों पण संक्षेपानं, केवळ मथितार्थ तेवढा ऐका.–एकदां काय झालं, अकबराला हिंदु होण्याची खूप इच्छा झाली. त्यानं बिरबलला सांगितलं तेव्हां बिचारा बिरबल मोठ्या पेंचांत पडला. बादशहाला नाहीं म्हणावं तरी पंचाईत, बरं होय म्हणावं तर त्याला हिंदु बनवून घेण्याचा अधिकार तरी होता का? झालं, किती तरी दिवस लपून बसला. एके रात्रीं बादशहाला आपल्या महालाच्या खिडकीजवळ "हिछ्-छो-हिछ्-छो" असा आवाज जोरजोरानें ऐकायला आला. बादशहाला त्या जागीं व तशा वेळीं कपडे धुण्याचा आवाज कधींहि ऐकायला आला नव्हता, त्यामुळं त्याचं

कुतूहल वाढलं. मजुरासारखा पोशाख करून तो यमुनेच्या कांठीं गेला. बीरूनं कितीहि रूप बदललं तरी तो बादशहाला ओळखायला आलाच. तिथं त्यानं पाहिलं तर कपडे दगडावर आपटण्यांत येत नव्हते, उलट एका गलेलठ्ठ गाढवाला राड आणि रिठे यांनीं घांसून घांसून धुण्यांत येत होतं. बादशहानं आपलं हंसूं दाबलं आणि आवाज पालटून विचारलं,–" काय काम चाललंय चौधरी ?"

" आपलं काम कर भय्या. तुला कां फुकट पंचायती ?"

" या अशा थंडी वाऱ्यांत अवेळीं काम चाललंय चौधरी ?"

"काय करूं, हे असं मेलंच पाहिजे. उद्यांच या प्राण्याचा घोडा बनवून बादशहा-पुढं पेश केला पाहिजे."

" गाढवाचा घोडा बनवणार ?"

" बनवलाच पाहिजे, बादशहाचा हुकूमच तसा आहे."

मग बादशहानं आपल्या खऱ्या आवाजांत म्हटलं,"चल बीरबल, आतां आलं लक्षांत. मुसलमानाचा हिंदु बनवणं गाढवाचा घोडा बनवण्याइतकंच अशक्य आहे."

" भय्या फजल ! ही गोष्ट ऐकली खरी पण जसा कांहीं नाग डसल्या-सारखं वाटलं."

अकबर–"आणि ही कथा मला माझ्या जीवनाच्या संध्यासमयीं ऐकायला मिळत आहे. आपल्या साऱ्या आयुष्यभर केलेल्या प्रयत्नाचा हाच परिणाम होणार ?"

अबुल् फजल–"जलाल, आपण आपल्या एका पिढीचा जिम्मा घेऊं शकतों. आमचे प्रयत्न यशस्वी करणं किंवा वांझोटे करणं आतां या बागेंत वसंतोत्सव साजरा करणाऱ्या पिढीच्या हातीं आहे."

टोडरमल–" पण भय्या, आम्हीं मुसलमानांचे हिंदू किंवा हिंदूंचे मुसलमान करण्याचं मनांत देखील आणलं नाहीं."

अबुल फजल–" आपण त्या दोघांना एकत्रित बघण्याची इच्छा केली. त्यांनीं एकमेकांत मिसळून त्यांचा एकजीव व्हावा, त्यांची एकजाति व्हावी अशी मनीषा होती आपली."

बीरबल—" पण मुल्ले आणि पंडित आमच्या प्रमाणं थोडाच विचार करतात ! आम्हांला सामर्थ्यवान हिंदुस्थान हवा आहे. हिंदुस्तानच्या तलवारींत शक्ति आहे, हिंदुस्थानच्या मेंदूत प्रतिभा आहे, हिंदुस्थानच्या तरुणांत हिम्मत आहे. पण हिंदु-स्थानचा दोष, हिंदुस्थानची कमजोरी, त्याचा विस्कळितपणा, त्याचे तुकडे तुकडे होणं –ही आहे. जर हिंदुस्तानच्या साऱ्या तलवारींची एकजूट केली तर !–"

अकबर–"बस, हीच माझी एकमात्र इच्छा होती माझ्या प्रिय सौंगड्यांनो ! केवळ याच इच्छेनं आम्हीं इतके संघर्ष केले आतां पर्यंत. ज्यावेळीं आम्हीं कामाला

सुरवात केली तेव्हां चहूं बाजूला अंधार पसरलेला होता, पण आतां मात्र तसं वाटत नाहीं. एक पिढी जितकं कांहीं करूं शकली असती तेवढं आम्हीं केलं पण ही गाढवा-घोड्याची गोष्ट ऐकून माझ्या काळजावर जणुं दगडाचा मारच बसला."

अबुल फजल–"जलालभय्या, आपण निराश होऊन कसं चालेल? खानखानाच्या वेळचा काळ आणि आपला काळ यांत कांहींच फरक नाहीं. त्यावेळीं जोधाबाई तुझी स्त्री बनून महालांत काय विष्णूच्या मूर्तीची पूजा करूं शकली असती?"

अकबर–"फरक आहे ना! पण फजल, आपल्याला अजून कितीतरी मजल गांठायची आहे! मी एकदा फिरंगी पाद्याच्या तोंडून असं ऐकलं होतं कीं त्यांच्या मुलखांत मोठ्यांतला मोठा बादशहा देखील एकीपेक्षां अधिक स्त्रियांशीं विवाह करूं शकत नाहीं. मला हा रिवाज इतका आवडला म्हणून सांगूं टोडर! त्यावेळीं तुला माझ्या बोलण्यावरून कळलं असेलच. जर मी हेंच कुठंहि बोलूं शकलों असतो तर काय बहार झाली असती! पण बादशहा वाईट कामं करायला स्वतंत्र असतो, तितका चांगल्या गोष्टी करायला तो स्वतंत्र नसतो ही केवढी विटंबना आहे बरं! शक्यता असतीच तर मी सलीमची आई सोडून इतर जणींना राणीवशांत आणलंहि नसतं. आतां सलीमच्या बाबतींत देखील मी असंच करूं शकलों असतों तर?"

बीरबल-"जलाल, प्रेम तर फक्त एकीशींच होऊं शकतं. जेव्हां मी हंसांचं युगुल बघतों तेव्हां वाटतं किती सुंदर आहे त्यांचं जीवन. जसे आनंदांत सौंगडी तसेच विपत्तीच्या वेळीं पण साथीदार."

अकबर–"माझ्या डोळ्यांना पाणी आलं होतं बीरूभय्या एकदां. मी गुजरातमध्यें वाघाच्या शिकारीला गेलों होतो. हत्तीवरून तुफंगानं (पलितेवाली बंदुक) वाघ मारणं म्हणजे कांहीं मोठी बहादूरी नाहीं, असंच मला वाटतं. तुमच्याजवळ वाघाप्रमाणं पंजे आणि जबडा नसेल; तुम्हीं देखील ढाल-तलवारीनं त्याच्या प्रमाणं तुल्यबल होऊं शकतां; पण यापेक्षां अधिक सरंजाम वापरणं हें शौर्याला सोडून आहे. मी तुफंगानं वाघावर गोळी झाडली. गोळी त्याच्या डोक्यावर लागली. वाघ एक उडी मारून खालीं कोसळला. त्यावेळीं मी पाहिलं, झाडींतून झेंपा घेत एक वाघीण आली. एक वेळ तिनं तुच्छतेनं माझ्यावर आपली नजर फेंकली आणि मग माझ्याकडे पाठ करून ती वाघाचे गाल चाटूं लागली. मीं लागलीच शिकाऱ्यांना गोळ्या न झाडण्या-बद्दल फर्मावलं आणि तेथून हत्ती परत फिरवला. त्यावेळीं माझ्या मनावर असा घाव पडला होता कीं जरी ती वाघीण माझ्यावर चालून आली असती तरी मी हात उचलला नसता. मी कितीतरी दिवस उदासीन होतों त्याच्यानंतर. मला तेव्हां वाटलं कीं वाघाच्या जर हजार-पांचशें वाघिणी असत्या तर त्या वेळीं ती वाघीण काय अशीच त्या वाघाचा गाल चाटती?"

अबुल् फजल–"आपल्या देशाची किती तरी प्रगति व्हायची आहे आणि आमची गति किती मंद आहे! आणि शिवाय आज आपल्याला हेहि माहित नाहीं कीं जेव्हां आमचे हातपाय गळून जातील तेव्हां आमचा भार वाहून नेणारा कुणी असेल कीं नाहीं?"

अकबर–"म्हणूनच मला वाटलं कीं तलवार चालवणाऱ्या दोन्हीं हिंदुमुसलमान जातींचा रक्त-संगम व्हावा. या संगमाला अनुलक्षूनच मी प्रयागला त्रिवेणीच्या कांठीं किल्ला बांधला. गंगा-यमुनांच्या प्रवाहांचा तो संगम पाहून माझ्या अंतःकरणांत एका विशाल संगमाचा विचार निर्माण झाला. पण आतां पाहतों कीं मी त्या बाबतींत किती कमी यश मिळवलं. वस्तुतः जी गोष्ट पिढ्यानुपिढ्यांच्या प्रयत्नांमुळंच होऊं शकेल, ती एका पिढींत कशी यशस्वी होऊं शकेल? पण मला नेहमीं एका गोष्टीचा असा अभिमान वाटतो कीं मला जसे सहकारी मिळाले तसे फारच थोड्यांच्या भाग्यांत असतील. अकबर आणि जोधाबाई, मेहेरुन्निसा आणि जे कोणी मला वश होऊं शकले असते, ते घरोघरीं आढळावेत असं मला वाटत होतं."

टोडरमल–"या बाबतींत अधिक नालायकी हिंदूंनींच सिद्ध केलेली आहे."

बीरबल–"आतां गाढवाला धुवून पुसून घोडा बनवण्याची गोष्ट बनवण्यांत आली. पण हिंदु-मुसलमानांत जर येवढा फरक असेल तर मग घोड्याचा गाढव कसा बनूं शकतो? काय हजारों हिंदू मुसलमान झालेले नाहीं दिसत?"

अकबर–"हिंदु तरुणांनीं मुसलमान तरुणींबरोबर लग्नं करावीत आणि त्यामुळं त्यांना त्या जातिधर्माला मुकावं लागूं नये, याची मला सारखी ओढ लागलेली होती."

अबुल् फजल–"मग जलालभय्या, तुला मी एक आनंदाची बातमी सांगतों: आपण जे करूं शकलों नाहीं तें माझ्या सुरैय्यानं केलं."

सगळे जण उत्सुकतेनें अबुल फजलकडे पाहूं लागले.

"तुम्हीं सारेजण ऐकायला उत्सुक झालेले आहांत, पण थांबा, जरा मला बाहेर जाऊन यायचं आहे."–असें म्हणून फजलने बाहेर कठड्याच्या कांठावर उभा राहून पाहिलें आणि मग आंत येऊन सांगितलें–"सांगण्यापेक्षां प्रत्यक्ष दाखवणंच योग्य होईल. चला माझ्याबरोबर!"

सगळेच त्या कठड्याजवळ आले. अबुल फजलनें हिरव्या अशोकाच्या पारावर बसलेल्या दोन तरुण आकृतींकडे अंगुलिनिर्देश करून म्हटलें, "ती बघा माझी सुरैय्या!"

टोडरमल–"आणि माझा कमल. आपल्यासाठीं सारंच जग कांहीं काळोखी ठरणार नाहीं, फजलू भय्या." असे म्हणून टोडरमलानें त्याचे दोन्ही हात आपल्या हातांनीं दाबले व त्याच्या गळ्यांत गळा मिळवला.

दोघेहि विलग झाले तेव्हां चौघांच्याहि डोळयांत आनंदाचीं आंसवें होतीं. अकबरानें मौनाचा भंग करून म्हटलें—

"मी हा तरुण-तरुणींचा वसंतोत्सव कितीतरी वर्षांपासून करीत आहे पण खरा वसंतोत्सव आज इतक्या दिवसांनीं साजरा झाला. मनाला वाटतं, त्या दोघांना बोलावून घ्यावं आणि त्यांच्या कपाळांचं चुंबन घ्यावं. या त्यांच्या गंगा यमुना संगमामुळं आमचीं अंतःकरणं सुप्रसन्न झालीं हें त्यांना समजलं असतं, तर किती छान झालं असतं बरं ?"

अबुल फजल—"सुरैय्याला अजून हें माहित नाहीं कीं तिचे मातापिता तिच्या या प्रणयाला किती आनंदाची गोष्ट समजतात."

टोडरमल—"कमलला तरी कुठं माहित आहे ? पण फजलू, तूं मोठा भाग्याचा; सुरैय्याची आई देखील तुला पाठिंबा देत आहे. कमलची आई आणि सुरैय्याची आई या जिवाभावाच्या मैत्रिणी असल्या तरी कमलची आई जरा जुन्या विचाराची आहे. पण हरकत नाहीं, मीच कमल आणि सुरैय्या यांना आशीर्वाद देईन."

अकबर—"सर्वां आधीं आशीर्वाद देण्याचा हक्क मला मिळाला पाहिजे."

बीरबल—"आणि जल्लू मी रे ? मला आपल्या बरोबर नेणार नाहींस वाटतं ?"

अकबर—"नेईन तर ! असा धोबी कुठं मिळणार आहे थोडाच !"

बीरबल—"पण असा घोडा बनणारा गाढव तरी कुठं मिळेल दुसरा ?"

अकबर—"खरंच, आजच्या आपल्या गप्पागोष्टी किती आनंदानं झाल्या. असाच आनंद महिन्यांतून एखादा दिवस तरी मिळाला तर ?"

– ३ –

चहूं बाजूंनीं दारें असलेली एक सुशोभित खोली गच्चीवर होती. तिच्या छताला लाल, हिरवीं, पांढरीं झाडें कुंड्यांतून टांगलेलीं होती. दरवाजांवर दुहेरी पडदे सोडलेले होते, त्यांपैकीं आंतले पडदे बुटेदार गुलाबी रेशमाचे होते. सतरंजीवर सुंदर इराणी गालिचा आंथरलेला होता. खोलीच्या मधोमध असलेल्या पांढऱ्या गादीवर कितीतरी लोड मांडून ठेवलेले होते. गादीवर बसलेल्या तरुणी बुद्धिबळें खेळत होत्या. त्यांपैकीं एक आपल्या परिचयाची सुरैय्या असून, लाल घागरा, हिरवी चोळी आणि पिवळी ओढणी अशा पोशाखांतली फूलमती–बिरबलाची तेरा वर्षांची मुलगी होती. बुद्धिबळाचे डाव प्रतिडाव योजण्यांत त्या येवढ्या तल्लीन झाल्या होत्या कीं त्यांना गादीवर होत असलेल्या पावलांचा आवाज देखील ऐकायला आला नाहीं. "सुरैय्या" असा आवाज कानीं पडतांच मात्र त्या दोघींच्या नजरा वर गेल्या आणि मग त्या उठून उभ्या झाल्या. सुरैय्यानें "काकी" म्हणून हांक मारतांच, कमलच्या आईनें

तिला आपल्याजवळ ओढून घेतलें व तिच्या गालाचा मुका घेतला. सुरैय्याच्या आईनें म्हटलें–

"पोरी, कमलनं तुझ्यासाठीं लाल मासळ्या आणलेल्या आहेत हौदांत पाळायला; जा; तंवर मी खेळत्ये मुन्नीबरोबर दोन डाव "

"आई, मुन्नी मोठी चलाख आहे बरं. दोनदां मात केलीन् माझ्यावर. हिला लहान मुलगी म्हणूं नकोस!"–असें म्हणून सुरैय्या आपल्या पदराची चापचोप करून घाईनें खोलीबाहेर पडली.

महालाच्या पिछाडीच्या बागेंत हौदाजवळ कमल वाट बघत होता, जवळच एक नवें मडकें ठेवलेलें होतें. सुरैय्यानें जवळ जाऊन कमलचे हात आपल्या हातांत घेऊन म्हटलें—

"माझ्यासाठीं लाल पिवळ्या मासळ्या आणल्यास कमल भय्या?"

"आणल्या ना!–सोनेरी पण आणल्या."

"बघूं." सुरैय्या मडक्यांत डोकावूं लागली.

"थांब, मी हौदांत सोडतों त्यांना! त्यांत पाहिलं तर अधिकच सुंदर वाटतील. बिलोरी हौदाच्या चमकत्या तळाशीं बघ त्यांची गंमत!"

सुरैय्या अधरां नयनां मधून हास्याचे तुषार उधळीत हौदाजवळ उभी राहिली. कमलनें मडक्यांतल्या मासळ्या हौदांत उबडून दिल्या. खरोखरीच त्या बिलोरी हौदांत त्यांचे लाल, गुलाबी, सोनेरी रंग अतिशयच सुंदर दिसूं लागले. कमल गंभीर-पणानें समजावून सांगूं लागला—

"आतां लहान आहेत या, सुरैय्या. पण वाढल्या तरी सहा बोटांपेक्षां लहानच राहतील."

"पण आता देखील सुंदरच वाटतात या, कमल!"

"हें बघ सुरैय्या. याचा रंग कसा आहे?"

"गुलाबी!"

"तुझ्या गालां प्रमाणंच!"

"लहानपणीं देखील तूं असंच म्हणायचास, कमल भय्या!"

"लहानपणीं देखील असेच होते, सुरैय्या!"

"लहानपणीं तूं देखील मोठा गोड वाटायचास कमल!"

"आणि आतां?"

"आतां तर खूपच!"

"हें असं कमी जास्ती कां?"

" काय जणं, पण जेव्हांपासून तुझी कंठ फुटला, तुझ्या ओठांवर बारिक सांवळी मिशीची कोर येतेशी वाटूं लागली, तेव्हांपासून वाटूं लागलं कीं प्रेम खूप आंत आंत शिरून बसलं. "

" आणि म्हणूनच तेव्हांपासून तूं कमलला दूरदूर लोटायला लागलीस ! "

" दूरदूर लोटायला ? "

" नाहीं तर काय ? आधीं कशी उडी घेऊन माझ्या खांद्यावर हातानं लोंबकळायचीस- "

" आतां साऱ्या तक्रारींची नामावळी नको करूस, कांहीं नवं जुनं सांग ना ! "

" नवं सांगूं ?-सुरैय्या, आपलं प्रेमाचं गुपित फुटलं ! "

" फुटलं ?- कुठं ? "

" आपल्या दोन्हीं घरांत आणि खुद्द हजरत बादशहा सलामत यांना देखील कळलं ! "

" बादशहा सलामतनां देखील ? "

" कां ग सुरैय्या ? घाबरलीस वाटतं ? "

" ऊं हूं, नाहीं तरी आपलं प्रेम कधीं ना कधीं उघडकीस आलंच असतं. पण आतां कसं आलं ? "

" इतकं खुलासेवार तर मलाहि ठाऊक नाहीं. पण कळलं असं कीं काका-काकींनीं आधींच आपल्या प्रेमाला मान्यता दिली, मग बाबा आणि बादशहा सलामत यांनीं, आणि सगळ्याच्या नंतर आईनं. "

" आईनं देखील ? "

" आईची सर्वांना भिती वाटत होती. ती किती जुन्या मताची आहे हें तुला आहे ना ठाऊक ? "

" पण, आतांच काकीनं घेतलेल्या मुक्याचे ठसे माझ्या गालावरून पुसले देखील नसतील. "

" होय ना ? त्या सगळ्यांचा अंदाजच चुकला. जेव्हां बाबांनीं तिला सांगितलं तेव्हां फारच खूष झाली ती ! "

" मग आपल्या प्रेमाला सर्वांनींच मान्यता दिली तर ! "

" जे आपले आत्मीय आहेत, त्या सगळ्या घरांनीं दिली, पण बाहेरचं जग याला नाहीं मान्यता देणार ! "

" पण बाहेरच्या जगाची तुला फिकीर वाटते कमल ? "

" मुळींच नाही, सुरैय्या ! मला फिकीर वाटते, आगामी जगाची, त्या जगाला वाट दाखवण्याचं हें कार्य आपण करीत आहोंत. "

" कमल, मला आतां साफ साफ कळून चुकलं कीं हें वहिनी साहेबांना देखील माहित आहे. रात्रीं त्यांच्या महालांत गेल्यें होत्यें, तर त्यांनीं थट्टेनं म्हटलं,' वन्सं, मी आतां भावोजीसाठीं व्याकुळ झाल्यें होत्यें, पण सुरैय्या वन्सं, आतां झाली बाई माझी इच्छा पूर्ण,–पण त्यांनीं तुझं नांव मात्र सांगितलं नाहीं. "

" याचा अर्थ येवढाच कीं भाईसाहेबानं वहिनीला सांगितलं आणि त्या दोघां-नाहि आपलं प्रेम पसंत आहे. "

" म्हणजे तुझं सारं सासर तुझ्या पाठीशीं आहे, कमल ! "

" आणि तूं आईचं मन आपल्या बाजूला वळवून घेण्यांत कमालच केलीस. "

" काकींचे पूजापाठ तुमच्या डोळ्यावर येतात, कमल. पण काकीची माझ्यावर किती माया आहे ती तुम्हांला माहित तरी आहे का ? असतं ठाऊक तर मग नसती केली तुम्हीं व्यर्थ विवंचना. "

" या साठींच बाबांनीं तिच्यावर सोडण्यासाठीं निर्वाणीचं अस्त्र म्हणून तुझी योजना केलेली होती. पण त्या अस्त्राला हात लावण्या आधींच गड सर झाला. आतां आपलं लग्न लावणार आहेत ? "

" कोण ? "

" कुणी मुल्ला किंवा पंडित नव्हे, तर आपला पैगंबर, ज्यानं हिंदुस्थानांत नव्या त्रिवेणीला नवा किल्ला बांधलेला आहे. "

" जो खांचा खळग्यांना आणि नद्या नाल्यांना निर्मळ समुद्राची कळा आणूं इच्छितो, तो पैगंबर ! "

" परवां रविवारीं होणार आहे, सुरैय्या. "

" परवां ? "– बोलतां बोलतां सुरैय्याच्या डोळ्यांना पाणी आलें; जसे कांहीं नर्गिसच्या पाकळ्यांत सांचलेले दंव बिंदु ! कमलचेहि डोळे तसेच भरून आले. त्यानें तिचे डोळे चुंबून घेतले, त्या दोघांनाहि माहित नव्हतें कीं आणखी चार डोळे दडलेल्या जागीं त्यांच्याचप्रमाणें आनंदाश्रु ढाळीत आहेत.

– ४ –

वसंताची गुलाबी थंडी आणि संध्याकाळची वेळ; मावळत्या सूर्याच्या लाल किरणांनीं जणूं आग लागलेला सागर किती सुंदर दिसत होता. समुद्राच्या वाळवंटांत बसलेलीं दोन तरुण हृदयें या दृश्याचा आनंद लुटत होतीं. लाली पराकोटीला पोंचली तेव्हां एकानें म्हटलें— " सागर ! आमचा हा इष्ट देव, किती सुंदर दिसतो ! "

" आपण आतां सागराची संतानं झालों, याबद्दल तुला कांहीं संदेह वाटतो का प्रिये ? "

" नाहीं बरं, कमला सारखा दिसणाऱ्या माझ्या कमला ! आपल्याला कधीं वाटलं तरी होतं का, कीं सागरानं आपल्या कुसव्यांत असला स्वर्गलोक दडवून ठेवलेला आहे ? "

" पूर्णपणें नसेल, पण खरंच मानवांनीं या व्हेनिस नगराला स्वर्गाची कळा आणली यांत संशय नाहीं. "

" जेव्हां माधुरी सांगायची कीं तिच्या देशांत कुलवधु आणि कुलकन्यका पुरुषा प्रमाणंच स्वच्छंदपणें अवगुंठन न घेतां वावरतात, तेव्हां मला तिचा विश्वास वाटायचा नाहीं. पण आतां दोन वर्षांपासून या स्वर्गांत राहात आहोंत आपण. प्रिया, व्हेनिसची सर दिल्लीला येईल ? "

" आपण कधी खरं तरी मानलं असतं का सुरैय्या, कीं फ्लारेन्स सारखं समृद्ध राज्य राजाशिवाय चाललेलं आहे ? "

" आणि व्हेनिस नगरी ही नगरांची राणी आहे हें देखील ? "

" खरंच, सुरैय्या, दिल्लीत आपण असं स्वच्छंदपणें हिंडूं फिरूं शकलों असतों ?"

" बुरखा घेतल्या शिवाय ? पालखीच्या आंत कसं बसं कोंबून झांकून जावं लागतं, प्रिय कमल. आणि इथं आम्ही हातांत हात घालून चाललों तेव्हां कुणी वर डोळा करून देखील बघत नाही. "

" पण गुजरात मध्यें पाहिल्या ना आपण उघडं तोंड ठेवणाऱ्या कुलांगना. दक्षिणेंत देखील पडद्याची चाल नाहीं म्हणे ! "

" यावरून असं दिसतं की हिंदुस्थानांतल्या स्त्रिया एके काळीं पडद्या पासून मुक्त होत्या. पुन्हां कधी काळीं आपल्या देशांत तसं होऊं शकेल का कमल ? "

" आपल्या वडील धाऱ्यांनीं आपल्या आयुष्यभर असे प्रयत्न केले. हा छोटासा फ्लॉरेन्स देश–तीन दिवसांत याच्या आरपार जातां येतं–या देशाकडे बघ जरा सुरैय्या ! इथले लोक किती अभिमानानं आपला माथा वर करून ऐटीनं चालतात. कुणा पुढं झुकून सलाम, कुर्निसात करणं माहित नाहीं त्यांना. राजाचं नांव ऐकतांच नाक मुरडतात. दाहक नाग किंवा सैतान वाटतो त्यांना राजा. "

" पण कमल, यांत खोटं काय आहे ? फ्लॉरेन्सच्या किसानांची हिंदुस्थान मधल्या किसानांबरोबर तुलना कर बरं ! इथं काय तरुलेच हाडांचे सांगाडे दिसतात तरी का कधीं ? "

" नाहीं ना प्रिये ! म्हणूनच तर इथं राजेशाही थाटामाटावर करोडों रुपये खर्च करावे लागत नाहींत. "

" तरी व्हेनिसमध्यें धन-कुबेर आहेत आणि त्यांतले बरेचजण आमच्या जगत् शेठांवर मात करूं शकतात. "

" आमचे जगत्सेठ लाखापाठीं एक लाल झेंडा लावतात. मला नेहमीं वाटायचं या दमडीबाजांचे रुपये आणि अशर्फी अंधारांत गाडून बसून काय होत असतील? त्यांना हवा मिळाली पाहिजे. त्यांना एका हातांतून दुसऱ्या हातीं जातां आलं पाहिजे. यांच्या विना मिठाई आपल्या ठिकाणींच पडल्या पडल्या वाळून जाते, फळं जागच्या जागीं सडून जातात. कापड गोदामांतल्या किड्यांना खायला मिळतं. आणि यांना पुरून आमचे शेठ लाल झेंडे फडकावतात. लोक म्हणतात, शंभर झेंडेवाला शेटजी करोडमल बनला. "

सूर्याची लाली आतां विरून गेली होती; चहूंकडे अंधाराची छाया पडूं लागली. समुद्राच्या लाटा किनाऱ्यावरल्या खडकावर आपटल्याचा आवाज संतत ऐकूं येऊं लागला. त्या युवायुवतीला अजूनहि वाळूंतून उठावेसें वाटत नव्हतें. त्यांना खरोखरच सागर आपला कोणी तरी प्रिय नातलग वाटत होता. जरी त्यांना स्वतः खुष्कीच्या मार्गानें प्रवास करावा लागला होता तरी त्यांच्या पुढें लवलवणाऱ्या समुद्राचें एक टोंक हिंदुस्थानला भिडलेलें आहे हें त्यांना ठाऊक होतें. म्हणूनच त्यांना कधीं कधीं असें वाटत असे कीं काय हीं दोन टोंकें एकमेकांना भेटूं शकणार नाहींत?

बरीच रात्र लोटल्यावर ते परत फिरले. अंधारी रात्र आणि आपल्या हृदयांतली खळबळ यामुळें आठवण होऊन सुरैय्या म्हणाली—

" आमच्या बादशहानं आपल्या राज्यांत शांतता स्थापन करण्याचे खूप यत्न केले आणि त्यांत त्यांना बरंचसं यश देखील आलं, पण तिथं आपण असेच अंधेऱ्या रात्रीं निःशंक निर्भय हिंडूं शकूं का? सांग ना! "

" इथं सारेच सुखी आहेत. किसानांच्या शेतांत द्राक्षं, सेब, गहूं, सारं कांहीं पिकतं! "

" आमच्याहि शेतींत सोनं पिकतं तें? "

" पण तें सोनं लुटणारे किती आहेत बरं आपल्याकडे, सुरैय्या? "

" आणि कमल! पाहिलंस, इथं कुठल्याहि घरीं जा, किती स्वाभाविकपणें कांहींहि अवडंबर न करतां मेजावर बाटली नि पेले आणून ठेवतात. "

" हिंदुस्थानांत तर माझे बाबा बादशहा बरोबर पाणी पीत असत यामुळंच बदनाम झाले होते. "

" आणि माझ्या दाया मला काय शिकवत, आहे ठाऊक? म्हणत-रजपुतानी फार घाणेरड्या असतात, त्यांच्या घरीं डुक्कर शिजवतात. तिथले आंधळे इथं येऊन बघतील तर किती बरं होईल? इथल्या जगांत उच्चनीच जातीच नाहींत. "

"या जगांत खाण्यापिण्याचा विटाळ पण नाहीं."

"फ्लारेन्समध्यें एकजूट आहे. अशीच एकजूट हिंदुस्थानांत देखील कधीं होईल कमल?"

"जेव्हां आपण सागराला शरण जाऊं, सागरविजय करूं, तेव्हांच हें शक्य होईल. सुरैय्या, आपण इथं आलोंच नसतों तर काय आपले देखील डोळे कधीं उघडले असते का?"

"सागर-विजय"

"सुरैय्या, व्हेनिस सागर-विजयिनी नगरी आहे. व्हेनिस मधले हे कालव्यांचे रस्ते, हे उंच उंच प्रासाद, हा त्या सागरविजयाचाच प्रसाद आहे. आज व्हेनिस नगरी सागरविजयांत अद्वितीय नाहीं. तिला आणिक कितीतरी प्रतिस्पर्धी नगरी आहेत. पण मला हें मात्र साफ साफ कळून चुकलं कीं आतां सागरविजयी लोकांचीच सत्ता जगावर चालूं होणार. मी आपल्याला भाग्यशाली समजतों, कारण माझ्या हृदयाला इकडे येण्याची प्रेरणा मिळाली."

"तूं कसलीं कसलीं पुस्तकं घेऊन रात्रीच्या रात्रीं जागत असतोस प्रिया? खरंच इथं पुस्तकं किती सुलभ आहेत!"

"आमच्या कडेहि शिसं मिळतं, कागद आहे, कुशल लोहार मिस्त्री आहेत; पण अजून देखील पुस्तकं छापणं माहिती नाहीं आम्हांला. जर आमच्याकडे छापखाने निघाले तर ज्ञान किती सुलभ होईल? मी हीं जीं पुस्तकं वाचीत असतों, आठवडेच्या आठवडे खलाशांबरोबर बेपत्ता होतों, त्यावरून येवढं मात्र सांगूं शकतों निश्चयानं कीं सागर-विजयी देशच विश्वविजयी होऊं शकेल. या फिरंग्यांना आंग धुण्याच्या बाबतींतल्या त्यांच्या बेपर्वाईमुळं आपल्या देशांतले गलिच्छ जंगली समजतात. पण यांची जिज्ञासा-वृत्ति बघून मनाला त्यांची प्रशंसा केल्याशिवाय राहवत नाहीं. यांनीं भूगोलाच्या बाबतींत दंतकथा नाहीं रचल्या; उलट जागोंजागीं प्रत्यक्ष जाऊन त्या त्या ठिकाणची माहिती मिळवली. यांचे नकाशे मी तुला दाखवले होते, सुरैय्या."

"सागर मला किती चांगला वाटतो म्हणून सांगूं, कमल!

"नुसता चांगलाच नव्हे, सुरैय्या. या सागराच्या हातींच देशाचं जीवन आहे आतां. तूं पाहिल्यास ना या लांकडाच्या जहाजांवर ठेवलेल्या तोफा?—

"चालते फिरते किल्ले आहेत हीं जहाजं. मोंगलांना विजया मिळवून दिला त्यांच्या घोड्यांनीं आणि बारुदीनं देखील! आज जगांत ज्यांच्या जवळ युद्धनौका असतील तेच विजयी होतील. म्हणूनच ही विद्या शिकण्याचा निश्चय केलाय मी सुरैय्या!"

कमल आणि सुरैय्या यांची ही इच्छा पूर्ण होऊं शकली नाहीं. ते भारताकडे यायला निघाले, पण तें युग चांचे लोकांचें होतें. सुरतेला पोंचायला दोन दिवसांचा अवकाश होता, तेव्हां त्यांच्या जहाजावर चांच्यांनीं चढाई केली. आपल्या दुसऱ्या सहकाऱ्यांच्या सहाय्यानें कमलनें आपल्या तोफा बंदुकांनीं चांच्यांना रोखण्याचा प्रयत्न केला, परंतु चांचे संख्येनें विपुल होते. कमलचे जहाज तोफांच्या गोळ्यांनीं खिळखिळें झालें व तळाकडे जाऊं लागले. त्या बुडणाऱ्या जहाजावर कमलजवळ सुरैय्या होती आणि त्याच्या हंसत मुखांतून अंतिम बोल निघाले–' सागर-विजय!"

---

# १७–रेखा भगत

( काळ—इ. स. १८०० )

– १ –

कार्तिकी पुनव होती. गंडकी स्नान आणि हरिहरनाथाचं दर्शन याची एकच गर्दी होती. दूरदूरच्या खेड्यांपाड्यांमधून स्त्रीपुरुष मोठ्या शिकस्तीनें सांठवलेले पैसे आणि सातू-तांदुळ घेऊन हरिहरक्षेत्री आले होते. त्यावेळीं बागेंत बांधलेल्या बैल-जोड्या, घोडे आणि हत्ती बघून कुणाला अशी आशा वाटणें शक्य होतें कीं हीच यात्रा वाढत वाढत पुढें जगांतली सर्वांत मोठी यात्रा होणार म्हणून ?

कोष्टाऊ आंगोशींतला खारा सत्तु हिरव्या मिरच्या आणि मुळे यांच्या बरोबर मोठ्या आवडीनें खाऊन रामरेखा भगत आणि त्याचे चार सोबती एका आंब्याच्या झाडाखालीं घोंगड्यावर बसलेले होते. रेखानें म्हैस विकली होती आणि आतां देखील आपल्या कनवटींचे वीस रुपये तो जेव्हां तेव्हां चाचपून बघत होता. जादूनें रुपये उडवून नेणारे चोर आजकाल खूप सुटलेले आहेत, असें मेळाभर पसरलेलें होतें. रेखाचा हात पुन्हां एकदां कनवटीवर गेला. आणि मग तो मोठ्या समाधानानें म्हणाला–

" म्हैस विकली एकदांची माझी, आज तीन महिन्यांपासून खूप खायला प्यायला घालून तयार केली होती. वीस रुपये म्हणजे कांहीं कमी नाहीं झाली तिची किंमत. पण आजकाल लक्ष्मी नजरे पुढून पहातां पहातां उडून जाते. "

मौला– " जाते तर काय ! आणि रुपया पैशाचा तर दुष्काळच पडला चहूं-कडे रेखाभाऊ. या कंपनीच्या राज्यांत कोणत्याच गोष्टींत बरकत नाहीं. दिवसभर माती खांदून खांदून मरावं लागतं मला आणि एका सांजेला देखील बायको पोरांना पोटभर खायला मिळत नाहीं. "

रेखा– " आजवर आम्हीं अधिकाऱ्याची आवभगत आणि बिगार, अमल्या गमल्याला द्यावी लागणारी लांच लुचपत या मुळें लंबे होत होतों, पण निदान जमीन तरी आमची होती. "

मौला–" सातां पिढ्यांपासून जंगल तोडून आम्हीं जमीन उठवली. "

सोबरन– " मौलू भाऊ, तें वाघराचं वावर आहे ना? केवढं जंगल होतं तिथं! माझे पूर्वज धिनावन बाबा याला वाघानं उचलून नेलं होतं, तेव्हां पासून त्याचं नांव वाघराचं वावर पडलं. जमीन उठवतांना आम्हीं प्राणांचं देखील मोल दिलं. "

तलम चिटाची पांढरी पागोटी आपल्या काळ्याबेळ्या चेहऱ्यावर ठीक करीत असलेल्या भोला पंडिताकडे बघून रेखा म्हणाला–

" भोला पंडित, तुम्हांला तर सत्य युगा पर्यंतच्या साऱ्या गोष्टी ठाऊक आहेत, सांगा बरं प्रजेवर असा कोप कधीं पडला होता का ? "

मौला– " जमीन उठवली आम्हीं, वाहतों आम्हींच, पण पंडत, आमच्या गांवचे मालिक मात्र बनले रामपूरचे मुंशी ! "

भोला पंडित– " अधर्म आहे, शुद्ध अधर्म, रेखा भगत. कंपनीनं रावण आणि कंस यांच्या जुलमावर मात केली. शास्त्र पुराणांत लिहिलेलं आहे, राजानं किसानाजवळून दशांश कर घ्यावा. "

मौला–" आणि पंडत, नवल वाटतं याचंच कीं या रामपूरच्या मुंशीला आमचा मालिक जमीनदार कां बनवला ? "

भोला पंडित–" सगळं उलटं आहे मौलू ! आधीं प्रजेवर एक राजा मात्र होता. किसानाला फक्त राजा ठाऊक होता. तो दूर आपल्या राजधानींत रहात असे. त्याला केवळ आपल्या दशांशाची काळजी, ती देखील पीकपाणी चांगलं असलं तर ! पण आतां पीकपाणी असो नसो, आपला जीव गहाण टाकून आणि लेकीबाळी विकून जमीनदाराच्या घरीं शेतसारा पटवला पाहिजेच. "

रेखा–" आणि तो सारा तरी ठराविक कांहीं आहे का ? सालोसाल वाढतच जातो. बरं ही अंधेरनगरी कां म्हणून कोणी विचारणारा देखील नाहीं. "

मुन्शी सदासुखलाल पटवारी ( कुलकर्णी ) आले हरिहर क्षेत्रीं स्नान करायला, आणि जमल्यास स्वस्त्यांत एक गाय विकत घ्यायला. पण त्या वर्षीची महागाई पाहून त्याचे पाय लटपटले. त्यानें एक कळकट दुलई पांघरली असून डोक्यावर टोपी होती त्याच्या. कानावर बोरूची लेखणी अजूनहि ठेवलेली होती, जणुं काय या जागीं देखील त्याला कीर्द खतावणी लिहायची होती. मसरखच्या जमीनदाराचा पटवारी असल्यामुळें आपण या संभाषणांत सामील व्हावें किंवा नाहीं याचा विचार चालला होता त्याच्या मनांत. पण गांवचें राजकारण चाललें असलें म्हणजे कान आणि तोंड असून माणसानें बोलायचें नाहीं म्हटलें तर तें कठीणच म्हणायचें. दुसरें म्हणजे असें कीं दयाळपूर कांहीं त्यांच्या धन्याचा गांव नव्हता; त्यामुळें त्या गांवच्या किसानांच्या बोलण्यांत भाग घ्यायला त्यांना हरकत वाटली नाहीं. मुंशीजीनें लेखणी बोटांच्या चिमटीनें कुरवाळीत म्हटलें—

" पंडित, विचारणारा धरणारा नाहीं म्हणून विचारतां ? कोण विचारणार ? इथं तर सांपडेल तो लुटतो–' पर संपत्तिकी लूट है; लूट सकै सो लूट '–परक्याचं धन जितकं लुटतां येईल तितकं लुटावं, असं चाललंय. बरं राजाहि नाही कोणी ! नाजिम साहेबाच्या कचेरींत माझा मावसमेहुणा आहे, त्याला आहे ठाऊक सारा भेदभाव. राजा-बिजा नाही, शें दोनशें फिरंगी डाकूंनी एक टोळी केली–आणि नांव दिलं कंपनी. "

रेखा–" हे मात्र ठीक सांगितलं मंसीजी. 'कंपनी बहादुर, कंपनी बहादुर' ऐकून ऐकून आम्हांला वाटायचं, कंपनी म्हणजे कोणी राजाबिजा असेल, पण आज खरी गोष्ट ठाऊक झाली."

मौला–" तरीच जिकडं पहावं तिकडं लूट चाललेली आहे. न्याय अन्यायाची वास्तपुस्त करणारा मात्र कोणीच नाहीं. रामपूरच्या मंसीजीचा दयाळपूर बरोबर गेल्या सात पिढ्या तरी कांहींहि संबंध होता का ?

सोबरन–" मला तर कळतच नाही मौलूभाई, हा रामपूरचा मुंशी आमच्या गांवचा मालिक कसा बनला. दिल्लीच्या बादशहाबरोबर कंपनीनं लढाई दिली—"

मुंशी–" दिल्ली नव्हे सोबरन राऊत, मकसूदाबादच्या ( मुर्शिदाबाद ) नबाबा-बरोबर दिली लढाई. दिल्लीच्या तख्ताजवळून मकसूदाबादनें आमचा मुलूख हिरावून घेतला होता, राऊत. "

सोबरन–" आम्हां लोकांना इतकी आठवण रहात नाहीं, मंसीजी. आम्हीं तर केवळ दिल्लीच जाणतों. बरं मकसूदाबादच्या हातीं राज्य आलं, तेव्हां देखील एकच राजा होता ना ? आम्हीं कसंबसं करीत होतों, मालगुजारी पटवत होतों. पण आतां काय यांना दोन दोन राजे म्हणावं कीं आणिक कांहीं म्हणावं ? "

रेखा–" सोबरन भैया, दोन दोन राजे झालेच ना ! एक कंपनीचं राज्य, दुसरं रामपूरच्या मंसीजींचं राज्यं ! जात्याच्या पाऊंतून जरा थोडंफार वाचण्याची आशा तरी होती पण आतां तळ आणि पाऊ यांच्यामध्यें सांपडल्यावर भरडून दळून निघाल्याशिवाय राहील तरी कसं ? आणि आम्हीं या उघड्या डोळयांनीं सारं पाहतो. मंसीजी, तुम्हींच सांगा आतां. आम्हीं तर गवारी, मूर्ख, अडाणी आहोंत. तुम्ही आमच्यापेक्षां शहाणे आहांत. भोला पंडित देखील. "

मुंशी–" रेखाभगत, तूं म्हणतोस तें अगदीं खरं आहे. जमीनदार जात्याची पाऊ आहे; राजापेक्षां कुठल्या तरी बाबतींत उणा वाटतो का तो ? "

रेखा–" उणा कसला मंसीजी, सवाईनं आहे ! गांवच्या पंचायतीला पुसतं का कोणी आतां ? रिवाज आहे म्हणून पांच पंच निवडायचे, पण त्यांना कोणता कारभार करतां येतो का ? सारा अधिकार जमीनदार आणि त्याचे अमले-शेमले यांच्या हातीं. तंटा-बखेडा झाला तर फिर्यादी-आरोपी या दोघांच्याकडून दंड वसूल करतात.

सोबरन राऊत, पंधरा वर्षं देखील झालीं नाहींत. कधीं नवराबायकोच्या भांडणांत म्हैस लिलांव होतांना ऐकलं होतं का ? "

सोबरन–" तेव्हां सारं पंचायतीच्या हातीं होतं. गांवांतले पंच कोणाचंहि घर उजाड पाडीत नसत. खुनाच्या मामल्यांत देखील ते तडजोड करून देत होते, रेखा भगत! आणखी मेंडबांध्या यांचं पाहिलं नाहीस तूं ? जसा त्यांचा कोणी ठाकठीक ठेवणारा वाली उरलाच नाहीं. पंचायत चालू असती तर असं कांहीं झालं असतं का ? "

रेखा–" कसं झालं असतं सोबरन राऊत ? आपल्या मुलांबाळांच्या चतकोरांत कोण उणं आणील ? पाऊस खूप झाला तर फाजील पाणी काढून लावायला आतां मेंड उरलेच कुठं ? सारे बुजून निघाले! बरं, कमी पाऊस पडला तर पाणी अडवायला बांध्या तरी कुठं आहेत ? साऱ्या खचून गेल्या, मग पीकपाणी व्हावं कसं ? "

मुंशी–" पंचायतींना धाब्यावर बसवून कंपनीनं हा जिम्मा जमीनदारावर सोंपवला. "

रेखा–" आणि जमीनदार काय करतो, तें आम्हीं पाहतच आहोंत. "

मुंशी–" मी देखील जमीनदाराचं मीठ खातों, रेखा भगत! आहे ठाऊक, मी मसरखच्या जमीनदाराचा पटवारी आहे. पण हें अन्यायाचं धन आहे. जो अन्यायाचं खाईल त्याच्या अंगीं लागत नाही. माझंच पहा ना–सात मुलगे होते, पण सांडासारखे मोठाले होऊन सारे पटापट गेले. " मुंशीजीच्या डोळ्यांत पाणी आलेलें पाहून सर्वांचेंच अंतःकरण विदीर्ण झालें. – " पटापट गेले रेखा भगत. आतां घरांत पाणी द्यायला एक बाईमाणूस देखील उरलं नाहीं. आणि धन्याची काय गत झाली आहे ठाऊक ? छपऱ्याच्या रांडेमागं लागले. आतां इंद्रिय गळून पडलं; रेखा भगत! गळून पडलं बरं, हीं जीं दोन मुलं आहेत, तीं घोंडे-खाजव्याच्या पोटचीं आहेत. "

रेखा– " मालिक लोकांत आतांशा असं खूप होतं म्हणे, मंसीजी. "

सोबरन– " शेत गेलं, गांव गेलं, साता समुद्रा पल्याडच्या या डाकूंनीं आमच्यावर आतां घरांतले डाकू सोडले. पंचायतहि गेली आणि जे कांहीं चार अक्षतांचे दाणे व्हायचे, तेहि होईनासे झाले. तरी पण पाऊसपाणी ठीक ठाक झालं आणि चार दाणे घरांत आले तर मालिक जमीनदार, गोराहत-चौकीदार, पटवारी-गुमास्ता यांच्या चोंचींतून वांचणार ते किती ? "

मुंशी– " पटवारी लुटतात हें आहे मला कबूल सोबरन राऊत! पण जमीनदार पटवाऱ्याला आठ आणे दरमहा देतो, हेंहि आहे ना ठाऊक ? आतां तुम्हींच सांगा, आम्हां कायस्थांची जीभ तरी भिजेल का आठ आण्यांमध्यें ? जमीनदारांना काय हें ठाऊक नसेल ? "

रेखा– " सगळं ठाऊक आहे मंसीजी, सगळं दिसतं त्यांना, आंधळे नाहींत कांहीं ते ! राजा कंपनी-बहादुर डाकू आहेच. त्यानं हा नवा डाकू जमीनदार आमच्यावर सोडला, आणि जमीनदारानं लहान लहान टोपलीभरू डाकू आमच्या डोक्यावर आणून बसवले. इतकं झालं तरी आम्हीं कसे जगणार?

सोबरन–" जगणार कसे ते दिसतंच. आतां पोटभर खायला मिळणारा आणि धड दोन पांघरुणं घालणारा एकजण तरी आढळतो का या दयाळपुरांत ? "

मुंशी–' कंपनीला त्याची कांहीं फिकीर नाहीं, सोबरन राऊत. तिनं माल गुजारीची रक्कम ठरवून दिली. किस्त पटवायच्या दिवशीं जमीनदार छपऱ्याला जातो आणि नगदी मोजून देतो. कंपनीला पैसा मिळाला म्हणजे झालं, मग इकडे दयाळपुरचे किसान जगले काय नी मेले काय ? जमीनदाराची मालगुजारी तुम्हीं दिली नाहीं कीं तो मारून मारून तुमच्या आंगाची सालडीं काढील. तुमच्या जवळून पांच रुपये घेतो, चार आपल्या घशांत घालतो आणि एक कंपनीला देतो म्हटलं सोबरन राऊत ! "

रेखा–" हे भगवान ! तूं झोंपलास का मेलास सांग तरी बाबा ! कां बरं आमचा न्याय करीत नाहींस ? आम्हीं तर हात टेंकले. "

सोबरन राऊत–" खरंच हात टेकलेले पाहिले ! ऐकलं का तुम्हीं ? बरई परगण्यांतल्या किसानांनीं एकी केली आणि जमीनदाराला धनी मानण्याचं साफ नाकारलं. त्यांनीं छपऱ्याला जाऊन कंपनीच्या साहेबाला म्हटलं, "आमची पंचायत मालगुजारी चुकवील. आम्हीं जमीनदाराला मानीत नाहीं." यावर साहेबानं काय उत्तर दिलं– 'अकाल दुकाळाची देखील द्याल ?' त्यावेळीं तर पोराबाळाचे जीव वाचवणं कठीण होतं. त्या फिरंग्याला दैवाच्या राजाचं देखील भय वाटत नव्हतं; आणिक हें देखील त्यानं मनापासून थोडंच म्हटलं होतं, वर वर बोलणं होतं त्याचं रेखा. पुढं म्हणाला तो,–' तुम्हीं कंगाल आहांत, तुम्हीं मालगुजारी दिली नाहीं तर कंपनीबहादुर तुमचं काय घेईल ? आम्हीं पैसेवाल्या अब्रूदार माणसाला जमीनदार बनवतों. त्यामुळं आमच्या मालगुजारीचा बकाया राहिला कीं त्याला आपलं घरदार लिलाव होण्याची भीति राहते. अब्रू जाण्याची भीति वाटते.' "

रेखा–" म्हणून तर साऱ्या अंगावर कोड फुटलेलं असतं या फिरंग्यांच्या. मोठे निर्दयी असतात लेकाचे. "

सोबरन–" झालं, बरईवाल्यांना कोणताच आधार उरला नाहीं, तेव्हां ते जीवावर उदार झाले. कंपनी जर बहादूर असती, तर बहादुराप्रमाणं लढली असती; लढणाऱ्याबरोबर लढाई दिली असती तिनं. बरईवाल्याजवळ पथ्थरकला ( बंदूक ) होत्या. कंपनीवाल्याजवळ तोफा. आणि कोठून कोठून काळी गोरी पलटण आली,

गांवासाठीं गांव जाळून टाकले, बायकां-पोरांची देखील गय केली नाहीं. काय करतील बरईवाले तरी ?"

मौला–"शेतीवाडी तर अशा तऱ्हेनं धुळीस मिळालीच, आतां विणकरांच्या तोंडचा देखील घांस हिसकूं लागले, सोबरन राऊत! आतां कंपनीबहादूर आपलं कापड विलाइतहून आणतात आन् विकतात."

मुंशी–"कळीवर कांतून विणून! ही माझी दुलई तेथलीच आहे, सोबरन राऊत. चरख्या-मागाचं कापड येवढं स्वस्त मिळत नाहीं; म्हणून इज्जतीखातर घ्यावं लागतं हें. इज्जतीकडे लक्ष दिलंच पाहिजे, रेखाभगत. तुम्ही हंसतां, पण सरकारा-दरबारांत जाजमावर बसण्याचा प्रसंग आला असता तर कळलं असतं."

रेखा–"तुमच्या इज्जतीसाठीं नाहीं हंसत, मंसीजी. हंसतों कंपनी बहादूरच्या करामतीसाठीं. राज्य करतो आणि व्यापारहि करतो. वा रे राज्य!"

भोला–"सत्ययुग, त्रेता द्वापार, आणि कलियुगाची पण पांच हजार वर्षे होऊन गेलीं. येवढ्या काळांत असं राज्यं कधीं ऐकलं नव्हतं."

मुंशी–"नाजिमच्या दरबारांत एका मुंशीनं कंपनी म्हणजे फिरंगी डाकू असं म्हटलं होतं, भोला पंडित. आणि दुसऱ्यानं सांगितलं कीं कंपनी सौदागराची जमात असून, ते आपल्या देशांतून केवळ व्यापार करायला आले. आधीं इथला माल तिथं विकत होते, आतां त्यानं बिलाइतमध्यें मोठमोठे कारखाने उघडले, त्यांतच स्वतः माल तयार करवतात आणि स्वतःच विकतात."

मौला–"मग झालं, आतां तर असं वाटतं कीं कारागिराची देखील धडगत नाहीं."

– २ –

हिंवाळ्यांत गंगा हिरवी बनते. आणि तिच्या स्वाभाविक शांत प्रवाहाची गति अधिकच गंभीर होते. या वेळीं नावांना धोका होण्याची शक्यता फारच थोडी असते. म्हणूनच व्यापारी हिंवाळा म्हणजे व्यापारासाठीं सुंदर मोसम काळ मानत असतात. या वेळीं गंगेच्या कांठावर चार तास बसलें तर शेंकडो मोठमोठ्या नौका तेथून पार जातांना दिसतील, त्यांपैकीं बऱ्याचशांमध्यें कंपनीचा माल आहे. त्यांतला बराचसा बिलायतेहून येऊन वरच्या प्रदेशांत जात असतो. आणि पाटणा, गाजीपूर, मिर्झापूर अशांसारख्या भरभराटलेल्या शहरांच्या घाटांवरून पाहिलें तर गंगेचा सारा प्रवाह मोठमोठ्या नौकांनीं झांकून गेलेला दिसून येतो.

पाटण्याहून एक बजरा ( मोठी नौका ) खालच्या बाजूला जात होता. त्यांतून शोरा, गालिचे इत्यादि कितीतरी वस्तू विलायतेसाठीं रवाना होत होत्या. पाटण्याहून कलकत्त्याला जायचे म्हटलें कीं एका आठवड्याहून अधिक काळ मोडतो, त्यामुळें

तिनकौडी डे आणि कोलमन यांच्यांत हळूं हळूं घनिष्ठभाव निर्माण झाला. तरी पण सुरवातीला एकमेकांशीं बोलायचालायला ते दबकलेच. तिनकौडीला नकली केसांचा टोप (विग) डोक्यावर, पायांतले ब्रीचेस, आंगांत फितवाल्या गुंड्या असलेला काळा कोट अशा पोशाखांतला तो कोडेला दिसणारा चेहेरा मोठा रोबिला आणि भीतिदायक वाटत होता, पण बोलायला प्रारंभ कोलमननेंच केला, म्हणून मग तिनकौडीची हिंमत हळूं हळूं वाढूं लागली. गप्पा गोष्टींतून तिनकौडीनें असा निष्कर्ष काढला कीं कोलमन देखील कंपनीच्या साहेबांवर जळफळत असून गव्हर्नरापासून तों कंपनीच्या लहान मोठ्या एजंटापर्यंत साऱ्यांवर मनसोक्त तोंडसुख घेतांना मुळींच मागेंपुढें पहात नाहीं. तिनकौडी देखील कंपनीच्या नौकरांना पाण्यांत पहात होता. वीस वर्षें पर्यंत त्यानें कंपनीच्या मोठमोठ्या कचेऱ्यांतून कारकुनीचें काम केलें होतें. तो गरिबाघरीं जन्माला आला तरी त्याचा लोभ परिमित असून तो स्वाभिमानी होता. तिनकौडी यानें आपल्या खाण्यापिण्याची जन्माची सोय करून ठेवली होती. एका जुन्या एजंटाच्या कृपेनें लुटीच्या वेळीं त्याला चोवीस परगण्यांत चार गांवांची जमीनदारी पण मिळाली होती; प्राप्तीच्या मानानें गांवांची मालगुजारी फारच थोडी होती. ही साहेबाची मेहेरबानी होती खरी, पण ती मिळवायला तिनकौडीनें असें कर्म केलें होतें कीं त्याच्या मतें त्या कर्माच्या पापांतून जन्मजन्मांतरीं देखील सुटका होणार नव्हती. साहेबाला खूष करण्यासाठीं त्यानें गांवची एक सुंदर तरुण ब्राह्मणी त्याच्याकडे नेऊन ठेवली होती. साहेब लोक त्यावेळीं आपल्या मेमांना येथें बहुधा आणीत नसत; कारण संकटानीं परिपूर्ण असा सहा महिन्यांचा समुद्राचा प्रवास करणें झेंपत नसे त्यांना. तिनकौडीचें वय असेल पंचेचाळीस; काळासांवळा गुबगुबीत वाटोळा देह; निरोगी; पण दररोज सकाळीं उठून आरशांत तोंड बघायचा आणि हाताची बोटें पहायचा. कोणत्याही दिवशीं आपल्याला कोड फुटूं शकेल असें त्याला वाटे; कारण त्याच्या मतें ब्राह्मणीचें पातिव्रत्य भंग करणाराला हेंच शासन असतें. साहेबांचें झिडकारणें, आणि त्यांची शिवीगाळ आणि लाथा सहन करणें यामुळें कंटाळून जाऊन त्यानें अजून नौकरीचें वय होतें तरी राजीनामा दिला. आतां तो गांवाकडे परत जायला निघाला होता. त्याच्या अंतःकरणांत वीस वर्षेंपर्यंत मुकाट्यानें गिळून घेतलेल्या अपमानाची आग धगधगत होती. कोलमन हा आपल्यापेक्षां देखील कट्टर असा कंपनीचा व तिच्या अधिकाऱ्यांचा शत्रु आहे असें दिसून येतांच, त्या दोघांत मोकळेपणानें उघड उघड गप्पा होऊं लागल्या. कोलमन एके दिवशीं सांगू लागला—

"ईस्ट इंडिया कंपनी केवळ व्यापार करण्यासाठीं स्थापन झाली होती. पण मागाहून या लोकांनीं लुटायला सुरवात केली. दिसत नाहीं? जेवढे म्हणून साहेब इथं येतात, ते अगदीं शक्य तितक्या लवकर लक्षाधीश बनून स्वदेशीं जाऊं

पाहतात. लहान मोठे सारे असेच. क्लाइव्हनं असंच केलं, पण त्याला कोणींहि हटकलं नाहीं. वॉरन हेस्टिंग्जनं लोभाला बळी पडून चेतसिंहाच्या राण्यांना उपाशी ठेवायला देखील कमी केलं नाहीं, अयोध्येच्या बेगमांना त्यानंच भिकारणी केलं, पण त्याच्या देशवाल्यांनीं त्याची गय केली नाही. शिक्षा होतां होतां वांचला पण जेवढं कमावलं तेवढं सारं बरींच वर्षे खटला चालल्यामुळं गमावून बसला."

"साहेब ? खटला कुणी भरला ?"

"पार्लमेंटनं ! आमच्या इथं राजा देखील मन मानेल तें करूं शकत नाहीं. मन मानेल तें केल्याबद्दल आम्ही आमच्या एका राजाची मान कापली फरसानं आणि तो अजूनहि जपून ठेवलेला आहे. डे, पार्लमेंट म्हणजे पंचायत आहे. त्यांत बरेचसे लोक खाऊन पिऊन सुखी लोकांनीं निवडलेले असतात आणि कांहीं मोठमोठ्या जमीनदार घराण्यांतले केवळ त्यांच्या घरंदाजपणामुळे घेण्यांत येतात."

"जमीनदार केव्हांपासून आहेत तुमच्याकडे, साहेब ?"

"आमच्या डोळयांदेखत हिंदुस्थानांत जमीनदारी कायम झाली, डे ! तिकडं आमच्याकडे कितीतरी शतकांपासून चालत आलेली आहे. परंतु तिथं देखील जबर-दस्तीनं शेतांतली किसानांची मिळकत हिरावून घेतलेली होती. जमीनदारी कायम करणाऱ्या गव्हर्नरचं नांव आहे ना ठाऊक ?"

"होय, कार्नवालिस."

"विलायतेंत नंबर एकचा कसाब जमीनदार आहे तो. त्यानं इथं आल्यावर पाहिलं कीं जोंपर्यंत किसान शेतांचे मालिक राहतील तोंपर्यंत अकाळा दुष्काळांत किंवा झडीच्या पावसानं पिकं बुडाली तर मालगुजारी जमीनधारा नीट वसूल करणं शक्य होणार नाहीं. शिवाय त्याला असंहि वाटलं कीं साता समुद्रापलीकडच्या इंग्रजांना या परमुलुखांत कोणी असे दोस्त पण पैदा करावेत, कीं ज्यांचा स्वार्थ इंग्रजांच्या स्वार्थाशीं निगडित राहील. जमीनदार हे इंग्रजानं निर्माण केलेले आहेत. किसानांच्या बंडामुळं इंग्रजांच्या राज्याला जसा धोका पोंचेल, तसाच जमीनदारांच्या संपत्तीला, अब्रूला आणि जमीनदारीला देखील धोका पोंचेल. यासाठीच लहान सहान किसानांना मालिक बनवण्याचे ऐवजीं पंचेवीस पन्नास गांवांचा एकेक असे बडे बडे जमीनदार बनवले म्हणजे ते आमच्या संपत् विपत् दोन्ही बाबतीत उपयोगी पडूं शकतील, असा विचार करून त्या विलायती कसाब जमीनदारानं हिंद मधल्या किसानांच्या माना मुरगाळून टाकल्या."

"मुरगाळल्या यांत तर तिळमात्र शंका नाहीं,"—तिनकौडीला आपल्या जमीन-दारींतल्या किसानांची आठवण झाली.

" जमनिदारांच्या जुलमानं साऱ्या दुनियेतले लोक हवालदिल झालेले आहेत, पण हरकत नाहीं, त्यांचे दिवस देखील आतां भरत आले आहेत. "

" ते कसे साहेब ? "

" फ्रान्सच्या राजाराणीला कांहीं वर्षांपूर्वीं प्रजेनं जीवें मारून टाकलं. आणि त्या क्रोधाग्नींत किती तरी जहागीरदार-जमीनदार जळून भस्म झाले. जमीनदारी पद्धति नष्ट झाली. लोकांनीं मनुष्यमात्रासाठीं स्वतंत्रता, समानता आणि बंधुता या ब्रीदाची घोषणा केली. मी इंग्लंडमध्यें होतों तेव्हा; आणि डे, फ्रान्सच्या राजमहालावर फ्रेंच प्रजासत्तेचा तिरंगी झेंडा फडफडतांना मी या डोळ्यांनीं पाहिलेला आहे. इंग्लंडचा राजा, जमनिदार-जहागीरदार, सारे आजकाल थरथर कांपत आहेत. इंग्लंडमध्यें देखील फ्रान्स प्रमाणंच झालं असतं, पण एका घटनेमुळं तें होऊं शकलं नाहीं, याचं वाईट वाटतं मला ! "

" कोणती घटना, साहेब ? "

" पहातां ना, विलायती कारखान्यातला किती तरी माल हिंदुस्थानच्या बाजारांत विकण्यांत येत आहे. तुमच्या इथले विणकर, सूत कांतणारे, सगळे बेकार होत आहेत, आणि आमच्या इथल्या शेटजींनी आपले कारखाने उघडून त्यांत जमीन-, दारांच्या अत्याचारामुळं उपाशी मरणाऱ्या लोकांना काम दिलं. त्यांनींच बनवलेला माल इथं येत असतो. आजवर आमच्या इथं यंत्र हातांनीं चालवीत असत. आतां वाफेच इंजिन बनत आहे; त्याच्यावर चालणाऱ्या चरख्या मागाचं कापड आणखी अधिक स्वस्त बनेल. मग या इथल्या कारागिरांचं वाटोळंच झालं म्हणून समजा. आमच्या इथले कारागीर देखील तसे लुबाडले गेलेच, पण त्यांना निदान या कारखान्यांमधून तरी काम मिळतं; कसे बसे मजुरी करून पोट भरतात. जर हे कारखाने उघडले नसते तर मात्र आमच्या देशाची देखील फ्रान्स सारखीच दशा झाली असती. माणसाला माणसाप्रमाणं जगतां आलं पाहिजे, डे. इतर माणसांना जो पशु मानतो, त्याला व त्याच्या मुलाबाळांना देखील स्वतः पशु बनावं लागतं ! "

" हें ठीक बोललांत, साहेब ! मी आपले गुलाम आणि नौकर यांना कधींहि माणसं समजलों नव्हतों. पण जेव्हां साहेब लोक मलाहि तसंच मानूं लागले, तेव्हां समजलं कीं माणसाला अपमान किती कडू लागतो. "

" गुलामगिरीची प्रथा नष्ट करण्यासंबंधी विलायतेंत खूपच चळवळ चाललेली आहे ! "

" विलायतेंत देखील गुलामगिरी आहेच्च का ? "

" साऱ्याच जगांत दुर्दैवी स्त्रीपुरुषांची खरेदी विक्री चाललेली आहे. पण मला अशी आशा वाटते कीं विलायतेंत लवकरच याच्या विरुद्ध कायदा बनवण्यांत येईल."

" मग ते गुलामांचे धनी धनिक काय करतील ? "

" धनिकांना हें नको आहे, व त्यांचंच प्रभुत्व आमच्या पार्लमेंटावर आहे. पण त्यांच्या मधल्याच कितीकांना वाटूं लागलंय की माणसांची खरेदीविक्री ही अत्यंत वाईट चाल आहे. हे तुम्हांला देखील कळतं डे. पण कितीकांना ही गुलामगिरीची प्रथा जावी असं वाटतं याचं कारण त्यांना पापा-पुण्याचा विचार आहे म्हणून नव्हे तर आज काल कारखान्यांत लोखंडाची यंत्रं कामं करतात ना, त्यांची किंमत खूप असते; पण दास त्याची पर्वा करणार नाहींत. म्हणूनच बारकाव्यांचं काम त्यांना देण्यांत येत नाहीं. ज्यांच्या जीवनामरणाचा तुम्हीं रात्रंदिवस खेळ करतां, ते संधि सांपडली तर तुमचं भारींत भारी नुकसान करून तुमच्यावर सूड उगवण्याचा हूख धरतीलच. "

" गाई वासरांची ताटातूट करून विकावं तसं एखाद्या दासीला तिच्या मुलाला तोडून विकतांना जेव्हां मी पाहतों तेव्हां मला तें विलक्षण असह्य होतं. "

" ज्याला असह्य वाटत नसेल, त्याला माणूसच म्हणतां येणार नाहीं, डे ! "

" माझ्या मनांत घोळतं आहे, फ्रान्समधलं विनाराजाचं राज्य. काय म्हणतात त्याला साहेब ? "

" प्रजातंत्र. "

" प्रजातंत्र राजतंत्रापेक्षां चांगलं असतं कां ? "

" डे, प्रजातंत्र सर्वांत अत्यंत चांगलं राज्य असतं. राजे, राजपुत्र, राण्या, राजकन्या यांच्या चैनीसाठीं देशाच्या उत्पन्नाचा बराचसा हिस्सा खर्च होत असतो. उलट पंचायती राज्य असलं कीं त्यांत अधिक न्यायीपण, कमी पक्षपात आणि अधिक सहानुभूति राहते राजाच्या राज्या पेक्षां. "

" शक्य आहे. मी आपल्या गांवांतील पंचायतींचा कारभार पाहिला आहे पूर्वी. खरोखरीच त्या न्याय चांगला करीत आणि खर्चाच्या पायीं माणूस फाक्या बनत नसे. पण जेव्हांपासून कार्नवालिसच्या जमीनदारांनीं पंचायतीचा गळा दाबला तेव्हां पासून लोकांच्या मानेला फांस लागला. "

" असंच झालं डे ! पण फ्रान्सच्या जनतेचा उद्देश प्रजातंत्राच्याहि पलीकडचा होता. तिच्या मनांत मानवमात्रांसाठी समानता, स्वतंत्रता आणि बंधुतां यांचं राज्य स्थापन करण्याचं होतं. "

" आमच्या देशासाठी देखील ? "

" तुम्हीं मानव आहांत कीं नाहीं ? "

" साहेबांच्या नजरेनं आम्हीं कुठले मानव ? "

" जोंपर्यंत पृथ्वीवर समानता, स्वतंत्रता आणि बंधुता यांची सत्ता चालणार नाहीं, जोपर्यंत ती सत्ता काळ्या गोऱ्या साऱ्या मानवांत स्थापन होत नाहीं, तोंपर्यंत मनुष्याला मनुष्यपणा येऊं शकणार नाही डे! कसाई कार्नवालिस आपल्या देशांतल्या गोऱ्या किसानांना देखील मानव मानायला तयार नाही. फ्रान्स देशातला राजा आणि जमीनदार गेले पण तेथल्या बनियांनीं--ईस्ट इंडिया कंपनीच्या भावा बंदांनीं राज्य संभाळलं; त्यामुळं तिथं समानता, स्वतंत्रता व बंधुता यांचं खरं तिरंगी निशाण फडकूं शकलं नाहीं."

" तर काय, फ्रान्समध्यें राजे-बाबूंच्या ऐवजीं शेटजींचं राज्य झालं?"

" होय, आणि इंग्लंडचे शेटजी ओरडूं लागले की आम्ही साता समुद्रापल्याड हिंदुस्थानचं राज्य चालवूं शकतों तर मग इंग्लंडमध्यें देखील करूं शकूं. ते तिथली राज्यशक्ति आपल्या हातीं घेऊं पाहतात, मात्र राजाला हटवून नव्हें."

' पण तुम्ही तर म्हणता की राजाच्या हातीं इंग्लंडचीं राज्यसूत्रंच नाहींत."

होय. मी या गोऱ्या बनियांच्या लीला घेतल्या पाहून. मला देश बघावेसे वाटले म्हणून संधि सांपडताच मी कंपनीची नौकरी धरली. तसाच आलो असतों तर या बनियांनीं संशय घेतला असता माझा. मग माझं देशपर्यटन करणं कठीण झालं असतं, म्हणून दोन वर्षं या कंपनीच्या नौकरीच्या नर्कात खितपत पडलों."

" संभावितांसाठीं नर्कच आहे हा साहेब. जे पापाची कमाई करून व सारे अपमान गिळून धन मिळवण्याची इच्छा करतात त्यांचाच निभाव या नौकरींत लागेल. कार्नवालिसच्या एका अनुचराच्या कृपेनं मला केल्या पापाची कमाई म्हणून चार गांवाची जमीनदारी मिळाली पण त्याचं फळ देखील मिळून चुकलं. बायको मुलं सगळीं पटकीनं मेलीं. आतां त्या जमीनदारीच्या नांवानं थरकाप होतो अंतःकरणाचा. मी देखील तुमच्या मताशीं सहमत आहे आतां समानता, स्वतंत्रता, आणि बंधुता याचं राज्य झालं तरच या पृथ्वीचा स्वर्ग होऊं शकेल, मानवाची मानखंडना होणार नाहीं."

" पण हें केवळ सहमत होण्यानं अगर नुसती इच्छा करण्यानं होणार नाहीं, डे! याच्या साठीं फ्रान्सच्या प्रमाणंच हजारोंनीं बलिदान केलं पाहिजे आपलं आणि तें देखील मुकाटयानं करून चालणार नाहीं. लाखों हिंदुस्थानी शिपाई इंग्रजांसाठीं बळी गेलेले आहेत–जात आहेत. तसलं बलिदान नव्हे, आतां स्वतःचं स्वतःसाठीं बलिदान, आणि तें देखिल समजून सवरून केलेलं!"

" समजून सवरून?"

" समजून सवरून, याचा अर्थ हिंदुस्थानीं लोकांना जगाचं ज्ञान झालं पाहिजे. सायन्स (विज्ञान) मनुष्याच्या हातीं भारी सामर्थ्य देत आहे. याच सायन्सच्या

ज्ञानावर मानवानं बारुद आणि बंदुक बनविली, स्वतःचं सामर्थ्य वाढवलं. याच विज्ञानानं तुमचीं शहरं उजाड करून इंग्लंडमध्यें नवे यंत्र-कारखाने आणि नवीं शहरं निर्माण केलीं. त्याच विज्ञानाला तुम्हांला शरण जावं लागेल. ''

'' आणिक ? ''

'' आणखी हिंदुस्थानांतले विटाळ चांडाळ, जातपात, हिंदु मुसलमानांतले भेद मिटवावे लागतील. तुम्हीं पहातांच की आम्हीं खाण्या पिण्याच्या बाबतीत कुणाचा कसलाहि विटाळ मानीत नाही. ''

'' नाहीं ना ! ''

' इंग्रजांत धनिक आणि गरीब यांच्या शिवाय दुसऱ्या लहान मोठ्या जातिभेदाची पर्वा तरी आहे का ? ''

'' नाही. बरं पुढं ? ''

'' सतीची चाल बंद पाडावी लागेल. लाखों बायका दर वर्षी विस्तवांत जाळणं बरं का ? तुम्हांला काय वाटतं कीं यामुळे ईश्वर तुम्हांला क्षमा करील ? ''

कोलमन आणि तिनकौडी डे हे कलकत्त्याला पोहोचल्यावर त्याची ताटातूट होणार होती. त्यामुळें त्या दोघांनाहि अत्यंत वाईट वाटत होते. कोलमनने निरोप घेतानां म्हटलें—

'' मित्रा, आतां आपण एकोणविसाव्या शतकांत पाऊल ठेवलं. जगांत उलथापालथी होत आहेत या उलथापालथीत आपण देखील भाग घेतला पाहिजे. यासाठीं पहिल्यादां एक काम करणं अवश्य आहे छापखाना आणि वर्तमानपत्र काढून जनतेला विस्तृत जगांतल्या हालचालींची माहिती करून द्यायला हवी. ''

– ३ –

त्या सालीं पाऊस पाणी नव्हतं. ज्येष्ठांत कोरडे पडलेले तलाव तसेच ठणठणीत कोरडे राहिले. तांदळा-रबीचें पीक पसाभर देखील झालें नाहीं. घरोघरीं मरगळ झाली, बरेचसे लोक घरें उजाड करून निघून गेले. धुरदेहाचा मोठा जिवंत तलाव कोरडा झाला तेव्हां त्याच्या वाळलेल्या पात्रावर पंचेवीस कोसांच्या टापूंतले लोक तुटून पडले. तेथें ते सारे कमळांची पाळेंमुळे–भसीड खोदून खाण्यासाठीं आले होते. आणि कितीकदां तर त्यांचीं त्यासाठीं आपसांत भांडणें देखील झालीं होतीं.

दुसऱ्या वर्षी पाऊस पडला. मंडियाच्या पहिल्या पेरणी नंतर जेव्हां रेखा निंदण करूं लागला तेव्हां त्याला आपल्या जवळ उभ्या असलेल्या मंगरीला पाहून अचंबा वाटूं लागला. त्या एका वर्षांत सगळीच धरणी उलट पुलट झालेली होती जणूं. घराघरांतलीं बरींचशीं माणसें मेलेलीं होतीं, घराघरांतल्या लोकांची पांगापांग झालेली होती. रेखाला आश्चर्य वाटत होतें अशाचें कीं त्या दोन जिवांनीं कसेबसे आपल्या

देहांतले प्राण सांभाळून एकमेकांची सोबत पण केलेली होती. रेखाला या बाबतींत धुरदेहाचे मोठे उपकार वाटत होते.

आणखी देखील कधीं पावसाच्या अभावामुळें दुष्काळ पडलेला असेल; मात्र इतके कष्ट रेखाच्या काळाआधींच्या किसानांना भोगावे लागले नसतील. त्या वेळीं एकच सरकार होते व त्याला देखील कमी सारा द्यावा लागत असे; पण आतां कंपनी सरकारच्या जोडीला हें आणखी जमीनदाराचें जबरदस्त सरकार होतें, त्यांच्या शिपाईप्याद्यांच्या मुळें वेलावर भोपळा देखील राहत नसे. एका हंगामाची कमाई किसानांना दीड महिना देखील पुरत नसे. मग दुष्काळासाठीं किसान काय पुरवून ठेवूं शकतील कपाळ ?

मार्गेसरांत मंगरीनें एका बाळाला जन्म दिला तेव्हां तर रेखाला अधिकच अचंबा वाटला, आपल्या पन्नाशी बद्दल नव्हे; कारण त्याची तिसरी बायको मंगरी ही तिशींतलीच असून कित्येक मेलेल्या मुलांची आई होती. पण दुष्काळांत जेथें हाड मांसाचे पोषण होणेच कठीण, तेथे मंगरीनें आणखी एका जीवाचे पोषण केलेलें होतें. सुक्या दुष्काळांत जन्म झाल्यामुळे रेखानें मुलाचें नांव सुखारी ठेवलें होतें.

माघांत रामपूरचे मालक आपले हत्ती घोडे व शिपाईप्यादे घेऊन दयाळपूरला आले. रेखाच्या कानीं आलें होते कीं मालकाला मूलबाळ कांहीच नाहीं. दुष्काळाच्या वेळीं देखील त्यांच्या घरीं सात वर्षांचा जुना तांदूळ खायला काढलेला होता. दयाळ-पुरांत मालकाची चावडी गांवाच्या एका टोंकाला रस्त्यावरच होती. तिच्या पुढें एक पंचवीस एकरांची आंबराई तयार करणें चाललें होतें; तिचें खोद-पाणी दयाळपूरकरांना मोफत करावें लागत होतें. मालकानें पन्नास पन्नास झाडें एकेका घराच्या जिम्याला दिलीं होतीं. झाड वाळलें तर घरवाल्यांना सव्वा रुपया दंड द्यावा लागत असे. रेखाच्या पुढल्या पिढीला जमीनदारी म्हणजे जुन्या काळापासून चालत आलेली सनातन गोष्ट वाटूं लागली होती. त्यांच्या दृष्टीनें सोबरन राऊत आणि रेखा भगत यांनीं सांगितलेल्या जमीनदारी काळाच्या आधींची व्यवस्था आणि पंचायती राज्य या कपोलकल्पित कथा ठरलेल्या होत्या. मालकाचे प्यादे दुष्काळानंतर तर आणखीच मस्तवाल झाले होते. त्यांच्या मतें दुष्काळ आला तो किसानांचे मन अधिकच मुर्दाड बनवण्यासाठीं आणि मालकांचा धाक त्यांच्यावर अधिक बसवण्यासाठीं. मार्गेसरांत जेव्हां रेखाच्या मांडवावरल्या भोपळ्याच्या वेलांना कासलीं दिसूं लागलीं तेव्हांपासूनच मालकांच्या प्याद्यांनीं घिरट्या घालायला सुरवात केली होती. लोक म्हणत, दुष्काळा-पासून रेखा चिडचिडा झाला, पण त्याला या साऱ्या गोष्टी नव्या वाटत होत्या. खरी गोष्ट अशी होती की दुष्काळा नंतर गांवात इतर लोक खूपच घसरगुंडीला लागले होते, त्या मानानें रेखा बराच सांवरलेला होता. त्यामुळें त्याच्या स्वाभि-

मानाला चिडचिडेपणा हे नाव व्यवहारांत मिळालें होते. प्यादे शिपाई मांडवाच्या आसपास फिरताना बघून रेखा मनांतून कुढत होता पण त्यानें तें तोंडावाटे बाहेर काढलें नाहीं. एके दिवशीं एक प्यादा दिवाणजीसाठीं (पटवाऱ्यासाठीं) दुध्या तोडायला मांडवावर चढला त्याच्या. त्या वेळीं रेखा भगत घरांत सुखारीला मांडीवर घेऊन लाडवत होता. मांडव दबल्याचा व चरचरल्याचा आवाज ऐकून त्याने सुखारीला चापऱ्यावर ठेवलें व तो बाहेर आला. पाहिलें, प्यादा छपरावर चढून दुधे तोडीत आहे; तीन तोडलेले होते, चवथ्याला हात लावला होता. रेखाच्या अंगाची आग झाली. त्यानें अर्ध्या गांवाला ऐकूं जाईल अशा आवाजात दम देऊन म्हटलें,–

" कोण आहे रे ? "

" दिवाणजी साठीं दुधे तोडतो, दिसत नाही का ? " वर मान देखील न उचलतां प्यादा म्हणाला.

रेखानें दम देऊन म्हटलें " बऱ्या बोलानं आधी खालीं उरत. बहिरा तर नाहीं ना ? "

" मालकाच्या शिपायाप्यायाशीं बोलतोस हें आहे ना ठाऊक ? "

" चांगलं ठाऊक आहे. दुधे तिथंच ठेवून खाली उतर, भलेमाणूसपणा यांतच आहे. "

प्यादा एक शब्दही न बोलतां खाली आला. दिवाणजीनें ऐकले तेव्हां त्यानेंहि आपला संताप गिळला. माघांत मालिक आल्यावर याचा निवाडा करण्याचे ठरवलें त्यानें.

मालिक आल्यावर तोच प्यादा संध्याकाळीं रेखा भगतच्या घरीं येऊन म्हणाला, " उद्यां सकाळीं मालकांसाठीं दोन शेर दूध पाठवलं पाहिजे. "

" माझ्या घरीं तर गाय म्हैस कांहीच नाहीं, दूध कुठून आणूं ? "

" कुठूनहि आण. मालकाचा हुकूम आहे. "

दिवाणजीला माहित होतें कीं रेखा भगताच्या घरीं गाय म्हैस कांहीहि नाहीं. पण त्याला तर रेखाची ' खोयमोडी ' करायची होती. संध्याकाळींच त्यानें मालकाच्या कानीं लागून रेखाच्या अपराधाची भली मोठी पत्रावळ त्याच्यापुढे ठेवलेली होती. आणि वर अशीहि कागाळी केली की त्यामुळं सारा गांव विरूद्ध होऊं पहात आहे. मालकाने रात्रींच आपला बेत नक्की केला.

सकाळी रेखाकडून दुध कांहीं आलें नाही. प्यादा गेला तेव्हां रेखानें आपल्या जवळ दुभतें जनावर नसल्याचे सांगितले. मालकानें पांच मुसंडे प्यादे बोलावून हुकूम सोडला–

" जा, त्या हरामजाद्याच्या बायकोचं दुध आणा दोहून ! "

गांवांतले कितीतरी जण त्यावेळीं तेथें हजर होते, त्यांना वाटलें कीं रेखाला पकडून आणतील प्यादे. रेखाला एक शब्दहि बोलण्याचा अवसर न देतां प्याद्यांनीं त्याच्या मुसक्या बांधल्या आणि दोघेजण आंत घरांत शिरून त्यांनीं मंगरीला बाहेर ओढलें. अगतिक रेखा खुनारलेल्या डोळयांनीं बघतच राहिला, त्यांनीं रडणाऱ्या मंगरीचे स्तन धरून खरोखरीच त्याची धार काढली एका पेल्यांत, आणि रेखाला तसाच बांधलेला तेथें ठेवून ते परत गेले.

मंगरी लाजेमुळें तशीच तोंड लपवून बसून राहिली. रेखानें आपली बसलेली दांतखिळी उलवून जरा वेळाने म्हटलें–

"मंगरी, लाजूं नकोस. आज आपल्या गांवची पंचायत जिवंत असती तर खुद्द बादशहा देखील असं करूं शकला नसता. पण या आमच्या बेइज्जतीचं फळ त्याना चाखवीनच. खरा अहीराच्या अस्सल बीजाचा असेन, तर तो दिवाण आणि रामपूरचा मुंशी या दोघांच्या कुळांत त्यांच्या नांवानं रडायला एकालाहि मागं ठेवणार नाहीं. या अपमानाचा न्याय माझे हे हातच करतील ये मंगरी, सोड माझे हात."

मंगरीचे डोळे झाले होते श्रावणा भाद्व्यांतल्या दिवसासारखे. तिने रेखाच्या मुसक्या सोडल्या. त्यानें घरांत जाऊन सुखारीचे मुके घेतले आणि मग बायकोला म्हटलें––

"मंगरी, तुला या घरांतून जें कांहीं काढतां येईल तें काढ आणि माहेरीं चालती हो. मी आतां हें घर पेटवून देणार आहे."

मंगरीनें रेखाचा स्वर ओळखला. तिने मुलगा आणि चार दोन धडोतीं घेऊन रेखाच्या पायावर डोकें ठेवलें. रेखानें आपला स्वर अत्यंत कोमल करून म्हटलें––

"केवळ तुझ्याच अब्रूचा नव्हे, तर साऱ्या गांवाच्या अब्रूचा सूड घ्यायचा आहे मला. जा; सुखारीला त्याचा बाप कसा होता हें सांगायला विसरूं नकोस. उशीर करूं नकोस. आगटींतले निवे आणायला चाललो मी आतां."

मंगरी दूरवर गेली आणि घराच्या आढ्यांतून केव्हां जाळ दिसतो याची वाट बघत उभी राहिली. गांवाच्या एका टोंकावर असलेल्या रेखाच्या जळत्या घराकडे गांवकरी धांवले आणि रेखा नंगी तरवार घेऊन जमीनदाराच्या चावडींत शिरला. हा काळाचा अवतार पाहून शिपाईप्याद्यांनीं धूम ठोकली. मालिक आणि दिवाण यांना जीवें मारतांना रेखा म्हणाला–"पाप्यांनों, तुमच्या नांवानं रडणारा एक देखलि ठेवणार नाहीं मी मागं!"

रेखानें आपलें हें बोलणें खरें केलें आणि तो प्रतिज्ञा पूर्वक बऱ्याच दीर्घकाळपर्यंत जगला.

कसाई कार्नवालिसनें असे किती रेखा निर्माण केले असतलि?

# १८–मंगल सिंह

( काळ--इ. स. १८५७ )

– १ –

ते दोघे आज टावर बघायला गेले होते. राजाचे विरोधी ज्या कोठड्यांतून जन्मभर खितपत पडत असत त्या बघितल्या त्यांनीं. त्यानीं बेड्या, कुऱ्हाडी आणि दुसरीं हत्यारें पण पाहिलीं, यांच्या जोरावर राजे असे सिद्ध करीत कीं जगणें मरणें त्यांच्याच हातीं असून तेच केवळ पृथ्वीवर ईश्वराचे युवराज म्हणा नाही तर यमराज म्हणा आहेत. या सर्वांच्यापेक्षां एक वस्तु त्याना अधिक आकर्षक वाटली. ती म्हणजे ज्या ठिकाणीं इंग्लंडच्या राजाराणीची शिरे धडावेगळी करून जमिनीवर लोळत पडलीं होतीं ती जागा.

ॲनी रसेलनें आज देखील आपला नाजुक हात त्याच्या हातांत दिलेला होता, पण आज त्याला तिच्या हाताची कोमलता विशेषच प्रतीत होत होती. अकरा वर्षांपूर्वी (इ. स. १८४५ मध्यें) फॅराडे या शास्त्रीय-संशोधकाने शोधून काढलेल्या विजेच्या प्रमाणे कसली तरी शक्ती ॲनीच्या हातांतून निघून त्याच्या शरीरांत धांवू लागली होती जशी कांहीं. मंगलसिंह म्हणाला–

" ॲनी, तूं खरोखरच विजेचा उगम (बॅटरी) आहेस का ? "

" असं कां बरं म्हणालास, मंगी ? "

" मला प्रत्यंतर येतं म्हणून. सोळा वर्षापूर्वी मी जेव्हां पहिल्यांदां इंग्लंडच्या जमिनीवर पाऊल ठेवलं तेव्हां वाटलं अंधारांतून प्रकाशांत आलों मी, मला इथं एक विशाल जग दिसलं–केवळ लांबी रुंदीच्या दृष्टीनं नव्हें तर भविष्य काळाच्या उदरांत दूरवर दिसणारं एक विशाल जग दिसूं लागलं. सॅकरीन ( इ. सन १८०८ ), वाफेनं चालणारं जहाज ( इ. स. १८१९ ), रेलवे ( इ. स. १८२५ ), आगपेटी ( इ. स. १८३८ ), फोटो ( इ. स. १८३९ ), विजेचे दिवे (१८४४), या गोष्टी नव्या आणि आश्चर्यकारक वाटल्या पहातांना, पण जेव्हां केंब्रिजमध्ये मी त्यांच्या संबंधीं वाचलं आणि रसायन शाळांत प्रयोग करण्याची संधि साधली तेव्हां भविष्यकाळीं जगाच्या ललाटीं काय काय लिहिलेलं आहे, हें मला समजूं लागलं. "

" खरंच इंग्लंडमध्यें येणं म्हणजे अंधारांतून प्रकाशाकडे येण्यासारखं वाटलं तुला ? "

" केवळ आत्तां मी तुला सांगितलं त्याच अर्थानं. तसं म्हटलं तर भारत सोडून निघालों तेव्हां माझ्या मनांत फक्त दोनच विचार होते– एक, आपली प्रिय इष्ट देवता प्रभू येशू यांच्या भक्तांचा देश पहाण्याचा, आणि दुसरा म्हणजे आपल्या वंशाला विन्मुख झालेली राजलक्ष्मी पुन्हां परतवून नेण्याचा प्रयत्न करण्याचा."

" खरंच, कितीदां तरी मी तुला तुझी माहिती विचारीन म्हणत्ये, पण असंच विसरून राहतं. आज सांग मंगी ! "

" जिनं माझ्या जीवनाची दिशाच बदलवून टाकली तिला सांगायला मला कसली हरकत वाटणार ? चल, लाडके ॲनी, आपण टेम्सच्या या शांत प्रवाहाकडे जाऊं या. आमच्या गंगेइतकी कांहीं टेम्स सुंदर आणि भव्य नाहीं पण कितीकदां तरी मला टेम्स पाहिली की गंगेची गोड आठवण येत असते. ॲनी, तुला ठाऊकच आहे, मला प्रभू येशु ख्रिस्ताच्या पूजनाशिवाय इतर साऱ्या पूजा अर्चा पाखंड आणि थोतांड वाटतात; तिटकारा वाटतो मला त्याचा; पण या टेम्सनंच मला पुन्हां ख्रिस्तविरोधी पाखंडी बनवलं. मी आपल्या हिंदू आईला कितीदां तरी भक्तिभावानं गंगेला फुलं वाहतांना पाहिलेलं आहे.

आतां दोघेहि टेम्सच्या किनाऱ्यावर जाऊन पोंचली होती. तेथें एका दगडी चबुतऱ्यावर तीं टेम्सकडे तोंड करून बसलीं. ॲनीच्या डोक्यावरील कानटोपीसारख्या पांढऱ्या टोपींतून निसटून गालांवर लोळणारे सोनेरी केसांचे गुच्छ आतां वाऱ्यामुळें भुरभुरूं लागले. मंगलनें त्यांचें चुंबन घेऊन पुन्हां बोलायला प्रारंभ केला--

" या टेम्सच्या किनाऱ्यावरून मी कितीदां तरी गंगेला आपलीं मानसफुलं वाहिलीं. "

" गंगेला फुलं वहायची तुझी आई ? "

" खूप भक्तिभावानं. ख्रिस्ती नाहीं कां प्रभु येशूची भक्तिपूर्वक प्रार्थना करीत ?– अगदीं तशाच. मी जेव्हां पहिल्यांदा ख्रिस्ती झालों तेव्हां मला तिचं करणं रानटी-पणाचं वाटे. पण आतां मी कितीदां तरी गंगेचा मानसिक अपमान केल्याबद्दल पश्चात्ताप केलेला आहे. "

" ख्रिस्तीपणामुळं आमच्या ज्या भावना नष्ट झाल्या असत्या, त्या आमच्या कवींनीं जिवंत केल्या. आम्हीं टेम्सला पिता म्हणतो हें आहे ना तुला ठाऊक ? "

" मग आम्हीहि म्हणतो--गंगामाता. "

" तुमची कल्पना अधिक मधुर वाटते, मंगी ! बरं, सांग ना तुझ्याबद्दल पुढं !"

"बनारस आणि रामनगर गंगेच्या या त्या कांठांवर थोड्याश्या अंतरावर बसलेलीं आहेत. वयाच्या सोळा वर्षांपर्यंत मी गंगेला पाहिलेलं आहे. माझं घर बनारसमध्यें अगदीं गंगेच्या कांठावरच आहे. घरापासून गंगेपर्यंत साठ पायऱ्यांचा एक घाट बांधलेला आहे. जन्मतांक्षणीं डोळे उघडले तेव्हांच आईनं मला मांडीवर घेऊन गंगेचं दर्शन करून दिलं. काय असेल ते असो, पण गंगा माझ्या धमन्यांतून वाहत आहे जणुं. रामनगरांत माझ्या आजोबांचा एक किल्ला आहे पण तो मी एकदोनदांच काय तो गंगेमधून नावेंतून पाहिला. आंत जाऊन, किंवा असाच आणखी बाहेरून पहाण्याची इच्छाहि झाली नाहीं कधीं आईला तर तिकडे कधीं जावंसं देखील वाटलं नाहीं. ॲनी, तूंच सांग. वास्तविक त्या किल्ल्याची जी युवराज्ञी व्हायची तिच्या कपाळीं बनारस मध्ये इंग्रजाच्या धाकानं एका घरांत नांव बदलून जन्म घालवायची पाळी आल्यावर तिनं कसा बरं त्या किल्ल्याकडे डोळा उचलून बघायचं साहस करावं? माझे आजोबा, महाराजा चेतसिंग, यांना त्या लुटारू वारन् हेस्टिंग्जनं नाहक पदच्युत केलं. –हेस्टिंग्जला केल्या करणीचं थोडं फार फळ इंग्लंडमध्यें मिळालं, पण माझ्या आजोबांवर केलेला अन्याय मात्र तसाच कायम राहिला. हिसकून घेतलेलं राज्य परत करणं म्हणजे कांहीं सोपा न्याय नव्हता ॲनी!"

"तुझी आई अजूनहि जिवंत आहे?"

"आमच्या पाद्र्याचं पत्र जेव्हां जेव्हां बनारसहून येतं ना, तेव्हां मी त्यांच्या तर्फेच आईला पण पत्र लिहून पाठवतो. पांच महिन्यांच्या आधीं तरी ती जिवंत होती, ॲनी!"

"मग तूं आधीं पासन ख्रिस्ती नव्हतास तर?"

"नाहीं, माझी आई अजून देखील हिंदूच आहे. मला आधीं वाटत होतं तिलाहि ख्रिस्ती करावं, पण आतां तर—"

"आतां तर काय? तूं देखील आईच्या बरोबर गंगामाईला फुलं वाहून नमस्कार करशील?"

"मग पाद्री साहेब म्हणतील यानं ख्रिस्ती धर्म सोडून दिला."

"तूं ख्रिस्ती कसा झालास?"

"तसा कांहीं खास अंतःप्रेरणेचा प्रश्न नव्हता. बनारसमध्यें देखील इंग्रज पाद्री आणि पाद्रिणी ख्रिस्ती धर्माचा प्रचार करतात पण बनारस स्वतः हिंदुधर्माचं रोम आहे, त्यामुळं त्यांना तेवढं यश मिळणं शक्य नाही. एकदां काय झालं, एका पाद्री डॉक्टरानं माझ्या आईच्या रोगाचा इलाज केला. त्यानंतर त्याच्या बायकोचं आमच्या घरी येणं जाणं सुरूं झालं. माझ्या आईचा तिचा खूप दाट परिचय झाला. मी लहान होतों; ती मला नेहमीं आपल्या कडेवर घ्यायची–"

" तूं लहानपणीं देखील सुंदरच दिसत असशील मंगी तुला कोण बरं कडेवर घ्यायची इच्छा करणार नाहीं ? "

" मग त्या पाद्रिणीनं आईला समजावून सांगितलं कीं मुलाला इंग्रजी शिकवा. पांचव्या सहाव्या वर्षीच पाद्री मला इंग्रजी शिकवूं लागला. आई आपल्या परिवाराच्या गत वैभवाचा विचार करीत होती तिला मनांतल्या मनांत आशा सुटली कीं, कदाचित माझा मुलगा इंग्रजी शिकून वंशाची राजलक्ष्मी परतून आणण्यासाठीं काहीं तरी करूं शकेल. मी तीन वर्षांचा होतों तेव्हांच माझे बाबा वारले, यामुळं आईलाच सगळ कांहीं पाहणं सवरणं करावं लागे. आमची संपत्ति तर राज्याबरोबरच गेली होती परंतु तिच्या जवळ सासूचे खूप दागिने होते, आणि माझे मामा देखील बहिणीची काळजी घेत. आठ वर्षाचा झाल्यावर मी अधिकतर पाद्री आणि पाद्रीण याच्याच घरीं असायचा. मला हिंदू धर्मासबंधी फार थोडं ऐकायला मिळालं; जे कांहीं थोडं फार ऐकलं तें देखील त्या पाद्रिणीच्या तोंडून ती म्हणायची, 'बेटा तूं भाग्याचा आहेस. म्हणूनच तुझी आई जगली, नाहीं तर तुझे वडील मेल्यावर लोकानीं तिला जिवंत जाळून सती केलं असतं, माझ्या आईला जिवंत जाळणं–सती–आणि हिंदुधर्म या सर्वांना एकत्रित केल्यावर तूंच साग ॲनी, माझ्या मनात अशा धर्माबद्दल तिरस्कारावाचून दुसरी कोणती भावना राहू शकते ? त्या वेळीं सतीची चाल बंद व्हायला ( इ. १८२९ ) दोन वर्षं होतीं. माझ्या कल्याणाचा विचार करून आईनं पाद्रिणीचं ऐकलं व कलकत्त्याला पाठवलं मला शिकवायला. कलकत्त्याला जेव्हां मी शिकत होतो तेव्हां मात्र आईला संशय आला की पाद्रिणीनं मला ख्रिस्ती बनवण्यासाठींच हें सारं कांही केलं. बरं झालं, आईला आधीच काही संशय आला नाही, नाहीं तर मला आपले डोळे उघडायला अवसरच मिळाला नसता. "

" मुलाच्या शिक्षणाची भारतांत काळजी घेण्यांत येत नाहीं का ? "

" तसं मला शिकवल असतं, पण तेराशे वर्षांपूर्वी जी विद्या लाभदायक ठरली असती, ती शिकलों असतों मी ! "

" मग इंग्लंडमध्ये यायला आईची परवानगी कशी मिळाली ? "

" कशी मिळाली ? न विचारतांच आलों झालं. पाद्र्यानं मदत केली, केंब्रिजमध्यें शिकण्याचा बंदोबस्त केला. इथून जेव्हां मी खुशालीचं पत्र आईला पाठवलं तेव्हां तिनं आशीर्वाद पाठवला. ती आतां पंचावन्नच्या वर गेली, पण प्रत्येक पत्रांत मला परत येण्याबद्दल लिहीत असते. "

" अन् तूं काय उत्तर देतोस ? "

" उत्तर कसलं, बहाणे लिहितों. तिला वाटतं, मुलगा राजधानींत आहे, इंग्लंडच्या राणीशीं ओळख आहे त्याची. आणि केव्हां तरी चेतसिहाच्या गादीचा धनी होऊन परत येईल."

" बिचारी, त्या गंगेच्या पुजारणीला काय ठाऊक की आपल्या मुलाची ओळख व्हिक्टोरिया राणी बरोबर नसून जगातल्या साऱ्या मुकुटधारी मस्तकांचे भयंकर शत्रू कार्ल मार्क्स आणि फ्रेड्रिक एन्गल्स याच्या बरोबर आहे."

" अजून भारताला भांडवलशाही जग आणि त्याचं सामर्थ्य याचंच ज्ञान नाहीं, मग त्याला मार्क्सचा साम्यवाद कसा समजेल ?"

" मार्क्सबरोबर तुझं भारतासंबंधी कधीं झालं का बोलणं चालणं ?"

" कितीदा तरी. मला आश्चर्य वाटतं की इथं बसल्या बसल्या त्याला भारताच्या जीवनप्रवाहाचं इतकं ज्ञान कुठून झालं ? पण हा कांही जादूचा चमत्कार नाहीं. याच लंडनमध्यें गेल्या तीनशे वर्षात वेगवेगळ्या इंग्रजानी भारता संबंधी जितकी माहिती मिळवून लिपिबद्ध केली ती सगळी उपलब्ध आहे. धूळ खात पडलेली ती सारीं पुस्तकं मार्क्सनं काळजीपूर्वक वाचली, शिवाय इथं कोणीहि भारतीय भेटो, त्याला विचारून पुसून तो आपल्या निष्कर्षांना कस लावतो."

" मार्क्सनं भारताच्या भवितव्याबद्दल काय म्हटलेलं आहे ?"

" तो भारतामधल्या योद्धयाच्या शौर्याची खूप प्रशंसा करतो; आमच्या बुद्धिमत्तेबद्दल त्याला खात्री वाटते; पण आमच्या पुराण पंथाचरणाला तो भारताचा सर्वांत भयंकर शत्रु मानतो. त्याच्या मतें आमची गावं स्वयंपूर्ण लहान लहान प्रजातंत्रं आहेत."

" प्रजातंत्र ?"

" सारा देश नव्हे, त्याचा एक जिल्हाहि नव्हे, किंवा त्यांतलीं दोन गांवं एकत्र मिळून देखील नव्हे. तर केवळ एकटेंच गांव! पण साऱ्याच जागीं नाहीं. जिथं लॉर्ड कार्नवालिसनं इंग्रजी नक्कल म्हणून जमीनदारी कायम केली तिथं ग्रामप्रजातंत्र केव्हांच नष्ट पावलं. या ग्राम-प्रजातंत्राचं संचालन जनतेच्या संमतीचे पाच किंवा त्यांच्या पेक्षा अधिक पंच करतात. पोलिस, न्याय, आरोग्य, पाणी, शिक्षण, धर्म इत्यादि सर्वांचा कारभार हे पहात असतात. आणि गावांतले बालापासून वृद्धांपर्यंत सारे खूप प्रामाणिकपणानं, बुद्धिमत्तेनं, न्यायानं व निर्भयतेनं गांवाची तसुतसु जमीन किंवा कनिष्ठतम माणसाची अब्रू याचं संरक्षण करण्यासाठीं पंचायतीच्या आज्ञेबरहुकूम वागायला तयार असतात. मुसलमान शासकांनीं सुरवातीला त्यांचं राज्य दिल्लीच्या आसपासच होतं तेव्हां स्वतःला केवळ प्रवासी समजून पंचायतीची मोडतोड करण्याचा प्रयत्न केला; पण मागाहून त्यांना चूक कळून चुकली तेव्हां त्यांनीं पंचायतीची

स्वायत्त सत्ता मान्य केली. हे इंग्रज शासक—आणि त्यांतल्या त्यांत इंग्लंड मधला जमीनदार कार्नवालिस हाच विशेषतः––यांनीं हीं ग्रामप्रजातंत्रं नष्ट करण्याचा विडाच उचलला. त्यांना त्यांत थोडं फार यश देखील आलं तरी तेवढ्या कारणानंच तीं कदाचित मोडलीं हि नसतीं. पण ग्रामप्रजातंत्रावर आणि त्याच्या आर्थिक स्वातंत्र्यावर पहिला घातक प्रहार केला मॅंचेस्टर, लॅंकेशायरच्या कापडानं; शेफील्डच्या लोखंडी बस्तूंनीं आणि इथून तिथं जाणाऱ्या अशाच मालांनीं. १० जुलै १८२२ ला कलकत्त्यांत वाफेनं चालणारं पहिलं जहाज पाण्यांत उतरवण्यांत आलं. त्याच्या योगानं गांवांच्या आर्थिक प्रजातंत्राचा उरला सुरला पाया देखील ढासळून पडला. अॅनी, हिंदुस्थानांतल्या तलम मलमलीची खाण असलेलं डाक्का शहर आतां दोनतृतीयाश तरी ओसाड पडलंय. आणि गावांतल्या विणकराची परिस्थिती विचारूंच नकोस. जो भारतीय गांव आपले लोहार, कुंभार, विणकर, कांतणारे, यांच्यामुळें स्वतःला स्वतंत्र समजत असे, त्यातले हे कारागीर आतां हात चोळत घरांत बसून उपासमार सहन करीत आहेत व त्याच्याचसाठीं लॅंकेशायर, मॅंचेस्टर, बार्मिंगहॅम, शेफील्ड मधून माल येत आहे. फक्त कापडाचीच आयात बघ. इ. स. १८१४ मध्यें भारतांतून इथं ब्रिटनमध्यें १८,६६, ६०८ कापडाचीं ठाणं आलीं होतीं. आणि इ स. १८३५ मध्यें केवळ ३,७६,०८६ ठाणं आलीं. या दोन वर्षाच्या दरम्यान आमच्याकडे ८,१८,२०,८५,१७,७७,२७७ वार विलायती कापड गेलं. आतां डाक्क्याची मलमल तयार करणारा भारत आपली रुई विलायतेत पाठवून कापड बनवून घेत आहे. आणि तो देखील किती? आता १८४९ मध्येंच १०,७५,३०९ पौंडाची रुई इथं आली."

" केवढं हें क्रौर्य! केवढा हा अत्याचार!"

" परंतु माझा गुरु म्हणतो कीं आमच हृदय विदेशी लोकांच्या या अत्याचारामुळं आसवं ढाळीत असलं तरी आमची बुद्धि हा पुराणपंथी किल्ला ढांसळतो म्हणून खुषींत आहे."

" मग दोघांचे दोन रस्ते असतील?"

" असणारच अॅनी दोघांचे दोन मार्ग. माता बाळंतपणाच्या वेळीं किती अनुभव घेत्ये वेदनांचा, पण त्याच वेळीं पुत्रप्राप्तीच्या आनंदाचा देखील अनुभव घेते ती! नाशांतूनच निर्माणकार्य होत असतं. हीं लहान लहान प्रजातंत्रं तुटल्याशिवाय मोठ्या आणि शक्तिशाली प्रजातंत्राचा पाया घालतां येत नाहीं. जोंपर्यंत भारतीयांची भक्ति केवळ ग्रामप्रजातंत्रापुरतीच सीमित राहील तोंपर्यंत त्यांच्यांत विशाल देशभक्ति—साऱ्या भारतासाठीं आत्मत्याग करण्याची शक्ति––येऊं शकणार नाहीं. आतां इंग्रजांनीं फक्त जहाज, रेलगाडी, तारायंत्र, इत्यादि केवळ आपल्या व्यापाराला उपयोगीं

अशाच यंत्रांचा प्रसार भारतांत करायला सुरवात केली; पण मार्क्सचं म्हणणं असं कीं जोंपर्यंत इंग्रज भांडवलदारांना भारतीय कोळसा व लोखंड उपयोगांत आणावीं लागतात तोंपर्यंत त्यांना स्वस्तांत या जिनसा तयार करण्याचं कुठवर टाळून चालेल ? भारतीय बुद्धि देखील विज्ञानाचे हे चमत्कार डोळ्यांदेखत घडत असून कुठवर झोंपा काढील ?"

"म्हणजे मग भारतांत देखील उद्योगधंदे आणि भांडवलशाही यांचा फैलाव करणं आवश्यक आहे."

"अलबत, आतां इंग्लंडमध्यें देखील सामन्तवादी जमीनदारांचा प्रभाव नाहीं ॲनी."

"होय. १८३२ मध्ये कायद्यानं इंग्लंडच्या सत्तेचीं सूत्रं भांडवलवाल्यांच्या हातीं दिलीं."

"भांडवलवाल्यांनीं सत्ता हातीं घ्यावी, अशी सूचना देणारा होता तो कायदा."

"खरं आहे तुझं म्हणणं. चार्टिस्टांच्या सभा आणि पत्रं यांचा तुझ्यावर परिणाम झालेला दिसतो ॲनी ?"

"सभांच्या वेळीं तर मला तितकीशी जाणीव नव्हती, थोडी अंधुकशी आठवण आहे. मात्र रसेल काका यांच्या तोंडून अनेकदां त्या जबरदस्त चळवळीची हकीकत ऐकली. मंत्रिमंडळापैकी ते चार्टिस्टांचे कट्टे दुश्मन होते हें आहेच तुला ठाऊक !"

"ॲनी, ते काय तेव्हां सांगतांना तसेच बहाद्दर वक्त्याप्रमाणं बोलत असत ? बारा बारा लक्ष जनतेच्या सह्यांनी मागितलेल्या कामगारांच्या सामान्य मागण्या पार्लमेंटमध्यें झिडकारून लावताना ते जसे बोलत असत तसेच बोलायचे का ?"

"नाही, प्रिया, त्यां सर्वांना भीति वाटते. तरी बरं आतां प्रभु येशूच्या या १८५६ व्या वर्षी चार्टरवाद कानी देखील येत नाहीं कुठं !"

"कां नाहीं भिणार ? ॲनी, सामंतांच्या सत्तेला मूठमाती देऊन जसं या भांडवलदार बनियांनीं आपलं राज्य स्थापन केलं, तसंच उद्यां कामगार देखील या तिजोरीवाल्यांचं राज्य संपुष्टांत आणून मानवतेचं राज्य कायम करतील व धनी-गरीब, श्रेष्ठ-कनिष्ठ, काळा-गोरा हे भेदभाव गाडून टाकतील.–"

"आणि स्त्री-पुरुषांचा देखील, मंगी ?"

"होय, स्त्रिया देखील पुरुषांच्या जुलमानं गांजलेल्या आहेत. आमच्या इथं सामन्तवाद आतां आतां पर्यंत सतीच्या नांवाखालीं लाखों स्त्रियांना दर वर्षी जाळून टाकायचा. आज देखील अशा तऱ्हेनं गोषांत संपत्तीच्या वारसाहक्कापासून वंचित राहून स्त्री पुरुषाचा जुलूम सहन करीत आहे; तो जुलूम म्हणजे मानव्याला लागलेला कलंकच आहे एक."

" आमच्या इथल्या स्त्रियांना तूं स्वतंत्र समजत असशील, कारण आम्हांला गोषांत ठेवीत नाहींत, पण– "

" नाहीं ॲनी मी त्यांना स्वतंत्र मानीत नाहीं. मात्र येवढंच म्हणेन कीं तुम्हीं आपल्या भारतीय बहिणींपेक्षां सुस्थितींत आहांत ! "

" मंगी, गुलामगिरींत कसली सुस्थिति आणि दुःस्थिती ? आम्हांला पार्लमेंटसाठीं मत देण्याचा अधिकार नाहीं, मोठमोठ्या शिक्षण संस्थांच्या फाटकांजवळ देखील आम्हांला उभं करीत नाहींत. आम्हीं फक्त आपली कंबर बांधून बांधून मुठीइतकी बारीक करावी आणि साठ वारांचा जमीनिवर लोळणारा झगा घालून पुरुषांसाठीं फुलपांखरांप्रमाणं नाचावं. त्याचं असो. पण मग काय मार्क्सनं अशी आशा दाखवली कीं भारतात उद्योगधंदे आणि भांडवलशाही यांचा प्रसार झाल्यानं लोकात साहसाचा प्रचार आणि प्रयोग अधिकाधिक होईल आणि दुसरं म्हणजे गांवांतून विखुरलेले बेकार किसान आणि कारागीर कारखान्यांमधून एकत्र येतील. मग ते आपले कामगार संघ स्थापन करून लढे करायला शिकतील आणि मग साम्यवादाचं निशाण घेऊन इंग्लंड मधल्या कामगारांच्या खांद्याला खांदा लावून मानवांच्या स्वातंत्र्याचं आपलं युद्ध लढतील व जगाला भांडवलशाहीच्या गुलामगिरींतून मुक्त करून समता, स्वतंत्रता आणि बंधुता याचं राज्य स्थापन करतील. पण ही तर शेंकडो वर्षांनंतरची गोष्ट आहे भंगी ?"

" पण आणखी एक गोष्ट मार्क्स सांगतो. इंग्रजांनीं जरी विज्ञानाचं वरदान असलेल्या यंत्र-कारखान्यापासून भारताला वंचित ठेवलं तरी पण विज्ञानाचंच दुसरं वरदान असलेलीं युद्धांतलीं शस्त्रास्त्रं देऊन भारतीय सैनिकांना सशस्त्र केलं. हेच भारतीय सैनिक भारताचं स्वातंत्र्य परत मिळवतांना मोठे सहाय्यक होणारे आहेत. "

" पण हा तरी काळ लवकर येणं शक्य आहे ? "

" नाहीं ॲनी, लवकर कसला, आला देखील तो काळ. वर्तमानपत्रांत वाचलंस ना, कीं सात फेब्रुवारी १८५६ ला अयोध्येचं राज्य इंग्रजांनी खालसा केलं ?"

" वाचलं ना, पण केवढी बेइमानी ही ? "

" बेइमानी आणि इमानदारी यांच्याबद्दल आपल्याला वादविवाद करायचा नाहीं. इंग्रज व्यापाऱ्यांनीं सगळं कांहीं आपल्या स्वार्थासाठीं केलं, पण अजाणता त्यांनीं आमच्या कल्याणासाठीं खूप कार्य केलं. त्यांनीं ग्रामप्रजातंत्र तोडून विस्तृत देश आमच्यासाठीं निर्माण करून दिला; त्यानीं आगगाड्या, तारायंत्र, जहाज यांच्या योगानं आमची कूपमंडूकता तोडून विशाल जगाशीं आमचं नातं जोडलं. अयोध्येचं राज्य खालसा केल्यानं आतां नवाच रंग येण्याचा संभव आहे व मी त्याचीच प्रतीक्षा करीत होतों, ॲनी. "

"मार्क्सच्या शिष्याजवळून आणिक दुसरी कुठली आशा करतां येण्याजोगी आहे ?"

— २ —

गंगेचा प्रशांत तट आतां अशान्त होऊं पाहतो. विठूरच्या विशाल महालांत रहाणारा पेशव्याचा उत्तराधिकारी नाना, गादी तर जाऊं द्या, पेन्शन देखील गमावून बसला होता. अयोध्येची ताजी शिकार इंग्रजांनीं आपल्या झोळण्यांत टाकल्या पासून नाना अधिकच सक्रिय झाला. आपल्या सारख्याच इतर पदच्युत सामंतांकडे तो आपले दूत रात्रंदिवस पाठवूं लागला. त्याच्या भाग्यानें इंग्रजानीं आणखी एक चूक केली; वास्तविक ती चूक नसून निलशः नव्या होणाऱ्या जगांत जगण्यासाठीं आवश्यकता होती एक; त्यानीं आधींच्या टोपीची गोळी वापरणाऱ्या बंदुकी रद्द करून त्यां ऐवजीं अधिक पल्लेदार अशा काडतुसांच्या बंदुका आपल्या फौजां मधून वांटल्या. तीं काडतुसे वापरतांना आधीं दातांनीं तोडावीं लागत असत. इंग्रजांच्या दूरदर्शी शत्रूंनीं या पासून फायदा करून घेतला; त्यांनीं गवगवा केला कीं काडतुसांना डुकरां-गाईंची चर्बी लावण्यांत येत असून, इंग्रजानी जाणून बुजूनच हीं काडतुसें शिपायांनां दांतानीं तोडण्यासाठी दिलेली आहेत. कारण त्यामुळें हिंदुस्थानांतून हिंदू-मुसलमान धर्म नष्ट व्हावेत आणि सगळेच क्रिस्तान बनावेत.

काशीराज चेतसिह यांचा नातु मंगलसिह याचें नांव सैनिकांत एखाद्या विजेप्रमाणें प्रभावी होऊं शकलें असतें, पण मंगलसिंहाने हें रहस्य कधींहि उघड केलें नाहीं. नाना आणि दुसरे विद्रोही पुढारी यांना त्याच्या बद्दल येवढेंच माहित होते कीं मंगलसिंह हा इंग्रजी सत्तेचा कट्टा वैरी असून त्याने विलायतेत शिक्षण घेतलेले आहे, त्याला राजकारणाची चांगली माहिती आहे, व विलायतेंत राहिल्यामुळे त्याचा धर्म गेला असला तरी तो क्रिस्तान धर्म मानीत नाहीं.

मंगलसिंहाला विद्रोही पुढाऱ्यांच्या हृदया मधल्या भावना समजायला फारसा उशीर लागला नाहीं. पदच्युत सामंत आपापले अधिकार पुन्हां मिळवण्याचा प्रयत्न करीत होते व त्या सर्वांचे एकमात्र शत्रु इंग्रज यांना हांकून लावण्यासाठीं ते सगळे एकी करूं पहात होते. त्यांच्यासाठीं प्राणांची बाजी लावणारे सैनिक म्हणजे केवळ बुदबळांतल्या मोहऱ्यांच्या योग्यतेचे वाटत होते त्यांना. सैनिक केवळ धर्म जाण्याच्या भयाने खवळलेले होते, जर त्यांना काडतुसाची चर्बी दातांनीं तोडावी लागली नसती तर ते अनंत काळपर्यंत कंपनीबहादूरचा जयजयकार करीत राहिले असते व त्याच्यासाठीं आपली मस्तकें त्यांनी तळहातीं घेतलीं असतीं. आणि हिंदु मुसलमानामधली खाई ? ती तर बिलकूल कमी झालेली नव्हती. उलट जर विद्रोह यशस्वी झाला असता तर धर्माच्या नांवावर उठवलेले हे निरक्षर सैनिक अल्ला आणि भगवान यांचे कृपापात्र बनण्या-

साठीं आपण अधिकच कट्टे धार्मिक आहोंत हें सिद्ध करण्याचा प्रयत्न करते. शिवाय आणखीहि एक विचार अंतःकरणांत दबा धरून बसलेला होता, तो म्हणजे गांवां शहरांची लूट करण्याचा होय. जरी हा दोष फारच थोड्या सैनिकांच्या हातून घडला व अगदीं एक दोन जागींच त्यांनीं असे केलें तरी पण गवगवा एवढा झाला कीं, खेडुत जनतेला डाकूंच्या प्रमाणें त्यांची दहशत वाटूं लागली. देशाचें दास्यविमोचन करणाऱ्या सैन्याबद्दल अशी भावना निर्माण होणें चांगलें नव्हतें. सुरुवातीला हें सगळें पाहून मंगलसिंह निराश झाला. तो कांहीं चेतसिहाचें गेलेले सिंहासन परत मिळवण्यासाठीं लढत नव्हता, तर समता, स्वतंत्रता आणि बंधुता यांचें राज्य स्थापन करण्यासाठीं त्यानें शस्त्र-ग्रहण केलें होतें. पण यासाठीं इंग्रज भांडवलशहांच्या सत्तेप्रमाणेंच जातिभेद व हिंदु-मुसलमानांचा भेदभाव देखलि नष्ट व्हायला पाहिजे होते. कूपमंडूका प्रमाणें त्यांचें संरक्षण करायला कांहीं त्यानें युद्धांत उडी घेतली नव्हती, उलट शतकानुशतकांच्या उभारलेल्या या भारतामधल्या भिंती पाडून त्याला जगाचा एक अभिन्न अवयव बनविण्यासाठीं तो लढत होता. इंग्रज भांडवलदारांच्या शोषणापासून आणि सत्तेमधून भारताची जनता स्वतंत्र करावी आणि तिचा दुसऱ्या देशांमधल्या जनतेबरोबर बंधुभाव निर्माण करून एका सुखी जगाचें निर्माण करण्यासाठीं तिला प्रवृत्त करावें, म्हणून त्यानें युद्धांत उडी घेतली. त्याला काडतुसांच्या चर्बीचा हा खोटा प्रचार केव्हाहि आवडणें शक्य नव्हतें; त्याचप्रमाणें या प्रचारामुळें भारतामधल्या धार्मिकतेचीं पाळेंमुळें अधिक मजबूत बनवणें देखील त्याला आवडत नव्हतें. नाना आणि दुसरे विद्रोही पुढारी स्वतः उंची उंची विलायती मद्ये उडवीत होते. संधि सांपडे तेव्हां मद्य आणि डुकराचें मांस भक्षण करीत व मिळतील त्या गौरांगी तरुणींचे उष्टे अधर चोखायला तयार असत. मात्र यावेळी तेच धर्मरक्षणासाठी शिपायांचें नेतृत्व करूं पाहत होते.

पण हे सगळे दोष बघून देखील मंगलसिंहानें आणखी एका गोष्टीचा विचार केला आणि आपलें कर्तव्य निश्चित करून टाकलें. इंग्रज भांडवलदार शासक आणि हिंदुस्थानी सामन्त या दोघांची गुलामगिरी भारताला भरडून काढीत असून, त्या दोघांत सर्व-बलाढ्य आणि अति चतुर अशी सत्ता इंग्रजांचीच होती. ती एकदां नष्ट केली कीं मग स्वदेशी सामन्तानाच तोंड द्यावें लागेल व तसें करणें भारतीय जनतेला सहजकार्य वाटेल.

जानेवारी महिना, रात्रीं पडणारी थंडी लंडनच्या मानानें फार नसली तरी होती कडाक्याचीच. बिठूरमध्यें सर्वत्र सामसूम असली तरी पेशव्याच्या महालांतले द्वारपाळ आपापल्या जागीं हजर होते. आपल्या धन्याच्या एका विश्वासु माणसाबरोबर दुसऱ्या एका अनोळखी इसमाला आंत शिरतांना त्यांनीं पाहिले तरी हटकलें नाहीं, कारण

आजकाल असे अनोळखी रात्रीं बेरात्रीं रोज महालांत ये जा करीत हें त्यांना माहित होतें.

मंगलसिंह आणि नाना यांची कांहीं ही पहिलीच भेट नव्हती, ओळखत होते ते एकमेकांना. त्या जागीं आपल्याप्रमाणेंच दिल्लीचा पेन्शनर बादशहा, अयोध्येचा नबाब, जगदीशपूरचा कुंवरसिंह आणि दुसऱ्या कितीतरी सामंताचे दूत हजर असलेले मंगलसिंहाला आढळून आले. बजबज ( कलकत्ता ), दानापूर, कानपूर, लखनौ, आग्रा, मिरत इत्यादि छावण्यांतील शिपायांमध्ये बंडाची भावना कितपत पसरली याची माहिनी त्या सर्वांनीं सांगितली. आश्चर्य मात्र असें की हे सारे सामंत त्या सर्वबलाढ्य अशा शक्तीचा पाडाव करण्यासाठीं स्वतःच्या फौजा न उभारतां, फक्त बंडखोर पलटणींवरच विसंबून होते. आणि सैनिकविद्येच्या संबंधीं पहावें तर झाडून सगळयांनाच तिचा तिळमात्र गंध नव्हता, पण प्रत्येकजण स्वतः सेनापतीचें पद घेऊं पाहत होता. नाना खूपच आशाजनक स्वरांत म्हणाला, " इंग्रजांचं भारतामधलं राज्य हिंदुस्थानी पलटणींच्या भरंवशावर निर्भर आहे, आणि त्याच पलटणी आज आपल्या पक्षाला येत आहेत. "

" पण सगळ्याच हिंदुस्थानी पलटणी कांहीं आपल्या बाजूला मिळाल्या नाहींत, नानासाहेब ! पंजाबी शीख बंडाला प्रवृत्त झाल्याची बातमी कांहीं अजून आलेली नाहीं, उलट हिंदुस्थानच्या बाकी साऱ्या पलटणींनी इंग्रजांची बाजू घेऊन पंजाबचा ज्या तऱ्हेनें पराभव केला त्याची आठवण ठेवून आतां ते सूड घेण्याची इच्छा करतील. इंग्रज मोठे हुशार आहेत, नानासाहेब. नाहीतर पेशवे आणि अयोध्येचे नबाब यांच्या प्रमाणंच त्यांनी जर दिलीपसिंहाला भारतातच कुठं नजरकैदेत ठेवलं असतं तर आज साऱ्या शीख पलटणी आपल्या बाजूला वळवून घेणं आपल्याला सोपं गेलं असतं. असो. आतां आपण येवढं मात्र ध्यानात ठेवलंच पाहिजे की शीख, नेपाळी आणि संस्थानी पलटणी आम्हांला साथ देणार नाहोत; आणि देशाच्या स्वातंत्र्ययुद्धांत जे आम्हांला साथ देत नाहींत, ते आमचे विरोधी आहेत असं समजलं पाहिजे. "

" आपलं म्हणणं बरोबर आहे, ठाकूरसाहेब." नाना म्हणाला, " पण आम्हीं आरंभींच जर यश मिळवलं तर मग कुणाही देशद्रोह्याला आमचा विरोध करण्याची हिंमत होणार नाहीं. "

" एका गोष्टीची आपण तजवीज करायला हवी. युद्धाला सुरवात झाल्यावर ही गोष्ट करायची असली तरी त्यासाठीं आतां पासून माणसं तयार केलीं पाहिजेत. आपल्याला जनतेला समजावून सांगावं लागेल कीं आम्ही देशाला स्वातंत्र्य मिळवून देणारे सैनिक आहोंत. "

पूर्वेकडला प्रतिनिधी म्हणाला–" आम्ही इंग्रजांविरुद्ध उपसलेल्या हत्यारांचा खणखणाट काय पुरेसा नाही त्यासाठीं ? "

मंगलसिह–" प्रत्येक ठिकाणी चोवीस तास कांहीं शस्त्रांचा खटखणाट होणार नाही. आमच्या देशांत बरेचसे भित्रे आणि स्वार्थी लोक असून त्यांचा इंग्रजांच्या अजिक्यपणावर विश्वास आहे. ते वाटेल त्या खोट्या नाटया अफवा पसरवतील. मला तर असं वाटतं की पूर्व, पश्चिम आणि मध्य असे तीन विभाग करून आपण त्यांत हिंदी-उर्दूतली तीन वर्तमानपत्रं छापलीं तर बरं. "

नानासाहेब—" तुम्हाला इंग्रजांचे ढंग अधिक आवडतात, ठाकूरसाहेब; पण आपण हें पाहिलंच कीं आम्ही वर्तमानपत्राशिवाय देखील काडतुसांची गोष्ट पसरवून किती तरी लोकांना तयार केलं. '

मंगलसिंह—" पण ऐन लढाईच्या वेळी आमच्या विरुद्ध इंग्रजांचे नौकर-चाकर ज्या अफवा पसरवतील, त्यांच्यासाठीं कांहीं तरी करावंच लागेल नानासाहेब. इंग्रजांचं सारं राज्य-यंत्र एका दिवसांतच काबीज करून घेणें तर आपल्याला शक्य नाहीं ना ? मग समजा उद्यां त्यांनीं कंडी उठवली कीं बंडवाले—मी बंडवाले म्हणतों याचं कारण उद्यां आपली आठवण याच नांवानं येईल लोकांना-बंडवाले गांवां-शहरांची लूट करीत व मुलां बाळांची देखील कत्तल करीत पुढं पुढं चाल करीत आहेत, तर मग ? "

नानासाहेब— " लोकांचा विश्वास बसेल त्यांच्यावर ? "

मंगलसिह—" एखादी गोष्ट वारंवार सागण्यांत आली आणि तिचा जर इन्कार करण्यांत आला नाही तर तिच्यावर लोकांचा विश्वास बसूं लागतो. "

नानासाहेब— " आम्ही काडतुसांच्या घटनेचा फायदा घेऊन इंग्रजांना धर्म-द्रोही म्हणून इतकं बदनाम केलेलं आहे की आतां त्यांच्या एकाही शब्दावर कोणी विश्वास ठेवणार नाहीं, असं मला वाटतं. "

मंगलसिंह—" पण याचा उपयोग नेहमींच होऊं शकेल असं मला वाटत नाहीं. असो. आतां आणखी दुसरी गोष्ट– आमचं हें युद्ध म्हणजे ' केवळ एक बंड ' असा प्रचार इंग्रज जगभर करतील. पण जगात असे किती तरी आहेत कीं जे आमचे दोस्त असून इंग्रजांचे दुष्मन आहेत; तें मात्र आम्हांला स्वातंत्र्य मिळावं अशी इच्छा करतील. असे मित्र विशेषतः युरोपियनां मधीच अधिक आहेत. त्यामुळेच आम्ही आपलं युद्ध म्हणजे साऱ्या युरोपियनांविरुद्ध जिहाद असं मानूं नये आणि बिनलढाऊ असे इंग्रज मुलंबाळं, म्हातारेकोतारे व स्त्रिया यांच्यावर हात उचलतां कामा नये. तसं केल्यानं युद्धांत कोणता लाभ तर व्हायचाच नाहीं, उलट हिंदुस्थानी लोकांची जगांत विनाकारण बदनामी मात्र होईल. "

नानासाहेब– " याचा विचार सेनापती करतील; आणि कोणत्या वेळीं काय करायचं याचा निश्चय ते स्वतःच करूं शकतात. "

मंगलसिंह– " आणखी एक शेवटची गोष्ट सांगायची आहे. ती म्हणजे अशी कीं जें युद्ध लढण्यासाठीं शिपाई आपल्या प्राणांची बाजी लावीत आहे व ज्या युद्धांत आम्हीं सर्व सामान्य जनतेवर मदतीसाठीं विसंबून आहोंत, ते केवळ काडतुसांना चर्बी लावण्यांत येते म्हणून लढण्यांत येऊं नये. इंग्रजांना काढून लावल्यावर आम्हीं कशा पद्धतीनं राज्य चालवूं आणि त्या राज्यापासून युद्धांत लढणाऱ्या शिपायांना व ते ज्या किसानां मधून सैन्यांत शिरले त्या किसानांना कोणते फायदे प्राप्त होणार हेंहि आम्ही त्यांना सांगितलं पाहिजे. "

नानासाहेब– " धर्मद्रोह्यांची सत्ता उलथून पाडणं ही गोष्ट त्यांच्या संतोषासाठीं पुरेशीं नाहीं का होणार ? "

" हाच प्रश्न आपल्याला विचारला तर आपण काय उत्तर द्याल त्याचं ? काय आपल्या अंतःकरणांत पेशव्यांची राजधानी पुणं इथं पुन्हा जायचं नाही ? काय नबाबजाद्यांच्या मनाला लखनौच्या तख्ताचं आकर्षण नाहीं ? तुम्हीं सगळे जर काडतुसांचा प्रश्न आणि इंग्रजांची हकालपट्टी यांच्या मिषानं स्वतःचा फायदा करून घेण्यासाठीं स्वतःच्या प्राणांची बाजी लावतां, तर तशीच प्राणांची बाजी लावणाऱ्या सामान्य जनतेला देखील त्यांच्या लाभांचं बरंचसं आमिष आम्ही ठेवलंच पाहिजे. "

" कसं ? "

"असं; आम्हीं गांवा गांवांतून पंचायती स्थापन करून लोकांना थोड्या पैशांत न्याय मिळवून देण्याची व्यवस्था करूं. आम्हीं सगळ्या देशाची एक पंचायत स्थापन करूं, त्या पंचायतीचे लोक गांवांगांवातल्या प्रजेनं निवडलेले असतील, त्या पंचायतीचा अधिकार बादशहावर देखील चालेल. आम्ही जमीनदारी पद्धत मोडून टाकूं आणि सरकार व किसान यांच्यामध्यें कोणी दुसरा उपऱ्या धनी रहाणार नाहीं. जहागीर ज्याला मिळेल त्याला सरकारला मिळणारी मालगुजारीच तेवढी घेण्याचा हक्क राहील. आम्हीं यंत्रांनीं चालणारे कारखाने वाढवून इथल्या सगळ्याच कारागिरांना काम देऊं व कोणीहि बेकार राहूं शकणार नाही. आम्ही ओलीतासाठी कालवे, तलाव आणि बंधारे बांधूं, त्यामुळें करोडों मजुरांना काम मिळेल, देशांत किती तरी पटीनं अधिक धान्य पिकेल आणि किसानांसाठीं बरीचशी नवी जमीन मिळेल. "

मंगलसिंहाच्या बोलण्याचा कोणीहि गंभीरपणानें विचार करण्याचें मनांत आणलें नाही. " राज्य तर मिळवूं द्या आधीं, मग पाहूं पुढं याचं, " असें म्हणून त्या सर्वांनीं गोष्ट टाळून नेली.

बाजेवर अंग टाकल्यावर देखील मंगलसिंहाचा बराच वेळ डोळा लागला नव्हता. त्याच्या मनांत विचार घोळत होते,—" हें सायन्सचं ( विज्ञानाचं ) युग आहे. आगगाडी, तारायंत्र, स्टीमर यांचे चमत्कार हे स्वतः डोळ्यांनीं बघत आहेत. आगकाडी फोटोग्राफी, आणि विजेचा प्रकाश यांच्या मनूंत आम्ही सारे प्रवेश करीत आहोंत, पण या लोकांच्या डोळ्यांपुढं अजून गतकालाचीच स्वप्नं रेंगाळत आहेत." तरी पण या घनघोर अंधारांत एक गोष्ट त्याला स्पष्टपणे दिसत होती. हे युद्ध केवळ जनतेच्या सामर्थ्यावरच जिंकण्यांत येईल व त्यामुळे जनतेला आपल्या बळाची जाणीव होईल. विलायती भांडवलदारांनीं जशी विलायतमधल्या कामगारांची मदत घेऊन आपल्या प्रतिस्पर्ध्यांना बाजूला हटवलें व मग मात्र त्या कामगारांना आंगठा दाखवला, तसेच हे भारतीय सामंत वाटल्यास भारतीय जनतेशीं-किसानांशीं व शिपायांशीं-काम झाल्यावर बेइमानी करतील देखील, पण ते जनतेचा आत्मविश्वास कांहीं हिरावून घेऊं शकणार नाहींत. तसेंच बाहेरील शत्रूं पासून बचाव करण्यासाठी देखील त्यांना सायन्सच्या (विज्ञानाच्या) योगानें लागलेले नवे नवे शोध उपयोगांत आणण्याचें नाकारून चालणार नाहीं. आगगाड्यांचे पाटे, तारेचे खांब आणि कलकत्त्यांत तयार होणारी वाफेचीं जहाजें आतां हिंदुस्तान सोडून जाऊंच शकणार नाहीत.

मंगलसिंहाचा विश्वास या मतलबी खोटारड्या सामंतांवर नव्हता; त्याला विश्वास वाटत होता पृथ्वीवरील मानवांच्या परिवर्तनकारिणी शक्तीचा-जनतेचा !

– ३ –

१० मे १८५७. मंगलसिंह मिरतच्या नजीकच होता. शिपायांनी तेथें बंडाचें निशाण उभारलें. बहादूरशहाचा प्रतिनिधी या नात्यानें शिपायांच्या एका तुकडीवर आपला प्रभाव पाडण्याची संधी त्याला मिळाली. सामंत नायकांना मंगलसिहाच्या योग्यतेची पूर्ण जाणीव होती पण त्याचें उद्दिष्ट आपल्या उद्दिष्टापेक्षां वेगळे आहे हेहि त्यांना माहित होतें म्हणून त्याची रवानगी पश्चिमेच्या ऐवजी पूर्वेकडे केली. मिरतहून पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे जाणाऱ्या या रस्त्यांनीं त्या स्वातंत्र्ययुद्धाच्या भाग्यांत यामुळें पूर्व पश्चिमे इतकेंच अंतर निर्माण झालें असेल, कोणी सांगावें ! दिल्लीकडे कूच करणाऱ्या सैन्याला दिल्लीच्या प्रतिष्ठेचा उपयोग विजय मिळविण्यासाठीं करणारा मंगलसिंहासारखा सेनानायक हवा होता.

मंगलसिंहाच्या तुकडीत एक हजार शिपाई होते. बंडाच्या पहिल्या दिवसापासूनच ते सारे स्वतःला सेनापतीच समजत होते. केवळ सेनापतींचीच फौज कधींहि जिंकू शकणार नाहीं हें त्यांना समजावून सांगायला एक आठवडा लागला मंगलसिंहाला. सैन्यांत एक मंगलसिंह सोडला तर एकालाहि युद्धविद्येचे उच्च शिक्षण नव्हतें, आणि हीच गोष्ट सगळ्या बंडखोर सैन्याना लागू होती. मंगलसिहाला एका

जागीं थांबून शिक्षण देण्यास सवड नव्हती. त्यावेळीं गरज होती एका गोष्टीची–जास्तींत जास्ती जिल्ह्यांमधून ताबडतोब इंग्रजांचे सामर्थ्य नष्ट करून टाकण्याची.

गंगापार रोहिलखंडांत शिरतांच मंगलसिहाने दर रात्रीं शिपायांना आपलें राजनैतिक ध्येय नियमितपणानें सांगायला सुरुवांत केली. सैनिकांना समजायला जरा अवधि लागला, त्यांच्या मनांत कितीतरी संदेह उठत, मंगलसिंहाने त्या सर्वांचे निराकरण केलें. मग त्यानें त्यांना फ्रान्स मधल्या दोन्ही क्रांत्यांचा (१७९२ व १८४८) इतिहास सांगितला. तसेंच वेल्स मधल्या इंग्रज कामगारांनी हिंदुस्थानांत राज्य करणाऱ्या याच इंग्रज बनियांच्या विरुद्ध कशी तरवार उचलली, व ते कसे शौर्यानें लढले आणि बनिये आपल्या संख्याबलावर त्यांना दाबूं शकले तरी त्यांनीं जिंकून घेतलेले अधिकार बनिये कसे हिरावून घेऊं शकले नाहींत हेंही त्याने सांगितलें.

जाणीवेने लढणाऱ्या या शिपायांचे वर्तन आतां पार बदलून गेलें होतें. त्यांच्यांतला प्रत्येकजण स्वातंत्र्ययुद्धाचा प्रचारक बनला तो गांवां-कसब्यातल्या व शहरांतल्या लोकांच्या मनांत आपल्या वागण्यानें व आपलें ध्येय पटवून स्वतः-विषयीं विश्वास व आदर उत्पन्न करीत असे. इंग्रजांच्या खजिन्यातला एकेक पैसा देखील योग्य कारणीं खर्चायचा, गरज भासल्यास लोकांच्या जवळून कर देखील उकळायचा--- पण तो देखील घ्यायचा स्थानिक लोकांची पंचायत स्थापन करून, त्यांची समजूत घालून व राजी खुषीनें व ऐपतीनुसार देऊं शकतील तेवढाच,--कोणतीहि वस्तु फुकट घ्यायची नाहीं, मंगलसिंहानें प्रत्येक ठिकाणीं हजारोंच्या गर्दींत त्या सर्वांना आपलें उद्दिष्ट समजावणें,–या सर्वांचा प्रभाव खूपच ताबडतोब पडत असे. तरुणांच्या झुंडींच्या झुंडी स्वातंत्र्ययुद्धाच्या सेनेंत भरती व्हायला येऊं लागल्या. मंगलसिहानें सैनिकांच्या नुसत्या कवायतीच घेतल्या नाहींत, तर हेरगिरी, टेहेळणी, रसद पोंचवणें इत्यादींचें देखील शिक्षण देण्याची व्यवस्था केली. हकीम आणि वैद्य यांची एक तुकडी आपल्यांत सामील करून घेतली. सामंतशाही लूट आणि लांचखाऊपणा यांची घाण काढून टाकण्यासाठीं शिक्षित लोकांना देशभक्तीच्या औषधाचा मोठा घोंट पाजायला हवा होता, पण तो या वेळीं देणें इतकें सोपें नव्हतें. तरी पण जो कोणी दोन दिवस देखील मंगलसिंहाच्या सह-वासांत आला, त्याच्यावर त्याचा प्रभाव पडल्या शिवाय राहिला नाहीं. शिपायांच्या मेळाव्यांत त्यांच्याशीं मनमोकळेपणानें हंसून खेळून गप्पा गोष्टी करतांना मंगल-सिंहाला पाहून असें कोणालाही वाटणें शक्य नव्हतें कीं तो या येवढ्या मोठया सैन्याचा–( शेवटी शेवटी तर त्याच्या सैनिकांची संख्या दोन हजारांवर गेली होती) सेनानायक असेल. पलटणींतला प्रत्येक तरुण त्याच्या संकेता सरशीं प्राण द्यायला सिद्ध होता. मंगलसिह नेहमींच शिपायांच्या पंक्तीला जेवायचा, त्यांच्याच प्रमाणें

तो घोंगडीवर झोंपायचा आणि संकटाच्या वेळीं तो आघाडीवर असायचा. त्यानें कैदी इंग्रज स्त्री-पुरुषांना खूपच आरामांत ठेवलें. त्यांना देखील या सेनापतीचा सुस्वभाव पाहून आश्चर्य वाटलें कारण त्यावेळीं युरोपांत देखील कैद्यांच्या बरोबर अशा तऱ्हेची उत्तम वागणूक ठेवण्यांत येत नसे. मंगलसिह रोहिलखंडाच्या चारहि जिल्ह्यांत फिरला, आणि त्यानें चहूंकडे फारच सुंदर व्यवस्था ठेवली.

नानासाहेबानें ५ जून १८५७ रोजी इंग्रजांविरुद्ध तलवार उपसली आणि दीड महिना झाला नाही तोच त्याला इंग्रजांपुढें हार खावी लागली. वारा कोणत्या दिशेनें वाहूं लागला हें मंगलसिंहाला ताबडतोब समजलें पण त्यानें स्वातंत्र्याचें निशाण देहांत प्राण असेतों खाली येऊं दिले नाही. इंग्रजी पलटणींनीं अयोध्येमधल्या निःशस्त्र निरपराध जनतेची सरसकट कत्तल चालवली, स्त्रियांचे प्राण आणि त्यांची अब्रू पायातळीं तुडवली, पण हे सारें ऐकून देखील मंगलसिंह आणि त्याचे साथीदार यांनीं कोणाही इंग्रज कैद्यावर हात टाकला नाहीं.

पावसाळा संपला न संपला तोंच साऱ्याच जागीं बंडवाल्यांच्या हातचीं हत्यारें गळून पडलीं पण रोहिलखंड आणि पश्चिम अयोध्या या ठिकाणी मंगलसिंह तसाच ठाणें देऊन बसला होता. चारी बाजूंनीं इंग्रज, गुरखे आणि शीख या फौजा त्याच्यावर चालून येत होत्या. स्वातंत्र्याच्या सैनिकांचें संख्याबळ दररोज कमी कमी होत होतें. मंगलसिंहाला भविष्य कळून चुकलें. त्याने पुष्कळांना भावी परिणामाची जाणीव देऊन घरांकडे परत जायला उद्युक्त केलें, पण मिरतहून त्याच्याबरोबर जे निघाले होते, त्या हजारांमधून एकहि शिपाई त्याची सोबत सोडायला तयार झाला नाहीं. आणि शेवटीं त्यानें जे दृश्य पाहिलें, त्यामुळें मंगलसिंहाला मृत्यू देखील एक आनंद-दायी गोष्ट वाटूं लागली. मृत्यूला आव्हान देणाऱ्या त्याच्या लहानशा तुकडींत ब्राह्मण-रजपूत, जाट-गुजर, हिंदु-मुसलमान हा भेदभावच मुळीं उरलेला नव्हता. सगळे एका जागींच स्वयंपाकपाणी करीत, एका पंक्तीला जेवीत. अशा तऱ्हेनें त्यांनीं हिंदुस्तानांतल्या एकजातीयत्वाचा हा आदर्श नमुना करून दाखवला होता.

बिदा सिंह, देवराम, सदाफल पांडे, रहीम खां, गुलाम हुसेन, हे मिरत मधले पांच सैनिक मंगलसिंहाबरोबर शेवटच्या घटके पर्यंत होते. त्यावेळीं गंगेत त्यांची नाव दोन्हीं बाजूनीं वेढली गेली. कैदी इंग्रज स्त्रीपुरुषांच्या विनंतीवरून इंग्रज जनर-लानें माफीची घोषणा करून पाहिली, पण त्यामुळें मंगलसिंह कांहीं शरण आला नाहीं, त्याला हें कधींच कबूल झालें नाहीं. आज देखील त्याला शरण येण्याबद्दल सुचवण्यांत आलें होतें, पण त्याचें उत्तर त्यानें गोळ्या झाडून दिले. शेवटीं पांचसहा प्रेतांनीं भर-लेली नाव धारेला लागली तेव्हां ती अडवण्यांत आली. इंग्रजांनीं त्या वेळी भारतांतल्या शौर्याचे पूजन केलें.

# १९—सफदर

( काळ- इ. स. १९२२. )

- १ -

एक लहानसाच पण सुरेख बंगला, त्याच्या विस्तीर्ण आवारांत एका बाजूला गुलाबांचा ताटवा, त्यांत तांबड्या आणि गुलाबी रंगाचे गुलाब फुललेले. दुसऱ्या बाजूला बॅडमिंग्टन खेळण्याचें एक लहानसें क्रीडांगण. तेथल्या हिरवळीवर हिंडणें देखील आनंददायक वाटायचें. तिसऱ्या बाजूला एक लतामंडप असून, चौथ्या बाजूला बंगल्याच्या मागे एक उघडा चौथरा होता. संध्याकाळीं बॅरिस्टर सफदरजंग बहुधा याच जागी बसत असत.

बंगल्याच्या बाहेरील भिंतींवर हिरव्या वेली चढून चिकटून पसरलेल्या. सफदर साहेबांनीं ऑक्सफर्ड मध्ये अशीं लतामंडित घरें पाहिली होतीं म्हणून त्यांनीं खास तशा पद्धतीनें या लता लावलेल्या होत्या. बंगल्याच्या आवारांतल्या गॅरेज मध्यें दोन मोटारी ठेवण्याची व्यवस्था होती. सफदरजंगची राहणी, त्याच्या बंगल्याची सजावट—या साऱ्यांत इंग्रजपणा शंभर टक्के भरलेला होता. त्याचे अर्धा डझन नौकर अशा कांहीं शिस्ती-शिष्टाचारानें वागत की कोणत्याही इंग्रज अधिकाऱ्याच्या नौकरांनीं त्याचे धडे गिरवावे. त्यांच्या कमरेला लाल दुपट्टा, डोक्यावर कायमच्या बांधून ठेवलेल्या फेट्यात आपल्या साहेबाचे नामचित्र (मोनोग्राम) असायचें. सफदर साहेबांना विलायती भोजन खूप आवडत असे; मुद्दाम यासाठीं तीन खानसामे ठेवलेले होते.

सफदर तर होतेच साहेब, पण सकीनाला देखील सारे नौकर चाकर मेमसाहेब म्हणत असत. सकीनेनें आपल्या धनुष्याकृति भिवयांच्या अतिरिक्त असलेले केसांचे अंकुर काढून त्या आणखी बारीक केल्या होत्या आणि रंग लावल्यामुळें तर त्या अधिकच काळ्या भोर झाल्या होत्या. दर पंधरा मिनिटांनीं ओठांना अधरराग लावण्याची संवय होती तिला, मात्र विलायती स्त्रियांची वेषभूषा करणें सकीनेला कधींच आवडलें नाहीं.

गेल्या वर्षी (१९२०मध्यें) सफदर साहेब आपली बीबी सकीना हिला घेऊन अगदीं पहिल्यांदांच इंग्लंडला गेले तेव्हां तिनें 'स्कर्ट, पेटीकोट' घालावा अशी त्यांची इच्छा होतीं. पण तें तिनें मान्य केलें नाहीं. आणि जेव्हां विलायतेंत त्यांना भेटणाऱ्या इंग्रज

स्त्रीपुरुषांनीं सकीनेच्या सौंदर्या बरोबरच तिच्या साडीची देखील तारीफ केली तेव्हां सफदरला सकीनेच्या नकारा बद्दल वाईट पण वाटलें नाहीं. त्या दांपत्याचा वर्ण इतका उजळ होता की युरोपांत सगळेच त्यांना इटालियन म्हणत असत.

१९२१ मधला थंडीचा मोसम. उत्तर हिंदुस्थानामधील इतर शहरांच्या प्रमाणे लखनौत देखील हिंवाळा सर्वात सुंदर ऋतू वाटत असतो. सफदर साहेब कचेरींतून येतांच आज बंगल्याच्या पिछाडीच्या चबुतऱ्यावर एका वेताच्या खुर्चीवर बसलेले होते. आज त्यांची चर्या विशेष गंभीर होती. त्यांच्या पुढल्या एका लहानशा टेबला-वर एक नोटबुक व दोन तीन पुस्तकें पडलेली होतीं. जवळच आणखी तीन रिका-म्या खुर्च्या पडलेल्या. आंगांत चांगला श्रेष्ठ प्रतीचा कडक इस्त्रीचा इंग्रजी सूट. त्यांच्या "दाढी मिशा नष्ट" चर्येवरील भाव बघूनच सहज कळून येण्यासारखे होते कीं साहेब आज कसल्या तरी भारी चिंतेनें व्यग्र झालेले आहेत. अशा प्रसंगीं साहेबांचें नौकरचाकर धन्याच्या आजूबाजूला अगदीच कमी फिरकायचे. तसा सफदरला राग हा कधीं काळींच यायचा, पण अशा प्रसंगी त्याला माणसांचा वारा देखील सहन होत नाही, असें त्या नौकरांनीं हेरून ठेवलेले होते.

संध्याकाळ झाली तरी सफदर आपल्या जागीच बसलेला होता. नौकरानें तार जोडून टेबल लॅंप आणून ठेवला. सफदरने कोणाचा तरी चाहाळ ऐकला बंगल्याच्या बाजूला; चौकशी केली तेव्हां नौकरानें सांगितलेः "शंकरसिह मास्तर येऊन परत निघाले." सफदरने लागलीच नौकर दामटला आणि मास्तरांना बोलावून घेतलें.

शंकरसिह मास्तरांचें वय असेल तिशी बत्तिशीतलें. पण आतां पासूनच त्यांच्या चर्येवर जरेचीं चिन्हे दिसूं लागलीं. बंद गळ्याचा काळा कोट, तशीच विजार, डोक्यावर वाटोळी फेल्ट टोपी. ओठावरल्या दाट काळ्या मिशा खालीं लोंबणाऱ्या. कुठें देखील यौवनवसंताच्या खुणा काही आढळायच्या नाहींत. डोळे बघावे मात्र; त्यांच्या तेजस्वीपणामुळें त्यांतली प्रतिभा प्रतीत व्हायची.

मास्तर येऊन पोंचतांच सफदरनें उठून त्यांच्याशीं हस्तांदोलनन केलें आणि त्यांना खुर्चीवर बसतांना पाहून म्हटलें—"शंकर, आज मला भेटल्याशिवायच जाणार होतास तूं?"

"क्षमस्व भाईसाहेब, मला वाटलं कीं असशील एकटाच कुठल्या तरी कामांत गढलेला."

"खटल्यांच्या फायली चाळत असलो तरी तुझ्यासाठीं दोन मिनिटांची तरी सवड निघते ना? मग आज तर माझ्यापुढं फायली देखील नाहींत."

शंकरसिंहावर सफदरचा सर्वात अधिक लोभ होता. त्याच्यापेक्षां आणखी अधिक जिव्हाळ्याचा मित्र दुसरा कोणीहि नव्हता सफदरचा. सैदपूरच्या शाळेंत चवथ्या

वर्गापासून तों लखनौत बी. ए. पास होण्यापर्यंत ते दोघे बरोबरच शिकले. दोघेहि बुद्धिमान; परीक्षांत कधीं याला तर कधीं त्याला दोन चार गुण अधिक उणे पडायचे, पण योग्यतेंत दोघेही समकक्ष असल्यामुळे त्यांच्यांत कधींहि मनोमालिन्य किंवा तंटा भांडण झालें नाहीं. दोघांच्या मैत्रीला आणखी एका गोष्टीची मदत झाली. दोघेहि गौतम राजपूत होते. आज जरी एकाचें घर हिंदू व दुसऱ्याचे मुसलमान होतें, तरी पण दहा पिढ्यांच्या आधी दोघेहि नुसते हिंदूच नव्हते तर दोघांच्याहि वंशशाखा एकाच पूर्वजापासून निघालेल्या होत्या. विशेष महत्त्वाच्या प्रसंगी वंशा-कुळाचा गोतावळा एक झाला म्हणजे अजून देखील त्या दोन घरचीं माणसे एकत्र येत.

सफदर आपल्या बापाचा एकुलता मुलगा. भावाची उणीव भासायची त्याला, पण ती नाहींशी करायला शंकरनें मदत केली होती. शंकर सफदरपेक्षां सहा महिन्यांनीं लहान. पण या सगळ्या बाह्य गोष्टी. त्या शिवाय शंकरमध्यें असे कांहीं गुण होते कीं त्यामुळें सोळा आणे साहेब बनलेल्या सफदरला या साध्याभोळ्या शंकर बद्दल अपार स्नेह आणि समतेचा भाव वाटत होता. शंकर स्वभावाने नम्र पण खुशामत करणें मात्र त्याला ठाऊक नव्हतें. त्याचें फळ असें कीं पहिल्या वर्गात एम्. ए ची परीक्षा पास होऊन देखील तो सरकारी हायस्कुलांत दुय्यम शिक्षक म्हणूनच रखडत होता. त्यानें नुसती इच्छाच दर्शवायची होती, दुसऱ्यांनीं त्याचा वशिला लावून दिला असता व तो आज एखाद्या हायस्कूलचा हेडमास्तर बनूं शकला असता. पण असें वाटते कीं त्याला आयुष्यभर दुय्यम शिक्षक म्हणूनच रहायचें आहे. एकवार मात्र त्यानें मित्राचा वशिला उपयोगात आणला होता. लखनौ बाहेर त्याची होणारी बदली वाचली ती यामुळेच. नम्रतेबरोबरच शंकरसिंहांत स्वाभिमानाचें पाणी देखील प्रकर्षानें खेळत होते, व त्याची कदर खूपच करायचा सफदर. वयाच्या बाराव्या वर्षी जुळलेले स्नेहाचें बंध आज वीस वर्षानंतर देखील जसेंच्या तसेंच दृढ आणि अभिन्न होते.

इकडचें तिकडचे बोलणें झालें नाहीं तोंच बदामी रंगाची साडी आणि लाल ब्लाऊज असलेली सकीना आली तेथे. शंकरनें उठून म्हटलें–"सलाम भाबी !"

भाबीनें हंसून उलट सलाम केला. एक काळ असा होता कीं श्रीमंत 'सरा'ची ग्रॅज्युएट मुलगी सकीना हिला गांवढळावाणी भासणाऱ्या शिक्षकाबरोबर सफदरचा स्नेह मुळींच आवडत नव्हता. सकीना बापाच्या घरीं कांहीं गोषांत रहात नव्हती त्यामुळें शंकरसिंहापुढे येण्या न येण्याचा कांही प्रश्नच नव्हता तरी पण सहा महिने तिच्या कपाळावर आंठ्यांची जाळीच पसरलेली असे, कारण सफदर बरोबर शंकरचें वागणें तिला अमर्यादेचें वाटे. पण शेवटीं तिनें शंकर खरोखरीच आपल्या स्नेहाला आणि आदराला पात्र आहे असा कबुलीजबाब सफदरजवळ दिला.

आणि आतां तर सकीनेनें शंकर बरोबर दीर-भावजयीचें नातेंच जोडलें होतें पक्कें. सकीना स्वेच्छेनें निपुत्रिका राहिली होती, तरी पण कधीं कधीं शंकरच्या मुलांना यायची घेऊन. इकडे सहा वर्षांपासून आपल्यावर श्रीशंकराची कृपा आहे असें शंकरला वाटूं लागलें. त्याच्या घरीं दोन वर्षं होतात न होतात तोंच नवा पाळणा हालूं लागे.

साहेबाचें मागच्या आठवड्यांतलें गंभीरपण बघून सकीनेला जरा काळजी वाटूं लागली होती. आज शंकरला बघून तिला खूप संतोष वाटूं लागला, कारण साहेबाच्या हृदयावरचे ओझे जर कुणी हलके करायला सहाय्य होत असेल तर तो शंकरच हें तिला पक्के ठाऊक होतें. सकीनाने शंकरकडे बघत म्हटले-"देवर, आज घाईत नसालच. भाबीच्या हातचं चॉकोलेटचं पुडिंग आवडेल ना ?"

सफदर-" चांगला तोंड चोपडेपणा चालवलास !"

सकीना-"तर तर, तसं आधीं विचारून घ्यावंच लागतं, नाहीतर कुठं गडप होतील देवरसाहेब, तें कळायचं देखील नाही."

शंकर--" हा अन्याय होतोय, भाबी. तुमचा हुकूम टाळल्याचं एखादं तरी उदाहरण आठवतं का तुम्हाला ?"

सकीना--" मी कुठं म्हणत्येय टाळला म्हणून ? पण देवर, हुकूम ऐकण्याच्या आधीच पळून जाणं हा गुन्हा नव्हे वाटतं ?"

शंकर--" बराय, मी आतां आपल्या सेनापति भाबी साहेबांचा हुकूम ऐकायला हात जोडून उभा राहतो !"

सकीना-" होय ना ? मग जात्यें मी आतां. जेवतांना पुडिंग खावं लागेल. सांगून ठेवत्ये हं !"

सकीना घाईनेच तेथून गेली. सफदर आणि शंकर यांच्या संभाषणाला गंभीर स्वरूप आलें.

सफदर म्हणाला--" शंकर, आपण आतां अगदींच नव्या अशा क्रांतियुगांत प्रवेश करीत आहोंत. १८५७ नंतर ही पहिलीच वेळ आहे की ज्या वेळीं हिंदुस्थानच्या धरणीचीं पाळं मुळं हालूं लागलेली आहेत. माझं तरी असं मत आहे."

" सफ्फू भाई तूं राजकीय चळवळीबद्दल बोलतोस ना ?"

" राजकीय चळवळ हा अगदीच सामान्य शब्द वाटतो, शंकर ! १८८५ मध्यें जेव्हां कॉंग्रेसची स्थापना झाली तेव्हां ती इंग्रज आय्. सी. एस्. पेन्शनरांची कृपापात्र होती. तेव्हां पण त्यांच्या ख्रिस्तमस मधल्या मनोरंजक व्याख्यानांना आणि बाटल्या उडवण्याला चळवळ हें नांव देत असत.जर त्यालाच तूं चळवळ म्हणत असशील तर मला वाटतं आपण आतां चळवळीमधून क्रांतियुगांत प्रवेश करीत आहोंत."

" कां बरं ? गांधीजींनीं टिळक स्वराज्य फंडासाठीं एक कोटी रुपये जमवले आणि स्वराज्याचा गाजावाजा जोरानं चालू केला म्हणून का ? "

" क्रांति किंवा क्रांतिकारक चळवळ यांचा आधार एक व्यक्ति असूं शकत नाहीं, शंकर. क्रांति जें भारी परिवर्तन घडवून आणते, तें एका किंवा दहापांच महान् व्यक्तींच्या सामर्थ्या बाहेरचं असतं. मी जेव्हां या आजच्या चळवळीचं मूळ पाहूं लागतो, तेव्हा मी हा असा निष्कर्ष काढतों. तुला ठाऊकच असेल की १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धाचे पुढारी पदभ्रष्ट सामंत होते. त्या युद्धाचं एक केंद्र हेंच लखनौ होतं. इतकंच नव्हे तर इंग्रजानी लखनौ खालसा करणं हें देखील त्या युद्धाच्या तात्कालिक कारणापैकी एक होतं. मात्र युद्ध लढवलं गेलं ते सामान्य लोकाचे प्राण पणास लावून ! आमच्या कितीक कमजोरी मुळं आम्ही त्यात यशस्वी होऊं शकलों नाही. इंग्रजांनी पराजितावर आपला खुनी राग काढला. असो. मला हे सांगायचं आहे की १८५७ नंतर ही पहिलीच वेळ आहे की जेव्हां देशाच्या स्वातंत्र्यासाठीं होणाऱ्या लढाईत जनतेला सामील करून घेण्यात येत आहे. आतां तूंच सांग, तूं इतिहासाचा एक चागलाच अभ्यासू आहेस, आधी झाली होती का अशी कोणती चळवळ की जिच्यांत जनतेने अशा तऱ्हेनं भाग घेतलेला होता ? "

" सफ्फू भाई, नागपूर कॉंग्रेस (१९२०) आणि कलकत्ता कॉंग्रेस देखील संपून गेली. गावागांवामधल्या ज्या खळबळीचा तूं उल्लेख करतोस, ती मी आपल्या डोळ्यांनीं बघितली. हें सारं असंभाव्य होतं हें हि मी कबूल करतों पण येवढा महापूर आल्यावर देखील, याच लखनौत कितीदां तरी विदेशी कापडांच्या होळया झाल्यावर देखील, तुझ्या नाकावरची माशी देखील उडूं शकली नाहीं. आणि आज तूं क्रांतीच्या भोवऱ्यांत सांपडलेल्या माणसाप्रमाणं बोलूं लागलास ? "

" खरं आहे तुझं म्हणणं, शंकर. गड्या छोट्या भय्या, खरंच रे हा भोंवरा माझ्या पायाखालची वाळू वाहून नेतोय. हा भोंवरा काहीं एक लहानसा एका ठिकाणीं असणारा असा नव्हे बरं, त्याचा उगम एका मोठ्या जबरदस्त भोंवऱ्यांतून झालेला आहे. प्रत्येक युगांत सर्वांत सामर्थ्यवान क्रांतिकारी शीलशक्ति जनतेंतून प्रगट होत असते. "

" तूं १८५७ पासून सुरुवात करतोस, सफ्फूभय्या. मोठा लांबचा चक्कर मारतोस ? "

" कां तें सांगूं शंकर ? "

" सांग तरी, ऐकायचं आहे मला. भाबी पुडिंग बनवीत आहे, अन् उद्यां रविवारही आहे. झालं मग, घरीं निरोप पाठव नौकराकडून की शंकर लखनौत

जिवंत आहे आणि सकीना भाबीनं पुडिंग खाऊं घातल्यामुळं घोरत पडला आहे. मग रात्रभर ऐकत बसेन मी निश्चिंतपणानं!"

"शंकर, ऑक्सफर्डमधली माझ्या आयुष्याची अर्धी गंमत केवळ तूं नसल्यामुळं गमावली मी. असो. मीच नव्हें केवळ, तर हिंदुस्थानाबाहेर साऱ्याच जागी राजकारणाचे विद्यार्थी असं समजतात की गेल्या युगात आणि या युगांत इंग्लंडच्या राजनीतीत जें परिवर्तन झालं तें आंतरराष्ट्रीय परिस्थितीमुळं केवळ नाइलाजानं—जगांतल्या दुसऱ्या राजशक्तींच्या हालचालींमुळं. तसंच या परिस्थितीच्या कारणांचा विचार केला तर तीं मुख्यतः आर्थिकच आहेत. १८५७ च्या आघाता नंतर आमचा देश झोंपी गेला, वाटल्यास असंही म्हणतां येईल की आपल्या परिवर्तनाची गति इतकी मंद आहे कीं तिला झोंपच म्हणता येईल. पण दुसऱ्या देशांत खूप परिवर्तन घडून आलं. हजार वर्षांपूर्वी रोमन साम्राज्याचे वेळी तुकड्यां तुकड्यांत विभागलेला इटली १८६० च्या २ एप्रीलला एकजिनसी राष्ट्र बनण्यांत यशस्वी झाला आणि त्यानं आमच्या हजारो तरुणाच्या पुढं मॅझिनी व गॅरिबाल्डी याचे आदर्श ठेवले. रोमन साम्राज्याचा विध्वंस करण्याइतके बलिष्ठ बनलेले जर्मन स्वतःला मात्र एकत्रित करूं शकले नव्हते, ते देखील १८६६ मध्यें अर्धवटपणें व फ्रान्सवर विजय मिळवल्यावर १८ जानेवारी १८७१ ला जवळ जवळ पूर्णतः प्रशियाच्या नेतृत्वाखालीं आपलं एक संघटित राष्ट्र करूं शकले १८६६ मधलं परिवर्तन तर जगांतलं मोठं परिवर्तन मानलं पाहिजे. कारण ते झाल्यामुळंच जर्मनी फ्रान्सच्या बलाढ्य शक्तीचा १८७० मध्यें पाडाव करून पारिस व व्हर्साय या जागीं आपला विजयी ध्वज रोवूं शकला. आणि त्यामुळेंच इंग्लंड आणि रशिया आपल्या भयभीत नजरा बर्लिनकडे रोखून पाहू लागले. हें झालं बाहेरच्या भयासंबंधीं; पण या सर्वांपेक्षां अधिक भीति निर्माण केली पारिस मधल्या मजूर राज्यानं–पारिस कम्यूननं! दोन एप्रील पासून दीड महिन्यापेक्षां थोडं अधिक टिकलं तें. (२ एप्रील ते २१ मे १८७१), पण त्यानं हें बजावून सांगितलं कीं केवळ सामंत आणि बनियेच राज्य करूं शकतात हें खरं नसून मजूर देखील राज्य चालवूं शकतात."

"पण या घटनांचा हिंदुस्थानच्या राजनैतिक घटनांबरोबर संबंध आहे असं वाटतं तुम्हांला?"

"राजनैतिक घटनाच नव्हे तर, आणखी आमचे इंग्रज शासक हिंदुस्थान संबंधीं जें धोरण ठेवतात, त्यांत या घटनांचा हात असतो. युरोपांत जर्मनी सारखी दुर्जेय शक्ति निर्माण होतांच फ्रान्सनं इंग्लंडचं वैर आणि स्पर्धा सोडून दिली. आतां त्याला धोका वाटतो जर्मनीचा. मेलेलं पारिस-कम्यून आणि १८७१ मध्यें आस्ट्रियाला जोडून साऱ्या जर्मन संस्थानांचं बनलेलं जिवंत जर्मन राष्ट्र यांमुळें

आमच्या भांडवलदार शासकांची झोंप उडाली, त्यांना धास्ती वाटूं लागली हें काय सांगायला हवं ? याच वेळीं आणखी एक परिवर्तन झालं. १८७० मध्ये इंग्रज व्यापारी भांडवलवाले बनले आणि त्यांनीं कच्च्या मालाच्या खरेदी पासून तों पक्का माल तयार करून त्याची विक्री करण्याच्या अवस्थेपर्यंत नफा मिळवून देणाऱ्या स्वस्त अशा भांडवलशाहीचा आश्रय घेतला. व्यापारशाहींत केवळ कारागिरांचा माल इकडून तिकडे नेऊन विकण्यांत जी कांहीं दलाली मिळेल तेवढीच, पण भांडवलशाही-मध्यें पावलो पावलीं नफा मिळतो. कापसाची खरेदी केली की नफा, रुईच्या गांठी बांधण्यांत नफा, आगगाडीतून नेण्यांत नफा, जहाजातून नेण्यांत (भाड्याच्या रूपानें) नफा, मॅचेस्टरच्या गिरण्यांत सूत कताई व कापड विणाई यांत नफा, पुन्हां जहाजानं कापड परत आणण्यात जहाज कंपनीचा नफा, आगगाडी चालविण्याचा नफा –नफाचनफा. या सगळ्या नफ्याची तुलना करा कारागिरांच्या हातचं कापड विकणाऱ्या व्यापाऱ्याचा नफ्याशीं ! ”

“ व्यापारशाही पेक्षां भांडवलशाहीचा नफा अधिक असतो, आणि तो इष्ट आहे. ”

‘ आणि १८७१ मध्यें व्हर्साय येथें जेव्हां जर्मनीनं प्रशियाचा राजा पहिला विल्यम याला जर्मनीचा कैसर ( सम्राट ) म्हणून घोषित केलं, त्याच्या दुसऱ्याच वर्षी ( १८७२ ) कट्टर इंग्रज भांडवलदार टोरींनीं इंग्लंडचा यहुदी मुख्य-प्रधान डिस्राइली याच्या तोंडून साम्राज्यवादाची घोषणा वदवली. घोषणा केवळ शाब्दिक नव्हती. उलट वस्तुस्थिती उघड करणारी होती. फॅक्टऱ्या इतक्या वाढ-लेल्या होत्या की त्यांच्या साठी सुरक्षित बाजारपेठा हव्या होत्या. अशा बाजारपेठा हव्या होत्या की जिथं जर्मनी व फ्रान्स मध्यें बनवलेल्या मालाची चढाओढ होण्याची भीति रहाणार नाहीं, त्या बाजारपेठाची सर्व मक्तेदारी सर्वस्वीं आपल्याच हातीं असावी. बरं, त्याच बरोबर भांडवल इतकं वाढलं होतं की तें गुंतवून नफा मिळविण्या-साठीं सुरक्षित स्थान हवं होतं; या साठींच मुलूख मिळतील तेवढे आपल्या ताब्यांत घेतले पाहिजेत. साम्राज्य शब्दाच्या आंत येवढा खोल अर्थ भरलेला होता डिस्राइ-लीनं. हिंदुस्तानांत दोन्हीं गोष्टींची सोय होऊं शकत होती. युरोपांतून हिंदुस्तानाकडे येणारा सर्वांत लहान आणि कमी खर्चाचा मार्ग होता सुवेजचा कालवा, तो १८६९ मध्यें सुरू झाला. १८७५ मध्यें ईजिप्तच्या खेदिवापासून १७७००० हिस्से चाळीस लक्ष पौंड देऊन डिस्राइलीनं तारेनं विकत घेतले. साम्राज्य घोषणेचं एक पाऊल पुढं अशा रीतीनं टाकलं. मग १८७७ च्या पहिल्या जानेवारीला दिल्लींत दरबार भरवून व्हिक्टोरिया राणीला सम्राज्ञी म्हणून घोषित करून डिस्राइलीच्या सरकारनं साम्राज्यवाद

इतक्या पुढं नेला कीं पुढं उदारमतवादी ग्लॅडस्टन मुख्य प्रधान झाला तरी त्याच्यांत डिस्राइलींचं धोरण बदलवण्याची हिंमत किंवा ताकद राहिली नव्हती. "

" आम्हीं तर आतांपर्यंत विद्यार्थ्यांना शिकवीत होतों कीं महाराणी व्हिक्टोरियानं भारतसम्राज्ञी--कैसरे हिंदची पदवी धारण करून हिंदुस्थानवर मोठी कृपा केली. "

" आणखी लक्षांत घ्यायचं म्हणजे असं कीं सहा वर्षं आधीच प्रशियाच्या राजानं देखील कैसरची पदवी धारण केली होती. कैसरचं नांव किती महाग होतं आधी. रोमन साम्राज्याच्या वेळेपासून टाकून दिलेल्या या शब्दाची किंमत बाजारांत झटपट किती तरी वाढली. "

" तसंच, रोमन भाषेंतला कैसर शब्द केवळ हिंदुस्थानमध्येंच चालवून इंग्रजींत मात्र त्या जागी "एम्प्रेस" हा शब्द ठेवण्यांत कांही रहस्य तर नसेल ? "

" असेलहि. असो. कैसर शब्दाबरोबर आम्हीं १८७१ पासून साम्राज्यवादाच्या युगांत प्रवेश केला. आधीं इंग्लंडनं शिरकाव केला, मग पराजित प्रजासत्ताक फ्रान्स पुन्हां सांवरल्यावर, १८८१ मध्ये आफ्रिकेतील टयुनिसवर त्यानं आपला कबजा करून साम्राज्यवादाचा अंगिकार केला. नवे कारखाने आणि भांडवलदार यांनीं गजबजलेला जर्मनी १८८४ पासून वसाहतीची मागणी पुढं सारून साम्राज्यवाद स्थापन करण्याच्या प्रयत्नांत आहे. "

" पण या सर्वांचा हिंदुस्थानांतल्या इंग्रजांच्या धोरणपालटाशीं काय संबंध ? "

" नित्य नवीं सुधारलेलीं यंत्रं, वाढणारे कारखाने आणि त्यांच्या योगानं वाढणारं नफ्याच्या स्वरूपांतलं भांडवल यांचा उपयोग होण्याची व्यवस्था करायला हवी होती. १८७४ ते १८८० पर्यंत डिस्रायलीच्या मंत्रिमंडळानं सर्वनाश करून सोडला. १८८० ते १८९२ पर्यंत ग्लॅडस्टनचं उदारमतवादी सरकार होतं ना, पण त्याला कांहीं डिस्रायलीन पुढं टाकलेलं पाऊल मागं घेतां येत नव्हतं. मात्र भांडवलवाल्यांच्या नागव्या साम्राज्यवादी राक्षसीपणाला जराशी देवकळा आणायची होती, त्यामुळे सामान्य जनता खवळायची थांबणं शक्य होतं. यासाठींच डिस्रायलीनं 'भारत साम्राज्ञी'च नाटक रचलेलं होतं. आतां उदारमतवादी लोकांनीं देखील आणखी औदार्य दाखवायची गरज भासत होती. आयर्लंड बद्दलचं 'होमरूल बिल' त्या औदार्याचं रूप होतं, पण आज देखील आयर्लंडचा प्रश्न तसाच कुजत पडलेला आहे. याच 'औदार्याचा' फायदा घेऊन आम्हीं हिंदुस्थानी साहेबानी १८८५ मध्यें आपली कॉंग्रेस उभारली. कॉंग्रेस वस्तुतः ब्रिटिश उदारमतवादी पक्षाची धर्मादाय पेटी या नात्यानं जगांत अस्तित्व पावली व तिनं एका युगापर्यंत आपल्या धर्माचं पालन केलं. पण १८९५ ते १९०५ पर्यंत पुन्हां दहा वर्षं ब्रिटनमध्यें टोरींचं सरकार आलं; त्यानं

एल्गिन आणि कर्झन यांच्या सारखे आपले सुपुत्र हिंदुस्थानांत पाठवले. या सुपुत्रांनीं साम्राज्यवादाच्या गांठी अधिकच घट्ट करण्याचे प्रयत्न केले, पण परिणाम मात्र उलटा झाला. ”

“ कसा ? तुझं म्हणणं लाल ( लजपतराय ), बाल ( बाळ गंगाधर टिळक ), पाल ( बिपिनचंद्र पाल ) यांना उद्देशून आहे ना ? ”

“ हे लाल, बाल, पाल, त्या परिणामाचीं बाह्य प्रतीक होत. जपाननं रशियाचा पराभव करून ( ८ फेब्रुवारी १९०४ ते सप्टेंबर १९०५ ) आपलं स्थान मोठ्यांच्या बरोबरीनं ठरविलं आणि आशियात एक नवी जागृति निर्माण केली. कर्झननं केलेला वंगभंग आणि हा आशियाचा विजय यांचा मेळ करून कॉंग्रेसच्या सभामंचकावरून होणाऱ्या आवेशपूर्ण भाषणांनीं भारतीय तरुणांना पुढं सरण्याची प्रेरणा दिली. अर्ध्या शतकानंतर भारतीय स्वतःसाठीं कसं मरावं तें शिकले. यांत आम्हांला आयर्लंड व रशिया यातील हुतात्म्यांच्या उदाहरणांमुळं खूपच मदत मिळाली . म्हणून याचं देखील मूळ केवळ भारतांतच शोधणं चुकीचं होणार नाहीं का ? ”

“ अलबत. वस्तुतः जगाचे धागेदोरे एकत्रित गुंफलेले आहेत. ”

“ शंकर, कोणत्याहि क्रांतिकारक चळवळीचं सामर्थ्य दोन गोष्टींवर निर्भर असतं —तिला आंतरराष्ट्रीय परिस्थिति आणि उदाहरणं यांच्यापासून किती प्रेरणा मिळत आहे ही एक, आणि देशांतला सगळ्यांत जास्ती क्रांतिकारी असा वर्ग तिच्यांत किती प्रमाणांत भाग घेतो ही दुसरी. पहिल्या शक्ति-प्रवाहाचीं कांहीं उदाहरणं आतां दिलींच. दुसरा शक्तिस्रोत म्हणजे कामगार-किसान जनता. क्रांतीची लढाई तेच लढूं शकतील की ज्यांच्या जवळ हरण्याजोग्या वस्तु फारच थोड्या असतात. सकीनाच्या अधर-राग, हा बंगला, आणि बापाची तालुकदारी गांवं गमावून बसण्याची भीति ज्याला वाटते, तो कसला क्रांतीचा सैनिक होणार ? म्हणूनच मी म्हणतों कीं, क्रांतीचं वाहन सामान्य जनताच होऊं शकेल. ”

“ माझंहि मत तुझ्या प्रमाणंच आहे. ”

“ छान. आज जनतेंत जो उत्साह आहे तो तर तुला आहेच माहित. आतां दुसरीकडून आंतरराष्ट्रीय परिस्थितीमुळें काय प्रेरणा मिळत आहे तिचा विचार कर. मागलं महायुद्ध ( १९१४–१८ ) जगात चांगलीच आग पेटवून गेलं. तें युद्ध जुंपलं याचं कारण साम्राज्यवादाला आलेलं पीक—भांडवल आणि पक्का माल यासाठीं सुरक्षित बाजारपेठा ताब्यांत ठेवण्याची किंवा हिरावून घेण्याची धडपड करण्याचा परिणाम. जर्मनीला नव्या वसाहती हव्या होत्या, पण धरित्रीची तर वांटणी होऊन गेलेली होती. त्यामुळं युद्ध करूनच या वसाहती हिसकावून घेणं शक्य होतं. झालं, वसाहतींचे धनी असलेले इंग्लंड आणि फ्रान्स यांच्या बरोबर जर्मनीची जुंपली.

जर्मनी हरला हें बरं झालं असलं तरी साम्राज्यवादाच्या सुखनिद्रेंत अडथळा आणणारा एक आणखी वैरी जन्माला आला.–तो म्हणजे साम्यवाद ! वस्तूंचं उत्पादन करायचं तें साऱ्या मानवांना सुखी आणि समृद्ध करण्यासाठीं, नफा मिळविण्यासाठी नव्हे, यंत्रांत सुधारणा होतात, कारखाने वाढतात, मालाची पैदास वाढते आणि त्याच्या विक्रीसाठीं मोठी बाजारपेठ लागते. पण गिऱ्हाइकांच्या हातीं पैसा खेळावा लागतो, त्यासाठी प्रत्येक गिऱ्हाइकाला पुरेसं वेतन मिळालं पाहिजे. हातांत पैसा जितका कमी असेल त्या मानानं मालाची खरेदी कमी प्रमाणांत होईल, मग तो माल वखारींतून आणि दुकानांतून पडून राहील, मंदी येईल, मालाची पैदास त्या प्रमाणांत कमी करावी लागेल, तेवढ्या प्रमाणांत कारखाने बंद होऊं लागतील, तितक्या प्रमाणांत कामगार बेकार होतील, तितक्या प्रमाणांत त्यांच्या जवळ माल घ्यायला पैसा राहणार नाहीं; मग ते माल कसला खरेदी करणार कपाळाचा ! फॅक्टऱ्या काय माती चालतील ? साम्यवाद सांगतो, नफ्याचा लोभ सोडा. आपलं राष्ट्र व सारं जग हा एक परिवार मानून त्याला आवश्यक असतील तेवढ्याच वस्तूंचं उत्पादन करा. प्रत्येकाजवळून त्याच्या कार्यक्षमतेनुसार काम घ्या, प्रत्येकाला त्याच्या गरजा भागविण्याइतक्या जीवनोपयोगी वस्तू द्या. जोंपर्यंत सगळ्यांच्या गरजा भागविण्यासाठीं पुरेसें उत्पादन करायला यंत्राचे कारखाने व यंत्रविशारद कारागीर मिळत नाहींत तोंपर्यंत त्यांच्या कामाच्या योग्यतेवरून प्रमाण ठरवून द्या. आणि हें सगळं शक्य होईल, मात्र जमिनीवर किंवा कारखान्यावर कोणा एका व्यक्तीची मालकी असतां कामा नये, आणि उत्पादनाची सारीं साधनं अवघ्या महान परिवाराच्या मालकीची असावींत."

"सुंदरच आहे ही कल्पना."

"आतां ही केवळ कल्पनाच राहिलेली नाहीं, शंकर ! जगाचा सहावा हिस्सा असलेल्या रशियावर १९१७ पासून असं साम्यवादी सरकार कायम होऊन राहिलेलं आहे. आज देखील भांडवलशाही जग त्या मानवतेच्या एकमात्र आशेला नष्ट करण्यासाठीं टपून बसलेलं आहे. पण पहिल्या कडक अग्निपरीक्षेंतून सोविएत सरकार यशस्वी रीतीनं पार पडलं. नाहीं म्हणायला फ्रान्स-अमेरिकेमधल्या भांडवलवाल्यांच्या मदतीनं हंगेरींतून सोविएत सत्ता सहा महिने लोटले नाहीं तोंच (मार्च ते आगस्ट १९१९) उलथवून लावण्यांत आली. सोविएत रशियांतलं कामगार–किसानांच्या सरकारचं अस्तित्व साऱ्या जगाला प्रेरणा देणारं आहे, आणि ज्या शक्तीच्या बळावर सोविएतची सत्ता कायम झाली, तीच शक्ति आतां प्रत्येक देशांत कार्यप्रवृत्त झालेली आहे. युद्ध थांबतांक्षणींच इंग्रजांनीं रौलट कायदा मंजूर करून घेण्याची घिसाडघाई करण्याचं कारण काय ? त्या विश्वव्यापिनी क्रांतिकारी शक्तीची गति कुंठित करण्यासाठींच. आतां विचार कर, ती क्रांतिकारिणी शक्ति हें

जग उलथून पाडायला भूमंडळांत स्वैर संचार न करती, तर इंग्रज रौलट कायदा बनवते ना; रौलट कायदा अस्तित्वांत आला नसता तर गांधी त्यांच्या विरुद्ध उठाव करायला जनतेला ललकारी देते ना; जनतेला ललकारी दिली नसती तर हा क्रांतीचा सुप्त दावानल १८५७ नंतर आतां पुन्हां धगधगून पेटला नसता. म्हणूनच मी म्हणतों कीं आपण आतां एका अगदींच नव्या अशा क्रांतियुगांत प्रवेश करीत आहोंत."

"तर मग गांधी क्रांतिधुरीण आहे असं का तुम्हांला वाटतं? गोखल्यांसारख्या मवाळाला गुरुस्थानीं मानणारे गांधी हे क्रांतिधुरीण कसे काय होऊं शकतात, सफ्फू भैय्या?"

"गांधींच्या सर्वच गोष्टी किंवा त्यांचे सगळेच विचार मला क्रांतिकारक वाटत नाहींत शंकर! क्रांतिकारी शक्तीचा स्रोत असलेल्या जनतेचे त्यांनीं जें आवाहन केलें, त्यालाच अनुलक्षून मी त्या बाबतींत त्यांना क्रांतिकारी समजतों. त्यांची धर्माची हांक--विशेषतः खिलाफतीच्या चळवळीची--मला बिलकूल क्रांतिविरोधी वाटते. यंत्रांचा व कारखान्यांचा त्याग करून पुन्हा जुन्याकडे वळण्याचा त्यांचा आदेश मी प्रतिगामी मानतों. शाळा-कॉलेजें बंद पाडण्याचा त्यांचा कार्यक्रम देखील मी याच कोटींत ढकलतों."

"आतां तुमच्या पोराला मार्कंडेयाचं आयुष्य लाभो, सफ्फू भैय्या. तुम्हीं गांधींची प्रशंसा करण्यांत इतके पुढें गेला होतां कीं माझा श्वास कोंडूं लागला; वाटलं कुठं शाळा-कॉलेजांना तुम्हीहि सैतानाचा कारखाना तर म्हणत नाहीं ना?"

"शिक्षणपद्धति दोषपूर्ण असूं शकते, शंकर! पण आजच्या शाळा-कॉलेजांमुळें आम्हाला सायन्सचा परिचय होतो. विज्ञानाशिवाय आज मनुष्य मनुष्यपण मिळवूं शकत नाही. जेव्हां केव्हां आम्ही स्वतंत्र होऊं, तेव्हां आमच्या मुक्ततेला विज्ञानाचा विशेष हातभार लागलेला असेल. दिवसेंदिवस वाढत असलेली मानवजातीची भविष्यकाळांतली समृद्धि त्याच विज्ञानावर निर्भर आहे. म्हणूनच विज्ञानाला सोडून मागं हटणं ही आत्महत्या होय. शाळा-कॉलेजं बंद पाडून चरख्या-हातमागाच्या शाळा स्थापन करणं म्हणजे स्वतःला मागल्या काळोखाच्या युगांत ओढून नेणं होय. क्रांतीचे सैनिक व्हायला विद्यार्थ्यांना आव्हान देणं कांहीं वाईट नाहीं. हें तर तुला देखील कबूल करावं लागेल, शंकर!"

"करतों ना, पण हे अवांतर बहिष्कार?"

"कोर्ट-कचेऱ्यांचा बहिष्कार बरा आहे; कारण त्याच्या मुळं आम्हीं आपल्या परकी सत्ताधाऱ्यांना आपली योग्यता व आपला क्षोभ दाखवूं शकतों. विलायती

मालाचा बहिष्कार देखील इंग्रज बनियाच्या गालावर चांगली जबरदस्त चपराक आहे; शिवाय त्यामुळं आमच्या स्वदेशी उद्योगधंद्यांना देखील सहाय्य होऊं शकेल. "

" झालं तर सफ्फू भैय्या. तुम्हीं खूप लांबचा पल्ला गांठला, हें दिसतंच ! "

" नाहीं, अजून गांठायची इच्छा आहे. "

" गांठायची इच्छा आहे ?"

" आधीं हें सांग. आपण क्रांतियुगांतून चाललेले आहोंत कीं नाहीं ? "

" मी तुम्हांला किती तरी प्रश्न केवळ विचारायचे म्हणूनच विचारले, सफ्फू-भैय्या. तसं म्हटलं तर, ज्या दिवशीं रशियन क्रांतीची बातमी मला समजली त्या दिवसापासून मी साम्यवादी वाङ्मय शोधशोधून वाचलं आणि त्यापेक्षां विशेष म्हणजे असं कीं, आपल्या देशांतील परिस्थितीच्या गुंत्याची उकल साम्यवादी दृष्टिकोनांतून होऊं शकेल कीं काय याचा विचार मी करूं लागलों. हिंदुस्थान आणि जग यांचं कल्याण याच एका मार्गानं होऊं शकेल असं मला वाटतं. गांधींची असहकारिता तो महान् उद्देश साधण्याच्या दृष्टीनं उपयोगीं पडेल किंवा नाहीं याचा मला संदेह पडलेला होता पण तुम्ही माझं लक्ष क्रांतीचं वाहन असलेल्या जनतेकडे वेधतां-क्षणींच तो माझा संदेह दूर झाला. मी गांधींना मात्र क्रांतीचं योग्य वाहन मानीत नाहीं सफ्फू भैय्या. तुला साफ साफ सांगतों हें मी ! जनतेला मानतों मी तें क्रांति-वाहन. १८५७ मध्यें पदच्युत संस्थानिकांनीं चरबी, काडतूस आणि धर्मावरलं गंडांतर यांची हांकाटी करून जनतेचा बराच मोठा हिस्सा आपल्या लढ्यांत ओढला होता पण आतां जनता भाकरीच्या प्रश्नावर लढ्याकडे आकर्षित होत आहे. माझ्या मतें आतां देण्यांत आलेलं आवाहन योग्यच आहे. क्रांतीचा मार्ग देखील योग्यच आहे. आणि उद्यां यदाकदाचित गांधी आपलं वास्तविक रूप धारण करून आले तरी देखील, मला वाटतं ते या क्रांतिचक्राची गति रोधूं शकणार नाहींत."

" म्हणूनच मी एक निर्धार केलेला आहे, क्रांतीच्या सेनेत सामील व्हायचा-असहकारी बनण्याचा. "

" इतक्या लवकर ? घाईनं ? "

" घाई करायची असती तर मी केव्हांच आखाड्यांत उतरलों असतों. पुष्कळ विचारांतीं आणि आज तुझं मत अजमावून घेतल्यावरच मी हा माझा निर्धार उघड करून सांगितला. "

सफदरच्या मुखांतून हें गंभीर शब्द बाहेर पडत होते, तेव्हां शंकरची दृष्टि दूर कुठें तरी स्थिरावलेली होती. त्याला अबोल बघून सफदर पुन्हां बोलूं लागला,--

"प्यारे दोस्त, तुझ्या पुढं आतां दिसत असेल, तुझ्या भाबीचा अधरराग, तिच्या रेशमी साड्या, तिचे मखमली जोडे, हा बंगला, त्यांतले हे खानसामे-नौकरचाकर-

मी सकीनेवर सक्ति करणार नाहीं; तिनं आपल्या मनास येईल तसं जीवन पत्करावं, तिची स्वतःची संपत्ति आहे आणि शिवाय हा बंगला, आपले कितीक गांव आणि कांहीं रोकड आहेच. मला त्यांच्यांत कांहीहि आकर्षण वाटत नाहीं. तिनं तिला वाटेल तें आयुष्य पत्करावं. "

" मी तुमचा किंवा भाबीचा विचार करीत नव्हतों. स्वतःबद्दल करीत होतों मी विचार. माझ्या वाटेंत असलेला मानसिक अडथळा आज दूर झाला. चला, आपण दोघे भाऊ एकदम या क्रांतीच्या मार्गावरून प्रवासाला निघूं. "

सफदरचे डोळे डबडबून आले–तो म्हणाला,–– " शंकर, ऑक्सफर्डमध्यें तुझ्या आठवणीनं व्याकुल व्हायचा मी. आतां आपण दोघे फांशीच्या खांबाकडे देखील हंसत खेळत जाऊं. "

सकीनेनें जेवण तयार असल्याची वर्दी दिली. बैठक समाप्त झाली.

– २ –

त्या रात्रीं सकीनेला सफदरचा चेहरा विशेषच प्रफुल्लित दिसला, पण शंकर-भाऊजी बरोबर झालेल्या संभाषणाचा तो परिणाम असे तिला वाटत होतें. सकीनेला आपला निर्धार कळवणें सफदरला महान संकट वाटत होतें. तसें म्हटलें तर सफदर देखील लाडालोभांतून वाढवलेला होता; पण तो खेडेगांवचा रहाणारा असल्यामुळें त्याने उघडी नागडी गरीबी सहानुभूतीच्या नजरांनी बघितलेली होती आणि म्हणूनच त्याला असा विश्वास वाटत होता कीं आपण जी अग्निपरीक्षा द्यायला सिद्ध झालों आहोत, तींत खात्रीनें उत्तीर्ण होऊं. पण सकीनेची गोष्ट वेगळी होती. शहर-गांवच्या एका श्रीमंत घरात ती लहानाची मोठी झालेली होती. " सिय न दीन्ह पग अवनि कठोरा "–( " बाई नाजुक सीतामाई, खडे कंटक रुततील पायी " ) अशीच तिच्या बाबतींत अवस्था होती. रविवारीं देखील सफदरला तिला सांगायचा धीर झाला नाही. सोमवारी चीफ कोर्टांत आपल्या कांहीं निकटवर्ती स्नेह्यांना देखील जेव्हां त्यानें आपला निर्धार सांगून टाकला तेव्हां मात्र सकीनेला तो सांगून टाकणें त्याला जरूरीचें वाटलें.

त्या रात्री त्यानें लखनौत मिळूं शकणारी सर्वोत्कृष्ट शांपेन मागवली होती. सकीनेला वाटलें, आज कोणी आणिक मित्र यायचा आहे. पण जेव्हां का त्यानें भोजनोत्तर ( Bearer ) बैराला शॉपेनची बाटली उघडून आणायला फर्मावलें, तेव्हां तिला कांहींसे कुतूहल वाटलें. सफदरनें सकीनेच्या ओठाला शांपेनचा पेला लावून म्हटलें—

" प्यारी सकीना, हा तुझ्याजवळून मला शेवटचा प्रसाद समज. "

" कां बरं ? मदिरा कां सोडणार आहांत प्रियतम ? "

"होय प्यारी, आणिक कितीतरी गोष्टी सोडायच्या आहेत, पण तुला मात्र नव्हे. आजपासून तूंच माझी मदिरा. तुझ्या सौंदर्याच्या प्राशनानंच माझे डोळे तर्र होऊन जातील." सकीनेच्या मुखावर म्लानता येऊं लागली हे बघून तो पुढें म्हणाला,– "प्यारी सकीना, आधीं आपण ही शांपेन संपवून टाकूं नि मग खूप खूप बोलूं."

सकीनेला मद्यप्राशनांत गोडी वाटली नाहीं. सफदरने उमरखय्यामच्या कितीतरी रुबाया म्हणून पेले भरले, तरी देखील नाहीं.

नौकर चाकर गेल्यावर आणि सकीना कसल्यातरी अनिष्टाच्या आशंकेनें अंग चोरून सफदर जवळ पहुडली तेव्हां त्यानें आपलें हृदय मोकळें केलें.–"प्यारी सकीना, मी एक महान निर्धार केलेला आहे. तो निर्धार करण्यापूर्वी मी तुला स्वतःचं म्हणणं मांडायची संधि द्यायला हवी होती. त्या दृष्टीनं मी तुझा मोठाच अपराधी आहे. पण मी असा अपराध कां केला हे तुला मी पुढं जें सांगणार आहे त्यावरून कळून येईलच. संक्षेपानंच सांगायचं म्हणजे आतां मी देशाच्या स्वातंत्र्याचा सैनिक बनणार आहे."

सकीनेच्या हृदयावर हे शब्द वज्राप्रमाणे आघात करते झाले, यांत तिळमात्र संदेह नव्हता आणि म्हणूनच तिच्या मुखावाटे अवाक्षरहि बाहेर आलें नाहीं. तिला अबोल बघून सफदर म्हणाला, "पण प्यारी सकीना, बाळपणापासून तूं सुखांत लोळलीस, तुला माझ्याबरोबर कांटेरी आयुष्यांत नेण्याची माझी इच्छा नाही."

सकीनेला भास झाला, तिच्या हृदयावर आणखी एक जबरदस्त आघात झाला. त्या आघातामुळें पहिल्या आघाताच्या वेदना ती पार विसरून गेली. तिच्या अंतःकरणांतल्या जागृत स्वाभिमानानें तिला बोलकें केलें–"प्रियतम, खरंच तुम्हीं मला इतकी सुखासीन समजतां ? तिकडे तुम्हांला कांट्याकुट्यांत वणवणतांना बघून देखील मी पलंगावर लोळत राहीन असं का वाटतं तुम्हांला ? सफदर, तुमच्यावर मी अंतःकरणापासून प्रेम करीत आल्यें तें माझं प्रेम तुमच्याबरोबर वाटेल तिथं सोबत करायला मला मदत करील. मी बऱ्याचशा अधरबत्त्या ( लिपस्टिक्स ) वापरल्या, आपला बराचसा वेळ नटण्याथटण्यांत घालवला, जविनांतल्या कठोरतेशी ओळख देख करून घेण्याचा मी कधीहि प्रयत्न केला नाहीं. पण सफदर तुम्हींच माझे सर्वस्व आहांत. माझा तुमच्यावर भार पडावा यासाठी कांहीं मी तसं म्हणत नाहीं, तर सदा तुम्हांला साथ देण्यासाठींच मी असं म्हणत आहे. आतां पर्यंत जसा तुम्हीं मला मार्ग दाखवला, तसाच या पुढच्या आयुष्यांत देखील तुम्हीं मार्ग दाखवावा."

सकीनेचे संकल्प दृढतर असतात हें जरी सफदरला ठाऊक होतें, तरी पण त्याला ही इतकी आशा कांहीं वाटली नव्हती. तो म्हणाला— "मी नवे मुकद्दमे घेणं बंद केलेलं आहे. जुन्यांपैकीं बरेचसे दुसऱ्यांवर सोंपवून देत आहे. याच आठवड्यामध्यें

कोर्टाची मी सुट्टी घेईन असं वाटतं. आणखी एक गोष्ट सांगायची आहे, सकीना ! शंकर देखील माझ्या बरोबर उडी घेणार आहे. ”

“ शंकर ? ” सकीना विस्मयानें उद्गारली.

“ शंकर एक रत्न आहे रत्न ! सकीना, माझ्याबरोबर तो साऱ्या जगाला पालाण घालील. ऑक्सफर्डमध्यें मला नेहमी त्याची आठवण यायची. ”

“ पण, सफदर, शंकरचा स्वार्थत्याग तुमच्या पेक्षां अधिक आहे. ”

“ तो पूर्वीपासूनच स्वतः स्वार्थत्यागाचं जीवन व्यतीत करीत आहे सकीना. जाणून बुजून तो त्या पासून ढळत नाही. मनांत आणलं असतं तर तो एक चांगला वकील होऊं शकला असता, आपल्या कोर्टात चांगलं नांव कमावूं शकला असता. ”

“ त्याची दोन मुलं वारलीं तेव्हां मी खूप रडल्यें होत्यें, पण आतां वाटतं, चौघांतून दोघांचा भार कमा झाला तेवढाच फायदा. ”

“ आणि चंपेला शंकरचा हा निश्चय आवडेल का ग सकीना ? ”

“ ती डोळे मिटून मान्यता देईल. तिनंच मला तुमच्यावर प्रेम करायला शिकवलं बरं, सफ्फू ! ”

‘ आपल्याला आपल्या पुढच्या रहाणीचा आतां विचार ठरवायचा आहे ! ”

“ आतांच तर सांगितलं तुम्हीं. मला विचार करायला अवसर तरी दिला कां ? सागा बरं तुम्हीच ! ”

“ माझी गांववाली दाई शरीफन आणि मंगर यांशिवाय बाकी साऱ्या नोकरांना दोन महिन्यांचा पगार देऊन रजा द्यायची. ”

“ बरं ! ”

“ दोन्ही मोटारी विकून टाकायच्या. ”

“ कबूल. ”

“ दोन पलंग आणि कांहीं खुर्च्या यांच्या शिवाय घरांतलं सगळं सामान सुमान वांटून तरी टाकायचं किंवा लिलावांत तरी द्यायचें. ”

“ हें हि कबूल.”

“लाटूश रोड वरली मावशीची हवेली मिळाली आहे ना आपल्याला, तींत जाऊन रहायचं. हा बंगला भाड्यानं देऊन टाकावा लागेल. ”

“चांगलं होईल. ”

“आणखी कांहीं राहिलं का ? ”

“ माझे कपडे–विलायती आहेत ते. ”

“ गांधींच्या असहकारितेंत मी सामील होतोंय म्हणून म्हणत्येस वाटतं ? ते जाळून टाकण्याच्या मताचा मी नाहीं, विशेषतः विलायती कपड्यांच्या इतक्या होळ्या

झाल्यावर तर नाहींच नाहीं. परंतु माझी खादीची पैरण आणि लेंगा शिवून येतील परवां पर्यंत."

"चांगले मतलबी आहांत हो, सफ्फू!"

"खादीची जाडी भरडी साडी नेसशील तूं सकीना?"

"जगाच्या अंतापर्यंत मी तुमच्या बरोबर चलणार आहे ना?"

"आणि मग हे कपडे?"

"तेच तर समजत नाही! लिलावांत विकतां आले तर त्याच पैशांत गरीबांना कपडे विकत घेऊन देतां येतील. नाहींतर वाटून टाकण्याचा प्रयत्न करून बघेन!"

– ३ –

सफदर सारख्या उदयोन्मुख बॅरिस्टराच्या या महान त्यागाची चहूंकडे वाखाणणी होऊं लागली. मात्र खुद्द सफदरला आपल्यापेक्षां शंकरचाच त्या वाखाणणीवर अधिक हक्क आहे, असे वाटत होते.

ऑक्टोबर आणि नोव्हेंबर हे दोन महिने सफदरला दौरा काढून जनतेत प्रचार करण्याची संधि मिळाली. बऱ्याचदां सकीना त्याच्याबरोबर गेली. शंकर देखील कित्येकदां गेला. सफदरचे सारे लक्ष खेड्यांपाड्यांकडे असे. लिहिणें वाचणें येणाऱ्या शहरांतल्या लोकांपेक्षा त्याचा विश्वास खेड्यांतल्या शेतकऱ्यांवर आणि मजूरावर अधिक होता, पण एका आठवड्यांतच त्याना कळून चुकले कीं आपल्या वक्तृत्वपूर्ण ऊर्दूचा चवथा हिस्सा देखील लोकांना समजूं शकला नाहीं. शंकरनें प्रारंभीच खेडवळ भाषेंत व्याख्यान द्यायला सुरवात केलेली होती. त्याचा होणारा सुपरिणाम बघून सफदरने देखील "अवधी" लोकभाषेत बोलण्याचा निश्चय केला. त्याच्या भाषेत पुस्तकी शब्द अधिक येत, पण स्वतःचे परिश्रम आणि शंकरची मदत घेऊन दोन महिने झाले न झाले तोंच त्याला अवधींतले कितीतरी विसरलेले आणि नवे शब्द पाठ झाले, आणि गांवकरी त्याचें एकेक वाक्य ऐकून डुलूं लागले.

दिसेंबर (१९२०) च्या पहिल्या आठवड्यांत त्यांच्या येथील इतर बऱ्याचशा राष्ट्रीय कार्यकर्त्यांप्रमाणें शंकर आणि सफदर यांना एकेक वर्षाची शिक्षा देऊन त्यांची फैजाबादला रवानगी करण्यांत आली. चंपा आणि सकीना त्यानंतर देखील काम करीतच होत्या पण त्यांना कांहीं अटक झाली नाहीं.

तुरुंगांत सफदर नियमानें एक तास चरख्यावर सूत काढीत असे. त्याच्या गांधी-विरोधी राजनैतिक विचाराची ज्यांना माहिती होती, ते त्याला टोमणे हाणीत. सफदरचें म्हणणें असे होतें–"विलायती कापडाचा बहिष्कार माझ्या मतें एक राजकीय शस्त्र आहे. त्याचबरोबर हेंहि मला माहित आहे कीं आमच्या देशांत अजून पुरेसं कापड तयार होत नाहीं. यासाठीं आम्हीं कापड बनवण्याचा उद्योग केलाच

पाहिजे. परंतु जेव्हां देशांतल्या गिरण्या पुरेशा कापडाचं उत्पादन करूं शकतील, तेव्हां मात्र मी चरखा चालवण्याच्या मताचा रहाणार नाहीं."

तुरुंगांत खुशालचेंडू लोकांचीच संख्या अधिक होती. या लोकांचा गांधींच्या एका वर्षांत स्वराज्य मिळवून देण्याच्या आश्वासनावर विश्वास बसलेला होता. त्यांना असें वाटत होतें, की तुरुंगांत आलें म्हणजे आपले कार्य झालें. गांधीवादानें पाखंडीपणा, फसवेगिरी आणि बाह्यावडंबर यांचें कंत्राट अजून घेतलेलें नव्हतें, त्यामुळें असहकारितावादी कैद्यांत प्रामाणिक राष्ट्रसेवकांचीच संख्या अधिकतर होती. तरी पण आपल्या राजकीय ज्ञानांत भर घालण्याकडे क्वचितच कोणाचें लक्ष असे, याची शंकर व सफदर यांना चीड येई. त्यांच्या पैकीं कित्येक रामायण, गीता किंवा कुराण यांचे पठण करीत. हातीं स्मरणी घेऊन नामाचा जप करीत. कित्येक केवळ पत्ते कुटण्यांत आणि बुद्धिबळाचे डाव माडण्यांतच आपला काळ घालवीत.

एके दिवशीं गांधीवादी राजकारणाचे दिग्गज विद्वान विनायकप्रसाद यांच्याशीं सफदरची जुंपली. शंकर पण तेव्हां तेथेंच हजर होता. विनायकप्रसाद म्हणाले— "राजकारणांत अहिंसेचा साधन म्हणून उपयोग करणं हा गांधीजींचा महान् शोध असून, ती एक अमोघ शस्त्र बनली."

"आमच्या सद्यःपरिस्थितींत तिचा उपयोग होऊं शकतो हें खरं, परंतु ती अमोघ वगैरे नाहीं हं! जगांत जितके अहिंसक पशु आहेत, तेच बहुधा इतरांचे शिकार बनतात."

"पशूंत नसेल, पण माणसांत मात्र एका अद्भुत बळाचा संचार अहिंसेनें होतो."

"राजकारणाच्या क्षेत्रांत तरी त्याचं उदाहरण दाखवून देता येणार नाही."

"नव्या शोधाचं उदाहरण कसं दाखवायचं?"

"पण हा शोध देखील नवा नाहीं." शंकर म्हणाला, "बुद्ध, महावीर, इत्यादि कितीतरी धर्मोपदेशकांनीं हिचं जोरदार समर्थन केलेलं आहे."

"मात्र राजकीय क्षेत्रांत नव्हे हो!"

सफदर म्हणाला, "राजकीय क्षेत्रांत अहिंसेची उपयुक्तता थोडी फार वाढली याचं कारण आज मानवता जरा उंच पातळीवर आलेली आहे : वर्तमानपत्रांत निःशस्त्र लोकांवर गोळ्या चालविण्याच्या बातम्या येतात त्या वाचून लोकांना वाईट वाटतं. निःशस्त्रांवर गोळ्या घालणं लोक वाईट मानतात. जालियनवाला बागेंत गोळ्या चालवून इंग्रजांनीं त्याच्या परिणामाचा अनुभव घेतलेला आहेच!"

"तर मग आमची अहिंसात्मक असहकारिता स्वराज्य मिळवायला समर्थ नाहीं असं तुम्हांला वाटतं का?"

"आपण आधीं स्वराज्याची व्याख्या सांगाल का?"

“ तुम्हींहि स्वराज्याच्या लढाईत भाग घेतलाय, सांगा ना तुम्हींच. ”

“ माझ्या मतें स्वराज्य म्हणजे श्रमजीवी लोकांचं राज्य, केवळ कामगारांचं राज्य ! ”

“ म्हणजे ? तुमच्या स्वराज्यांत तनमनधनें करून सहाय्य करणारे, कष्ट झेलून तुरुंगांत येणारे सुशिक्षित, शेठ-सावकार, तालुकदार इत्यादिकांचा कांहींहि अधिकार असणार नाहीं ? ”

“ आतां तर आपण पहातांच कीं शेठसावकार आणि तालुकदार यांना अमान-सभा स्थापन करण्यापुढं दुसऱ्या कामाला फुरसद नव्हती. ते बिचारे आतां तुरुंगात कसचे येणार ? आणि आलाच कोणी एखादा, तर त्यानं आपला स्वार्थ श्रमजीवी लोकांच्या स्वार्थापासून वेगळा ठेवतां कामा नये. ”

शंकर आणि सफदर पुस्तकें वाचण्यांत, आणि देशाच्या आर्थिक व सामाजिक प्रश्नांवर मिळून विचारविनिमय करीत असत. सुरवातीला त्यांचं बोलणं ऐकून घ्यायला इतरजण तयार नसत पण जेव्हां ३१ दिसेंबर १९२१ ची मध्यरात्र उलटून गेली तरी तुरुंगाचीं दारें तशींच बंद राहिली, तेव्हां मात्र त्यांना निराशेचा धक्का बसला. आणि मग चौरीचौऱ्यांत खवळलेल्या जनतेने कांहीं पोलिसांना जीवें मारलें ही बातमी ऐकल्यामुळें गांधीजीनीं सत्याग्रह मागें घेतला, तेव्हां मात्र बरेचसे गंभीरपणानें विचार करूं लागले आणि त्यांपैकीं कित्येकजण शंकर व सफदर यांच्या प्रमाणेंच अशा मताचे बनले कीं, “क्रांतीचा शक्तिस्रोत केवळ जनताच आहे, गांधींची बुद्धि नव्हें. गांधींनीं जनतेच्या शक्तीवर अविश्वास दाखवून स्वतःची क्रांतिविरोधी भूमिका सिद्ध केलेली आहे. ”

---

# २०—सुमेर

( काळ-१९४२ )

१९४१ चा आगस्ट महिना होता तो. पावसाचें प्रमाण या वर्षी बेसुमार होतें. कितीदांतरी दिवसामागून दिवस लोटावेत पण सूर्यदर्शन घडूं नये असें झालेलें होतें. पाटणा शहरीं गंगा खूपच फुगली होती आणि आता ती बंधारा फोडून शहरांत तर शिरणार नाहीं ना अशी धाकधूक प्रत्येक क्षणी वाटायची. अशा वेळीं बंधाऱ्यावर देखरेख ठेवणें आवश्यक असतें. आणि पाटण्यांतल्या तरुणांनीं ( त्यांतले विद्यार्थीच अधिक होते ) बंधाऱ्याच्या रखवालीची जिम्मेदारी स्वतःवर घेतलेली होती. सुमेर हा पाटणा कॉलेजांतला पहिल्या एम्. ए. चा विद्यार्थी. त्याची ड्यूटी दीघाघाट जवळ होती. गंगामाई फुगत चालल्याची बातमी अर्ध्या रात्रींच समजली. सकाळ झाली तरी पाणी चढायचें थांबलेलें नव्हते. बंधाऱ्याची वरची पाळ पाण्यापासून वीतभर अंतरावर देखील नव्हती. लोकांच्या तोंडचें पाणी पळालें आणि हजारो इसम जागोंजागीं कुदळीं घमेली घेऊन उभे होते. विटांचा तो बांध एक बोटभर देखील आणखी उंच करतां येईल कीं नाहीं याबद्दल मात्र शंकाच होती. सुमेर देखील सकाळ पासून खूपच चिंतामग्न स्थितींत बांधावर हिंडत होता. दुपारीं पाणी हळूं हळू उतरूं लागलेलें पाहून चिंतेच्या माराखालीं दबलेल्या सुमेरच्या अंतःकरणाला जरा हायसें वाटलें. आपल्या नजीकच्याच भागांत सुमेरनें आणखी एका सौम्यमूर्तीला बांधावर पहारा देतांना कितीदांतरी पाहिलेलें होतें; कधीं कधीं त्याला वाटले देखील कीं जावें नि त्यांच्याशीं गप्पा गोष्टी कराव्यांत. पण महापुराच्या चिंतेनें त्याचें मन इतकें व्यग्र झालेलें होते कीं बोलायला धजतच नव्हता तो. आज जेव्हां का पूर ओसरूं लागला आणि आकाशांतले ढग पण पांगूं लागले, तेव्हां कुठे सुमेरला आपल्या शेजारांतल्या पहारेकऱ्याला बघतांक्षणीं बोलावेसें वाटलें.

त्या दोघांतून एकाचा वर्ण गव्हाळया, तर दुसऱ्याचा काळा; दोघेहि एकसारखेच मध्यम बांध्याचे, मात्र सुमेर वयानें एक्वीस वर्षांचा सडपातळ तरुण, तर दुसरा चाळिशींतला लथलपथल आंगाचा स्थूलकाय दिसत होता. खाकी हाफपॅन्ट, ओपन कॉलरचा खाकी हाफशर्ट, खांद्यावर बरसाती, पायांत काळे रबरी पावसाळी जोडे हा सुमेरचा पोशाख, तर त्याच्या सोबत्याचा पोशाख म्हणजे केवळ पांढरें खादीचें धोतर,

एक तसलाच सदरा, गांधी टोपी आणि एक कांबळें, पाय तसेच अनवाणी. सुमेर आणखी पुढें सरकला आणि तोंडावर एक स्मित रेषा आणून म्हणाला—

" आज पूर ओसरतोय हें भाग्यच म्हणायचं. "

" आकाश पण निवळत चाललंय. "

" होय ना ! किती काळजी वाटत होती ! मी एकदां असं वाचल्याचं आठवतं कीं अडीच हजार वर्षांपूर्वी ज्या वेळी पाटलिपुत्र नगर वसवणं चालू होतं त्यावेळीं गौतमबुद्धानं सांगितलं म्हणतात-हें नगर अन्य तऱ्हेनं भरभराटीला येणारं असलं तरी त्याला तीन वैरी आहेत—आग, पाणी आणि दुही ! "

" तुम्ही इतिहासाचे विद्यार्थी आहांत तर एकूण. "

" तसा मी विद्यार्थी आहे राज्यशास्त्राचा. पण इतिहास वाचायची आवड आहे मला. विशेषतः मुळांतल्या कागदपत्रांचे अनुवाद वाचण्याची तर चटकच आहे. "

" अस्सं, पाण्याचं शत्रुत्व तर बघतोंच आपण किती तरी दिवसां पासून ! "

" आगीचं भय पाटलिपुत्रांतली घरं अधिकतर लाकडांचीं असत तेव्हां वाटत असावं. शाल वृक्षांची जंगलं त्यावेळीं पुष्कळ होती, त्यामुळं असंच करावं लागे. "

" आणि दुही बद्दल म्हणाल तर साऱ्या भारतलक्ष्मीची नासाडी झाली आहे तिच्यामुळं. खरंच आपलं नांव काय म्हटलं ? "

" सुमेर. पाटणा कॉलेजमध्यें पांचव्या वर्षांतला विद्यार्थी आहे मीं ! "

" माझं नांव रामबालक ओझा. मी देखील एके काळीं पाटणा कॉलेजांत होतो, पण त्याला आतां वीस वर्षे होऊन गेलीं. मी एम्. ए. व्हायच्या आधींच असहकारिता करणार होतों पण एका मित्रानं भीडच घातली म्हणा ना. मात्र तसाच आधीं बाहेर पडलों असतों तरी मला पस्तावा वाटला नसतां. या इतक्या वर्षांच्या अनुभवानंतर पक्कं समजून चुकलं की खरोखरच हे शाळा-कॉलेजांमधलं शिक्षण म्हणजे अनर्थकारी विद्या आहे. "

" अरे अरे, मग तुम्ही आपली विद्या पार विसरलां असाल ? "

" जवळ जवळ विसरलोच म्हणाना. अगदी पूर्णपणें विसरून माझी पुन्हां कोरी पाटी झाली असती तर किती बरं झालं असतं. मग मी सत्य अधिक चांगल्या प्रकारें ग्रहण करूं शकलो असतों. "

" अर्थातच बुद्धीच्या ऐवजीं श्रद्धेच्या मार्गानं डोळे मिटूनच ना ? "

" श्रद्धेचा मार्ग आपल्याला अयोग्य वाटतो सुमेरबाबू ? "

" ओझाजी, मी बाबू नाही, एका सामान्य चांभाराचा मुलगा आहे मी ! एक तसुभर देखील जमीन नाहीं माझ्या घरीं आतां; आधीं होती, पण ती जमीनदारानं

जबरीनं बेदखल करून तिथं आपली बाग बनवली. दळण कांडण करून आई अजूनहि कसंबसं पोटाला मिळवत्ये. मी या स्थितीला येऊन पोंचलों याचं कारण एका सज्जनाची कृपा आणि नंतर मग शिष्यवृत्ति. यावरून लक्षांत येईलच कीं माझा 'बाबू' शब्दावर जरा देखील हक्क नाहीं."

"संवय आहे झालं मला. पण सुमेरजी, आपली आतां जी माहिती समजली त्यामुळं मला किती आनंद झाला म्हणून सांगूं! एका हरिजन तरुणाला अशा प्रकारे जगाशीं दोन हात करतांना बघून गांधीजींच्या एका शिष्याला किती आनंद होत असेल हें आहे तुम्हांला ठाऊक?"

"ओझाजी, मला आपल्याशी आणिक कांही बोलायचं आहे, आणि तें देखील मित्रभावानं. तेव्हां आपण आधींपासूनच माझ्या आपल्या मधल्या मतभेदाची जाणीव करून घेतली तर अधिक बरं. मला हरिजन या नांवाचा अत्यंत तिटकरा वाटतो. मी 'हरिजन' पत्र म्हणजे एक बिलकूल सनातनी—भारताला काळोख्या युगाकडे नेणारं पत्र—असं मानतों; आणि तसंच गांधीजींना मी आपला जबरदस्त वैरी समजतों..."

"काय? आपल्या जातीवर गांधीजींनीं केलेले उपकार जरा देखील मानायला आपण तयार नाही?"

"जेवढे उपकार कामगारांनीं गिरणीमालकाचे मानायला हवेत तेवढे मानतों ना!"

"गांधीजी मालक बनण्याचा कांहीं आदेश देत नाहींत."

"जमीनदार, भांडवलवाले, संस्थानिक यांना पालक मानण्याच्या उपदेशाचा अर्थ दुसरा काय संभवतो? गांधीजी आमचा कळवळा दाखवतात याचं कारण त्यांना आम्हीं हिंदूंतून फुटून निघूं नये असं वाटतं. हिंदूंपासून आम्हीं वेगळं होऊन आपले वेगळे अधिकार मागितले म्हणूनच त्यांनी पुण्याला आमरण उपवास आरंभला होता. हिंदूंना हजारों वर्षांपासून स्वस्त्या गुलामांची गरज होती आणि आमच्या जातीनं ती गरज भागवली. आधीं तर आम्हांला दासच म्हणत असत. आतां गांधीजी आम्हांला 'हरिजन' या नांवानं संबोधून आमच्या उद्धाराची भाषा बोलत आहेत. हिंदूंच्या खालोखाल हा हरीच आमचा सर्वांत मोठा वैरी होऊन राहिलेला आहे. आतां तुम्हींच सांगा, अशा हरीचा जन बनणं आम्हांला कधीं तरी आवडेल का?"

"म्हणजे, तुमचा देवावर देखील विश्वास नाहीं?"

"कसा असेल? हजारों वर्षांपासून आमची जात पशुपेक्षां देखील हीन, अस्पृश्य, अवमानित अशी समजली जाते आणि ती त्याच देवाच्या नांवावर, कीं जो हिंदूं-तल्या श्रेष्ठ जातींच्या जरा जराश्या अडचणी निवारण्यासाठीं अवतार घेई, रथाचा

सारथी देखील झाला तो. परंतु आज शेंकडों पिढ्यांपासून आमच्या स्त्रियांची बेअब्रू चाललेली होती, सोनपूरच्या यात्रेंतल्या जनावरांप्रमाणं आमची खरेदी-विक्री चाललेली होती आणि आज देखील शिव्या आणि मार खाणं, व उपाशी मरणं ही आमच्या-वर देवानं केलेली कृपाच आहे असं सांगण्यांत येतं. इतकं सारं होऊन देखील ज्या देवाच्या नाकावरची माशी देखील उडूं शकली नाहीं त्या देवाला मानतंय आमचं खेटर ! ”

“ म्हणजे आपण एकूण आंबेडकरपंथी आहांत तर ? ”

“ नाहीं, डॉक्टर आंबेडकर स्वच्छंद आहेत. मला देखील पहिल्या दुसऱ्या वर्षी हिंदू मुलांनीं कॉलेजच्या वसतिगृहांत राहूं दिलं नव्हतं; पण आंबेडकरांचा मार्ग आणि कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचा मार्ग या दोहोंत मला कांहींच फरक आढळत नाहीं. माझ्या मतें आंबेडकरांचा मार्ग गांधी-बिर्ला-बजाज यांच्याच मार्गाला जाऊन मिळणारा आहे. त्यांतून निष्पन्न येवढंच होऊं शकेल कीं अस्पृश्यांपैकीं कांहीं जणांना पांच पांच सहा सहा हजार मासिक तनखा मिळूं लागेल. अस्पृश्यांत देखील बिर्ला-बजाज नसले तरी हजारीमल बनूं शकतील. अस्पृश्यांच्या ताब्यांत एक दोन संस्थानं नसलीं तरी एक दोन लहान मोठ्या जमिनदाऱ्या तरी येतील. पण त्यामुळं दहा कोटि अस्पृश्यांची केविलवाणी परिस्थिति सुधारतां येणं शक्य नाहीं. ”

“ म्हणजे पिळणूक बंद झाली पाहिजे असाच ना तुमच्या बोलण्याचा आशय ? ”

“ होय, गरीबांच्या कमाईवर गलेलठ्ठ होणाऱ्यांची जरा देखील सांवली हिंदुस्थानांत रहातां कामा नये. तरच आमचा प्रश्न समाधानानं सुटूं शकेल ! ”

“ म्हणूनच तर गांधीजी हातसुताचे कपडे, हातकुटाईचे तांदूळ, हातानं बनवलेला गूळ–सगळ्याच हातांनीं बनवलेल्या जिनसा वापरण्यावर भर देत आहेत. ”

“ होय, भर देत आहेत खराच. बिर्ला आणि बजाज यांच्या रुपयांच्या जोरावर. जेव्हा केऱ्हां खादी संघाला लाख-दोन लाखांचं नुकसान येतं तेव्हां एखादा शेठ टर्रकन् चेक फाडून देतो. आणि लक्षांत ठेवा ओझाजी, गांधीच्या चर्ख्या-मागानं आपल्या गिरण्या बंद होऊं शकतील आणि मोत्यांचे हार व रेशमाच्या साड्या फक्त स्वप्नांतच बघायला मिळतील असा जर विश्वास वाटला असता, तर कोणीहि शेठ-शेठाणी गांधीजींपुढं लोटांगण घालायला आली नसती. ”

“ एकूण तुम्हीं गांधीवाद्यांना भांडवलवाल्यांचे दलाल समजतां तर ? ”

“ यांत काय संशय ? थोडा फार अंदेशा होता पण ‘जाळ–जमीन’ धोरणा विरुद्ध हिंदुस्थानी शेठांनीं केलेल्या कुईत सामील होऊन त्यांनीं पूर्ण खात्रीच करून दिली. ”

" तर मग जिथं जिथं जपानी येण्याची संभावना असेल तिथले कारखाने उडवून जाळून टाकायचे असं का तुम्हांला वाटतं? हिंदीं लोकांनीं किती कष्ट आणि आपदा झेलून ते कारखाने उभारलेले आहेत, याचा आपण जरा तरी विचार करा सुमेरजी!"

"मी त्या कष्टाचा नि आपदाचा नीट विचार केला, तसंच गांधीवाद्यांना यंत्राचं अस्तित्व एक क्षणभर देखील सहन होऊं शकत नाहीं याची देखील मला चांगली कल्पना आहे. पण त्याचबरोबर मला असंहि माहित आहे कीं आपले कारखाने जपान्यांच्या हातीं शाबूतपणे पडावेत अशी या शेठांची मनीषा आहे. जपान भांडवलशाहीचा मोठाच पाठिराखा आहे. जपानी रेडियो ऐकून या शेठांना वाटतं कीं जपानी सत्तेखाली देखील तेच आपल्या कारखान्याचे धनी राहतील. आतां तुम्हीच सांगा, या शिवाय कोणत्या उच्च आदर्शानं त्यांच्यामधली त्यागाची भावना येवढी उचंबळून आली ती?"

" देशांतल्या राष्ट्रीय संपत्तीचं संरक्षण व्हावं अशी त्यांची इच्छा आहे!"

" ओझाजी, कशाला जखमेवर मीठ घालतां? या शेठांना राष्ट्रीय संपत्तीची पर्वा नाहीं, आपल्या स्वतःच्या धनाची काळजी पडलेली आहे त्यांना. देश खाईंत गेला तरी त्याचं त्यांना कांहींहि वाटायचं नाही. त्यांना हवा गडगंज मुनाफा. मजुरांना चार दोन पैसे अधिक मजुरी देण्याऐवजीं जे लोक संपवाल्यांना मोटारीखालीं चिरडून टाकायला कमी करीत नाहींत त्यांना राष्ट्राच्या संपत्तीच्या संरक्षणाचं काय होय?"

"तें खरं आहे असं धरून चाललों, तरी पण गांधीजींच्या प्रामाणिकपणाबद्दल तरी शंका घ्यायला नको तुम्हीं!"

" एखाद्या व्यक्तीचा प्रामाणिकपणा त्याच्या कृतीवरून आणि शब्दांवरून अजमावावयाचा असतो. मी कांहीं गांधीजींना दुधपितं बाळ समजत नाही. एंड्र्यूज फंडासाठी त्यांना पाच लक्षांची गरज होती, पांच दिवसांच्या आंत मुंबईच्या शेठानीं गांधींच्या चरणीं सात लाख वाहिले. शेठाचं एवढं मोठं जे कार्य ते साधू पहातात त्यासाठी इंग्लंड अमेरिकेमधले शेठ सात कोटींची थैली देऊं शकले असते. त्यांना एकूण हा सौदा स्वस्त्यांत पडला."

" म्हणजे ही लांच लुचपत झाली म्हणायची."

" शेठ देवांच्या मूर्तीपुढं जे कांहीं ठेवतात ते एकाच आशेनं, त्यांच्या द्वारावरच मुळीं 'लाभ–शुभ' असं लिहिलेलं असतं."

" मग चरखे-माग यांना देखील तुम्ही पिळणुकीचे दुष्मन मानीत नसाल?"

" नाहींच मुळीं; उलट मी त्यांना पिळणुकीचे प्रभावी पोषणकर्ते मानतों."

" मग तुम्ही गिरण्यांना पिळणुकीचे शत्रु मानीत असाल?"

" मी चरखे–माग पिळणुकीला पोषक आहेत असं कां मानतो हें ऐकतां का जरा ? जग आतां दगडाचीं हत्यारं अवजारं वापरण्याच्या युगांपासून फार पुढं गेलेलं आहे. त्याच प्रमाणं चरखा–माग यांच्या हि किती तरी पुढं गेलेलं आहे. पाटण्याच्या अजब बंगल्यांत मी हजार वर्षां आधीच्या जुन्या ताल-पत्रांवर लिहिलेल्या पोथ्या पाहिल्या आहेत. त्या वेळी शेठांचीं वही खातीं, व नालंदामधल्या विद्यार्थ्यांचीं पुस्तकं व टिपणवह्या याच तालपत्रांवर लिहिल्या जात असत. एक नव्हे सात जन्म जरी गांधीजींनीं तालपत्राच्या युगाकडे परत जायला सांगितलं तरी देखील दुनिया टिटा-घरचा कागद, मोनो टाईप, रोटरी छापखाना यांच्या युगापासून परत तालपत्राच्या काळाकडे जाणार नाहीं. न जाण्यांतच जगाचं कल्याण आहे. कारण अशा जाण्यांनं सेवाग्रामच्या भजनावलीचा प्रसार व्हायला अडथळा येणार नसला तरी पण हरएक व्यक्तीला आज पर्यंत उपलब्ध झालेल्या ज्ञानाची-विज्ञानाची प्रगति करून येणं मात्र अशक्य होईल. फॅसिस्ट डाकूंचे रणगाडे, विमानं, पाणबुड्या, विषारी वायु यांचा प्रतिकार करण्यासाठीं गांधीजींनीं जर पाषाणयुगांतलीं हत्यारं वापरायला सांगितलीं तर जराशी देखील अक्कल डोक्यांत ठेवणारी कोणतीहि जात त्या सांगण्याकडे दुर्लक्ष्यच करील. कारण तसं करणं म्हणजे सरळ सरळ आत्महत्त्या होय. "

" म्हणजे आपणाला अहिंसेचा महान सिद्धांत देखील मान्य नाहीं तर ?"

" गांधीजींची अहिंसा ? परमेश्वरा रक्षण कर रे बाबा हिच्या पासून आमचं ! किसान आणि कामगार यांच्यावर कॉंग्रेस सरकाराच्या हुकुमांनीं झालेल्या गोळीबारांचं जी अहिंसा समर्थन करते आणि फॅसिस्ट लुटारूंच्या पुढं मात्र निःशस्त्र बनायला तीच अहिंसा सांगत्ये. तेव्हां अशा अहिंसेचं आकलन होणं आम्हांला शक्य नाहीं. पण आधीं मी आपल्या पहिल्या प्रश्नाचं उत्तर पूर्णपणे देऊन टाकतो. या शेठांना माहिती आहे कीं चरख्या–मागानं त्यांच्या कारखान्यांचं कूंस देखील वांकडं होऊं शकत नाहीं. जोंपर्यंत चरखे व माग याच्या मुळं गिरणीच्या पेक्षां स्वस्त व सुबक कापड बाजारांत येऊं शकत नाहीं, तोंपर्यंत त्यांचं अस्तित्व शेठांच्या दानावर निर्भर राहील. पिळणुकीवर रामबाण तोडगा असलेल्या साम्यवादाच्या मार्गांत मात्र हा चरखा-वाद एक अडचण होऊन बसलेला आहे. बऱ्याच लोकांची अशी मूर्ख समजूत आहे कीं पिळणूक थांबण्यासाठीं साम्यवादापेक्षां–म्हणजे यंत्रानं चालणाऱ्या कारखान्यांवर जनतेचा अधिकार स्थापन करण्यापेक्षां–चरखा-वाद अधिक प्रभावी ठरूं शकेल. झालं, जगाला गिरण्यांचं कापड वापरायला लावणार शेठ चरखा-भक्त बनले या अशा हेतूनं. आणि गांधीजी तो हेतु ओळखून आहेत."

" हा तर त्यांच्या हेतूवरच हल्ला दिसतो तुमचा ! "

" त्यांची प्रत्येक कृती माझ्या सारख्या पिळल्या जाणाऱ्या जातींना भयावह ठरते. भारतांत आमची जातच सर्वांत अधिक पिळणुकीला बळी पडलेली आहे. आमच्या मानसिक गुलामगिरीचे अड्डे, आणि पिळणूकवाल्यांचे जबरदस्त पोषक असलेल्या पुरोहितांचीं दुकानं बनलेलीं हीं देवळं,—कुलपं लावलीं पाहिजेत या मंदिरांना ! आणि इकडे गांधीजी तीं आमच्यासाठीं खुलीं करवून त्या जाळ्यांत आम्हांला अडकवूं पाहतात. जुन्या पोथ्या—राजे रजवाड्यांनीं दिलेल्या कोर दोन कोरांवर जगणाऱ्या संतांचे उपदेश—आम्हीं जाळून टाकूं नाही तर निदान सात किल्ल्यांच्या कड्याकुलपांत तरी गाडून टाकूं. पण त्याच पोथ्यांची ग्वाही सांगून गांधीजी आम्हांला आडरानांत नेऊं पाहतात. मरण-व्यवस्थेप्रमाणंच असणाऱ्या या वर्णव्यवस्थेचा खरं पाहतां एक अवशेष देखील या भारतवर्षात उरतां कामा नये; पण गांधीजी अनासक्तियोगाच्या नांवानं त्याचं गोंडस समर्थन करूं पाहतात. या सर्वांवर कडी म्हणजे हरिजनोद्धार, केवळ ढोंग नाहीं तर काय आहे दुसरं ? या मुळं फार झालं तर उंच वर्णीयांतील हरिजनोद्धारकांना वेतन मिळत असेल, नाहीं असं नाही, पण त्यांच्या पासून उद्धाराची आशा मात्र केवळ आंधळयांनींच करावी. "

" अस्पृश्य आणि सवर्ण हे एक व्हावेत, असं नाही आपल्याला वाटत ? "

" काळानच आम्हांला एक केलंय ना ! पण गांधीजीना प्रिय असलेले हे धर्म, देव आणि रूढिप्रियता यांच्यामुळं तें आम्हांला समजत नाहीं. माझ्याकडे बघा, ओझाजी. माझा वर्ण गव्हाळ्या, नाक सरळ, सडसडीत व ठसठशीत; तुमचा वर्ण काळा, नाक बिलकूल चपटेल ! याचा अर्थ काय होतो ? माझ्यांत आर्यांचं रक्त अधिक आहे आणि तुमच्यात माझ्या पूर्वजाचं रक्त अधिक दिसतं. तुमच्या पूर्वजांनीं वर्णव्यवस्थेची लोखंडी तटबंदी उभारून रक्तसंकर थांबवण्याचा प्रयत्न केला पण त्याची इच्छा पूर्ण होऊं शकली नाहीं. याची साक्ष तुम्ही आम्हीं साक्षात देतोंच. वोल्गा आणि गंगा यांच्या तटांवरच्या रक्तांचा आपसांत संकर झाला, एकजीव झाला. आतां वर्णासाठीं भांडण नाहीं, आता तुम्हांला कोण ब्राम्हण जातींतून हांकलणार ? आतां जर आमच्या पिंडाला झोंबलेल्या धर्म, देव व रूढी यांच्या पासून आमची सुटका झाली तर सारं कांहीं ठीक होऊं शकेल. पण जोंवर शोषक आणि त्यांचे गांधीजीसारखे पोषक अस्तित्वांत आहेत तोवर तरी त्याची आशा करायला नको. "

" आपलं हें तिखट बोलणं ऐकून मला राग येणार नाहीं. "

" हृदयांत भडकलेली आग आणि तारुण्य यामुळं एखाद दुसरा उणा शब्द बाहेर पडला असेल तर क्षमा करा ओझाजी ! "

"मला मुळींच वाईट वाटत नाहीं; पण हें सांगा, जर चरख्या-मागा प्रमाणं केवळ भारतीय वस्तूंची पुन्हां स्थापना देशांत होणं संभवनीय नाहीं वाटत आपल्याला, तर मग काय विदेशी साम्यवाद भारताला कल्याणप्रद होऊं शकेल असं वाटतं?"

"शोषकांना जी गोष्ट आवडत नसते ती विदेशी आणि असंभाव्य ठरते. साखरेचे कारखाने शेठांना विदेशी वाटत नाहींत कारण त्यांच्या कृपेनं ते कोट्याधीश बनले. तीच गोष्ट कापड, ताग, कागद, सिमेंट, लोखंड, सायकली, जहाजं, विमानं, मोटारी, कांच, विजेचं साहित्य, फौंटनपेन, जोडे इत्यादि विजेनं किंवा वाफेनं चालणाऱ्या कारखान्यांची समजायची. त्या लाखों कोटी किंमतीच्या कारखान्यांना विदेशी मानण्यांत येत नाहीं. उद्यां रेडियो, टेलिविजन, फिल्म, रणगाडे इत्यादिकांच्या योगानं जेव्हां शेठांच्या तिजोऱ्यांत मजुरांच्या निढळाच्या घामाचे कोट्यावधि रुपये गुपचूप जाऊं लागले कीं मग त्यांतलं विदेशीपण देखील नाहीसं होईल. पिळणुकीला सहाय्य करणारीं सारीं विदेशी यंत्रं ते स्वदेशी ठरवतात, मात्र शोषणध्वंसक रामबाण उपाय असलेला साम्यवाद मात्र नेहमीच विदेशी ठरणार. यालाच प्रामाणिकपणा म्हणतात ओझाजी!"

"साम्यवाद हा धर्म-विरोधी आहे, आणि धर्म हा तर भारताचा आत्मा आहे, या अडचणीचा तर विचार करा सुमेरजी!"

"आपण आधींच सांगितलंत कॉलेजमधली सारीच विद्या विसरल्याचं, मग मी तरी काय बोलणार? जेव्हां तुम्हीं लोक धर्माचं नांव घेता, तेव्हां तुमच्या पुढं केवळ एकमेव हिंदुधर्मच असतो. गांधीजीनं बजाजजीच्या गोसेवा मंडळाला आशीर्वाद दिलेला आहे. या मंडळांत केवळ एक मांस सोडून इतर सगळ्या वस्तू गाईच्याच खाण्याची प्रतिज्ञा घ्यावी लागते. गोमूत्र व गोमय सेवन करणारे देखील गोभक्षक मानले तर भारतांतील निम्म्याहून अधिक लोक गोभक्षक ठरतील, आणि आमची जात देखील गोभक्षक आहे, हें आहेच तुम्हांला ठाऊक. तसं पाहिलं तर भारतामध्यें एक चतुर्थांश मुसलमान आहेत, कोटीच्या आसपास ख्रिस्ती आहेत. आणि बौद्धांची संख्या असेल अशीच काहीं लक्ष. या धर्मांचा जर आपण धर्मांत समावेश करीत असाल, तर मग सांगा पृथ्वीवर असा कोणता देश आहे कीं जिथं धर्मावर दृढ श्रद्धा ठेवणारे आढळणार नाहींत? गांधीजीचे मित्र म्हणवणारे माजी लॉर्ड इर्विन आणि आजचे लॉर्ड हॅलिफॅक्स हेहि एक मोठे ख्रिस्ती साधु आहेत. आजपर्यंत धर्माचे गोडवे गाऊनच धर्मप्राण इंग्रजांना साम्यवादापासून अलग राखण्यासाठीं या संतांनीं प्रचार चालविलेला आहे. अरबस्तान, तुर्कस्तान, इराण, अफगाणिस्तान, या देशांतले मुसलमान हिंदुस्थानांतील मुसलमानांपेक्षां कमी धर्मनिष्ठ नाहींत. ज्या देशांत लक्षावधि सुंदर स्त्रियांनीं स्वेच्छेनं आपले लांब सडक केंस कापवून त्यांचे दोर

मंदिराला लागणारा लांकूडफाटा बांधण्याच्या उपयोगी आणले तो जपान काय कमी धर्मनिष्ठ आहे ? सगळेच शोषक अत्यंत धर्मनिष्ठ असतात, ओझाजी; आणि सगळेच शोषणाचे शत्रु धर्माचे वैरी म्हणून डांगोरा पिटण्यांत येतो. बरं, साम्यवाद विदेशी आहे असंहि कबूल केलं तरी ख्रिस्ती व मुसलमानी हे विदेशी धर्म जसे आतां स्वदेशी बनले, किंवा आगगाडी तार, विमान, यंत्रांचे कारखाने अशा विदेशी वस्तू आतां जशा आमच्या डोळ्यांदेखत स्वदेशी बनल्या, तसाच साम्यवाद देखील स्वदेशी होऊं शकेल–नव्हे, झालेलाच आहे."

– २ –

सायंकाळच्या सहलीसाठीं पाटण्याला दोन ठिकाणें आहेत—लॉन आणि हार्डिज-पार्क; व ती अशी कांही बेढब आणि गलिच्छ वाटतात कीं केवळ सहलीसाठीं म्हणून तीं लोकांना आकर्षित करूं शकत नाहींत. मात्र ज्यांना केवळ मनसोक्त हिंडणें–फिरणें आवडतें, किंवा मित्रांना भेटण्याची इच्छा असते, ते या जागी येत असतात. अंधार पडूं लागला होता तरी तीन तरुणांमधले संभाषण अजून चाललेलेंच होतें. बाकी-पूरच्या लॉनवर (मैदानावर) ते बसलेले होते. एक जण म्हणत होता—

"कॉमरेड सुमेर, तरी पण मी पुन्हा सांगतो, एकवार आणखी विचार कर. तूं फारच पुढं पाऊल टाकतोस."

"मृत्यूशीं खेळूं पाहण्यापेक्षां आणखी कुठलं पुढचं पाऊल टाकण्यासारखं आहे ? मात्र रूप, येवढं मात्र पक्कं लक्षात घे की मी कसलीहि घाई केलेली नाहीं. आलं मनांत की टाकता येतं वाटतं हे असलं पाऊल ?"

"आकाशांत उड्डाण करायचं आहे, भैय्या. मला तर घराच्या गच्चीवरल्या कठड्याजवळ उभं राह्यची भीति वाटते."

"किती तरी जणांना सायकलवर बसायचं म्हटलं तरी भीति वाटते. आणि तूं तर दोन्ही हात सोडून तशीच दामटतोस."

"बरं राहिल. पण मला मात्र हेंच कळत नाहीं कीं एका काबाडकरणीच्या सुमेर नांवाच्या मुलाला या साम्राज्यवादी युद्धांत आपला जीव देण्याची कां इच्छा व्हावी ?"

"सांगूं कां ते ? या लढाईवर साऱ्या काबाडकरणींचे मुलगे व त्यांच्या जातीचे सगळे लोक यांचं भवितव्य अवलंबून आहे. आतां हें युद्ध केवळ साम्राज्यांचाच निर्णय करणार नसून पिळणुकीचा प्रश्न देखील त्यामुळं निकालांत निघणार आहे."

"या युद्धाचा दोष सर्वांपेक्षां इंग्रज भांडवलवाल्यांच्या माथींच अधिक आहे, हें तरी तुला मान्य आहे ना ?

" बाल्डविन, चेंबर्लेन हे ज्यांच्या स्वार्थाचे प्रतिनिधी होते, तेच इंग्रज भांडवलदार ना ? कबूल आहे मला तें ! त्यांनीच मुसोलिनी, हिटलर यांना पोसून पुष्ट धृष्ट केलं; साम्यवाद्यांपासून शोषक वर्गांना जरा तरी त्राण मिळावं हा त्यांचा हेतु; पण भस्मासुरानं पहिल्यांदां नंदीश्वरावरच वरदहस्त ठेवण्याचा प्रयत्न केला; जोपर्यंत हा त्यांचा तमाशा चाललेला होता, तोंपर्यंत मी देखील हें असलं पाऊल टाकण्याचं ठरवलं नव्हतं. पण आतां नंदीश्वराच्याच नव्हे तर आमच्या देखील डोक्यावर हात ठेवण्याचा इरादा या भस्मासुरानं केलेला आहे."

" आमच्या ? मला तर कसलाच फरक भासत नाहीं तेव्हांच्या व आतांच्या युद्धांत."

" तुला वाटत नाही याचं कारण तुझा वर्ग—शेठजीचा वर्ग—फॅसिस्ट सत्तेंत देखिल मलिदा मिळवण्याची आशा ठेवतो. या युद्धामुळं क्रप्, मित्सुई यांची चंगळ उडाली असली तरी, या युद्धांत सोविएतचा पराभव झाला तर मात्र शोषितांना—मजुरांना व किसानांना—कोणींहि वाली उरणार नाहीं. हिटलर टोजो यांच्या सारख्या कसाबांच्या राज्यांत किसानांना वायदा माफीचा लढा सुरूं करतां येतच नाही, रूपकिशोर बाबू ! किंवा एखाद्या अत्यंत भीषण अत्याचाराबद्दल संप देखील पुकारतां येत नाहीं. मजूर-किसानांना आजीव दास बनवूं पाहतो फॅसिझम् ! आमच्या पाठीशीं असणारं सोविएत एकमेव राष्ट्र आहे; अनेक राष्ट्रांपैकीं हेंहि एक असं काहीं नव्हे. साऱ्या जगांतले कामगार आणि किसान त्याला आपलं आशास्थान समजतात, आपलंच राष्ट्र मानतात. दीडशे वर्षांच्या कोटी कोटी बलिदानांच्या नंतर मानवतेला—चिरंतन कालापासूनच्या शोषितांना—मार्गदर्शन करण्यासाठीं ही सोविएतरूपी साम्यवादी ज्योत पृथ्वीवर पाजळलेली आहे. एकदां कां ही ज्योत विझली कीं मग पुन्हा जगाला किती तरी काळ अंधारात चाचपडत आपली वाट हुडकावी लागेल. आमच्या जिवात जिव असेतों हें भीषण कांड आमच्या नजरे पुढं आम्हीं होऊं देणार नाही."

" पण भय्या सुमेर ! देशांत तर आणखी समाजवादी आहेत. त्यांनाहि जगांत चाललेलं शोषण थांबवायचं आहे."

" ज्यांना सेवाग्रामहून फैलावणारा अंधारच प्रकाश भासतो, अशा समाजवाद्यांपासून वांचव रे बाबा वेताळा ! तसा तर मग हिटलर देखील स्वतःला समाजवादी म्हणवतो. गांधींजींचा शिष्यगण देखील त्याला समाजवादी म्हणतो. केवळ समाजवादी म्हटल्यानं का कोणी समाजवादी होतो ? हिटलर-टोजो यांचा जय झाला तर हिंदुस्थानमधली भांडवलशाही व भांडवलदारवर्ग नष्ट न होतां उलट अधिक बळकट होईल, हें आहे का तुला ठाऊक ? हे फॅसिस्ट-दस्यु किसान आणि कामगार यांना सुखानं श्वासोच्छ्वास देखील घेऊं देणार नाहींत. आणि साम्यवाद्यांची काय अवस्था

होईल याची कल्पना करण्यासाठीं इटाली-जर्मनीचा ताजा इतिहासच बघण्याजोगा आहे. तिथंच काय पण केवळ फ्रान्समधींच आतां दररोज जें कम्युनिस्टांचं गोळया घालून कंदन करणं चाललेलं आहे तेंच घे ना बघून! जो स्वतःला मार्क्सवादी म्हणवून युद्धापासून अलिप्त राहूं इच्छितो, तो एकतर स्वतःला तरी फसवीत असावा किंवा इतरांना तरी! हिटलर-टोजोच्या राज्यांत मार्क्सवादी समाजवाद्यांच्या प्राणाचं मोल बंदुकीच्या एका गोळी इतकं असतं याची आम्हांला चांगली माहिती आहे. मग इतकं असूनहि कोणी समाजवादी जर स्वतःला तटस्थ म्हणवूं लागला तर त्याचं धोरण वटवाघळासारखंच आहे असं खुशाल समजावं. सोविएतचा नायनाट झाल्यावर जे समाजवादाचं निशाण उभारण्याची शेखी मिरवतात, त्यांना एक वेडे तरी म्हटलं पाहिजे नाही तर धोकेबाज तरी!"

"तर मग तुझ्या मतें या युद्धांत कोणीहि तटस्थ राहूं शकत नाही?"

"होय, ज्या ज्या कोणाला जरा देखील डोकं आहे त्यानं आपापला पक्ष निवडून घेतलेला आहे, असं माझं ठाम मत आहे. कारण या युद्धाचा परिणाम एकतर शोषणविरोधी शक्ति समूळ नष्ट करण्यांत होईल किंवा त्याच शक्ती येवढ्या सामर्थ्यवान बनतील कीं मग मुसोलिनी, हिटलर, टोजो आणि त्यांचे तीर्थरूप बाल्डविन, चेंबरलेन, हॅलिफॅक्स यांना या जगांत स्थानच उरणार नाहीं. हिंदुस्थानांत सुभाषचंद्र आणि त्याचे अनुयायी यांनीं आपल्या पक्षाची निवड केलेली आहे; व ज्यांना तुम्हीं लोक तटस्थ मानतां, त्यांनीं देखील आपला निर्णय घेतलेला आहे. त्यांची तटस्थता केवळ वरवरचा देखावा आहे, कारण फॅसिस्टांचे रंग ढंग त्यांना चांगलेच ठाऊक आहेत."

"पण आपल्या इंग्रज राज्यकर्त्यांची मनोवृत्ति बघतोस ना?"

"आंधळे आहेत ते! तीस वर्षांपूर्वीच्या सृष्टींत आजहि आपल्याला ठेवूं पाहतात. पण तुला काय वाटतं या जीर्ण शीर्ण सांगाड्यासाठींच हें युद्ध जिंकण्यांत येत आहे? यांना युद्धोत्तर जगांत स्थान तरी राहील का? आम्हांला पक्कं माहित आहे कीं हे लोक आमच्या युद्धकार्यांत व सहकार्यांत पदोपदी अडचणी आणतील, कारण त्यांना प्रत्येक गोष्ट आतां भूतकाळांत जमा झालेल्या जगाच्या चष्म्यांतून बघायची संवय झालेली आहे."

"तरीच, पहातो ना आम्हीं. अमन सभांमधींच ज्यांचे चेहेरे झळकायचे तेच आतां 'राष्ट्रीय आघाडी'चे पुढारी बनून जनतेपुढं वल्गना करूं लागलेले आहेत. आमचे गव्हर्नर, गव्हर्नरजनरल, जनतेला स्वार्थत्यागाचा उपदेश देत आहेत."

"आणि त्यांचा अवाढव्य खर्च पाहिला म्हणजे मोवळ येऊं लागते. आपल्या देशांत कमींत कमी मजूरी एक आणा रोज असते. सरासरीनं हिशोबच धरला तर

होईल वर्षाला २५ रुपये. व आतां यांचे पगार पहा वर्षाचेः व्हाइसरायचा २,५०,८०० रुपये, म्हणजे काबाडकष्ट करणाऱ्या मजुराच्या दहा हजारपट अधिक; बंगाल आणि संयुक्त प्रांताचे गव्हर्नर प्रत्येकीं १,२०,००० म्हणजे सामान्य मजुराच्या ४८०० पट अधिक; बिहारच्या गव्हर्नरचा पगार एक लक्ष, म्हणजे सामान्य मजुराच्या चार हजार पट अधिक! दुसरे अवांतर खर्च सोडून हे आंकडे होतात. जर ते सारे खर्च यांत मिळवले तर प्रवासभत्ता व सुट्टीचा पगार सोडून देखील बंगालच्या गव्हर्नरचा वार्षिक खर्च ६,०७,२०० रुपये होतो; सामान्य मजुराच्या उत्पन्नाच्या २४२८८ पट होतो तो. आतां या आंकड्यांबरोबर इंग्लंडच्या मजुरांचे आंकडे ताडून बघ. तेथल्या मजुराची आठवड्याची कमीत कमी मजूरी ८५ शिलिंग म्हणजे साडे छप्पन्न रुपयां इतकी होते. कोळशाच्या खाणीत ७८ शिलिंग म्हणजे ५२ रुपया इतकी मजूरी दर आठवड्याला ठरवून दिलेली आहे. शेतावर राबणारे देखील ४५ रुपयापेक्षां अधिक दर आठवड्याला मिळवतात. म्हणजे सामान्यतः कामाप्रमाणे कमी अधिक २०० ते २२१ पौंड वार्षिक मजूरी झाली–आणि या हिशोबानं पाहिलं तर तेथल्या मुख्य-प्रधानाला वर्षाला त्यांच्या केवळ छत्तीस पट अधिक पगार मिळतो. सोविएत मध्यें तर मुख्य प्रधानाला १२००० रुबल मिळत असतात आणि बरेचसे कामगार देखील तेवढाच पगार मिळवतात तेथला सर्वात कमी वेतन मिळवणारा मजूर मुख्य मंत्र्याच्या एक षष्ठांश वेतन मिळवतो. आतां बघा––हिंदुस्थानांतला बंगालचा गव्हर्नर कामगारापेक्षां २४२८८ पट अधिक वेतन घेतो, इंग्लंडचा मुख्य प्रधान कामगारा-पेक्षां ३६ पट अधिक वेतन घेतो. व सोविएत रशियाचा मुख्य प्रधान कामगाराच्या सहापट वेतन घेतो. आणि शेठजींच्या मिळकतीबरोबर या काबाडकष्ट करणारांची मिळकत ताडून पाहिली तर काळीजच फाटून जाईल आपलं."

"ही तर केवळ लूट दिसते, सुमेर भैय्या!"

"म्हणून तर मला असं सांगायचं आहे कीं, हिंदुस्थानांत नौकरी करणाऱ्या या स्वार्थी, भेकड आणि अदूरदृष्टि इंग्रजांवर आम्ही अवलंबून राहतां कामा नये. यांच्या साठीं कांहीं आम्हीं हें युद्ध लढायला व जिंकायला सरसावलों नाही. पृथ्वीच्या एक-षष्ठांश भूभागावर जी एक नवी सृष्टि निर्माण झालेली आहे व जिचा विध्वंस करण्या-साठीं फॅसिस्टांनीं आक्रमण केलें आहे, तिच्या संरक्षणासाठीं आम्हीं आमचे प्राण पणास लावलेले आहेत. त्या आगामी नव्या दुनियेच्या संरक्षणासाठीं आम्हीं आपले प्राण पणास लावले आहेत कीं जिच्यांतली मानवता स्वतंत्र आणि समृद्ध होईल."

समद मुकाट्यानें हें संभाषण ऐकत होता. आतां त्याला देखील एक दोन प्रश्न विचारण्याची इच्छा झाली. तो म्हणाला–

"भाई सुमेर, तुझ्या कित्येक गोष्टी मला पटतात आणि कितीक पटत पण नाहींत, परंतु तुझ्या मतांबद्दल मात्र मला आदर वाटत असतो, हें तुला आहेच ठाऊक. या विश्वव्यापी युद्धांत आपणाला तटस्थ राहतां येत नाहीं, हें मलाहि मान्य आहे. पण दोस्ता, तुझी निवड वगैरे होऊन तूं भरती झालास तेव्हां कुठं आम्हांला कळवलंस. जरा आधी सांगितलं असतंस तर ?"

"आधी सांगितलं असतं, तर निवडच झाली नसती. म्हणूनच भरती झाल्यावर चोवीस तासांचं उड्डाण केल्यानंतर मग मी मित्रांना कळवली बातमी. आतां हरकत नाहीं बातमी पसरायला, कारण परवांच मी अंबाला 'उडन्तू-स्कूल' मध्यें जायला निघणार आहे."

"आईला तरी कळवलंस का ?"

"आईला काय ? जसं पाटणा तसंच अंबाला. मी मरणाच्या खाईंत उडी घ्यायला जात आहे असं जोंवर तिला मी कळवीत नाही तोंवर तिला सारं सारखंच. बरं तसं तिला उघड उघड कळवणं म्हणजे तिच्या जिवाला उगीच काळजी लावून देणं आहे. म्हणून मी असं ठरवलंय की जोवर जिवंत असेन तोवर तिला पत्र लिहीत जाईन. यांतच तिला संतोष वाटेल."

"मला वारंवार तुझ्या या धाडसाचं कौतुक वाटतं."

"मानवजन्म घेतल्याचं मोल आम्हीं प्रत्येक आणीबाणीच्या प्रसंगीं चुकवण्या-साठीं सिद्ध असलं पाहिजे, समद! शिवाय एक ध्येयवादी मानव या नात्यानं तर आपली जबाबदारी अधिकच वाढूं लागते."

"तुला खरंच असं वाटतं की या युद्धानं विलक्षण उलटापालट होईल ?"

"मागच्या युद्धानं काय कमी उलटापालट केली ? जगाच्या सहाव्या भागावर समतेचं राज्य स्थापन करणारा सोविएत रशिया अस्तित्त्वांत आला, हें काय कमी झालं होय ? पण या युद्धामुळं जे परिवर्तन होणारं आहे त्याच्यामुळें नवी धरणी व नवं आकाश निर्माण होईल बघ. दोस्ता, जिकडे सोविएत राष्ट्र आहे, लाल सेना आहे, ज्या पक्षाला विजय मिळावा म्हणून आज चीन, इंग्लंड व अमेरिका इथली जनता आपलं जीवन सर्वस्व पणास लावून लढत आहे, त्या पक्षाला विजयश्री माळ घालणार असं मला निस्संदेह वाटतं."

समद आणि रूपकिशोर यांच्या मध्यें पाकिस्तानबद्दल बराच वादविवाद व्हायचा. आतां रूपकिशोरनें पुन्हां तोच प्रश्न उपस्थित केला—

"गांधीवादी स्वराज्य हवं कीं साम्यवादी, या बाबतींत तुझ्या माझ्यांत मत-भेद असूं शकेल; पण मित्रा, स्वराज्य मात्र भारतालाच मिळालं पाहिजे यांत तर कांहीं संदेहच नाहीं."

" रूप बाबू ! भारत देखील एक निराकार शब्द आहे. त्या नांवावर बरंचसं इंद्रजाल देखील रचतां येणं शक्य आहे. स्वराज्य भारतीयांसाठींच हवं, त्यांत आपला भाग्यनिर्णय भारतीयांना करतां यावा. आकाशांतून पडणारं हें स्वराज्य केवळ कांहीं बड्या लोकांच्या पुरतंच मर्यादित राह्यचं नाही तर ! "

रूप म्हणाला,—" बरं, तसंहि झालं तरी स्वराज्यांत सजीव भारताचे खंड खंड पडतां कामा नयेत ! "

" पुन्हा झालं शब्दजाल सुरूं. " सुमेर म्हणाला—" भारत खंडित व्हायचा कीं अखंड राह्यचा हें त्यांतल्या रहिवाशांवर अवलंबून आहे.

मौर्यांच्या वेळीं हिंदुकुशाच्या पल्याड आमुदारिया नदीपर्यंत भारताची सरहद्द होती आणि रीतिरिवाज, भाषा व इतिहास यांच्या दृष्टीनं पाहिलं तर अफगाण-पठाण हे भारतीय ठरतात. दहाव्या शतकापर्यंत काबूलमध्यें हिंदु राज्य होतं. तशी मग हिंदुकुश ही हिंदुस्तानची सरहद्द ठरेल. अखंड हिंदुस्थानवाले हिंदुकुशपर्यंत आपला हक्क सांगायला आहेत का तयार ? अफगाणिस्तानांतल्या अफगाणांचं तर जाऊंच द्या, पण सिंधूच्या पश्चिमेकडे रहाणाऱ्या सरहद्द प्रांतीय अफगाणांना (पठाणांना) देखील त्यांच्या इच्छेविरुद्ध अखंड हिंदुस्थानांत ठेवतां येणार नाहीं तीच गोष्ट सिंध, पंजाब, काश्मीर, पूर्वबंगाल यांना देखील कां लागू करण्यांत येऊं नये ? "

" म्हणजे ? त्यांनां भारतापासून वेगळं करायचं ? " रूप किशोरनें विचारलें.

" होय, " सुमेर म्हणाला–" त्यांचा आग्रहच असेल तर तसंच करावं लागेल. आम्हीं जनतेचं युद्ध लढतों याचा अर्थच हा की कोणत्याहि देशातल्या जनतेला तिच्या इच्छेविरुद्ध राजकीय पारतंत्र्यांत ठेवतां कामा नये. पाकिस्तानचा निर्णय हिंदु करणार नाहीत, तो निर्णय मुस्लिम बहुमत असलेल्या प्रांतांतली जनता घेईल. आम्हांला जर भारतामध्यें जनतेच्या ऐवजीं शोषकांची सत्ता स्थापन करायची असेल, तर मग पाकिस्तान येणारच. पण जर बौद्धिक आणि शारिरिक श्रम करणाऱ्या बहुजन समाजाची सत्ता तुम्हांला हवी असेल तर मग भारत अनेक स्वतंत्र जातींचा एक अखंड देश होऊं शकेल. एकजातीयत्वासाठीं हवी एक भाषा, एकत्र रोटी बेटी व्यवहार; हें फक्त साम्यवादालाच शक्य आहे. तरी देखील भाषेच्या दृष्टीनं आम्हांला ८० च्या वर स्वतंत्र जाती मानाव्या लागतील. "

" ८० च्या वर ? तूं तर पाकिस्तानवर देखील मात केलीस ! "

" भाषा मी बनवल्या वाटतं ? जनतेच्या राज्यांत तिची मातृभाषाच शिक्षणाचं माध्यम करावी लागेल. मातृभाषा तीच कीं जिच्या व्याकरणांत एक मूल देखील चूक करूं शकत नाहीं. सोविएत संघ म्हणजे ७० जातींचं मिळून एक

बहुजातिक राष्ट्र होय. त्याच्या दुप्पट लोकसंख्या असलेला भारत देश. हें जर १० जातींचं एक बहुजातिक राष्ट्र झालं तर त्यांत आश्चर्य वाटायचं काय कारण ?"

"म्हणजे तूं पाकिस्तानवादी आहेस ?"

"जोपर्यंत मुस्लिम जनतेचा आग्रह आहे तोंपर्यंत होय. पाकिस्तानच्या मागणीला मान्यता मिळावी असं प्रत्येक मताच्या मुसलमान पुढाऱ्याला वाटतं, मग माझ्या मतें ती मागणी मुसलमान नसलेल्यांना लाथाडण्याचा कांहींहि अधिकार नाहीं. ज्या मुस्लिम प्रांतांतली बहुसंख्य जनता भारतीय संघांतून वेगळी होऊं पाहत्ये, त्या प्रांताला तसं करतां यावं."

– ३ –

खालीं पसरलेली अथांग काळी जलराशि, त्या शांत पाण्यावर बुडें देखील विशिष्ट जातीचें चिन्ह दिसत नव्हतें. पुढें दूरवर पांढऱ्या शुभ्र ढगाचें एक विशाल क्षेत्र दिसत होते. सुमेरला आपल्या पुढे असलेल्या गतिमापक यंत्राशिवाय अंतराळांत आपल्या वेगाचें प्रमाण जाणण्यासाठीं इतर कोणतेंहि साधन नव्हतें दर ताशीं तीनशें मैल वेगानें विमान उडत होतें. सुमेरला त्यावेळीं पाषाणयुगाची आठवण झाली. त्यावेळी दगडाची अवजारें करून त्याचा उपयोग करणे हाच मनुष्याचा सर्वांत मोठा शोध होता, त्याचें सर्वांत मोठें सामर्थ्य होतें. आणि आतां–मनुष्य आकाशाचा राजा बनला. मानवता कितीतरी उन्नत झाली. त्याच वेळी त्याला आठवण झाली मानवतेच्या वैऱ्यांची !–मनुष्याच्या बुद्धीचें हें अद्भुत लेणंच वापरून मानवतेच्या पायांत दास्याच्या शृंखला घालूं पाहणाऱ्या फॅसिस्टांची ! जपानी फॅसिस्ट भारताच्या शेजारल्या ब्रह्मदेशांत येऊन थडकले या जाणिवेने सुमेरच्या सर्वांगावर शहारे आले. त्याच वेळीं त्याच्या नजरेसमोर कदमकुवा मोहल्ल्यांतलीं तीं घरें व त्यांत राहणाऱ्या स्त्रिया दिसूं लागल्या. त्यांतच त्याची प्रिया देखलि होती–इतरहि होत्या. त्यांनीं या अस्पृश्य आईच्या बुद्धिमान ध्येयवादी पुत्राला मुलगा आणि भाऊ मानलेलें होतें. फॅसिस्टांबद्दल वाटणाऱ्या अतीव तिरस्कारानें त्याचें अंतःकरण खदखदूं लागलें. आणि त्याचवेळीं त्याला पुढून लाल सूर्य चिन्हांकित तीन विमानें जातांना दिसलीं. सुमेरनें आपल्या मशीनगनरला फोननें सांगितले व दोन मिनिटांच्या आंत तो फॅसिस्ट विमानांच्या मधोमध जाऊन थडकला. बोलायला वेळ लागतो. लिहायला तर आणखीहि अधिक लागतो, पण काय झालें तें समजलें देखील नाहीं. सुमेरचा गोलंदाज शरीफ यानें आपली मशीन गन ट्र ट्र ट्र केली आणि सुमेरनें आपलें विमान नेमक्या जागीं घातलें आणि दहा मिनिटांच्या आंतच तिन्हीं फॅसिस्ट विमानें पंख तुटलेल्या घारींप्रमाणें समुद्रास्तृप्यन्तु झालीं.

सुमेरला आपलें कौशल्य दाखवायला हीं पहिलीच संधि मिळालेली होती, पण मिळवलेल्या यशानें तो खूपच संतोषित झाला. विमान परतवतांना त्यानें शरीफला म्हटलें—

"शरीफ भैय्या, यानं आपल्या मोलाची भरपाई दिली करून. या प्रत्येक विमानानं जर तीन तीन फॅसिस्ट विमानांचा बळी घेतला तर कितीतरी छान होईल नाहीं?"

"माझ्या मनावरचं देखील आतां दडपण दूर झालं. आतां मेलों तरी तें फुकट जाणार नाहीं."

"आतां जितके दिवस जगूं, तितके दिवस जपानी फॅसिस्टांना लंबे करून नफाच नफा कमावूं."

सुमेर दोनशें दिवस जगला. त्यानें शंभर जपान्यांचे बळी घेतले. शेवटच्या दिवशीं बंगालच्या उपसागरांत त्याला काम मिळालें. अंदमानच्या पश्चिमेकडून एक जपानी आरमार जात होतें. सुमेरने चाळीस हजार टनांचें एक जपानी लढाऊ गलबत हेरलें. आरमाराच्या जवळपास संरक्षक विमानें उडत होतीं; परंतु दूर ढगांतून टिप्पण धरूं पाहणारे सुमेरचे डोळे त्यांना दिसूं शकले नाहींत.

सुमेरनें आपल्या गोलंदाजाला टार्पेडो तयार ठेवायला हुकूम सोडला. ढग तेथून तर आरमाराच्या वरपर्यंत पसरलेले होते. सुमेरने भरवेगानें आपलें विमान चालवलें, त्याचें विमान लढाऊ गलबतावर केव्हां थडकलें, केव्हां त्या हिंदी वैमानिकानें त्या गलबतावर टार्पेडोनी परिपूर्ण अशा आपल्या विमानाची झेंप घातली, हें शत्रूच्या विमानांना समजलें देखील नाहीं. सुमेर आणि त्याचा गोलंदाज यांचा पत्ता लागला नाहीं; पण त्यांनीं तें लढाऊ गलबत देखील आपल्याबरोबरच बेपत्ता केलें.

---

# आजच्या साहित्यकाराचें कर्तव्य

## भारतीय साहित्यिकांना महापंडित राहुल सांकृत्यायन यांचा संदेश

"एका काळीं सामन्तांच्या दरबारामार्फत युगपरिवर्तनाच्या कार्याला मदत मिळूं शकत होती. पण आजचा महान् साहित्यिक हा दरबारी साहित्यकार राहिलेला नाहीं. छापखाना, कागद, यन्त्र, रेडिओ, बोलपट इत्यादि विज्ञानशास्त्राच्या अद्भुत आविष्कारांच्या मार्फत तो जास्तींत जास्त जनतेला आपला संदेश पोंचवूं इच्छीत आहे. आजचा साहित्यिक दहा वीस सामन्तांपुरता आपला संदेश मर्यादित ठेवण्यांत कृतकृत्यता मानायला तयार नाहीं. आपल्या संदेशाच्या हजारो लाखों संस्करणांच्या द्वारां तो सामान्य जनतेच्या अगदीं खालच्या तळापर्यंत पोंचायची उमेद धरून असतो. म्हणूनच आजचा साहित्यकार आजच्या परिस्थितींत जर साहित्यकार होण्यापलीकडे अधिक कांहीहि होऊं शकत नसेल तर त्यानें आज जनमनाचें मनोरंजन केलें पाहिजे, आज त्यानें जनशक्तीला स्फूर्ति मिळवून दिली पाहिजे. आज तो जनतेला लढ्याकडे पाठ फिरवून पळून जाण्याचा संदेश देणारच नाहीं. उलट विशाल जनतेला साथ देत राहून, एकसारखी प्रगति करीत राहून, जनयुद्धामध्यें भाग घेऊन, निर्मितीला संपन्न करण्याची जबाबदारी त्याच्या शिरावर आहे. आज नुसती दुनियेची व्याख्या करण्यावर समाधान न मानतां दुनिया बदलून टाकण्याचे कामीं आपली सगळी शक्ति उपयोगांत आणण्याची सुवर्णसंधि साहित्यिकाला मिळालेली आहे. इतकी सुंदर संधि कोणत्या युगांतल्या साहित्यिकाला मिळालेली होती बरें ? आज त्याचा सगळा स्वार्थ व त्याची महत्वाकांक्षा यांचा जनतेच्या स्वार्थामध्यें पूर्णपणें अंतर्भाव झालेला आहे. म्हणूनच त्याला आपल्या तुच्छ स्वार्थसाधनासाठीं क्षुद्रपणा पतकरण्याची जरूर राहिलेली नाहीं. आज तो आपल्या व्यक्तित्वाला महान् स्वरूप देऊन सगळ्या समाजाच्या हितसंबंधाप्रीत्यर्थ प्रचंड आवाज उठवूं शकतो.

आम्ही जनतेचे साहित्यकार या चिरपुरातन व चिरनूतन जनशक्तीशीं आपलें जिव्हाळ्याचें नातें प्रस्थापित करूं शकतों. कारण आम्हांला जनतेच्या मनांतील भाव

उमगून घ्यायला पाहिजे; त्यांत सर्व उपयुक्त रसांचा परिपोष करण्यासाठीं जनतेची भाषा यशस्वी रीतीनें आत्मसात केली पाहिजे; जनता जी समजूं शकणार नाहीं अशा भाषाशैलींत आम्ही आपला संदेश गुरफटून ठेवतां कामा नये. साहित्यिकारांनें जनतेची सांस्कृतिक उंची वाढविण्याचें कार्य करूं नये असा याचा अर्थ नव्हे. साहित्यकार हा जनतेचा सामर्थ्यशाली दोस्त तर आहेच आणि त्याचबरोबर तो जनतेचा पुढारीहि आहे. तो शिपाईहि आहे आणि तो सेनानायकहि आहे. मात्र आजच्या सेनानायकाला, आजच्या पुढाऱ्याला, आपलें कर्तव्य उत्तम तऱ्हेनें पार पाडायचें असेल तर त्यानें जनतेशीं समरस झाले पाहिजे, आपल्या एकलकोंडेपणाची कोंडी फोडून बाहेर येण्याची उमेद धरली पाहिजे तरच जनतेच्या हृदयाचें स्पंदन, जनतेच्या मेंदूंत उद्भवणारे विचारतरंग, यांच्या प्रत्यक्ष अनुभूति घेऊन महान् साहित्याची निर्मिति तो करूं शकेल, साकार नवनिर्मितीला तो संपन्न करूं शकेल.

जनतेच्या हृदयाची ही संवेदना, जनतेविषयींची ही संवेदना, आम्हांला जनतेच्या सहस्रधार जीवनांतून सहस्र प्रकारच्या प्रेरणा देऊं शकते. अशा परिस्थितींत आम्ही आमच्या भोंवतालील जीवन-घटनाच्या बाबतींत उदासीन राहूं शकतों काय ? अर्थात् नाहीं. बंगालमधील भीषण घटना व मानवतेचे चीत्कार न ऐकण्याइतके आम्ही बहिरे झालों आहोत काय ? अर्थात् नाहीं. जर जनतेच्या सामर्थ्यावर आमचा विश्वास असेल तर आम्ही निराश व निरुपाय होण्याची आवश्यकताच नाहीं. जनतेच्या दुर्दम्य शक्तीनें फॅसिझमच्या काळ्या ढगांमध्यें आशेचा विद्युत्संचार जागृत केला आहे. ही अमोघ जनशक्तीच आमच्या भवितव्याची हमी आहे. ”

[ मध्यभारतीय फॅसिझमविरोधी लेखक-संमेलनाच्या इंदूर अधिवेशनाच्या

२६-१-४४ अध्यक्षपदावरून केलेलें भाषण ]

वरिवर वरवरं पाहिलें आहे

पण नीट आहे त्यामुळे गोड आहे तरी

गोड करण्याचे कारण नाही

दोघेहि विलग झाले तेव्हां चौघांच्याहि डोळयांत आनंदाचीं आंसवें होतीं. अकबरानें मौनाचा भंग करून म्हटलें—

"मी हा तरुण-तरुणींचा वसंतोत्सव कितीतरी वर्षांपासून करीत आहे पण खरा वसंतोत्सव आज इतक्या दिवसांनीं साजरा झाला. मनाला वाटतं, त्या दोघांना बोलावून घ्यावं आणि त्यांच्या कपाळांचं चुंबन घ्यावं. या त्यांच्या गंगा यमुना संगमामुळं आमचीं अंतःकरणं सुप्रसन्न झालीं हें त्यांना समजलं असतं, तर किती छान झालं असतं बरं ?"

अबुल फजल–"सुरैय्याला अजून हें माहित नाहीं कीं तिचे मातापिता तिच्या या प्रणयाला किती आनंदाची गोष्ट समजतात."

टोडरमल–"कमलला तरी कुठं माहित आहे ? पण फजल्, तूं मोठा भाग्याचा; सुरैय्याची आई देखील तुला पाठिंबा देत आहे. कमलची आई आणि सुरैय्याची आई या जिवाभावाच्या मैत्रिणी असल्या तरी कमलची आई जरा जुन्या विचाराची आहे. पण हरकत नाहीं, मीच कमल आणि सुरैय्या यांना आशीर्वाद देईन."

अकबर–"सर्वां आधीं आशीर्वाद देण्याचा हक्क मला मिळाला पाहिजे."

बीरबल–"आणि जल्लू मी रे ? मला आपल्या बरोबर नेणार नाहींस वाटतं ?"

अकबर–"नेईन तर ! असा धोबी कुठं मिळणार आहे थोडाच !"

बीरबल–"पण असा घोडा बनणारा गाढव तरी कुठं मिळेल दुसरा ?"

अकबर–"खरंच, आजच्या आपल्या गप्पागोष्टी किती आनंदानं झाल्या. असाच आनंद महिन्यांतून एखादा दिवस तरी मिळाला तर ?"

– ३ –

चहूं बाजूंनीं दारें असलेली एक सुशोभित खोली गच्चीवर होती. तिच्या छताला लाल, हिरवीं, पांढरीं झाडें कुंड्यांतून टांगलेलीं होती. दरवाजांवर दुहेरी पडदे सोडलेले होते, त्यांपैकीं आंतले पडदे बुटेदार गुलाबी रेशमाचे होते. सतरंजीवर सुंदर इराणी गालिचा आंथरलेला होता. खोलीच्या मधोमध असलेल्या पांढऱ्या गादीवर कितीतरी लोड मांडून ठेवलेले होते. गादीवर बसलेल्या तरुणी बुद्धिबळें खेळत होत्या. त्यांपैकीं एक आपल्या परिचयाची सुरैय्या असून, लाल घागरा, हिरवी चोळी आणि पिवळी ओढणी अशा पोशाखांतली फूलमती–बिरबलाची तेरा वर्षांची मुलगी होती. बुद्धिबळाचे डाव प्रतिडाव योजण्यांत त्या येवढ्या तल्लीन झाल्या होत्या कीं त्यांना गादीवर होत असलेल्या पावलांचा आवाज देखील ऐकायला आला नाहीं. "सुरैय्या" असा आवाज कानीं पडतांच मात्र त्या दोघींच्या नजरा वर गेल्या आणि मग त्या उठून उभ्या झाल्या. सुरैय्यानें "काकी" म्हणून हांक मारतांच, कमलच्या आईनें